श्रीमंत होळकर सरकार ग्रंथमाला, पुस्तक २९ वें

# मराठी साहित्य व व्याकरण



## विभाग १ व २



आवृत्ति चवथी

लेखकः—मोरेश्वर सखाराम मोने

सेवानिवृत्त शिक्षक—अध्यापिकाशाला, हिंगणें, पुणें.

सन १९४०

किंमत १ रुपया

# प्रस्तावना

" दुसरें कांहीं शिकला नाहींस तरी व्याकरण शीक, कारण तें शिकला नाहींस तर ' स्व-जनां'ना तूं ' श्व-जन ' ( कुत्रे ) करून टाकण्यासारखा मूर्खपणा तुझ्या हातून होईल " अशा अर्थाचें संस्कृतामध्यें एक सुभाषित आहे. त्यांतलि अतिशयोक्ति अर्थात् सोडली पाहिजे; परंतु व्याकरणाकडे अलीकडे जें बरेंचसें दुर्लक्ष होत आहे ती गोष्ट विशेष स्पृहणीय नाहीं असें माझें मत आहे. व्याकरणाविषयीं अप्रीति उत्पन्न झालेली आहे ती व्याकरण-विषयाच्या दोषामुळें नव्हे, तर विशेषें-करून तो विषय शिकविण्याच्या सदोष पद्धतीमुळे व थोडाबहुत त्या विषयावरील रूक्ष भासणाऱ्या पुस्तकांमुळे झालेली आहे.

माझे मित्र रा० मो० स० मोने यांनीं या दोन गोष्टी मनांत बाळगून, शिक्षकांना व विद्यार्थ्यांना कंटाळा न येतां वाचावेंसें वाटेल व याहून अधिक म्हणजे त्यांतील प्रश्नांविषयीं विचार करावासा वाटेल अशा तऱ्हेनें हें पुस्तक लिहिलें आहे. रा० मोने यांना व्याकरण-विषयाचा चांगला नाद आहे हें त्यांनीं लिहिलेल्या " **मराठी भाषेचे व्याकरणकार** " या पुस्तकावरून आणि प्राथमिक शाळांतून व हायस्कुलांतून त्यांच्या चालू असलेल्या " **आपलें बोलणें** " इत्यादि पांच-सहा व्याकरण-पुस्तकांवरून दिसून येते.

हें पुस्तक इंग्रजी सहावी, मॅट्रिक व ट्रेनिंग संस्थांमधलि विद्यार्थी यांकरितां अभ्यास-पुस्तक म्हणून नेमलें जावें या हेतूनें लिहिलें आहे; आणि त्यांत व्याकरण, छन्दःशास्त्र, अलंकार, काव्यचर्चा, व्युत्पत्ति व मराठी भाषेची परिणति, इतक्या साहित्यांगांचें त्रोटक विवेचन केलें आहे. सरकारनें नेमलेल्या ग्रॅमर-कमिटीनें प्राथमिक शाळांतील व्हर्नाक्युलर फायनलच्या विद्यार्थ्यांकरितां जो व्याकरणाचा विषय ठरविलेला आहे, त्यापेक्षां थोडी तरी ज्यास्त लायकी मॅट्रिकच्या विद्यार्थ्यांची व ट्रेनिंग संस्थांमधून बाहेर पडणाऱ्या भावी शिक्षक-विद्यार्थ्यांची असली पाहिजे, हें कोणासही मान्य होईल. अशा विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरितां सध्यांचा मॅट्रिकचा अभ्यासक्रम व ट्रेनिंगच्या विद्यार्थ्यांचा अभ्यासक्रम डोळ्यांपुढें ठेवून पुस्तकाची सुटसुटीत व बांधेसूद रचना त्यांनीं केलेली आहे.

या पुस्तकाचे **साहित्य-विभाग** व **व्याकरण-विभाग** असे दोन भाग केले आहेत. हल्लीं निरनिराळ्या लेखकांच्या वाङ्मयांतील उताऱ्यांचीं वाचन-पुस्तकें हायस्कुलांतून व ट्रेनिंग संस्थांतून अध्ययनाकरितां लाविलीं जातात. त्या पुस्तकांतील सुप्रसिद्ध लेखकांच्या व कवींच्या भाषेमधील वैशिष्ट्य व रसग्रहणाच्या दृष्टीनें आवश्यक अशा गोष्टी, तसेंच प्रत्येक काल-विभागांत मराठीचा आढळून येणारीं स्थित्यन्तरें, ' **मराठी भाषेचा इतिहास** ' ह्या प्रकरणांत स्पष्ट दिग्दर्शित होतील अशा रीतीनें मांडलीं आहेत.

'**काव्यविचार**' या प्रकरणांत काव्यगुण, काव्यांतील रस, प्रमुख अलंकार, भाषा-कला-विलासाची सुभाषित, कोटि, विनोद, म्हणी, इ० अंगे, व कांहीं काव्यदोष यांचें उदाहरणांसहित स्थूल दृष्टीने विवेचन केलें आहे.

'**छन्दःशास्त्र**' या प्रकरणांत जुन्या कवींच्या कवितांचीं **श्लोक-वृत्तें** व आधुनिक कवींनीं गाऊन प्रसृत केलेलीं **जाति-वृत्तें**, यांचीं लक्षणे व उदाहरणे यांसहित सुबोध माहिती दिली आहे. हल्लींच्या क्रमिक पुस्तकांतून आधुनिक कवींची सुंदर पद्ये ग्रथित केलेलीं असतात; आणि मुले तीं आवडीनें गुणगुणत असतात; अर्थात् त्या पद्यांच्या रचनेची छन्दःशास्त्रदृष्टया माहिती जुन्या श्लोकात्मक वृत्तांच्या रचनेप्रमाणेच प्रौढ विद्यार्थ्यांस अत्यन्त आवश्यक आहे, ही गोष्ट ओघानेच उत्पन्न होणार; म्हणून त्या माहितीचा समावेश इतर कोणीं अद्यापपर्यंत केला नाहीं अशा सुबोध स्वरूपांत (छन्दोरचना ह्या पुस्तकाच्या आधारे) या पुस्तकांत रा० मोने यांनीं केला आहे.

**व्युत्पत्ति-प्रकरणांत** मराठी शब्द-घटनेचे स्वरूप थोडक्यांत दिले असून वर्णभेद, वर्णवृद्धि, वर्णलोप, वर्णविपर्यय आणि लक्षणा किंवा रूढि इत्यादिकांच्या योगानें अर्थान्तर पावणाऱ्या कांहीं मनोरंजक व निवडक शब्दांची व्युत्पत्ति दिली आहे.

**व्याकरण-विभागामध्ये** आतापर्यंत मराठी व्याकरण-विषयासंबंधीं चर्चा होऊन जीं मतें निश्चित ठरलीं त्यांचा (विशेषतः दामले यांच्या व्याकरणाच्या आधारें) रा० मोने यांनीं समावेश केलेला आहे. तथापि सरकारने नेमिलेल्या ग्रॅमर कमिटीनें प्राथमिक शाळांकरितां व्याकरणाचा जो अभ्यासक्रम ठरविलेला आहे, त्यास विसंगत होणार नाहीं, अशा प्रकारें विवेचन करण्याचें धोरण ठेविल्यामुळे कांहीं ठिकाणीं कोणाचा मतभेद झाल्यास त्यास त्यांचा उपाय नाहीं. प्रमुख समास, संधि, विभक्ति, कारकें, संयुक्त क्रियापदें, प्रयोग, इ० गोष्टींबद्दल थोडक्यांत त्या त्या प्रकरणांत जी चर्चा केली आहे, ती ट्रेनिंगच्या विद्यार्थ्यांस स्मरणांत ठेवण्यास व त्यांस शिकविणाऱ्या विद्वान् अध्यापकांस वर्गात अधिक मार्मिक विवेचन करण्यास उपयुक्त होईल अशी आहे. **वाक्यपृथक्करणांसंबंधीं** यथोचित विवेचन केलें असून, शाळाखात्याने ठराव करून वाक्य-पृथक्करणाचा जो आराखडा मान्य केला आहे, तोच सुटसुटित असल्यानें त्यांनीं स्वीकारिलेला आहे. याशिवाय **पद्य-विशेष, विराम-चिन्हें** व **लेखन-शुद्धि** यांचाही या विभागांत समावेश केला आहे.

तात्पर्य, हें पुस्तक शालोपयोगीच नव्हे, तर सामान्य जिज्ञासु वाचकांसही उपयुक्त होईल असें झालें आहे. रा० मोने हे आज १५।२० वर्षे शिक्षकाचें काम करीत असल्यामुळें शिक्षकांच्या व विद्यार्थ्यांच्या काय अडचणी असतात हे त्यांना ठाऊक झालें आहे. अशा हौशी व अनुभवी शिक्षकाच्या हातून लिहिले गेलेलें हे व्याकरण-विषयक पुस्तक चांगले उतरले आहे असें मी आश्वासन देऊं शकतों. रा० मोने यांनीं मराठी ग्रंथांत अशा पुस्तकाची भर घातल्याबद्दल त्यांचे अभिनंदन करणें जरूर आहे.

श्री० ना० दा० ठाकरसी कॉलेज,
एरंडवणें, पुणें. ता० १९।१२।३४

**वा० म० जोशी**

# अ भि प्रा य

[ १ ]

माझे मित्र रा० मो० स० मोने यांनीं नुकतेंच लिहिलेलें "**मराठी साहित्य व व्याकरण**" हें पुस्तक छापत असतांनाच त्यांनीं मला वेळोवेळीं दाखविलें. त्यांतील बहुतेक प्रकरणें मीं वाचलीं आहेत; व त्यांवरून मला अशी निश्चिति वाटते कीं, हें पुस्तक कर्त्याच्या अपेक्षेप्रमाणें इंग्रजी हायस्कूलमधील व मराठी ट्रेनिंग कॉलेजांतील विद्यार्थ्यांस उपयुक्त होईल; व त्यांच्या भाषाशास्त्राच्या अध्ययनासंबंधाच्या सर्व गरजा ह्या पुस्तकानें भागतील.

परीक्षेंत उत्तीर्ण होण्याची भाडोत्री दृष्टि बाजूस ठेवून व ज्ञानाकरितां ज्ञानार्जन ह्या दृष्टीनें पाहूं जातां, 'मराठी भाषेचा इतिहास' हें प्रकरण विशेष उपयुक्त आहे. यांत अंगें दोन. (१) मराठी भाषेच्या परिणतेची संकलित माहिती,–अर्थात् संस्कृत व प्राकृत भाषा यांचे द्वारा तिचें जनन व क्रमविकास यांबद्दल साधार विवेचन;— आणि (२) मराठी भाषेच्या अत्यन्त जुन्या रूपांपासून तों वर्तमानकालीन नव्या रूपांपर्यंत सर्वच रूपें धारण करणाऱ्या अनेक निवडक उताऱ्यांचा संग्रह. पैकीं पहिल्या अंगाबद्दल ज्या ग्रंथांच्या आधारांवरून ती माहिती लिहिली आहे ते पूर्व-ग्रंथकार अभिनंदनास विशेषतः पात्र असले तरी दुसरें अंग जे उतारे, ते रा० मोने यांनींच विद्यार्थ्यांस उपयुक्त असे सपरिश्रम शोधून व निवडून ग्रथित केले असल्यानें त्यांबद्दल तेच अभिनंदनार्ह ठरतात. हे उतारे एकामागून एक वाचतांना वाटतें कीं आपल्यापुढें जुन्या ज्ञानेश्वर–कालापासून तों वर्तमान केळकर-काळापर्यंतचा मराठी भाषेच्या स्थित्यन्तराचा चित्रपटच उलगडत आहे. त्यांत सांठलेल्या विविध व मनोरंजक ज्ञानानें व भाषेच्या रूपवैचित्र्यानें मनाची चांगलीच उदात्त करमणूक होते; म्हणून सामान्य वाचकांसही मी असें सप्रशंस सुचवितों कीं, त्यांनीं इतर प्रकरणें न वाचिलीं तरी 'मराठी भाषेचा इतिहास' हें प्रकरण अवश्य वाचावें. या वाचनापासून त्यांना ज्ञान व मनोरंजन हीं दोन्ही लाभतील.

इतर साहित्यांगांच्या दृष्टीनें पाहतांही लेखकानें हें पुस्तक आजच्या कालापर्यंत आणून ठेवलें आहे, हें त्यांतील छन्दः–शास्त्र या प्रकरणावरून उघड दिसून येतें. प्रो० मा० त्रिं० पटवर्धन यांनीं जुन्या व नव्या वृत्तांचा संग्रह 'छंदोरचना' या स्वतंत्र पुस्तकांत केला आहे; पण त्यांतील विविध उपयुक्त ज्ञान—विशेषतः नव्या चालींच्या वृत्तांविषयीं माहिती—विद्यार्थ्यांच्या आटोक्यांत सुलभपणें आणून देण्याचें काम रा० मोने यांनींच केलें आहे; अर्थात् त्याबद्दलचें श्रेय त्यांसच आहे. शिवाय या ग्रंथांतील निरनिराळ्या प्रकरणांच्या उत्कृष्टत्वाबद्दल प्रस्तावक

रा. वामनराव जोशी यांशीं मी पूर्ण सहमत आहें; म्हणून त्यांच्यापेक्षां कांहीं अधिक लिहिण्याचें मला प्रयोजन दिसत नाहीं.

न्यू इंग्लिश स्कूल, पुणें
ता० २४।१२।३४ } गो० कृ० मोडक

[ २ ]

रा० मो० स० मोने यांस, सा० न० वि० वि०

आज तपशीलवार ५१ सूचना लिहून पाठविल्या आहेत ... **शेवटीं**, पुढील गोष्ट आपणांस सांगाव्याशा वाटतात.

( १ ) अगदीं पहिली गोष्ट म्हणजे ही कीं, दादोबा, दामले किंवा रामभाऊ जोशी असें असें म्हणतात म्हणून कोणतीही सूचना मीं आपणांस केलेली नाहीं, किंवा त्यांचा कोणाचाही आधार मी कोठें घेतलेला नाहीं. मला जें एकंदर विचार करून योग्य वाटलें तेंच तेवढें मी आपणांस सुचविलें आहे.

( २ ) मीं ह्या सर्व सूचना आपणांस दोन हेतूंनीं केल्या आहेत. मला हें आपलें पुस्तक फार आवडलें व तें फार सुंदर व उपयुक्त वाटलें. म्हणून—विशेष कांहींच पानें न वाढतां—तें अधिकच पूर्ण, सुंदर, उपयुक्त व निर्दोष व्हावें हा तपशीलांतील सर्व सूचना करण्याचा माझा हेतु आहे; आणि वाङ्मयात्मक लेखक, शिक्षक, वगैरेंस ' हँडबुका ' प्रमाणें सर्वसंग्राहक, बाळगण्यास सोपा असा लहानसा संदर्भ-ग्रंथ ह्या नात्यानें तें अधिकच उपयुक्त व पूर्ण व्हावें, हा सर्वसामान्य ह्या सदरांतील सूचना करण्याचा हेतु आहे.

( ३ ) शिवाय मराठी व्याकरणाची कांहीं थोडी सेवा घडावी, हाही ह्या सूचना करण्यात माझा हेतु आहे.

( ४ ) मराठी वाङ्मयाचा इतिहास संपल्यानंतर एकादें परिशिष्ट देऊन मराठी वाङ्मयांतील सर्वांत महत्त्वाच्या गोष्टींची सनवारीसह एक लहानशी यादी द्यावी. उदा०—अगदीं पहिलें नाटक, कादंबरी, आधुनिक काव्याची सुरुवात, साहित्य-संमेलनाची स्थापना; इ० तसेंच मराठींतील निर्विवादपणें सर्वोत्तम व वाङ्मयांत महत्त्वाचें स्थान प्राप्त करून देणाऱ्या ग्रंथांची यादी. उदा०—ज्ञानेश्वरी, दासबोध, गीतारहस्य, इ०; मराठींतील सर्वोत्तम किंवा प्रसिद्ध ग्रंथकारांच्या जन्म-मृत्यूंच्या सनासह यादी. उदा०—विष्णुशास्त्री चिपळूणकर, टिळक, आगरकर, आपटे, खाडिलकर, परांजपे, इ०; ह्यांशिवाय महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाच्या शुद्धलेखन-मंडळाच्या निर्णयाची यादी द्यावी. शक्य तर सर्व ग्रंथांत त्याचें अवलंबन करावें.

कळावें, हे विनंति.

हिंदु विश्वविद्यालय
काशी; ता० २।२।३६ }

आपला,
**बळवंत गणेश खापर्डे**

# भूमिका

" सध्यांच्या देशस्थितींत पुस्तकें लिहिणारांनीं शुद्ध भाषाविषयक वादांत आपली हिंमत खर्चावी किंवा नाहीं ? शेंकडा नव्याण्णव लोकांस ज्याची पर्वा नाहीं किंवा गरज नाहीं, अशा व्याकरणासारख्या एकदेशीय विषयांत काळ घालविणें कितपत फायदेशीर आहे ? यास उत्तर असें कीं, एक तर मराठी भाषेस उत्तरोत्तर उन्नतावस्था येत जाणार आहे, अशी खातरी असल्यामुळें या कामास मीं हात घातला " असें कै० **आगरकर** यांनीं आपल्या '**वाक्य-मीमांसें**' त म्हटलें आहे; आणि त्याच कारणास्तव मींही हें पुस्तक लिहिण्यास हात घातला. शिवाय, एकाद्या गोष्टीचा नाद किंवा वेड म्हटलें तरी चालेल; हेंही हें पुस्तक लिहिण्याचें माझें दुसरें कारण आहे. तिसरें कारण असें कीं, 'मराठी' हा विषय आणि व्याकरण व तदन्तर्गत अलंकार, व्युत्पत्ति, छन्दःशास्त्र, काव्यचर्चा, इ० गोष्टींकडे विद्यार्थ्यांचें किंवा विद्यापीठांचें सध्यां फारसें लक्ष नाहीं ही गोष्ट खरी असली, तरी विद्यापीठांतील 'मराठी' विषयाचे विद्वान् सभासद व ट्रेनिंग कॉलेजांचे चालक यांस त्यासंबंधानें कांहीं आस्था नाहीं असें नसून, त्यांनाही '**मराठी**' चा विशेष पुरस्कार करण्यांत कांहीं अडचणी असाव्या, हेंच अधिक संभाव्य आहे. अर्थात् योग्य काल आल्यानंतर—आणि आगरकरांच्या वरील भाकिताप्रमाणें तो येणार हें खचित—या विषयाचें अधिक आस्थापूर्वक अध्ययन विद्यार्थ्यांकडून व्हावें, अशी योजना विद्यापीठांकडून व ट्रेनिंग संस्थांकडून होईल, यांत कांहीं शंका नाहीं. अशा वेळीं मराठीच्या अभ्यासकांस जशा प्रकारचीं पुस्तकें असावीं, तशा प्रकारचें हें पुस्तक मराठीची आस्था बाळगणाऱ्यापुढें मीं ठेवीत आहें.

हें पुस्तक प्रथम दोन वेळां प्रि० **महादेव काशीनाथ कारखानीस** (ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन, धुळें) यांनीं वाचून पाहिलें. तसेंच माझे आप्त व न्यू इंग्लिश स्कूलमधील विद्वान् शिक्षक श्री० **गोविंद कृष्ण मोडक** यांनीही पुस्तक छापत असतां आपुलकीचे भावानें बराचसा भाग वाचून पाहिला. या उभयतांनींही ज्या अमूल्य सूचना केल्या, त्यांबद्दल त्यांचे मी प्रथम आभार मानितों. तथापि पुस्तक सुटसुटीत व्हावें म्हणून अनेक ठिकाणचीं निवडलेलीं अनेक उदाहरणें कमी करून तें हल्लींच्या स्वरूपांत दिसत आहे. असें करीत असतांना, माझ्या हातून कांहीं न्यूनाधिक झालें असल्यास त्याचा जबाबदार मीच आहें.

या पुस्तकांतील विशेषांसंबंधानें प्रस्तावनाकार प्रो० **वा० म० जोशी**, यांनीं जें लिहिलें आहे त्यापेक्षां मला कांहीं ज्यास्त सांगावयाचें नाहीं. या पुस्तकाच्या लेखनाच्या कामीं मला शेंकडों पुस्तकें वाचावीं, चाळावीं व अभ्यासावीं लागलीं; तीन वर्षें सक्त परिश्रम झाले; पुढें ज्यांनीं आपल्याकरितां पुस्तकाची माझ्याकडे

मागणी केली त्याच्या अभिवचनांतच एक वर्ष खर्ची पडलें; अखेर मराठीचा युनिव्हर्सिटीत व इतरत्र कोणी वाली नाही या सबबीवर ते परत करण्यांत आलें; हें सर्व समजून उमजून चित्रशाळेच्या चालकांनी ते छापावयास घेतलें, ही गोष्ट त्यांनी विशेष केली यात कांही शंका नाही; म्हणून त्यांचे येथे आभार मानणे अवश्य आहे.

हे पुस्तक लिहीत असतां **'छन्दोरचना'** व **'मराठी भाषा उद्गम व विकास'** ह्या पुस्तकांचा मला बराच उपयोग झाला. माझ्या पुस्तकातील जाति-वृत्तासंबंधाचा भाग तर मीं पहिल्या पुस्तकाच्या आधारेंच लिहिला आहे; यास्तव आपल्या पुस्तकाचा उपयोग करण्यास परवानगी दिल्याबद्दल मी माझे मित्र प्रो० **माधव त्रिंबक पटवर्धन** (राजाराम कॉलेज, कोल्हापूर) यांचा फार आभारी आहें. त्याचप्रमाणें दुसऱ्या पुस्तकाचे लेखक व माझे दुसरे मित्र श्री० **कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी** यांचाही मी आभारी आहे.

आमच्या संस्थेंतील आमचे प्रोत्साहक प्रो० **वा० म० जोशी** यांनी मार्मिक प्रस्तावना लिहून दिल्याबद्दल त्याचे मी मन:पूर्वक आभार मानितों.

मराठी ग्रंथोत्तेजक मंडळ-इंदोर, या संस्थेनें माझ्या 'मराठी भाषेचे व्याकरणकार' या पुस्तकास आपल्या मालेत समाविष्ट करून घेऊन पूर्वी दोनशे रुपये उत्तेजनादाखल दिले होते; होळकर सरकारकडून काटकसरीच्या धोरणामुळे सदरहू संस्थेस मिळणारी मदत आता बंद झाली आहे. अर्थात् त्या संस्थेला पूर्वीप्रमाणें लेखकांस उत्तेजन देतां येणें अशक्य आहे; तरीही त्या संस्थेच्या परीक्षक-मंडळाने माझें हे पुस्तक पाहून त्यास आपल्या मालेंत समाविष्ट करण्याची परवानगी दिली आहे, याबद्दल मी त्या मंडळाचे कृतज्ञता-बुद्धीनें आभार मानितों.

'अध्यापिका-शाला,'
हिंगणें, पुणे. ता० २०।१२।३४

आपला नम्र,
**मोरेश्वर सखाराम मोने**

## आवृत्ति दुसरी

प्रो० व० ग० खापर्डे, बनारस, यांनीं वेळांत वेळ काढून माझे हें पुस्तक समग्र तपासून पाहिलें व विस्तृत परीक्षण मला लिहून पाठविलें. त्यांतील अमूल्य सूचनांचा स्वीकार करून, ही आवृत्ति पुष्कळच निर्दोष करण्याचा मीं प्रयत्न केला आहे. प्रो० खापर्डे यांचा पुस्तकावरील सामान्य अभिप्राय दुसरीकडे दिलाच आहे. त्यांच्या माझ्याविषयींच्या ह्या प्रेमाबद्दल मी त्यांचे आभार मानीन तेवढे थोडेच.

(१) 'मराठी भाषेचा इतिहास' हें माझ्या प्रथमावृत्तीतील प्रकरण पुष्कळांस आवडलें; पण तो इतिहास बृहन्महाराष्ट्रांतील उत्कृष्ट वाङ्मय-लेखकांच्या कृतींचा विद्यार्थ्यांस परिचय करून दिल्याशिवाय अपूर्ण असाच वाटत होता, याची जाणीव मला प्रथमावृत्तीचे वेळींही होतीच; आणि ती मी प्रारंभीं माझ्या 'भूमिके'त व

पुस्तकाच्या शेवटच्या पानांतील समारोपांत दिलगिरीपूर्वक व्यक्तही केली होती. ही उणीव विस्तृत वाचनाच्या अभावी मला भरून काढतां येणे अशक्य होतें; पण ती पूर्ण करणारे त्या त्या प्रांतांतील विद्वान्, तज्ज्ञ व सुप्रसिद्ध लेखक मला लाभले, हा ह्या पुस्तकाचा योगायोगच होय. त्यांच्या सहकारितेनें '**बृहन्महाराष्ट्रीय साहित्या**'ची जोड मला ह्या पुस्तकास देतां आली, ही ह्या द्वितीयावृत्तींतील मुख्य सुधारणा होय. विदर्भसाहित्य—प्रो० कोलते, उमरावती; बडोदरसाहित्य—प्रो० दाडेकर, बडोदें; मालवसाहित्य—ग० वा० कवीश्वर, एम्. ए., मंडलेश्वर; मराठवाडा साहित्य—डॉ० गाडगीळ, हैद्राबाद; आणि गोमंतकसाहित्य—दत्तात्रेय व्यंकटेश पै, मडगाव; या विद्वानांनी तत्प्रांतीय वाङ्मयाचें समालोचन करून 'न्यून तें पूर्ण केलें पाहिजे । विद्वज्जनीं' या वचनाची सार्थकता करून दिली ह्याबद्दल मी ह्या सर्वांचा ऋणी आहें.

( २ ) पुस्तकांतील विषय आतांच्या क्षणापर्यंतचा नसला, तर त्यांत नावीन्य उरणार नाहीं; ह्या जाणीवेनें मराठी कादंबऱ्या, लघुकथा, नाटकें, इतिहास, कविता, ह्यांचें विहंगमावलोकन करून, विमानात बसलेल्या मनुष्याला मराठी साहित्यसृष्टींत काय मनोरम दृश्य आढळेल, तें थोडी पानें ज्यास्त घालून, दाखविण्याचा प्रयत्न केला आहे; ही ह्या आवृत्तींतील दुसरी सुधारणा होय.

( ३ ) कै० हरीभाऊ आपटे यांनी केलेले मार्मिक काव्यलक्षण, कांहीं अधिक अलंकार व उदाहरणाची सोपी निवड, एवढा फरक काव्य-विचार या प्रकरणांत केला आहे.

( ४ ) प्राथमिक व दुय्यम शाळात हल्ली चालू असलेल्या क्रमिक सुंदर वाचन-पुस्तकांतील एकून एक पद्यें पाहून, त्यांतीं अक्षर-वृत्ते व जाति-वृत्तें हीं छन्दःशास्त्रांत समाविष्ट केलीं आहेत.

( ५ ) लेखनशुद्धीमध्यें म० सा० परिषदेच्या शुद्धलेखन-मंडळानें ठरविलेल्या व नागपूर विद्यापीठासारख्या अनेक संस्थांनी मान्य केलेल्या शुद्धलेखनाचें स्वरूप पूर्वीच्या नियमांबरोबरच देऊन अधिक स्पष्ट केलें आहे.

काव्यविचार हा भाग गो० कृ० मोडक यांनी व जातिवृत्तासंबंधी भाग प्रो० माधवराव पटवर्धन यांनीं पाहून दिला; कानडी शब्द रा० विठ्ठलराव शिंदे यांनी व पोर्तुगीज शब्द द० व्यं० पै यांनी चिकित्सापूर्वक पाहून दिले; त्यांबद्दल त्यांचा मी आभारी आहें.

मुंबई विद्यापीठ, आग्रा विद्यापीठ, अजमेर एज्युकेशन बोर्ड आणि पुणें व धुळें येथील ट्रेनिंग कॉलेजे, यांत या पुस्तकाचा पुरस्कार झाला आहे, हे लिहिण्यास मला आनंद वाटतो.

अध्यापिका-शाला,<br>हिंगणें, पुणें,<br>ता० २।६।१९३६

आपला नम्र,<br>**मो० स० मोने**

# आवृत्ति तिसरी

प्राथमिक शाळांतील व्याकरण-पुस्तकें नवीन धर्तीवर मीं प्रथम लिहिलीं; त्यांप्रमाणेंच मॅट्रिकच्या व ट्रेनिंगच्या विद्यार्थ्यांकरितां हें 'मराठी साहित्य व व्याकरण' ह्या प्रकारचें पुस्तक मींच प्रथमतः लिहिलें. ह्या दोन्ही पुस्तकांची लगेच अनुकरणात्मक पुस्तकें निघूं लागलीं. कांहीं विद्वत्तेच्या नांवावर भराभर भरडून काढून छापलीं गेलीं व कांहीं इतिहास-भूगोलांच्या पत्रकांप्रमाणें जंत्रीवजा खरडलीं गेलीं. त्या पुस्तकांच्या स्वरूपांचा कांहीं विचार न करितां, आपल्या पुस्तकाचें नावीन्य व वैशिष्टय कायम राखण्यासाठीं ह्या पुस्तकांत खालीलप्रमाणें कांहीं सुधारणा केल्या आहेत.

( १ ) 'बृहन्महाराष्ट्रीय साहित्य' हा भाग वेगळा न ठेवितां, **मराठी भाषेचा इतिहास** ह्या प्रकरणांतच त्यांतील मजकुराचा समावेश केला आहे. प्रांतीय वाङ्मयाचीं आतां स्वतंत्र पुस्तकें निघूं लागल्यामुळें तसें करणें अवश्यच होतें; शिवाय प्रांतिक वाङ्मय व प्रांतीय लेखक ह्यांचें एकंदर मराठी वाङ्मयांत असलेलें स्थान दिग्दर्शित व्हावयास पाहिजेच होतें; म्हणून हा फरक केला आहे.

( २ ) प्राचीन काल-विभागांतील प्रमुख कवींची स्वतंत्रपणें माहिती दिली आहे व त्यांच्या जन्म-मृत्यूंचे काल ज्ञानकोशावरून निश्चित केले आहेत. त्याचप्रमाणें अर्वाचीन प्रमुख कवि व लेखक यांचीही मिळाली तेवढी माहिती थोडक्यांत दिली आहे.

( ३ ) 'अर्वाचीन गद्या'चे **छत्रेयुग**, **दादोयुग**, **शास्त्रीयुग**, **मालाकारयुग**, **केळकरयुग** व **फडकेयुग**, असे भाग पाडिले असून, 'अर्वाचीन कविते'चे **भाषान्तरयुग**, **आरंभ-काल**, **उत्कर्ष-काल** व **शाहीर कवि**, असे भाग पाडिले आहेत, त्यांयोगें अर्वाचीन कवितेचीं स्थित्यन्तरें स्पष्ट कळून येतील.

( ४ ) '**विहंगमावलोकन**' हें प्रकरण आजच्या क्षणापर्यंत आणून पोंचविलें आहे.

( ५ ) '**पवढें पुरे**' या सदरांत मार्मिक प्रश्न व त्यांचीं उत्तरें ज्या पानांत सांपडतील ते पृष्ठांक दिले आहेत; त्यांचा विद्यार्थ्यांस उजळणी करण्यास फार उपयोग होईल.

( ६ ) इंग्रजी **चौथी, पांचवी व सहावी**, या वर्गांत ह्या पुस्तकांतील कोणता भाग घ्यावा, त्याची केव्हां केव्हां मर्यादा ठरविणें कठीण जातें; म्हणून शिक्षकांकरितां त्यासंबंधीं सामान्य माहिती प्रारंभीं दिली आहे.

वामन-मोरोपंतांचीं उदाहरणें ह्या पुस्तकांत जागोजाग आढळतील: आजच्या विद्यार्थ्यांना तीं जडही वाटतील हें खरें, तरी त्या कवींच्या काव्याचें थोडें-फार अध्ययन आजच्या कालांतही अवश्य असल्यानें सहेतुकच तीं उदाहरणें ठेविलीं आहेत.

हें पुस्तक मुख्यतः विद्यार्थ्यांकरितां असलें, तरी पुण्या-मुंबईशिवाय जेथें संदर्भ-ग्रंथ-सामग्री तुटपुंजी, अशा ठिकाणच्या अनेक शिक्षकांनाही ह्या पुस्तकाची उपयुक्तता अधिक वाटते; व कांहींनीं तसें कळविलेंही म्हणून कांहीं छाटाछाट न करितां, पुस्तकाचें मूळचें स्वरूपच ठेविलें आहे.

आजचे लेखक, आजचे कवि, आजचीं साहित्य-संमेलनें, आजचीं विद्यापीठें व विद्यमान सरकारें हीं प्रांतिक भाषांच्या विषयीं अधिक आस्थेवाईक बनत चाललेलीं आहेत, असें स्पष्ट दिसत आहे; आणि प्रथमावृत्तींत निर्देशिलेलें 'मराठी ' भाषा उत्तरोत्तर उन्नतावस्थेस येत जाणार ' हें आगरकरांचें भविष्य आज सुफलित होण्याच्या मार्गांत आहे, हें पाहून अत्यन्त आनंद. वाटतो; म्हणून माझ्या ह्या मराठी भाषाविषयक अध्ययनाच्या पुस्तकाला ज्या विद्यापीठांनीं, ट्रेनिंग संस्था व इतर संस्था यांनीं आणि तज्ज्ञांनीं मान्यता दिली व पुरस्कार केला, त्यांचे मी या प्रसंगीं फार फार आभार मानितों.

अध्यापिकाशाला,
हिंगणें, ता० ४।५।३८

आपला,
**मो० स० मोने**

## आवृत्ति चौथी.

या आवृत्तींत "**आजच**" या सदरांत गेल्या २ वर्षांत बाहेर पडलेल्या कांहीं उत्कृष्ट ग्रंथांची थोडक्यांत ओळख करून दिली आहे; यापेक्षां अधिक कांहीं फरक केला नाहीं.

फडतरे वाडा,
६०८ सदाशिव पेठ,
पुणें, ता. २५।४।१९४०

आपला,
**मो० स० मोने**

---

# मो० स० मोने यांचीं पुस्तकें

## ( चित्रशाळेनें प्रकाशित केलेलीं )

| | | |
|---|---|---|
| १. | मराठी भाषेचे व्याकरणकार | २–०–० |
| २. | पंचवार्तिक ( प्रति शिल्लक नाहींत ) | ०–४–० |
| ३. | मराठी साहित्य व व्याकरण ( मॅट्रिक व ट्रेनिंगकरितां टेक्स्ट ) | १–०–० |
| ४. | " अभिनव–साहित्य–सोपान " ( इंग्रजी पहिलीकरितां टेक्स्ट ) | ०–४–० |
| ५. | " अभिनव–साहित्य–सोपान " ( इंग्रजी दुसरीकरितां टेक्स्ट ) | ०–५–० |
| ६. | " अभिनव–साहित्य–सोपान " ( इंग्रजी तिसरीकरितां टेक्स्ट ) | ०–६–० |
| ७. | " अभिनव–साहित्य–सोपान " ( इंग्रजी चौथीकरितां टेक्स्ट ) | ०–७–० |
| ८. | " अभिनव–साहित्य–सोपान " ( इंग्रजी पांचवी व सहावीकरितां. छापत आहे ) | |

# मॅकमिलन आणि कंपनीनें प्रकाशित केलेलीं.

| | | |
|---|---|---|
| १. | " आपलें बोलणें " पु. १ लें ( म० ३ व ४ करितां टेक्स्ट ) | ०–४–० |
| २. | " आपलें बोलणें " पु. २ रें ( म० ५ व इं. १ करितां ,, ) | ०–४–० |
| ३. | " आपलें बोलणें " पु. ३ रें ( म० ६ व इं. २ करितां ,, ) | ०–५–० |
| ४. | " आपलें बोलणें " पु. ४ थें ( म० ७ व इं. ३,४,५ करितां ) | ०–६–० |
| ५. | संक्षिप्त मराठी व्याकरण ( प्रति शिल्लक नाहींत ) | ०–४–६ |

# अनुक्रमणिका

## विभाग पहिला

### १. मराठी भाषेचा इतिहास ( पृष्ठें १ ते १३३ )

#### प्राचीन मराठी



#### अर्वाचीन मराठी



#### विहंगमावलोकन

---

# विभाग पाहिला

# मराठी साहित्य

## मराठी भाषेचा इतिहास

### उत्पत्ति

१. मराठी भाषेच्या उत्पत्तीसंबंधानें विद्वानांत एकमत नाहीं; संस्कृत भाषेपासून **मागधी, पैशाची, शौरसेनी व महाराष्ट्री** या प्राकृत भाषा झाल्या आणि त्यांपैकीं महाराष्ट्री नांवाच्या प्राकृत भाषेपासून मराठीची उत्पत्ति झाली. म्हणजे मराठीची महाराष्ट्री प्राकृत ही आई व संस्कृत ही आजी, असें **भारताचार्य चिंतामणराव वैद्य** इ० कांहीं विद्वानांचें म्हणणें आहे. वर्णलोप, वर्णवृद्धि, वर्णविपर्यय, इ० फरकांनीं संस्कृतापासून प्राकृत (महाराष्ट्री) आणि प्राकृतापासून मराठी, अशी ढोबळ व सरळ उत्पत्ति ते प्रतिपादितात.

| सं० | प्रा० | म० | सं० | प्रा० | म० |
|---|---|---|---|---|---|
| कार्य | कज्ज | काज | अंगार | इंगालो | इंगळा |
| सर्प | सप्प | साप | हृदय | हिअअ | हिय्या |
| अरघट्ट | रहट्ट | रहाट | त्रयोदश | तेरह | तेरा |
| घोटक | घोडअ | घोडा | कुब्ज | खुज्जो | खुजा |
| द्विगुण | दउण | दूणा | विष | विख्ख | वीख |

(१) **सं०** — नाथ, अश्रुतपूर्वं ईदृशं वचनं तत् पुनः भण

**प्रा०** — णाह, अस्सुदपूव्वं एदिसं वअणं ता पुणो भणाहि

**म०** — नाथ, अश्रुतपूर्व असें वचन तें पुनः म्हण.

(२) **सं०** —अत्र स्तोकमपि शुभसूचकं नास्ति
**प्रा०** —एत्थ थोआंवि सुहसुहअं णत्थि
**म०** —येथें थोडेंहि शुभसूचक नाहीं याप्रमाणें.

२. दुसऱ्या पक्षाचें म्हणणें असें कीं, मराठी भाषा कोणत्याही एका प्राकृतापासून निघाली नसून सर्व प्राकृत भाषांतील शब्द तिनें घेतले आहेत. त्यांतल्या-त्यांत महाराष्ट्री व संस्कृत-प्राकृत ह्यांच्या मिश्रणानें बनलेली अपभ्रंश भाषा, ह्या दोन भाषांचे अवशेष मराठींत पुष्कळ सांपडतात. संस्कृत भाषा जेव्हां प्रचारांत होती, तेव्हांपासून किंवा त्यापूर्वींही वैदिक कालापासून प्राकृत व अपभ्रंष भाषा बोलभाषा म्हणून ह्या देशांत सामान्य लोकांच्या प्रचारांत होत्या; परंतु संस्कृत भाषा बोलणाऱ्या आर्य लोकांची संस्कृति ह्या लोकांपेक्षां श्रेष्ठ दर्जाची असल्यामुळें संस्कृत भाषेचा पगडा ह्या प्राकृत भाषांवर ज्यास्त बसला; आणि पुढें पुढें राजा व पंडित इ० श्रेष्ठ संस्कृतीचे लोक संस्कृत भाषा, त्यांच्यापेक्षां कमी संस्कृतीचे लोक प्राकृत भाषा व राजांचे सेवक, सुतार, लोहार, तेली, तांबोळी, इ० कारागीर लोक अपभ्रंश भाषा वापरूं लागले; असा प्रकार एकाच वेळीं आढळून येतो.

मराठीनें या सर्वांचें ऋण घेतलेलें आहे. संस्कृत तत्सम म्हणजे संस्कृताप्रमाणेंच जसेच्या तसे मराठींत आलेले शब्द फार आहेत आणि जरूर तर हवे तेवढे घालण्याचा प्रचार आजच्या प्रौढ मराठींत मुळींच कमी झालेला नाहीं; तद्भव म्हणजे संस्कृत शब्दांत कांहीं फरक होऊन आलेले शब्दही जवळ जवळ संस्कृताइतकेच सांपडतील; प्राकृतोत्पन्न आणि अपभ्रंश हेही शब्द जवळ जवळ तितकेच आढळतात. महाराष्ट्री प्राकृतांतील तेवढे शब्द मराठींत आले आहेत असें नाहीं, तर इतर प्राकृतांतीलही शब्द मराठींत आहेतच; महाराष्ट्रींतून आलेले जास्त आहेत इतकेंच. तेव्हां मराठी भाषा ही केवळ संस्कृतापासून उत्पन्न झाली किंवा महाराष्ट्रीपासूनच निर्माण झाली असें कांहींच म्हणतां येत नाहीं; तर संस्कृत-महाराष्ट्री-अपभ्रंश ह्या सर्वांच्या मिश्रणानें मराठीची उत्पत्ति झाली, अशी कै० डॉ. गुणेप्रभृति कांहीं विद्वानांची विचारसरणी आहे.

आजच्या मराठींत मुसलमानी राजवटींमुळें पुष्कळच आरबी व फारसी शब्द असून ते मराठीशीं जवळ जवळ एकरूप झालेले आहेत; पण एवढ्यावरून त्या भाषांपासून मराठी उत्पन्न झाली असें कांहीं म्हणतां येत नाहीं. त्याचप्रमाणें

इंग्रजी, पोर्तुगीज, इ० पाश्चात्य भाषा; व कानडी, तेलगू, इ० द्राविडी भाषा; आणि हिंदी, गुजराती, इ० आज देशांत चालू असलेल्या भाषा; ह्यांचाही मराठीवर कांहीं अंशीं परिणाम घडलेला आहे खरा, परंतु तेवढ्यावरून मराठीच जनकत्व त्या भाषांकडे जाऊं शकत नाहीं हें स्पष्टच आहे. भाषा-समृद्धीच्या दृष्टीनें त्या सर्वांचें कमी-जास्त उपकारित्व मात्र मराठीनें कबूल केलें पाहिजे.

**देशभाषा.** एकंदरींत असें म्हणतां येईल कीं, संस्कृतापासून प्राकृत भाषा निघाल्या व प्राकृत भाषांपासून सध्यांच्या देशभाषा झाल्या. आर्यांच्या तत्कालीन वसाहतींपैकीं मगध व त्यालगतच्या प्रदेशांत **मागधी** ही प्राकृत भाषा चालू होती व तिच्यापासूनच आतांच्या बहारी, बंगाली, आसामी, ह्या भाषा बनल्या आहेत; मथुरा व त्याच्या आसपासच्या प्रदेशांत **शौरसेनी** प्राकृत चालू होती व तिच्यापासूनच हल्लींची हिंदी भाषा निघालेली आहे व ती मुख्यतः संयुक्तप्रांतांत चालू आहे. मथुरेच्या पश्चिमेकडील भागांत अशोकाच्या शिलालेखांतील प्राकृत भाषा होती व तिच्यापासून हल्लींच्या काठेवाडी, राजस्तानी व गुजराती ह्या भाषा निघाल्या आहेत; व त्या त्या प्रांतांतून चालू आहेत. तसेंच पंजाब व त्यालगतच्या भागांत **पैशाची** ही प्राकृत भाषा चालू होती व तिच्यापासून लहांडी, पंजाबी, ह्या आतांच्या भाषा निघाल्या आहेत. उज्जनीपासून गोदावरीपर्यंतच्या मोठ्या विस्तृत प्रदेशांत म्हणजे महा-राष्ट्रांत **महाराष्ट्री** नांवाची प्राकृत भाषा चालू होती व तिच्या पुष्कळ अंशापासून हल्लींच्या मराठीची उत्पत्ति झाली आहे. महाराष्ट्री भाषा बोलणारे आर्य लोक गोदावरीच्या दक्षिण भागीं तुंगभद्रेपर्यंत पसरून स्थायिक झाल्यानंतर त्या प्रदेशाला ' महाराष्ट्र ' हें नांव प्राप्त झालें; आणि त्यांतील लोकांची हल्लींची भाषा ती **मराठी भाषा** होय.

## आरंभ-काल

कोणतीही भाषा अगोदर बोलण्यांत व नंतर लेखनांत येत असते. तेव्हां लेखी पुरावा जेथपर्यंतचा सांपडतो, तो मराठीचा आरंभ-काल समजण्यास हरकत नाहीं. लेखी पुरावा म्हणजे ग्रंथ, शिलालेख, ताम्रपट वगैरे. पैकीं मराठीचा आरंभ-काल ठरविण्यास उपयुक्त असे महत्त्वाचे खालील ग्रंथ व शिलालेख सांपडले आहेत.

[ मागील २ व ३ या पानांतील विवेचनाची स्पष्टता खालील मांडणीवरून होईल—]




[ मराठी भाषा, उद्गम व विकास, पृ० १२४ वरून कांहीं फरकानें.

(१) सन ४८८ मधील मंगळवेढ्याचा ताम्रपट.
(२) सन ७३६ मधील चिकुडें येथील ताम्रपट.

यांत अगदीं तुरळक असे कांहीं मराठी शब्द आढळतात.

(३) सन ९८३ तला म्हैसूरजवळील श्रवणबेळगोळ येथलि गोमतेश्वराच्या पुतळ्याच्या खालील शिलालेख. यांत "**श्रीचावुण्डरायें करवियलें**" व "**गंगरायें सुत्तालें करावेयलें**" अशा दोन मराठी ओळी आहेत.

(४) ११ व्या शतकाच्या उत्तरार्धांतील 'राजीमतीप्रबोध' नामक एका ग्रंथांत एका महाराष्ट्रिक स्त्रीचें वर्णन आहे. त्यांत "**मी काई सांधओ, गोमटी मुह,**" इ० मराठी वळणाचीं वाक्यें आहेत.

(५) सन ११२९ तील 'मानसोल्लास' नामक ग्रंथांत "**जेणे** रसातळ उणु मत्स्यरूपें वेद **आणियले** मनु शिवक **वाणियले** तो संसार सायर तारण मोहंतो **रावो नारायेणु**." ह्या ओळी आहेत. त्यांतलि मराठी ठशाचीं रूपें कळण्यासारखींच आहेत.

(६) सन ११८७ तला परळचा शिलालेख. यांत "अथ तु जो कोणु हुविए शासन लोपी तेया श्रीवैद्यनाथ देवाची भाल सकुटुंबिआ पडे" इ० शपथ सर्वांना कळण्यासाठीं मराठींत कोरलेली आहे; त्याचा खालील ठसा पहा—

॥ अथतुजोकोणुहुविप शासनलो॥
पीतयां श्रीवैद्यनाथदेवाची भालसकुटुंबिआपडे॥ तद्गाची
मायगाटविकविजे॥

(७) सन १२०६ मधलि भास्कराचार्यांचा नातू चांगदेव यानें चाळीसगांवाजवळ पाटणच्या भवानीच्या मंदिरांत कोरविलेला लेख मराठीच्या दृष्टीनें अधिक स्पष्ट आहे. त्यांत "इयां पाटणीं जें कोणें उघटे तेहाचा असि आउं जो राउला होता ग्राहकापासी तो मढा दीन्हला" इ० वाक्यें तत्कालीन मराठीच्या स्वरूपाचा निदर्शक आहेत.

(८) सन १२७३ मधलि पंढरपूरच्या विठ्ठलाच्या मंदिरांतलि 'चौऱ्यांयशींच्या शिळेवरील लेख' यांत पुढील वाक्यें आहेत—"स्वस्ती श्री सकु ११९५ श्रीमुख संव-

१. ज्यानें रसाळांतून मत्स्यरूपानें वेद आणिले, मनु (व) शिव वर्णिले (स्तविले) तो संसारसागरतारक मोहंता राजा नारायण.

२. आतां जो कोणी होऊन हें शासन मोडील त्याला श्रीवैद्यनाथ देवाची शपथ. तो सहकुटुंब पतन पावेल.

३. या पाटणांत जें द्रव्य उत्पन्न होईल, त्यावरील राजानें घ्यावयाचा जो कर तो मठास दिला.

त्सरे फागनिपूर श्रीविठ्ठलदेव रायासि तिसा सिति फुलें:दांडे आचंद्रार्क चालवेआ नाना भक्त मालीआं दत्त पैकाचा विवरे. "

यात्रमाणें शिलालेखांचें व जुन्या आरंभींच्या मराठीचें स्वरूप ध्यानांत यावें म्हणून हे त्रोटक उतारे दिले आहेत; त्यांवरून असें दिसून येईल कीं, इ० सनाच्या चवथ्या-पांचव्या शतकापासून मराठी भाषेचा उदय झाला असावा; ती भाषा सामान्य लोकांच्या बोलण्यांत येत असावी; ग्रंथ-लेखन संस्कृतांतच होत होतें; विद्वानांत संस्कृताचें प्राबल्य जास्त होतें; केवळ सर्वसामान्य लोकांना कळण्यासाठीं त्यांच्या चालू बोलभाषेंत कांहीं आज्ञा वगैरे कोरविल्या जात; सन ९८३ पर्यंत ताम्रपट इत्यादिकांत मराठी शब्दांचीं तुरळक रूपें आढळतात.

## मराठीचीं निरनिराळीं स्वरूपें

भाषेवर मुख्यतः राजवटींचा परिणाम होतो. राजवटींमुळें राज्यक्रान्तीबरोबरच धर्मक्रान्ति, समाजक्रान्ति, विचारक्रान्ति, भाषाक्रान्ति, ह्याही गोष्टी होत असतात. आपल्या मराठीवर निरनिराळ्या राजवटींमुळें असेच परिणाम झाले असल्यानें, आपण त्या दृष्टीनें भाषेचीं निरनिराळीं स्वरूपें केव्हां कशा प्रकारचीं आढळतात, त्याचा विचार करूं.

१. यादवकालीन मराठी (सन १२५० ते १३५०) ज्ञानेश्वर, महानुभाव
२. बहामनीकालीन मराठी (सन १३५० ते १६००) एकनाथ, दासोपंत
३. शिवकालिन मराठी (सन १६०० ते १७००) रामदास, तुकाराम
४. पेशवेकालीन मराठी (सन १७०० ते १८००) मोरोपंत, रामजोशी
५. इंग्रजकालिन मराठी (सन १८०० ते चालू)
   (१) सन १८०० ते १८३६ डॉ० कॅरे, छत्रे, गेस्फर्ड, जांभेकर, इ०.
   (२) सन १८३६ ते १८५७ दादोबा, लोकहितवादी, हरी केशवजी, इ०.
   (३) सन १८५७ ते १८७४ कृ० चिपळूणकर, पर०गोडबोले, कीर्तने, इ०.
   (४) सन १८७४ ते १९०० वि० चिपळूणकर, टिळक, आगरकर, इ०.
   (५) सन १९०० ते १९२५ केळकर, कोल्हटकर, वा० म० जोशी, इ०.
   (६) सन १९२५ ते चालू फडके, खांडेकर, वरेरकर, अत्रे, इ०.

---

१. स्वस्ति श्री शके ११९५ श्रीमुख संवत्सरीं श्रीविठ्ठल देवास + + + + फुलें दांडे वाहणें सूर्य चंद्र आहेत तोंपर्यंत नेहमी चालविण्यास अनेक भक्तांना दिलेल्या पैक्याचा तपशील.

# प्राचीन गद्य व पद्य

## १. यादवकालीन मराठी ( १२५० ते १३५० )

मराठीचा ग्रंथनिविष्ट काल इ० स० च्या १२ व्या शतकापासून सांपडतो. त्या कालीं देवगिरी येथें यादवांची कारकीर्द सुरू होती. त्या राजानीं मराठीला अतिशय उत्तेजन दिलें. ज्ञानेश्वरादि महाराष्ट्र-संतकवींचें वाङ्मय आणि महानुभावीय वाङ्मय असे तत्कालीन मराठीचे दोन प्रवाह आढळून येतात. प्रारंभींचें मराठी वाङ्मय पद्य स्वरूपांतच झालें.

**मुकुंदराज**. जोगाईचें आंबें येथील राहणारा. जयत्पाळ राजाचे कारकीर्दींतला. यानें सन ११८८ मध्यें '**विवेकसिंधु**' नांवाचा ग्रंथ लिहिला. मराठींतील महत्त्वाची अशी हीच पहिली वाङ्मयनिर्मिति आढळते, म्हणून त्या दृष्टीनें ह्या ग्रंथाचें महत्त्व आहे. त्यानें 'परमामृत' म्हणून आणखीही एक ग्रंथ लिहिला आहे.

**ज्ञानेश्वर** ( १२७५–१२९६ ). पैठणजवळ आपेगांव येथील रहाणारा. आळंदी येथें जन्म. यांनीं रामदेवराव जाधवांच्या कारकीर्दींत सन १२९० मध्यें '**ज्ञानदेवी**' नांवाचा काव्यमय, भक्तिप्रधान, तात्त्विक ग्रंथ लिहिला. गीतेवरील हा उत्कृष्ट टीकाग्रंथ आहे. त्या ग्रंथाला ज्ञानेश्वरांनीं स्वतः 'भावार्थदीपिका' असें नांव दिलें आहे. यांतील मराठी भाषेचें स्वरूप पाहिलें म्हणजे एक प्रकारें आश्चर्यच वाटतें. जन्मानंतर थोड्याच काळांत ही मराठी भाषा आपल्या प्रभावानें, सौंदर्यानें, गांभीर्यानें, प्रसादानें, भूषणानें व लालित्यानें सर्वांस दिपविणारी अशी झाली. मराठी भाषा जी एकदम पुढें येते ती अशा दिपविणाऱ्या स्थितींत येते. ज्ञानेश्वरांनीं 'अमृतानुभव' वगैरे आणखीही कांहीं ग्रंथ लिहिले आहेत. यांच्या भाषेंत उपमा व दृष्टान्त यांची रेळचेल आढळते. आणि नामांवरून विशेषणें, क्रियापदें; किंवा क्रियापदांवरून नामें, विशेषणें; इ० ते सहज बनवितात. त्याच्या 'ओवी' बद्दल एकानें म्हटलें आहे— "ज्ञानेश्वराचिया पाठीं, जो वोवी करील मऱ्हाटी, तेणें अमृताचे ताटीं, जाण नरोटी ठेविली" हें सामान्यतः खरेंच आहे. त्यांच्या कवितेंत रसाळपणा ओतप्रोत भरलेला आहे.

**नामदेव** (ज० १२७० ?). पंढरपूरचा राहणारा. याचें नांव या कालांतील संत-मंडळींत प्रामुख्यानें घ्यावयास पाहिजे. हा जातीचा शिंपी. प्रथम वाटमाऱ्या होता, पण पुढें परम भगवद्भक्त झाला. भक्तिमार्गाचा पुरस्कार ज्ञानदेवांनीं केला, त्यांच्या ज्ञानेश्वरीस वारकरी लोक 'माउली' किंवा 'आई' म्हणतात, हें खरें; परंतु पहिली गोष्ट मात्र तितकीशी खरी वाटत नाहीं. कारण ज्ञानेश्वराच्या वाङ्मयांत विठ्ठलभक्तीचा कोठें प्रामुख्यानें उल्लेख नसून, वेदान्तावरच अधिक भर आहे. नामदेवानें मात्र विठ्ठलभक्तीचा डांगोरा पिटला हें खरें आहे. पंढरीस नामदेवाची पायरी प्रसिद्ध आहे. त्याच्या वाणींत साधेपणा व प्रेमळपणा फार आढळतो. त्याचें सर्वच कुटुंब विठ्ठलभक्त असल्यानें अभंगरचना करी. त्याची दासी जनाबाई हिचे अभंगही असेच भक्तिरसपूर्ण आहेत. ( भाषेवरून याचा काल ज्ञानेश्वरानंतर एक शतक मागून असावा असें निःसंशय वाटतें ).

या कालांत निवृत्तिनाथ, ज्ञानदेव, सोपानदेव, व **मुक्ताबाई** हीं भावंडें नामदेव, **जनाबाई**, गोरा कुंभार, सावता माळी, विसोबा खेचर, नरहरि सोनार, बंका महार, चोखामेळा, परिसा भागवत, राका कुंभार, **कान्होपात्रा**, सेना न्हावी, सजनकसाई, इ० मराठीची सेवा करणारी स्त्री-पुरुष संत-मंडळी होऊन गेली.

**हेमाडपंत.** रामदेवराव जाधवाच्याच कारकीर्दींत हा 'श्रीकरणाधिप' म्हणजे फडनवीस होऊन गेला. त्यानें स्वतः रचलेला मराठी ग्रंथ उपलब्ध नाहीं; परंतु त्याच्या नांवावर 'हेमाद्रिकृत नीतिबोध', चतुर्वर्गचिंतामणि, लेखनकल्पतरु, वगैरे बरेच लहान-मोठे ग्रंथ मोडले जातात. हेमाडपंती देवळें व हेमाडपंती मोडी लिपि हीं प्रसिद्धच आहेत. त्यानें महानुभावीय व इतर ग्रंथकारांस अतिशय उत्तेजन दिलें. 'लेखनकल्पतरू'त अनेक मायने व गद्यरूप पद्यात्मक पत्रें दिलीं आहेत; त्यांचा नमुना पहा—

**विनंति विशेष। आपणांकारणें। पक्क आंबे दाणे। एक शत। चांगल्या झाडाचे। बहुनामांकित। गोडीस बहुत। योग्य ऐसे। आणोनि सारे। बहु माफजाती। करून गड्याहातीं। पाठविले। आहेत हे घ्यावे। व उत्तर द्यावें। बहु काय लिहावें। हे विनंती।** ( अभंगस्वरूप गद्य ).

तसेंच—

**विज्ञापना अशी कीं राजश्री देवरावदादांनीं। मजला विनंति केली कीं आमच्या सर्व भाउबंदांनीं। दीक्षित यांचा आश्रय करुनि समाइक इनाम जें आहे। तें क्षेत्र पितृसंपादित तेव्हां मागितलें असावें हें।** (आर्यास्वरूप गद्य).

याच शतकांत **'पंचतंत्र'** नांवाचें संस्कृत पंचतंत्रांचें मराठी भाषान्तर झालेलें उपलब्ध आहे. त्याच्या पूर्वीचा मराठी गद्य-ग्रंथ उपलब्ध नाहीं.

**ज्ञानेश्वरकालीन भाषाविशेष**—खालीं मुकुंदराज व ज्ञानेश्वर यांच्या भाषेचा एकेक उतारा दिला आहे; त्यावरून पुढील गोष्टी कळून येतील—(१) बोलु, शब्दु, रसु, इ० उ-कारान्त व पावो, विषो, इ० ओ-कारान्त अशीं नामादिकांचीं रूपें आढळतात. (२) श्लाघ्यता, लवणसमुद्र, निजबोध, इ० शुद्ध संस्कृत शब्द विवेकसिंधूंत आढळतात, त्या मानानें ज्ञानेश्वरींत चालू भाषेंतील शब्द, (देशीकार लेणें) बरेच असले तरी (३) घ्राण, रसना, इंद्रियें, अमृतातें, इ० शुद्ध संस्कृत शब्दांची पकड वेदान्तपर ग्रंथ असल्यामुळें सुटली नाहीं. (४) कवतीक, जीभ, रेखा, इ० तद्भव शब्द फार येऊं लागले. (५) बळ्ळाळु, रोळु, जैतपाळु, इ० शब्दांतल्याप्रमाणें 'ळ' कार तुरळक येऊं लागला; तो कानडींतून आला असें कांहींचें म्हणणें आहे. (६) पैज, बीक, रोळु, इ० केवळ देशी शब्द असावेत. (७) कोथळेया, खराटेया, जेयाचेनि, जिये, रसालपणाचेया, आलिंगावेया, अशा प्रकारचीं सामान्यरूपें आढळतात. (८) भणें, भाणितलें, इ० भूतकाळीं; (९) जींगे, मोडे, पावे, होयें, नोहे, इ० जुन्या वर्तमानकाळीं व (१०) धरिजे यांसारखीं कर्मणि; अशीं क्रियापदाचीं रूपें आढळतात. (११) भावों जाये, पुरों लागे, अशीं संयुक्त क्रियापदाचीं रूपें आहेत. (१२) यवनी शब्द यांत बहुशः आढळत नाहींतच.

उतारे

## मुकुंदराज (सन ११८८)

विवेकसिंधु-रचना—

**विवेकसींधुचीं शब्दरत्नें। कंठीं धारिजे प्रयत्नें। तरी जनकाचेनि महीमानें। श्लाघ्यता पावे ॥ १५१ ॥ लवण समुद्रींचीं मुक्तें[1]। भूषणें होती कीरूं[2] समस्तें। परी भुशीतयासीही मुक्तत्वें[3]। विवेकसींधुचीं कीं ॥ १५२ ॥ अहो विवेकसींधुची पूर्वार्द्ध। क्षीरसींधुपरीस अगाध। जेथें निर्गुण निजबोध। भेटे विष्णुस्वरूप ॥ १५३ ॥ नरसींव्हाचा बळ्ळाळु। ह्याचा कुमर जैतपाळु। तेणें करविला हा रोळुं[4]। ग्रंथरचनेचा ॥ १५५ ॥ (अ० ७).**

---

१. मोतीं. २. निश्चयानें. ३. मुक्त करण्यानें. ४. वर्षाव, खटाटोप.

## ज्ञानेश्वर ( १२९० )

महाराष्ट्र–भाषेची थोरवी—

माझा मऱ्हाटा चि बोलु कवतिके । परि अमृतातें ही पैजेसीं जींके । ऐसीं अक्षरें चि रसिकें । मेलवीन ॥ १४॥ जिये कोवलिकेचेनि पाडें। दीसाति नादिंचे तरंग थोकडे । वेधें परिमलाचें बीकें मोडे । जेयाचे नि ॥१५॥ आइका रसालपणाचेया लोभा । किं श्रवणिं चि होथि जीभा । बोले इंद्रियां लागे कलंभा । येकमेकां ॥१६॥ साहाजें शब्दु तरि विषो श्रवणाचा । परि रसना म्हणे कां रसु चि आमुचा । घ्राणासि भावो जाये परिमलाचा । हा तो चि कां होईल ॥ १७॥ नवल बोलतिये रेखेची वाहोणी । दावितां डोलेयां हि पुरों लागे धणी । ते म्हणाति उघाडिली कां खाणि । रूपांची हे ॥ १८॥ जेथ संपूर्ण पद उभारे । तेथ मन चि धावे बाहिरे । बोलु भुजांहीं आशे भरे । आलिंगावेया ॥१९॥ ऐसां इंद्रियें आपुलालां भावें । झोंबतां परि तो सरिसेपणें चि बुझावी । जैसा एकला जग चेववी । सहस्रकरू ॥ २० ॥ (ज्ञानेश्वरी, अ० ६).

## पंचतंत्र ( १३ वें शतक )

पिंगलकु पुसे. दमनकु सांघे. म्हणे. कोणे एके नगरीं यज्ञदत्त नामें ब्राह्मणु असे. तो दुर्बलु, तयातें ब्राह्मणीनें म्हाणितलें. तुम्ही कांही उदमि न करा. आम्ही अवघे भुके मरत असो. तंव तो चहूंकडे हिंडों निघाला. वाटेस जातां एके अरण्यिं पातला. तयासि तृषा लागालि. म्हणोनि उदकारणें हिंडतां तंव एकु अड देखिला.

गोटक वाक्यें, सुबोधता व इसापाप्रमाणें चतुर नीतिबोधक रचना, इ० विशेष या भाषेंत आढळतात.

## महानुभावीय वाङ्मय

**श्रीचक्रधर** ( सन ११५३ ते १२७२ ). महानुभावीय पंथाचा संस्थापक. यानें याच कालांत तत्कालीन चालू असलेल्या मराठींत लोकांस उपदेश करण्यास सुरुवात केली. तो जरी मूळचा गुर्जर प्रांतांतील होता, तरी त्याचा मराठीविषयीं विशेष अभिमान दिसून येतो. “ कानडदेशा तेलंगदेशा न वचावे, महाराष्ट्रीं असावे ” असा त्याचा ग्रंथलेखनासंबंधानें आपल्या अनुयायांना दंडक होता. त्याचप्रमाणें संस्कृतांत ब्रह्मविद्येसंबंधीं ज्ञान लिहिल्यास सामान्य लोकांना त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं; म्हणून श्रीचक्रधराचे शिष्य **नागदेवाचार्य** यांनीं “ ब्रह्मविद्येस माझिये स्वामीचा परिवारू नाग-

---

१. प्राकृत. २. मार्दवामुळें. ३. सप्तस्वरांचे. ४. नादानें. ५. बळ. ६. कलह. ७. विषय. ८. कवित्वाची. ९. पद्धति. १०. तृप्ति. ११. सर्व वाक्य.

वेल कीं, भणौनि हे केशवा, संस्कृत सूत्रबद्ध प्रकरण न करीं तूं." असा आपल्या शिष्यास उपदेश केला आहे. श्रीचक्रधरानें स्वतः कांहीं ग्रंथ लिहिलेला नाहीं; परंतु तत्पंथयि विद्वान् शिष्य **महींद्र व्यास** ह्यानें सन १२६० च्या सुमारास म्हणजे ज्ञानेश्वरीपूर्वी सुमारें ३० वर्षे चक्रधराचें गद्यरूप 'लीलाचरित्र' गायिलें. त्यानंतर **भास्कर व्यास** ह्यांनीं सन १२७३ म्हणजे ज्ञानेश्वरीपूर्वी १६–१७ वर्षे 'शिशुपालवध' (शृंगाररसप्रधान), 'उद्धवगीता' (वैराग्यप्रधान), इ० ग्रंथ लिहिले. (ह्या ग्रंथांचा काल उमरावतीचे प्रो० वि० भि० कोलते यांनीं सन १३०८ हा भास्करभट बोरीकर यांच्या संशोधित चरित्रांत दिला आहे. पान ८५). खुद्द चक्रधराच्या तोंडिचीं त्याच्या शिष्यांनीं उतरून घेतलेलीं सिद्धान्त-सूत्रें गद्य-स्वरूपांत असून, महानुभावी यांचें गद्य व पद्य असें दोन्ही प्रकारचें वाङ्मय एव्हांपासून सुरु झालेलें आहे.

या पंथाचा प्रसार प्रथम विदर्भांत व नंतर पंजाब ते कन्याकुमारीपर्यंत झाला. ह्या पंथांतील कवीनीं व ग्रंथकारांनीं मराठींत उच्च दर्जाची व अलोट वाङ्मय-निर्मिति केली. (१) मराठींत धर्मग्रंथ पद्धतशीर लिहिण्याचा पाया त्यानीं घातला; (२) भिन्न भिन्न वृत्तात्मक काव्यरचनेचें बीं त्यांनीं पेरलें; (३) नियमक व सयमक श्लोक–रचनेची प्रथा त्यांनीं पाडली; (४) गद्य-रचनेचा मार्ग प्रथम त्यांनीं चोखाळला; (५) कोश–रचनेचा पायंडा त्यांनीं पाडला; (६) व्याकरणशास्त्राचा ओनामा त्यांनीं गिरविला; व (७) मराठी भाषा-शास्त्राचाही श्रीगणेशा त्यांनींच केला; (८) महाराष्ट्र-शारदेचें हें अपूर्व दालन उघडें झाल्यापासून मराठी भाषेला पुष्टि आली व तिचें सौंदर्य वाढलें, ह्यांत कांहीं संशय नाहीं. (९) आपल्या पंथाच्या प्रसाराबरोबर मराठीचे पडसाद यांनीं आसेतु–हिमाचलापर्यंत पोंचविले. ह्या गोष्टी महानुभावयि वाङ्मया-संबंधानें विशेष लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत.

रामदेवराव यादव इ० यादवराजांनीं मराठीला फार उत्तेजन दिलें. या राजांच्या राजवटींतच मुकुंदराज, ज्ञानेश्वर, यांच्याप्रमाणेंच महानुभावीय गद्य–पद्य ग्रंथकार निर्माण झाले. महानुभावीयांची मराठींतील ग्रंथनिर्मीति ज्ञानेश्वराच्याही अगोदरची असें म्हणतात, पण त्यास नीटसा आधार नाहीं. दोहोंचेही वाङ्मयप्रवाह समकालीनच मानतां येतील. महानुभावीयांचे ग्रंथ विधर्मीयांपासून संरक्षण होण्यासाठीं त्यांनीं मुद्दामच आतांपर्यंत गुप्त ठेविले होते. तसेंच ते त्यांनीं

सांकेतिक * **सकळी सुंदरी**, इ० निरनिराळ्या लिपींत लिहिले होते. ते संकेत कै० राजवाड्यांनीं हुडकून काढल्यामुळें, आतां त्यांत गौप्य उरलें नसून, तें सर्व वाङ्मय खुलें झालें आहे. कै० विनायकराव भावे यांनीं त्यांच्या गद्य, पद्य, कोश, व्याकरणें, इ० ५००० ग्रंथांची यादीच छापिली आहे.

ज्ञानेश्वरकालांतील महानुभावीय ग्रंथांतील भाषेचें स्वरूप फारसें भिन्न नाहीं. ज्ञानेश्वरीपूर्वी महानुभावीय कवयित्री **महदंबा** हिनें 'धवळे' हा नवाच वृत्तप्रकार प्रचारांत आणिला, म्हणून हिला मराठी आद्य कवयित्री म्हणतात. या कालांत वाइदेबास (भावे व्यास), म्हाइंभट (महेंद्र व्यास), केसोबास (केशव व्यास), इ० प्रमुख महानुभावीय ग्रंथकार झाले.

## महदंबा (ज्ञानेश्वरीपूर्व)

महदंबेचा धवळा—

**सौंदरु श्रीकृष्णु देखियला झळकतां:**
**तंव तियचें आकर्षलें चीत्त :**
**कैसी संभ्रमति जाली माडावरुनिया घालूं पाहे झंप :**
**तंव विप्रें सांवरिली बाळी म्हणे देवी नव्हे तुमचें उचीत**

---

* महानुभावीयांनीं देवनागरी अक्षरांच्या उलटापालटीनें सुमारे ४० सांकेतिक लिपि बसविलेल्या आढळतात. त्यांपैकीं सुंदरी लिपीचा संकेत खालीलप्रमाणें—

| | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ | आ | इ | ई | उ | ऊ | ए | ऐ | ओ | औ | अं | अः | | | |
| ,, | ,, | उ | ऊ | इ | ई | ओ | औ | ए | ऐ | ,, | ,, | | | |
| क | ख | ग | घ | ङ | च | छ | ज | झ | ञ | ट | ठ | ड | ढ | ण |
| न | थ | ज | ह | ० | झ | ब | प | फ | | ठ | ट | ढ | ळ | ष |
| त | थ | द | ध | न | प | फ | ब | भ | म | य | र | ल | व | श |
| स | छ | ग | भ | ञ | क | घ | ष | ध | व | र | य | च | म | द |
| ष | स | ह | ळ | क्ष | ज्ञ | | | | | | | | | |
| ल | त | ण | ड | ज्ञ | क्ष | | | | | | | | | |
| क | का | कि | की | कु | कू | के | कै | को | कौ | कं | कः | | | |
| न | ना | नि | नी | नु | नू | ने | नै | नो | नौ | नं | नः | | | |

श्री च क्र ध रा ये न माः
श्री झ न्य भ या रे ञ वाः

## केशवराज व्यास ( १३ वें शतक )

**चक्रधर–दृष्टान्त—**

सर्वज्ञें भणितलें: अनंत शक्तिः परमेश्वरुः सकळांसीं ही विषय वेवस्छा कारीतिः गांवा हास्ति आलाः तैं जात्येंध हस्तींतें पाहों गेले : एकें पावो देखिला: एकें सोंड देखिली : एकें कानु देखिला : एकें पाठि देखिली: एकें पोटु देखिलें: एकें पूंस देखिलें: मग एकु-मेकेंसी संवादातिः हा रे तुवां हस्ति देखिला: पावो देखिला तो भणे हस्ति खांबा सारिखा : सोंड देखिली तो भणे हस्ति मूसळा सारिखा : कानु देखिला तो भणे हस्ति सूपा सारिखा : पाठि देखिली तो भणे हस्ति भिंती सारिखा :... तेयां मध्यें डोळसु असे: तो भणेः हा हस्तीचा एकेकु अवयेवु होयेः परः हास्ति नोहेः एवं अवयेवीं युक्त तों हास्तिः ( महानुभावीय वाङ्मय, य० खु० देशपांडे. )

## २. बहामनीकालीन मराठी ( १३५० ते १६०० )

यादवांच्या राजवटींत मराठी भाषेचें निर्भेळ व स्फूर्तियुक्त स्वरूप वरील-प्रमाणें होतें; परंतु हा प्रकार फार दिवस टिकला नाहीं. अल्लाउद्दीन खिलजी व त्याचा हस्तक मलीक काफूर यांच्या स्वाऱ्यांनीं देवगिरीचें राज्य सन १३१८ त बुडालें. त्यानंतर दक्षिणेंत बहामनी राज्याची स्थापना झाली व पुढें त्याचींही शकलें होऊन निरनिराळ्या ठिकाणीं आदिलशाही, कुतुबशाही, इ० शाह्या सुरू झाल्या. त्या कालांतील मराठी भाषेचें स्वरूप आतां आपल्यास पहावयाचें आहे.

त्या कालाला मुख्यतः **एकनाथ-दासोपंतां**चा काल असें म्हणतां येईल. एकनाथाचे आजे भानुदास, एकनाथाचे गुरु जनार्दनस्वामी, नरसिंहसरस्वती, गुरुचरित्रकार गंगाधरसरस्वती, हे संत या कालांतील ग्रंथलेखक होत. त्यांशिवाय जनी जनार्दन, विष्णुदास नामा, विरेश्वर, नरसिव्ह, रंगनाथ, इ० साधुसंत यांनीं याच कालांत आपल्या वाणीच्या सामर्थ्यानें मराठीची जोपासना केली.

**एकनाथ** ( १५४८ ते १५९९ ). पैठणचा रहाणारा. याचे एकनाथी भागवत व भावार्थरामायण हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. एकनाथी भागवत त्यानें सन १५७३ त काशी येथें पूर्ण केलें. त्या कालीं संस्कृत-प्राकृताचा मोठाच झगडा चालू होता. संकृतांत ग्रंथरचना करणें श्रेष्ठ प्रतीचें व मराठींत करणें कमीपणाचें असें तत्कालीन पंडितांस वाटत असे. म्हणूनच ज्ञानेश्वरानें, महानुभावीयांनीं, एकनाथानें, फादर स्टीफन्सनें, मोरोपंतानें, आपली काव्यरचना मराठींतच सामान्य जनांना समजण्याकरितां केली. एकनाथानें आपलें भागवत काशीच्या

पंडितांस वाचून दाखवून तें संस्कृताच्या बरोबरीचें आहे असें त्यांजकडून वदवून घेतलें. खुद्द एकनाथाचा मुलगा हरिपंडित बापाच्या विरुद्ध होता. ज्ञानदेवांनीं 'माझा मऱ्हाटा चि बोलु कवतिकें। परि अमृतातें हि पैजेसीं जींकें। ऐसीं अक्षरें चि रसिकें। मेळवीन' हा बाणा खरा करून दाखविला. एकनाथानेंही 'संस्कृत वाणी देवें केली। प्राकृत काय चोरापासूनि आली? । असो या अभिमानभुली। वृथा बोली काय काज?' असें प्रत्ययास आणून दिलें; इतकी त्याची रचना मधुर व प्रासादिक आहे. त्याचें दुसरें महत्त्वाचें कृत्य म्हणजे त्यानें सन १५८४ त ज्ञानेश्वरीची नवीन शुद्ध प्रत तयार केली, हें होय. याच्या वेळेपासूनही जातिवृत्तांतील पदांची रचना आढळते.

**दासोपंत** (१५५१–१६१५). बेदरजवळ नारायणपेठ येथील राहणारा. वास्तव्य आंबेजोगाई येथें. यानेंही गीतेवर टीका केली असून, त्याचे गीतार्णव, पदार्णव, इ० ग्रंथ आहेत; त्यांत प्रत्येकीं १। लाख ओव्या आहेत. याच्या इतकी प्रचंड काव्यरचना दुसऱ्या कोणत्याही मराठी कवीची नसेल. त्याची रचना अत्यन्त सुबोध, रसाळ व दृष्टान्तादिकांनीं खचलेली अशी आहे. 'पंचीकरण' हा ग्रंथ तर पासोडीवर लिहिलेला अद्यापि उपलब्ध आहे, असें म्हणतात. त्याशिवाय पदें, कूटें, वगैरे, इतर प्रकारची विपुल ग्रंथरचना यानें केलेली आहे. यानें आपल्या उपास्य दैवताला केव्हां कांता, केव्हां विरहिणी, केव्हां दासी, केव्हां लहान मूल, इ० भूमिका घेऊन आळविलें आहे. त्याचीं कांहीं पदें रागदारींत आळविण्याजोगींही बसाविलेलीं आहेत. त्याचा मराठीविषयीं अभिमान जाज्वल्य होता. इतर अनेकांनीं संस्कृताचें रूपान्तर करून गीता सांगितली; पण यांनीं स्व-अनुभवानें गीतार्थ प्रतिपादिला. 'संस्कृतें बोलिलें सेवणें। तेंचि सांडावें प्राकृत वचनें। ऐसिया मूर्खा मुंडणें। किती आतां?' असें तो म्हणतो. त्यानें संस्कृतापेक्षां मराठी न्यून तर नाहींच, पण उलट मराठींत एकेका गोष्टीकरितां जी बहुविध शब्दसंपत्ति आहे, तशी संस्कृतांत कोठें आहे? असें संस्कृतवादी व प्राकृतवादी यांच्या संभाषणात्मक एक दीड हजार ओंव्यांचें कथानक रचून मुद्देसूद रीतीनें संस्कृतवाद्याचें खंडन केलें आहे. त्याचा मासला पुढें उताऱ्यांत दिला आहे.

**एकनाथकालीन भाषाविशेष**—(१) ज्ञानेश्वरकालीन मराठीचें जसें शुद्ध देशी स्वरूप होतें, तसें एकनाथकालीन भाषेंत न उरतां ती अधिकाधिक संस्कृतमय बनूं लागली; (२) धर्मुबद्दल धर्म, देहोबद्दल देह, याप्रमाणें

उ-कारान्त व ओ-कारान्त शब्दांबद्दल अ-कारान्त शब्द लिहिण्याचा प्रघात पडूं लागला. ( ३ ) म्हणौनि, करौनि, ह्या रूपांबद्दल म्हणोन , करोन, हीं रूपें प्रचारांत येऊं लागलीं. ( ४ ) पुढिलेया, धर्माचेया, तुटलेयापाठीं, निमालेया पाठीं, ह्यांबद्दल पुढिलियां, धर्माचिया, तुटलियापाठीं, असा सामान्यरूपांत-फरक झाला. ( ५ ) ' ळ ' तुरळक येत होता तो आतां सररहा येऊं लागला. ( ६ ) मियांबद्दल म्यां हें रूप आलें. ( ७ ) वेदान्त व भक्तिपर ग्रंथांत फारसी शब्द फारसे घुसले नाहींत, तरी इतर लिखाणांत त्यांचें प्राबल्य बेसुमार झालें. फक्त कांहीं नामे, सर्वनामें व क्रियापदें तेवढीं मराठी, बाकी सर्व फारसीमय. उदा०—' कोधाजी नाइकवाडी याणें तमाम तफरका केला ' यांत याणें व केला हे दोनच शब्द अविकृत शुद्ध मराठी आहेत. ( ८ ) शेखदार, अर्जदार, यांतील ' दार ' हा प्रत्यय; पलिखाना, उस्तरखाना, फरासखाना, यांतील ' खाना ' प्रत्यय; व यांसारखे शेंकडों प्रत्यय धूमधडाक्यानें मराठीशीं लगट करूं लागले. ( ९ ) किल्ले कायापुरी प्रगणे शरीराबाद ( किल्ला इ कायापुरी–कायापुरीचा किल्ला, प्रगणा इ शरीराबाद–शरीराबादचा परगणा ) यांतल्याप्रमाणें षष्ठिचा ' इ ' हा प्रत्यय मागील नामांस लावण्याची तऱ्हा सररहा सुरू झाली. ( १० ) ' व ' हें उभयान्वयी अव्यय स्थायिकच होऊन बसलें. ( ११ ) अर्ज्दास्त्, बंदेन्वाज्, कार्कून्, यांतल्याप्रमाणें शब्दांतील अन्त्याक्षरें व मध्यन्तरींचींही अक्षरें निभृत उच्चारण्याची लकब बळाऊं लागली. या प्रकारें ह्या कालांतील मराठी भाषेचें स्वरूप आढळतें.

सरकार–दरबारांत फारसी भाषा सुरू झाली व कागदपत्रही फारसींत राहूं लागले, ' अर्जदारां 'च्या ' फिर्यादी ' ' काजी 'पुढें जाऊन, त्यांचा ' फैसला ' किंवा ' इन्साफ ' होऊं लागला. अग्रवादी, पश्चिमवादी, व्यवहार, वगैरे पूर्वापर धर्मग्रंथांत आढळणाऱ्या संज्ञा नाहींशा झाल्या व त्यांच्या जागा मुसलमानी शब्दांनीं घेतल्या. पत्रांबदली ' कागद ' आले; व त्यांवर प्रमाणांकरिता साक्षी होत असत त्या ' गोही ' झाल्या. अधिकाऱ्यांचे ' मोकदम ' झाले; आणि त्यांना प्रतिवर्षी मिळणाऱ्या वार्षिक वेतनाऐवजीं ' सालिना मुशाहिरा ' मिळण्याचा ' सिलासिला ' पडला. लोक स्वतःचें नांव पुत्र ( अमक्याचा ) म्हणून न लिहितां ' बिन ' योजून लिहूं लागले. ( बिन = पुत्र ) राजे लोकांच्या सभोंवतालच्या मंडळींत तर साफच बदला झाला. राजसभेंत बैसणाईत होते

तेथें 'दरबारी आले. राजाबरोबर स्वारींत सवदळी, दांडिवेसे, हाडेपी, बौरी, सॅागळिये, चवरधरू, भांडारी, वेचेंकरू, देवहारू, दिवटे, बडवे, वगैरे सेवंक असत ते आतां दिसेनासे झाले. झंझुमल, अनुभीम, राईक, पाईक, मांडलीक, राऊत[10], रजपूत, वगैरे हुद्दे आणि पदव्या ऐकूं न येतां, 'जेमादार[11],' 'हवाले[12]-दार,' शिलेदार[13],' 'सरदार,' ह्या पदव्या नव्यानें ऐकूं येऊं लागल्या; (महाराष्ट्र-सारस्वत, भावे भा० १, पृ० १९१).

उ तारे

## एकनाथ, ( गद्य )

### अर्जदास्त

"अर्जदास्त अर्जदार बंदगी बंदेनवाज अलेकं सलाम साहेबांचे सेवेसी बंदे शरीराकार जीवाजी शेखदार बुधाजी कारकून प्रगणे शरीराबाद किल्ले कायापुरी सरकार साहेबांची आज्ञा घेऊन स्वार झालों तों प्रगणे मजकुरीं येऊन सरकार काम करावयास लागलों तों प्रगणे मजकूरचे जमेदार दंभाजी शेट्ये व कामाजी महाजन व मनरिाम देशमुख व ममताई देशपांडीण व क्रोधाजी नाइकवाडी ऐसे हरामजादे फार आहेत ते सरकार कामाचा कयास चालूं देत नाहींत दंभाजी शेट्या कचेरीस येऊन जोम धरून बसतो मनरिाम देशमुख आपलें काम परभारें करून घेतो ममताई देशपांडीण इणें तमाम प्रगणा जेरदस्त केला क्रोधाजी नाइकवाडी याणें तमाम तफरका केला"

यांत एकंदर ८७ शब्द असून, त्यांपैकीं निम्मे शब्द फारसी व फारसी प्रत्ययघटित असे आहेत. तत्कालीन व्यवहारांतलें मराठी अशा प्रकारचें होतें!

## एकनाथ, ( पद्य )

### उत्तम-पुरुष-लक्षण—

**जो सर्व वर्णांचा सहज धर्म। जेणें पाविजे परब्रह्म।**
**जे नाशिती चित्तभ्रम। ते गुण उत्तम अवधारीं ॥ २३४ ॥**
**हो का उपायो जेणें तेणें। पुढिलांसी जें सुख देणें।**
**तें उपतिष्ठे[1] मजकारणें। तो गुण म्यां श्रीकृष्णें वंदिजे ॥ २३५ ॥**

---

१. शिपाई. २. पालखीचे दांडे धरणारे, भोई. ३. विडेकरी. ४. शागीर्द. ५. पाणके. ६. खजानजी. ७. खर्च करणारे. ८. पुजारी. ९. सेवक. १०. घोडेस्वार. ११. टोळींचा मुख्य १२. कांहीं शिपायांचा मुख्य. १३. हत्यार बाळगणारा.

१. प्राप्त होतें.

तैसेंच परपीडा असुख। पुढिलियां न देणें दुःख।
तेंही करूनि मज होय सुख। जाण निष्टंके उद्धवा ॥ २३६ ॥
हो का अधर्माचिये जोडी। कोंडी धरूनिया कवडी।
जो रिघों नेदी दृष्टी बुडीं। फुटकी कवडी स्पर्शेना ॥ २४० ॥
शिर तुटालिया पाठीं। हस्तपादादि क्रिया तुटी।
काम निमालिया पाठीं। निमाली गोष्टी क्रोधाची ॥ २४९ ॥
भूतप्रिय ·हितकारी। ऐसा जो पुरुष संसारी।
मी भगवंत त्याच्या घरीं। सर्व हित करीं सर्वदा ॥ २६२ ॥ (अ० १७)

## दासोपंत

संस्कृतें घटु म्हणती। आतां तया घटांचे भेद किती। कवण्या घटाची प्राप्ति। पावावी तेणें ? ॥ १ ॥ हारा, डेरा, रांजणू, । मुढा, पगडा, आनु। सुगड, तौली सुजाणू। कैसी बोलेल ? ॥ २॥ घडी, घागरी, घडौली। आळंदं, वाचिकें, बौळी। चिटकी, मोरवा, पातली। सांजवणें ते ॥३॥ ऐसे प्रतिभाषे वेगळाले। घट असती नामाथिले। एके संस्कृतें सर्व कळे। ऐसें कैसेन ? ॥ ४ ॥

इंग्रजीवांचून मराठीचें कसें होईल, ही विवंचना पडणाऱ्यांना दासोपंतांचें हें फार मार्मिक उत्तर आहे. परभाषेच्या वर्चस्वामुळे असलेली शब्दसंपत्तिही आपण कशी नष्ट करितों, हें यावरून कळून येईल.

## ३. शिवकालीन मराठी ( १६०० ते १७०० )

या कालांत स्वराज्य-स्थापनेची जशी राजकीय घडामोड झाली, तशीच भाषेच्या दृष्टीनेंही कांहीं घडामोड झाली. शिवाजी महाराजांनीं फारसीला पाय-बंद घालण्यासाठीं 'राजव्यवहारकोश' तयार करविला. पंतप्रधान (पेशवा), पंतअमात्य ( मुजुमदार ), सेनापति ( सरनोबत ), पंतसचिव ( सुरनीस ), मंत्री ( वाकनीस ), इ० नांवें फारसी नांवांऐवजीं योजण्याचा प्रघात सुरू केला; तो शिवाजीनंतर फारसा टिकून राहिला नाहीं; तरी वेदान्तपर किंवा भक्तिपर वाङ्मयांत त्याचा फारसा शिरकाव झाला नाहीं; संत-मंडळींनीं आपलें वाङ्मय त्यापासून बरेंच निर्मळ राखिलें. फार तर कांहीं शब्द त्या वाङ्मयांत घुसले असतील इतकेंच.

या कालांत रामदास, तुकाराम, वामनपंडित, रघुनाथपंडित, आनंदतनय व एकनाथाचा नातू मुक्तेश्वर हे प्रसिद्ध कवि झाले. त्याचप्रमाणें रामदासांचे शिष्य

१. निश्चयानें. २. कोटीपासून कवाडीपर्यंत. ३. दृष्टीसमोर.

रंगनाथस्वामी, केशवस्वामी; अनेक कूटें व चित्रकाव्यें रचणारा विठ्ठल कवि, नागेश, इ०नीं मराठीची उत्कृष्ट प्रकारें सेवा केली आहे.

'**रामदास**' ( १६०८–१६८२ ). नांव नारायण, वडील सूर्याजीपंत, आडनांव ठोसर. राक्षसभुवनाजवळ जांब येथलि राहणारा. विरक्त. लग्नाचे वेळीं 'सावधान' शब्द ऐकून पळून गेला. नाशीक येथें दीर्घकाल तपश्चर्या केली. हिंदुस्थानांत १२०० मठ, तेथें मारुती व आखाडे, आणि महंत स्थापिले. 'बहूसाल कल्पांत लोकांसि आला' असें पाहून 'कैसी वांचतील जनें ?' ही चिंता. 'प्रपंच साधुनि परमार्थाचा लाभ जयानें केला। तो नर भला भला' असा याचा उपदेश आहे. 'दासबोध' हा त्याचा उत्कृष्ट ग्रंथ. ह्या-शिवाय सुंदर रामायण, युद्ध रामायण, लघु रामायण, मनाचे श्लोक व इतर किती तरी त्याची स्फुटरचना आहे. याच्या भाषेंत जोरदारपणा, लोकसंग्रहाकरितां प्रयत्न, खळबळ उडवून देणारा व धीरोदात्त उपदेश, अनुप्रास व अनुकरणवाचक शब्द यांची रेलचेल ( 'कपी कपी बहू कपी । उलाट धीट साक्षपी ॥ लता अनेक औघडा । बळेंच घालिती झडा' किंवा 'कडाडिती धडाडिती बहू तरू झडाडिती ॥ कितेक झोंकती बळें । रसाळ लक्षिती फळें' हें मर्कटांचें वर्णन ) ह्या गोष्टी आढळतात. ह्याच्या रचनेंत नियमबद्धता नाहीं, शुद्धलेखनाचा धाक नाहीं, 'धीर् धरा धीर् धरा तक्वा । हड्बडूं गड्बडूं नका' ही अष्टाक्षरी अनुष्टुप् वृत्तांतील ओळ ! असलें यांचे लिखाण. संस्कृताची जरब नाहीं, फारसीचा विधिनिषेध नाहीं, तींत भीडभाड कांहीं नाहीं, जसा कवि तशी त्याची रोख-ठोक भाषा. तो मनांत येईल तें बोलतो व बोलतो तसें लिहितो. देहे, सर्वै, बुधी, दुख, मृद, लिळा, ऊठिला, शक्तीन्सार, येहलोक, अवेवधान, प्रेत्न, मित्रिकी, ग्वौळले, आमोल्य, वेर्थ, उधट, जीतुका, तीतुका, रघूनायेका, शीरीं, इछा, ऊदंड, नस्तां, जगदांतरीं, खतल्ल, क्रिडाभरें, मधूकरें, शूक, मयोर, श्रिरंग, श्रिकृष्ण, विधीभुगोळ, असे शब्द दडपण्यास तो कचरत नाहीं.

**तुकाराम** ( १६०८–१६५१ ). देहू येथील राहणारा. वडिलांचें नांव वोल्होबा. जात कुणबी. धंदा वाणी. पहिलीं बायकामुलें दुष्काळांत मेलीं. दुसरी बायको जिजाबाई खाष्ट पण पतीविषयीं प्रेमळ. वेदार्थ सांगतो म्हणून रामेश्वर-भटानें बुडविलेल्या वह्या फुगून वर आल्या. इंद्रायणींत जिवंत समाधि घेतली. मोठा भगवद्भक्त, निःस्पृह, सत्त्वगुणी. याच्या इतकी उत्कृष्ट अभंगरचना

दुसऱ्याची आढळत नाहीं. याच्या वाणींत प्रसाद, भक्ति, पावित्र्य, खंबीरपणा आणि असद्गुणांबद्दल तिटकारा, ह्या गोष्टी स्पष्ट दिसून येतात. निःस्पृह वाणी आणि त्यामागें कडकडीत सत्याचरणाचा जोर यांमुळें त्याचे अभंग बहुमोल असे उतरले आहेत. स्फुट अभंगांशिवाय निराळी अशी त्याची ग्रंथरचना नाहीं. त्याचे शेंकडों अभंग '**म्हणी**'रूप बनलेले आहेत.

**वामनपंडित** (१६३६–१६९५). साताऱ्याजवळील कोरेगांव कुमठें येथील राहणारा. वृत्ति जोशीपणाची. (विजापूरचा राहणारा, आडनांव शेषे, असा म० सा० भा० २ यांत उल्लेख आहे). वडील नरहरि. आई लक्ष्मीबाई. वाईजवळ भोगांव येथें समाधि. प्रथम द्वैती असून, नंतर अद्वैतमतानुयायी झाला. महान् पंडित. यानें काशींतील पंडितांस जिंकून जयपत्र मिळविलें. दिवसा मशाली लावून गांवोगांव वाद करीत हिंडे. बरोबर एक उंटभर पुस्तकें बाळगी. प्रथम यानें संस्कृतांत पद्यरचना केली; पण मागून रामदासाच्या सांगण्यावरून मराठींत कविता केली, असें म्हणतात. भगवद्गीतेवर समश्लोकी टीका व 'यथार्थदीपिका' असे दोन ग्रंथ लिहिले. यानें नामसुधा, वेणुसुधा, भामाविलास, रुक्मिणीपत्रिका, वामनचरित्र, इ० भागवतांतील आणि भरतभाव, सीतास्वयंवर, इ० रामायणांतील स्फुट प्रकरणें लिहिलीं. त्याचप्रमाणें भर्तृहरींचें नीतिशतक, वैराग्यशतक व शृंगारशतक यांचें भाषांतर केलें. ही सर्व रचना इतकी सरस झाली आहे कीं, त्यामुळेच 'यथार्थदीपिका'कार वामन व शृंगाररसानें ओथंबलेलीं भामाविलासासारखीं प्रकरणें लिहिणारा वामन हे भिन्न असावेत, असें कांहीं लोकांस वाटतें. वस्तुतः तसा कांहीं प्रकार नसून, वामनपंडित हे मराठी भाषाप्रभु असल्यानें, भक्ति, वैराग्य, शृंगार, इ० कोणत्याही रसांत त्यांची उत्कृष्ट कविता आढळून येते. त्यांच्या शब्द-रचनेची माधुरी अलौकिक आहे. त्यांची भाषा नवनवोन्मेषशालिनी म्हणजे नवीन नवीन तेज किंवा भाषेची चमक, विविधता, इ० दाखविणारी असून, नूपुरांचा झणत्कार व इतर अलंकारांचा चमत्कार प्रकटवीत चमकत येणारी अशी आढळून येते. रसानुरूप वृत्तयोजना हा त्यांच्या भाषेंतील आणखी एक विशेष होय. यांच्याइतकीं सुंदर यमकें दुसऱ्या कोणास साधलेलीं नाहींत, म्हणून ह्यांना 'यमक्या वामन' असें म्हणतात. हे प्रथम-श्लोकांत कथानकाचा सूचक आरंभ करितात.

**रघुनाथपंडित** (१७ वें शतक). हे 'राजव्यवहारकोश'कर्ते व शिवाजीच्या अष्टप्रधानांतील पंडितराव म्हणजे न्यायशास्त्री होते; ते कर्नाटकांतील

चंदावर येथील राहणारे; जयसिंगाशीं बोलणें करण्याकरितां शिवाजीनें वकील म्हणून यांनाच पाठविलें होतें; आरंभीं ते शहाजीच्या विद्वन्मंडळांत होते; देशस्थ ब्राह्मण, कऱ्हाडे नव्हेत; त्याचप्रमाणें सारस्वतही नव्हेत व त्यांचें आडनांव चंदावरकरही नव्हे, इ० माहिती रा० प्रियोळकर यांनीं पुढें आणिली आहे. यानें दमयंती–स्वयंवर, गजेंद्रमोक्ष व रामदासवर्णन, हीं काव्यें लिहिलीं. पैकीं पाहिलें काव्य अत्यन्त सरस असून तें त्यांचें नांव अजरामर करणारें आहे. बाकीचीं दोन किरकोळ आहेत. श्रृंगार, वीर, करुणा, इ० रस व अनुप्रास, श्लेष, यथोक्ति, इ० अलंकारांनीं तें चांगलेंच सजविलेलें आहे. वृत्तयोजनाही रसानुरूप आहे. पूर्वीची विशिष्ट काव्यरचनापद्धति सोडून संस्कृत महाकाव्याच्या धर्तीवर रचना करणारा हाच पहिला कवि होय.

**उपरि सकंटक साचे परंतु साचे जयांत सु-रसाचे ।**
**घोस असे फणसांचे षण्मासांचे कितेक वरसांचे ॥**

हें फणसांच्या झाडांचें वर्णन,

**कदा नेणो वोढी शरधिंतुनि काढी शर कदा ।**
**कदा धन्वीं जोडी वरिवरिहि सोडी तरि कदा ॥**
**विपक्षाच्या वक्षावरि विवरलक्षास्तव रणीं ।**
**कळे राजेंद्राची त्वरित शरसंधान–करणी ॥**

हें नळाच्या शरसंधान-चापल्याचें वर्णन,

**हे मंद-मंद–पद सुंदर कुंद-दंती । चाले जसा मद-धुरंधर इंद्र-दंती ॥**
**हंसा धरूं जवळि जाय कृशोदरी ते । निष्कंप-कंकण-करासि पुढें करीते ॥**

इ० स्वभावोक्तिपर सुंदर वर्णनें याच्या काव्यांत विपुल आहेत.

**आनंदतनय.** रघुनाथपंडित व आनंदतनय हे व्याही–व्याही होते असें म्हणतात. आनंदतनय हे ‘ आरणी ’ येथील राहणारे. यांनींही सीतास्वयंवर, शबरी आख्यान, उमा-रमा-संवाद, वगैरे आख्यानें रचलीं आहेत. त्यांत अर्थ-चमत्कृतीपेक्षां शब्दचमत्कृति साधण्यावर भर अधिक असल्यानें त्याच्या काव्याला क्लिष्टता आलेली आहे; तरी वर्णनशैली रघुनाथ पंडितांच्या धर्तीवर असून मनोहर आहे. हे एका श्लोकांत आपणांस ‘आरणीचा शिपाई’ असें म्हणवून घेतात.

**मुक्तेश्वर** ( १५९९–१६४९ ). एकनाथाचा नातू ( मुलगी गोदूबाई हिचा मुलगा ). पैठणचा राहणारा. याचीं भारताचीं कांहीं पर्वें उपलब्ध आहेत,

तेवढ्यावरूनही त्याचें बहुश्रुतत्व व रसाळपणा हीं व्यक्त होतात. त्याची सृष्टि-वर्णनें, शब्दचित्रें व तपशील मोहक व फार बारकाईचीं असतात. याची वर्णन-शैली एकंदरींत हृदयंगम असली तरी क्वचित् छचोरही आहे. त्याचप्रमाणें भारतीय पात्रांच्या तोंडीं कर्णकटु यवनी शब्द आणि ज्या गोष्टी त्याच्या कालांत होत्या परंतु भारतकालांत नव्हत्या त्या तो तत्कालीन वर्णनांत दडपून देतो हे दोष फार आंढळतात. त्याचें रामायण व हरिश्चंद्राख्यान, वगैरे कांहीं आख्यानें व पदेंही आहेत. त्याच्या रचनेंत इतर तत्कालीन कवींपेक्षां कांहीं ना कांहीं निराळें कौशल्य आढळतें.

**पवित्र शीतळ जळ, माथां मंदाकिनी । कंठीं धरियला वन्ही, नवल काय ?**
**गरुडारूढ मधुसूदन, हृदयीं वसे पूर्ण । कंठीं सर्पाभरण, नवल काय ?**
**सिंहावरी वोळंगत, अंकीं गिरिजा स्वस्थ । मारिला कुंजर दैत्य, नवल काय ?**
**अहो लीला-विश्वंभरा, कृपामूर्ती जगदोद्धारा । तारिसी मुक्तेश्वरा, नवल काय ?**

'**विठ्ठल**' अनंत क्षीरसागर. रुक्मिणी-स्वयंवर, सीता-स्वयंवर, रसमंजरी, इ० सात ग्रंथ यांनीं लिहिले. प्रत्येक ग्रंथाची ओवीसंख्या, नांव, शक, इ० पूर्ण तपशील त्यानें दिला आहे. बीडजवळील गौरीपूर येथील राहणारा. अनेक नवीं वृत्तें, बंध, कूटें, याच्या काव्यांत कृत्रिमपणानें खच्चून भरलेलीं आहेत. छत्र, चामर, स्वस्तिकें, व्यजनें, पट्टीश, सारीपाट, वापी, अश्व, उष्ट्र, गज, धनुर्बाण, अष्टदलादि वेध, माला, खड्ग, सर्प, मयूर, इ० चित्रकाव्यें रचून हा अर्थप्राप्तीची याचना करितो; परंतु नाडेभोरपी किंवा गारुडी यांच्या लायकीची त्याची करामत असल्यानें फलप्राप्ति शून्य. याच्या कूटाचा एक मासला—

**कोणी एक वनीं विचित्र पुतळा जेवावया बैसला ।**
**पात्रीं जेवण जेवितांचि स्वबळें पात्रेंचि तो भक्षिला ।।**
**त्याची जी वनिता वनांत फिरतां सूर्यास प्रार्थी सदा ।**
**आणा 'विठ्ठल' हा पदार्थ उमगा षण्मासिंचा वायदा ।। १ ।।**

हा पदार्थ कमलांतील **भुंगा** होय हें सहज कळेलच. असल्या काव्यांत चमत्कृति आहे, पण जिव्हाळा नाहीं. याचा जन्म-मृत्यु शक प्रसिद्ध नाहीं.

**शिवकालीन भाषा-विशेष**—( १ ) पद्यामध्यें फारसीचा शिरकाव फारसा न होतां तें अविकृतच राहिलें. ( २ ) संस्कृत शब्दांचा व समासांचा भरणा यथास्थित होत गेला. ( ३ ) ओंवी व अभंग ह्यांशिवाय इतर वृत्तांत पूर्वी तुरळक पद्यरचना कदाचित् असेल, त्याऐवजीं आतां अनेक वृत्तांत कविता विलसूं लागली; आणि वामनादिकांच्या काव्यांनीं त्याला स्थिरता,

बहुविधता व उत्कृष्टता प्राप्त झाली. (४) पूर्वीच्या मराठीचें साधें-सुधें रूप जाऊन आतां तीं निरनिराळ्या अलंकारांनीं विभूषित: होऊन नटूं-मुरडूं व नाचूं-खिदळूं लागलेली आढळून येते. (५) रामदासांशिवाय बहुतेक कवींनीं वेदान्त, भक्ति, वैराग्य व पुराणकथानिरूपण, यांकडेच अधिक लक्ष दिलें आहे. (६) रामदासानें मात्र परमार्थाबरोबर प्रपंचही नेटका असावा, असें प्रतिपादन केलें आहे. (७) छन्द:शास्त्र, व्याकरण-शुद्धता, ह्यांकडे कोणत्याच कवींनीं प्रामुख्यानें लक्ष दिलेलें नाहीं. (८) वामनासारखा पंडितही ह्या गोष्टीस अपवादक नाहीं, मग 'अर्थरि तात्पर्ये' अशा रामदासासारख्यांची गोष्ट बोलावयासच नको.

गद्य-लिखाणांत मात्र बरीच घडामोड झाली. मुसलमानांच्या राजवटीचा परिणाम उत्तरोत्तर अधिक भोंवल्यावांचून: राहिला नाहीं. (१) लेखनशुद्धी-कडे कोणाचें लक्ष किंवा फुरसत नसल्यामुळें निरनिराळ्या लेखनांत एकाच शब्दाचीं निरनिराळीं रूपें आढळतात. उदा०—लखुजी–लुखजी, दियानतराव–द्यानतराव, औरंगजेब–अवरंगजेब, धर्मादाव–धर्मादाऊ, इ०. (२) मराठीं-तल्या मराठींतच बोलभाषेप्रमाणें विचित्र अशीं अपभ्रष्ट रूपें फारच आढळतात. उदा०—अश्रिवाद, सदभट, विस्णदास, जाग्रुती, सत्वेस्वर, धर्मपरायेण, छेत्रपती, दुकोळ, भोगोटा, थापना, धाशत, यस्यास, भुशणें, स्याहाजी, कळहो, ळहान, लक्षमी, महादेभट, दरोज, छप्रपलंग, इ०. (३) फारसी वर्णांचा निभृत उच्चार आतां बोलभाषेंत व तसल्या गद्य लिखाणांत कायमचा घुसला गेला. उदा०—मार्‌तो, कर्‌तो, जेव्‌ला, बस्‌ला, उठ्‌ला, इथ्‌ला, तिथ्‌ला, वर्‌चा, मधूला, कर्, डर्, गवत्, इ०. (४) कांहीं फारसी व्यंजनांचें मराठीच्या लेखनांत स्वरयुक्त पूर्ण अक्षरही झालें. उदा०—सरदार, दरबार, तरवार, इ०. (५) झुंजारराऊ, जिऊ, हुसेनु, असल्या ठिकाणीं नामांचीं ऊ–कारान्त रूपें केलेलीं आढळतात. (६) देसायान्, देशमुखान्, कारकुनान् इ० प्रथमेचीं मूळचीं अनेकवचनें असून, त्यांस पुनः षष्ठीचा 'इ' प्रत्यय लावितात (देशमुखान्+इ=देशमुखी). (७) महालासी, मसलतेस, आपाणियासी, यैसियास, अशीं द्वितीयेचीं व चतुर्थीचीं रूपें आढळतात; शिवाय त्यांकरितां मूळरूपेंही वापरलीं आहेत. उ०—खान **सातारा** आला, इ०. (८) भटें, महाराजें, साहेबीं, येहीं, तेहीं, मियां, तुवां, अशीं तृतीयेचीं रूपें आहेत. (९) मौजे,

किल्ले, यांतील [ मौजा + इ, किल्ला + इ ] ‘ इ ’ ह्या प्रत्ययाबद्दल पूर्वीं विवेचन आलेंच आहे. ( १० ) लोकीं, पूर्वे, उत्तरे, हवाला, इ० सप्तमीचीं रूपें आहेत. ( ११ ) केसो त्रिमळ ( नें ) लेहाया पाठविली, मलीक अंबर ( पासून ) भोगवटा ( चा ) आहे, हाजी बुऱ्हाण ( नें ) मालूम केले, पेशजी कारकीर्द ( त ) जो गुन्हा केला, इ० ठिकाणीं विभक्ति–प्रत्ययांचा लोप आढळतो. ( १२ ) गेलिया, सातारिया, आठा ( दिवसा ), विसा ( वर्षांचा ) इ० सामान्यरूपें आहेत. ( १३ ) जे जे वस्तु, ते ते वर्तणूक, यांतल्याप्रमाणें प्रथमान्त एकवचनी स्त्रीलिंगी सर्वनामें आहेत. ( १४ ) विशेषणें विशेष्यापुढें घालणें, उ०–दिवसा **दहा** मध्यें, किल्ले **मजकुरीं**, हकीकती **कैसी**, इ०. ( १५ ) होए, आहेती, खाताती, असेती, इ० वर्तमानकाळीं; दिधलें, खादली, पुसिलें, निजेला, इ० भूतकाळीं; दीजे, कजि, इ० कर्माणि; क्रियापदरूपें आहेत. ( १६ ) लेहाया, आलिया, म्हणउनु, करुनु, कळौनु, सांगोन, पोहोचाऊन, इ० कृदन्तें आहेत. ( १७ ) रोज, यैसा, दरोज, हाली, बरजोर, बेसक, हरीवख्त, इ० फारसींतून आलेलीं क्रियाविशेषण अव्ययें आहेत. ( १८ ) शब्दयोगी अव्ययें मागें व पुढें दोन्ही प्रकारें वापरण्याचा प्रघात होता. उ०—त्यावरी, गेलियावरी, जर्धीपासून, वरीलीकडुनु, किल्ले कोंढाणा खाले ( कोंढाणा किल्ल्याखालीं ); देखत परवाना, देखत हुकूम; इ०. ( १९ ) बस, अलबत, बेशक, बेलाशक, खूप, वाहवा, अफसोस, शाबास, खूष, इ० केवलप्रयोगी अव्ययें फारसींतून आलेलीं आहेत. ( २० ) गनीमास घेरा केले, विलायती खराब जाला, त्यास हे नामाकुल गोस्ट न कजि, कुसुर हो न देणें, तुम्ही पांढरीच्या कामास आला आहां, इ० शेंकडों प्रयोग-विशेष फारसीपासून मराठींत उत्पन्न झालेले आहेत.

याप्रमाणें अंतर्बाह्य स्वरूपांत, रोजच्या बोलण्यांत व गद्य लिखाणांत आतां फारसीनें आपला इतका शिरकाव केला होता कीं, तिच्या अतीव वर्चस्वामुळें मराठी अज्जीबात नामशेष होते कीं काय असें वाटूं लागलें होतें; परंतु मागें लिहिल्याप्रमाणें शिवाजी व तत्कालीन साधु-संत यांच्या प्रयत्नांमुळें व जोपासनेमुळें तो प्रसंग मराठीवर गुजरला नाहीं; इतकेंच नव्हे, तर उलट मराठीनें फारसीचें एवढें उसनें घेऊनही तें आपल्या कामास लाविलें व पचवून टाकिलें.

ह्या कालांत खलाशांचे, आरमारासंबंधाचे, पोषाखाचे, सैन्यांतील हुकुमांसंबंधाचे कांहीं शब्द—शिरपेंच ( फा० ), फालतू ( हिं० ), कंपू ( इं०–कँप =

जमाव ). गर्नाल ( हि० ), पिस्तूल ( इं०—पिस्तोल ), बनेला ( पोर्तुगीज—गलबत ), साबण ( अर०—साबून ), मेस्त्री ( कारागीर ), इ०—मराठींत घुसले; पण त्यांनीं नुकसान न होतां मराठी शब्द—संपत्तींत थोडी-फार भर पडली; हा उपकारच झाला.

**फादर स्टीफन्स** (१५४९–१६१९). ह्या मिशनरी गृहस्थानें गोमंतकांत ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्याकरितां म्हणून मराठींत पण रोमन लिपींत सन १६१६ त ओंवीबद्ध ख्रिस्तपुराण लिहिलें. इकडे आलेल्या तत्कालीन युरोपियनांची मराठी भाषा कशा प्रकारची होती, हे त्यावरून कळून येतें.

उ ता रे

## शिवाजीचें कान्होजी जेधे यांस पत्र

श्रीमंत सकलगुण अलंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री कान्होजी जेधे देशमुख तपे भोर किले रोहिडा प्रति राजश्री शिवाजीराजे जोहार येथील क्षेम जाणौनु स्वकयि कुशल लिहिणे तुम्ही पत्रिका पाठविली सकल आभिप्राउ कलौं आला. लि० की खान अर्लीशानखान येही लिहिले आहे की, जावलीवरी सुरू केले आहे तरी तुमचा व त्यांचा पहिलेपासून घरोबा आहे गेले तरी पाहिजे आमा खासा अगर पुत्र पाठवायाचे जाले तरी बोलभाक बरवे रिति घेउनु मग जाणे दगा होये येसे न करणे...हरयेक करून तुम्ही राहणे दोन्ही गोस्टी तुम्हास लिहिल्या आहेती यांत तुम्ही स्याहणे असा बहुत लिहिणे नलगे.

## तुकाराम

देवाशीं सलगी—

देव बराडी बराडी । देठासाठीं घाली उडी ॥ १ ॥
देव भ्येड देव भ्येड । राखे बळीचे कवाड ॥ २ ॥
देव भावीक देव भावीक । होये दासांचे सेवक ॥ ३ ॥
देव होया देव होया । जैसा म्हणे तैसा तया ॥ ४ ॥
देव लाहान देव लाहान । तुका म्हणे आणोरणं ॥ ५ ॥

ह्या जगनाडी गाथेंतल्या अभंगाइतकी तुकारामाची वाणी अशुद्ध होती कीं काय असा संशय येतो.

विष्णुदासांची वृत्ति—

मऊ मेणाहूनी आम्ही विष्णुदास । कठिण वज्रास भेदूं ऐसे ॥ १ ॥
मेले जित असों निजोनियां जागे । जो जो जें जें मागे तें तें देऊं ॥ २ ॥

भले तरी देऊं XXची लंगोटी । नाठाळाचे काठी देऊं माथां ॥ ३ ॥
मायबापाहुनी बहू मायावंत । करूं घातपात शत्रूहुनी ॥ ४ ॥
तुका म्हणे आम्ही अवघेचि गोड । जया पुरे कोड त्याचे परी ॥ ५ ॥

समाजसुधारक तुकाराम—

महारासी शिवे । कोपे ब्राह्मण तो नव्हे ॥ १ ॥
तया प्रायश्चित्त कांहीं । देहत्याग करितां नाहीं ॥ २ ॥
नातळे चांडाळ । त्याचा अंतरीं विटाळ ॥ ३ ॥
ज्याचा संग चित्तीं । तुका म्हणे तो त्या याती ॥ ४ ॥

× × ×

आली सिंहस्थ पर्वणी । न्हाव्यां भटां झाली धणी ॥ १ ॥
अंतरीं पापाच्या कोडी । वरविरी बोडी डोई दाढी ॥ २ ॥
पाप गेल्याची काय खूण ? । नाहीं पालटले अवगुण ॥ ३ ॥
भक्तिभावेंविण । तुका म्हणे अवघा सीण ॥ ४ ॥

## रामदास

प्रपंच व परमार्थ—

गृहासी आग लागली । देखोनी कां बोंब केली ॥ लोकांची मांदी मेळवली । आगी विझवाया कारणें ॥ १ ॥ तसी परमार्थीं बोंब मारावी । कांहीं काढाकाढी करावी ॥ हळू हळू सोडवावी । मिठी प्रपंचाची ॥ २ ॥ प्रपंच धुडका पेटला । मध्यें परमार्थ जळूनि गेला ऐसें ॥ देखोनि तुम्हांला । कैसें बरें वाटतें ? ॥ ३ ॥

तरणोपाय—

कांहीं समुदाव करणें । येविषीं आलस्य न करणें ॥ आलस्य करितां उदंड उणें । दिसेल परमार्थीं ॥ १ ॥ पोहणारे बुडते तारावे । सामर्थ्यें बुडों नेदावे ॥ मूर्ख ते शहाणे करावे । विवेकी पुरुषें ॥ २ ॥ सोइऱ्या धायऱ्यांचीं मुलं । तिक्षण बुधिचीं सखोलें ॥ तयासी बोलणें मृद बोलें । करीत जावें ॥ ३ ॥ निकट मित्री बरी होतां । मग त्यासी न्यावें एकांता ॥ म्हणावें ' रे, भगवंता । कांहींतरी भजावें' ॥ ४ ॥ मान्य होतां जप सांगावा । मग तो इकडे पाठवावा ॥ मग तयाचा सकळ गोवा । उगऊं आम्ही ॥ ५ ॥

जोरदार उपदेश—

समर्थाचिया सेवका वक्र पाहे । असा सर्व भू-मंडळीं कोण आहे ? ॥
जयाची लिळा वर्णिती लोक तीन्ही । नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥ १४ ॥

भवाचे भयें काय भीतोसि लंडी । धरीं रे मना, धैर्य धाकासि सांडीं ॥
रघूनायकासारिखा स्वामि शिरीं । नुपेक्षी कदा कोपल्या दंडधारी ॥

## वामन पंडित

नामसुधा—

हरिपण हरिनामें धातुमूर्तीस आलें ।
हरिमय हरिनामें विश्व संतांसि जालें ॥
भवभय हरिनामें साधकांचें पळालें ।
वद वद वद जिव्हे, रामनामें रसाळें ॥

वेणुसुधा —

अंग वक्र अधरीं धरि पावा । गोपवेष हरि तोचि जपावा ॥
वाम-बाहुवरि गालहि डावा । तो ठसा स्व-हृदयांत पडावा ॥ १ ॥
वेणुध्वनी तो सुर-गायकांनीं । त्यांच्या विमानांतहि बायकांनीं ॥
आश्चर्य कानीं पडतांचि केलें । न तृप्त ज्यांचें मन हें भुकेलें ॥ २ ॥
मातृ-स्तनींचा रस आननांत । तों होय वेणु-ध्वनि काननांत ॥
गळे गिळेना पय वासुरांतें । आश्चर्य वाटे गगनीं सुरांतें ॥ ३ ॥
वनीं राजहंसीं पिकांनीं शुकांनीं । ध्वनी गोड तो आयकोनी सुकानीं ॥
त्वरें येउनी सेवियेले हरीतें । महापापही नाम ज्याचें हरीतें ॥ ४ ॥

कृष्णदर्शनसुख—

कड्यावरुनियां उड्या प्रथम टाकुनी त्या गड्या ।
गडे पशुप भेटती तडतडां भुजीं आंगड्या ॥
फुगोनि तनु फाटती मणगटीं कडीं दाटती ।
सुखें अमित वाटतां विरह-सिंधु ते आटती ॥

सितास्वयंवर—

गजगती जगतीप्रति दाविते । वसुमती सुमती सुख भाविते ॥
स्वतनुजा-तनु जाणतसे धरा । नवरि ते वरिते मणि-कंधरा ॥

बटु वामन—

तूं बा कोण ? अपूर्व, कोठ वससी ? हें विश्व जीं तत्त्वतां ।
पाळीं कोण तुतें ? अनाथ आजि मी, भ्राता न माता-पिता; ॥

**द्यावें काय तुतें ? त्रि-पाद धरणी माझ्या पदें; फार घे; ।**
**नेघें; वामन बोलिला बळिस कीं तृप्ति त्रिलोकीं रिघे ॥**

किती प्रकारचीं व किती वर्णनें द्यावीं ? वरील पद्यांवरूनही वामनाचीं सुंदर यमकें, मृदु लालित्ययुक्त भाषा, योग्य वर्णनशैली, संस्कृत-शब्द-प्रचुर, प्रौढ व नाना अलंकार-खचित अशी रचना, इ० गोष्टी दिसून येतील.

## फादर स्टीफन्स

मराठी बोली—

**परम-शास्त्र जगीं प्रघटावेया । बहुतां जनां फळसिद्धि होवावेया ॥**
**भासा बांधोनी मराठिया । कथा निरोपिली ॥ १२१ ॥ जैसी पुस्पांमाजी**
**पुस्प मोगरी । कीं परिमळामाजी कस्तुरी ॥ तैसी भासांमाजी साजिरी ।**
**मराठिया ॥ १२३ ॥ पक्षिआंमधें मैओरू । वृक्ष्यांमध्यें कल्पतरू ॥**
**भासांमधें भासु थोरू । मराठिया ॥ १२४ ॥ तारांमधें बारा राशी । सप्त**
**वारां माजी रविसशी ॥ भासांमधें मानुं तैशी । मराठिया ॥ १२५ ॥** (अवस्वरु १)

## ४. पेशवेकालीन मराठी ( १७०० ते १८०० )

पेशव्यांचा काल म्हणजे स्वराज्याच्या भरभराटीचा काल होय. शिवाजी-नंतर अनेक कर्तृत्ववान् मराठ्यांनीं झुंजारपणा प्रगट करून मराठी राज्य राखिलें; आणि पुढें शाहूच्या कारकिर्दीत मराठ्यांचा व्यवहार इतका वाढला कीं, त्याला सर्व हिंदुस्थान पुरेनासें झालें. ह्याचा परिणाम भाषेवरही घडून आल्या-वांचून राहिला नाहीं. उत्तर-हिंदुस्थानांतील झगड्यांमुळें व निजामाशीं प्रत्यहीं होणाऱ्या कटकटींमुळें दिल्लीचीं व इतर ठिकाणचीं राजकारणें चालविण्यासाठीं फारसीच्या व्यवहारावांचून मराठीचें चालूं शकलें नाहीं. उलट पूर्वींपेक्षां दस्तैवजी कागदपत्र, तहनामे, सरकार-दरबारचीं कामें, इनाम-देणग्या-वतनां-संबंधाचे कागदपत्र, यांत फारसीचें प्राबल्य वाढतच गेलें. ह्या गोष्टीकडे लक्ष देण्यास त्यावेळीं कोणाला फुरसतही नव्हती.

ह्या कालांत श्रीधर, महीपति, मोरोपंत, मध्वमुनि, अमृतराय, निरंजन-माधव, काशिकवि, रामजोशी, इ० नामांकित कवि होऊन गेले. त्याचप्रमाणें रामजोशी याच्या संप्रदायांतील अनंतफंदी, रामा सटवा, लहरी मुकुंदा,

होनाजी बाळा, प्रभाकर, सगनभाऊ, परशराम, ह्या शाहीरांनीं आपल्या कवितेचा एक निराळाच थाट उडवून दिला.

**श्रीधर** ( १६७८–१७२९ ). पंढरपूर येथील राहणारा. यानें हरिविजय, रामविजय, पांडवप्रताप, शिवलीलामृत, इ० ओवीबद्ध ग्रंथ लिहिले. यानें कांहीं श्लोकबद्ध रचनाही केली आहे, परंतु ती प्रसिद्ध नाहीं. याचे ग्रंथ रसाळ असल्यानें महाराष्ट्रांत आबाल–वृद्धांस प्रिय झालेले आहेत. सुबोधता, माधुर्य, रसोत्कटता, हे याच्या काव्यांतील विशेष आहेत. ' मल्लयुद्धानें मल्लांस आनंद व्हावा, युद्धवर्णनानें योद्धयांस हुरूप चढावा, सुदामजीच्या चरित्रानें दरिद्र्यांस स्वतःची यथार्थ ओळख व्हावी, राम-लक्ष्मणांच्या हकीकतीनें बंधु-प्रेमाचा उमाळा यावा, कृष्णाच्या खोडकर लीलांनीं बालांस हसूं यावें व प्रेमळांसही आनंद व्हावा, अशी याची हातोटी असल्यानें त्याच्या इतकी महाराष्ट्रावर दुसऱ्या कोणत्याही कवीची छाप बसली नाहीं.

**महीपति** ( १७१५–१७९० ). आडनांव कांबळे. नगर जिल्ह्यांत राहुरीजवळ ताहराबाद येथें राहणारे. विशेष व्युत्पन्न नव्हते. त्यांनीं भक्तविजय, संतविजय, भक्तलीलामृत, संतलीलामृत, इ० ग्रंथ ओवीवृत्तांत रचिले. त्यांत इतिहास नाहीं, तरी चौकसबुद्धि, भाविकपणा, ह्या गोष्टी आढळून येतात. भाषा साधीसुधी असली, तरी दृष्टान्तांनीं ते आपला विषय चांगला सजवितात. उत्तरहिंदुस्थानांतलि नागरा अंध कवि नाभाजी, याशिवाय संतचरित्रें यापूर्वी कोणीं गाइलीं नव्हती, तीं यानें एकत्र केलीं हें याचें महत्त्वाचें कार्य आहे.

**मोरोपंत** ( १७२९–१७९४ ). वडिलांचें नांव रामाजीपंत. आडनांव पराडकर. कऱ्हाडे ब्राह्मण. बारामतीस पेशव्यांचे व्याही बाबूजी नाईक यांजकडे पुराण सांगण्याचें काम करीत. यांनीं महाभारत, भागवत, रामायण, इ० मधील कथानकांवर आर्यावृत्तांत पुष्कळच कविता लिहिली आहे. यांच्या इतकी सरस आर्या ( गीति ) दुसऱ्या कोणास साधली नाहीं. यांनीं संस्कृत ग्रंथरचनाही बरीच केली असून, त्यावरून ते चांगले व्युत्पन्न होते हें स्पष्ट दिसून येतें. त्यांनीं अष्टोत्तरशत रामायणेंही लिहिलीं आहेत. यांची केकावलीही पुष्कळांस परिचितच आहे. यांच्या इतकी विविध प्रकारची व सुमारें पाऊण लाख ग्रंथरचना करणारा कवि महाराष्ट्रांत दासोपंताशिवाय दुसरा झाला नाहीं. यांची कविता प्रौढ, शुद्ध, सरस, व कांहीं ठिकाणीं रसाळही आहे. त्यांच्या कवितेंत प्रास-यमकादि शब्दा-

लंकार व उपमा, रूपक, इ० अर्थालंकार विपुल आढळतात. कोणती एकादी काव्य-चमत्कृति मोरोपंतांनीं साधिली नाहीं, असें नाहीं. यांची कविता संस्कृत-शब्द-प्रचुर व समासप्रचुर असल्यानें सामान्य माणसांस क्लिष्ट वाटते; परंतु विद्वान् मर्मज्ञ त्यांत रंगून गेल्यावांचून राहत नाहींत. यांना कोणी ' महाराष्ट्र-कविवर ' म्हणून अत्युच्च सिंहासनावर बसवितात, तर कोणी त्यांस केवळ भाषान्तरकार म्हणून अगदींच सामान्य लेखतात. तथापि त्यांनीं स्वचित्तशुध्यर्थ काव्य लिहिलें; तें भाषाप्रभुत्व दाखविण्याकरितां नव्हे; असें ते स्वतः शतधा सांगत असतांना त्यांवर भलतेच दोष लादणें युक्त नव्हे. त्यांच्या दूषकांसही त्यांचें भाषाप्रभुत्व मान्य करावें लागतेंच. स्वतःच्या हयातींतच काशीपासून रामेश्वरपर्यंत प्रसिद्धि पावलेले हेच पाहिले महाराष्ट्र–कवि होत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. रामजोशी यांनीं कीर्तनप्रसंगीं गाऊन त्यांच्या आर्यांचा एवढा प्रसार केला.

**रामजोशी** ( १७६२–१८१२ ). सोलापूरचा राहणारा. छन्दः–शास्त्रा-वरील 'छन्दोमंजरी' नांवाचा उत्कृष्ट ग्रंथ यांच्या नांवावर छापलेला आहे; पण तो रामचंद्र दैवज्ञानें लिहिला आहे, असें भावे म्हणतात. ( म० सा० भा० २ पृष्ठ ३७६ ). त्याची विशेष प्रसिद्धि त्यानें ' लावणी ' हा जो काव्यप्रकार मराठींत नवीन सुरू केला, त्यावरून आहे. हा कीर्तनकार असून गांवोगांव हिंडे. स्वतःचीं व मोरोपंतांचीं कवनें रसाळपणानें कीर्तनांत गाऊन, आपल्या वक्तृत्वानें तो आपल्याभोंवतीं लोकांचा फड उभा करी. प्रारंभीं तो चिमा व बया या दोन सहकारिणी, आणि कुत्रीं, माकडें, बरोबर घेऊन तमाशे करीत गांवोगांव हिंडे. परंतु पुढें मोरोपंतांच्या सांगण्यावरून त्यानें भक्तिपर लावण्या केल्या; त्याही शृंगारपर लावण्यांइतक्याच सरळ आहेत.

**पेशवेकालीन भाषाविशेष**—( १ ) शिवकालीन भाषेपेक्षां पेशवे-कालीन भाषेंत पद्यरचनेंत कांहीं विशेष फरक पडला नाहीं. ( २ ) पुराणकथा-निरूपणांतच बहुतेक कवि रंगून गेले होते; तथापि उत्तर–पेशवाईत ( ३ ) शाहीर मंडळींनीं जो थाट उडवून दिला तो अपूर्व आहे. शाहीर मंडळांनीं शृंगारिक लावण्या रचून एक प्रकारें पद्याला निराळें वळण लाविलें; त्याचप्रमाणें ( ४ ) त्यांनीं तत्कालीन वीरांचीं व वैभवाचीं वर्णनें पोवाड्यांत गाऊन वीररसोत्पादक काव्याचा एक निराळाच मासला लोकांपुढें आणून त्यांस रंजविलें; त्यांचा ' लावणी ' हा प्रकार जरी कानांला गोड वाटला तरी ह्या रचनेला एकंदरीत असभ्यतेचा वास येत असल्यानें तो प्रकार शिष्टजनसंमत नाहीं.

उ ता रे

## श्रीधर

यशोदा-कृष्ण—

गजवदनासी म्हणे यशोदा । गुण देईं माझिया मुकुंदा ।। संकष्टचतुर्थी सर्वदा । न सोडीं मी जाण पां ।। १ ।। वचन ऐकोनी कृष्णनाथें । सत्य कराया गणेशातें ।। खोडी केली नाहीं अनंतें । एक मासपर्यंत ।। २ ।। यशोदा म्हणे आली प्रचिती । धन्य धन्य देव गणपती ।। तों सवेंचि आली चतुर्थी । संकट हर्त्री सर्वांचें ।। ३ ।। ... विस्मय मायेसी वाटला । म्हणे रे घननीळा ।। नैवेद्य अवघा काय झाला । हारा पडिला रिता कां ? ।। ४ ।। श्रीकृष्ण म्हणे वो माते । सत्य मानीं वचनातें ।। एक सहस्र उंदीर येथें । आले होते आतां हो ।। ५ ।। त्यांत एक थोरला मूषक । त्यावरी बैसला विनायक ।। सोंडेनें लाडू सकळिक । एकाएकीं आकर्षले ।। ६ ।।

इत्यादि मोहक वर्णन ऐकून कोणत्या खोडसाळ बालकांना आनंद होणार नाहीं ? व कोणत्या वत्सल मातांना प्रेमपान्हा फुटणार नाहीं ?

## निरंजनमाधव

काशीक्षेत्र—

गंगापुत्र गुमान फार करिती, घाटीं सदा हिंडती ।
कंगालासि पिडा करूनि धरिती, 'दे दक्षिणा' मागती ।।
थोडी घेति न, बोलती खलमती, नानापरी पीडिती ।
आंगासी झटती, किचाट करिती, हाणोनि घेती किती ? ।। १ ।।

हे गंगापुत्रांचे वर्णन किती यथायोग्य आहे ?

## मोरोपंत

रुक्मिणी-हरण—

माळा ऊचालितां प्रिय आपणाहि रथावरूनियां लवला ।
लव लागे ना तों घे अंकीं करुणा-समुद्र कालवला ।। १ ।।
...हंसें मुक्ता नेली मग केला कलकलाट काकांनीं ।
हाकांनीं नभ भरलें जाय सुरांच्याहि नाद हा कानीं ।। २ ।।

कुंभकर्ण-निद्रा

विंध्य तसा निजला तो, वदन-दरीमाजि निबिड अंधार ।
फार भयंकर भासे, पाताळाचेंचि काय तें दार ! ॥ १ ॥

हीं शब्दचित्रें किती मजेदार आहेत !

गंगा-वर्णन—

देवि, दयावति, दवाडिसि; दासाची दुःख-दुर्दशा दूर ।
पापांतें पळवितसे; परम-पवित्रे, तुझा पयःपूर ॥ १ ॥

यांतील अनुप्रास किती साहजिक व सुंदर साधले आहेत ?

स्वोद्धारार्थ प्रार्थना—

दयामृतघना अहो हरि, वळा मयूराकडे ।
रडे शिशु तयासि घे कळवळोनि माता कडे ॥
असा अतिथि धार्मिकस्तुतपदा, कदा सापडे ।
तुम्हां जड भवार्णवीं उतारितां न दासा पडे ॥ (केकावलि)

भीष्मार्जुन-युद्ध—

शांतनव सिंह गमला, पळतां नर-रथहि तो पळ ससाच ।
स-सख प्रभुहि वसंतीं, बहु फुलला होय हा पळस साच ॥

शांत, वीर, करुण, इ० कोणताहि रस मोरोपंतास साधतो. मात्र, वीररसाचे वेळीं त्यांची कविता अधिक ओजस्वी दिसून येते.

## पंतानुगामी कवि

श्रीएकनाथसदनीं माधवजी सर्व काम हें करितो ।
प्रेमें चंदन घाशी गंगेचें पाणि कावडी भरितो ॥ (पंतपुतण्ये बाळाजी)
न मरे यास्तव नेला पर्वतशिखरासि लोटिला खोलीं ।
परि तो निर्भय चित्तीं वाहे नारायणासि लाखोली ॥ (धुंडिराज)
सुश्लोक वामनाचा, अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची ।
ओवी ज्ञानेशाची, किंवा आर्या मयूरपंताची ॥ (रामचंद्र बडवे)

## काशिकवि

सुभद्रा-याचना—

हरिची भागिनी ह्मणे सुभद्रा रुक्मिणी-वहिनी दया करा ।
दादाला तुम्हि कळवुनि वळवुनि, अर्जुनजीचा शोध करा ॥ ध्रु० ॥

आई-बापांचा श्रीकृष्णाचा विचार मोडुनि बलदेवें ।
दुराग्रहानें निश्चय केला, सुयोधनाला मज द्यावें ॥
भाउ नव्हे हा बाउच केवळ, भावुनि मनांत उमजावें ।
वाडिल बंधु परि आडिल खोडकर, खळाकडिल हें समजावें ॥
हंसा टाकुनि काय वायसा मुक्ताफळ हें अर्पावें ! ।
जन्मांतरिंचा वैरी भाऊ, असें यावरुन वळखावें ॥
अपाय याला उपाय न सुचे; काय करावें ? विष खावें !
दुर्योधन खळ हेला मेला गेला उलथुन पोटभरा ॥ दादाला० ॥ १ ॥

याच्या इतक्या सोप्या व हृदयंगम कवितेचा मासला क्वचितच आढळेल.

## रामजोशी

उपदेशपर लावणी—

भला जन्म हा तुला लाधला खुलास हृदयीं बुधा—
धरिसि तरि हरिचा सेवक सुधा ॥ ध्रु० ॥
चराचरीं गुरु तरावयाला नरा, शिरावरि हरी—
जरा तरि समज धरीं अंतरीं ॥
काय गळ्यांत घालुनि तुळशीचीं लाकडें ?
हीं काय भवाला दुर करितिल माकडें ?
बाहेर मिरविशी; आंत हरिशिं वांकडें ।
अशा भक्तिच्या रसारहित तूं कसा म्हणविशी बुधा ?—
हरिरस सांडुनि, घेसी दुधा ॥ १ ॥ भला० ॥

## लहरी मुकुंदा

देशस्थितिपर लावणी—

धन्य वंश एकेक पुरुष कल्पवृक्ष पिकले ।
शत वर्षें द्विज पाक्षि आनंदें त्या तरुवर टिकले ॥
जलचर, हैदर, नबाब, सन्मुख रण करितां थकले ।
ज्यांनिं पुण्याकडे विलोकिलें ते संपत्तिला मुकले ! ॥

## प्रभाकर

पेशवाईचा शेवट—

यशस्वि झाले श्रीमंत पहिले सर्व लढायाला ।
आतांच आलें अपेश कोठुन बाजीरायाला ? ॥

जे श्रीमंत सकुमार ते वनांतरीं भटकत फिरती ।
कळलें तिकडे भर दिवसा प्रभु कांख्यांमाधिं शिरती ॥
आपला घोडा आपण स्वहस्तें चुचकारुन धरिती ।
खालीं पसरुन उपवस्त्र दिलगिरींत वर निद्रा करिती ॥
कुंकवावांचुनि कपाळ मंगळसूत्रावांचुन गळा ।
तसा सैन्य-समुदाय उदासिन रंग दिसे आगळा ॥

अशा प्रकारची पेशवाईच्या उत्तर-काळांतली ह्या शाहीर-मंडळींची कविता आहे. ऐश्वर्य, संपात्ति व त्याबरोबरच रंगेलपणा, ह्या गोष्टी ह्या कवींच्या काव्यांत अधिक आढळून येतात. कवन उत्कृष्ट, खडा आवाज, रागदारीच्या ताना, नव्या नव्या ढंगांच्या चाली, आवडता रस, ह्यांच्या योगानें तत्कालीन जन-समाज वेडावून गेला असला, तर त्यांत कांहींच आश्चर्य नाहीं. छेका-पन्हुतींत या सर्व कवींचा तुरा जो रामजोशी त्यांनीं— "अशी रचाया दुजी कुणाची माय व्यालि भूवरी?" असें शेवटीं विचारलें आहे. तो आपल्याला '**कविराय**' असें म्हणवून घेतो; आणि— 'अशी कोण वर्णि सदालिका। इतर कवि कविरायाहुनि फिका' असे तो अभिमानोद्गार काढितो. प्रत्यक्ष कविता पाहिल्यावर रसिकालाही तसें वाटल्यावांचून राहत नाहीं. अनंतफंदीसंबंधानें असाच प्रकार आहे. त्याच्याबद्दल होनाजी बाळा म्हणतो—

## होनाजी बाळा

फंदी अनंत कवनाचा सागर अजिंक्य ज्याचा हातखंडा ।
चमत्कार चहूंकडे चालतो सृष्टींवर ज्याचा झेंडा ॥
वाचावंत संपत्ति सारखी, बहुतांचें तनमन हरकी ।
लुंगेसुंगे कवि भेदरले, अवघ्यांवर त्याची गुर्की ॥
समोर गातां कोणि टिकेना मनामधें बसली कर्की ।
धन ज्याचा हातचा मळ केवळ तो रुपयांचा हंडा ॥ १ ॥

## पेशवेकालीन गद्य वाङ्मय

पेशवाईतील गद्यवाङ्मय म्हणजे शिवाजीची ९० कलमी वाकेनविशी बखर, राजारामाच्या सांगण्यावरून सन १६९४ त कृष्णाजी अनंत सभासद यांनीं लिहिलेली शिवचरित्रात्मक 'सभासदी बखर' रामचंद्रपंत अमात्यांनीं लिहिलेलीं 'आज्ञापत्र' नांवाचीं प्रकरणें (सन १७१६), पानिपत प्रकरणा-बद्दल मोरो हरि व अंताजी माणकेश्वर यांनीं लिहिलेल्या बखरी, मल्हारराव

होळकरांनीं पेशव्यांस त्याच मोहिमेसंबंधीं लिहिलेली 'होळकरांची थैली,' तसेंच भाषेच्या दृष्टीनें अत्यन्त मौलिक असून आरंभापासून अखेरपर्यंत चटकदार पण शेवट हृदयद्रावक असलेली कृष्णाजी शामरावांची 'भाऊसाहेबांची बखर', तसेंच श्रीमंत गोपिकाबाईसाहेब यांनीं युद्धानंतर लगेच दोन वर्षांनीं रघुनाथ यादवाकडून अस्सल कागदपत्राधारें लिहविलेली एक बखर, मल्हार रामराव चिटणीस यांचें ( ? म० सा० भा० २, पृ० ३५७ ) 'राजनीति' नांवाचें एक प्रकरण व शिवाजीचें सप्तप्रकरणात्मक चरित्र ( सन १८१० ), सवाई माधवरावाकरितां नानानें लिहविलेली एक मराठी राज्याची बखर, यांशिवाय पेशवाईच्या अखेरीस कृष्णाजपंत सोहनी यांनीं लिहिलेली 'पेशव्यांची बखर,' सन १८१७ त लिहिलेली एक 'मराठी साम्राज्याची बखर' व इतर कांहीं बखरीवजा लिहिलेले ग्रंथ होत.

त्याचप्रमाणें खुद्द बाजीराव, चिमाजी आप्पा यांचीं पत्रें; नानासाहेब, भाऊसाहेब यांचीं पत्रें; पुण्यांतील, इंदूर-ग्वालेर येथील, दिल्ली येथील व निजामाकडील वकील यांचीं पत्रें; नाना फडनविसाचीं पत्रें व आत्मचरित्र; इ० पेशवेकालीन गद्यलिखाण डावपेंचांनीं, मुत्सद्दीगिरीनें व व्यवहार-चातुर्यानें भरलेलें असल्यामुळें तें पुष्कळ ठिकाणीं रसाळ असें उतरलें आहे; व म्हणून त्यास वाङ्मयांत स्थान देण्यास हरकत नाहीं. यांशिवाय रामायण–महाभारतादि पौराणिक आख्यानांच्या मोडींत लिहिलेल्या बखरी असत, पण त्यांना वाङ्मय म्हणतां येणार नाहीं

**पेशवेकालीन गद्यलिखाणांतील भाषाविशेष**— या कालांतील भाषेसंबंधानें साधारणपणें पुढील गोष्टी आढळून येतात. ( १ ) शिवाजीच्या कालांतल्यापेक्षांही पेशव्यांच्या कालांत सरकारी, दस्तैवजी व लढाई, तह, वगैरेसंबंधींच्या कागद-पत्रांत फारसीचा जोर अधिकच वाढला; परंतु ( २ ) खासगी पत्रांत तो तितकासा वाढलेला दिसत नाहीं. उदा०— रामचंद्रपंताचें आज्ञापत्र किंवा नाना फडनविसाचें आत्मचरित्र यांत फारसी शब्दांचा अतिरेक दिसत नाहीं. तेंच चिमणाजी आप्पाच्या युद्धसंबंधींच्या पत्रांत ( गनीम, बरकंदाजी, तोफजी, इ० ) शेंकडा ६० चे वर यवनी शब्द सांपडतील. ( ३ ) संस्कृत शब्दांचा भरणा करण्याची जी प्रथा शिवकालांत पडली ती कायमच टिकली; म्हणून सरकार-दरबाराशिवाय इतर लिखाणांत

संस्कृत शब्दही पुष्कळ आढळतात. (४) शुद्ध निर्भेळ देशीकार लेणें जवळ जवळ लुप्तच झालें म्हणावयास हरकत नाहीं. (५) त्याजवरोन, त्यादारभ्य, फिरंगीयांनीं, कि निमित्त कीं, प्रोत्साहनानिमित्त, इ० शब्दप्रयोग अठराव्या शतकाच्या प्रथमार्धातील लिखाणांत आढळतात. (६) ते उत्तरार्धातील लिखाणांत तितके आढळत नाहींत. नानाच्या आत्मचरित्रांतील भाषेस तर अगदीं अलीकडील वळण लागलेलें दिसतें. (७) सामान्य लिखाणांत शुद्धा-शुद्धतेकडे फारसें लक्ष नसल्यानें सवशय, माहाभारत, सप्तरिसी, कर्तुत्व, येश, येथास्थित, परायेण, श्रौंश, विच्यार, च्यार, युध्य, गोस्ट, विज्यापूर, सिव्या, असले शब्द सामान्य लेखकांच्या लेखनांत आढळतात. (८) कांहीं शब्द दुहेरी लिहिले जात. उदा०—अपसूत–अपसूक, उघडीप–उघडीक, अदमासें–अजमासें, नदर–नजर, खासगी–खाजगी, गुजरणें–गुदरणें, तसबीर–तजबीर, इ०. (९) कारकुनी लिखाणांत ए ऐ ओ औ बद्दल ये यै वो वौ असें लेखन ज्यास्त प्रचारांत आलें. उदा०—ऐसीजे–यैसीजे, ऐवजीं–यैवजीं, एक–येक, औषध–वौषध, इ०. (१०) पुणियास, डेरियासीं– द्वितीया; त्यांणीं, जातीनसीं–शीं, चोरटियांनीं, श्रीमंतांहीं–तृतीया; तलेगांवींहून–पंचमी; सातारा गेला–सप्तमी, अशीं विभक्तिरूपें ह्या कालांत आढळतात. (११) आहेची खबर, हत्तीची लढाई मंधी, चांभारगोंदेयास, इतकीयावर, कारखानेयांत, बोललियाचा, अशा प्रकारचीं सामान्यरूपें आढळतात. (१२) विशेष्याच्या पुढें विशेषणें घालण्याची प्रवृत्ति या कालांत टिकूनच राहिली. खूळ **मातबर**; सरदार **मातबर**; सभ्य मनुष्यें **प्रामाणिक, भिडेचीं, विचारसूक्ष्मज्ञ**, इ०. (१३) कांहीं नवीन शब्द नवीन व्यवहारामुळें प्रचारांत आले. अक्षत-मरिष्ट इदंन्यायें, उपरोधिक, कुचोद्य, उपरशब्दी, आंतरभाव, बाहेरभाव, कमकसर, गर्गशा, खामखां, कौल, कमरबंदी, झांबडाझांबड, डौल, नक्षा, द्व्यामुष्यायण, धातुपोषण, दुरंदेशी, पायउतारा, फलादेश, भाईचारा, शकटभेद, बजिन्नस, परिच्छिन्न, बालाग्र, रुबरू, हर्शामर्श, इ०. (१४) कांहीं शब्द मूळचे अर्थ बदलून उपयोगांत आले आहेत. उ०—कारकून (कार्यकर्ता, पत्रलेखक); हवालदार (जबाबदार, कांहीं शिपायांवरील मुख्य); जमादार (सर शिपाई, टोळीचा नायक); खबरदार (बातमीदार याद राख); इ०. (१५) पुराणांतील उपमा, संस्कृत सुभाषितादिकांनीं आरंभ, संस्कृत म्हणींची वाक्यांत मध्येंच योजना, भाषेंत ठाकठिकी, ह्या गोष्टी अधिक आढळून

येतात. उदा०—भारती युद्धासमान युद्ध झालें, भाऊ त्यासमयीं कल्पान्तींचा आदित्य भासला; 'राजा कालस्य कारणम्' यासाठीं राजेलोकीं नेहमीं सावध असावें; इ०. (१६) पराक्रमाबरोबर भाषेंत जोरही वाढला, (१७) ह्याशिवाय शेंकडों प्रयोगविशेष व म्हणीही व्यवहारांत हरहंमेश नव्याच रूढ होऊं लागल्या होत्या. खूळ उभें करणें, तुमचें गोत्रघटित होळकरासी, आमचे लोकांचें कैसें विकतें? धुळीचे दिवे खात जाल, आलस असिला न पाहिजे, या झाडास येरंड्याचीं फळें आलीं, लहान माणसाचे पंक्तीस बसावें लागतें हाच मृत्य आहे, घोडा स्वाधीन नसल्यास बसणारा काय करील? हत्तीचे तोंडीं लाकूड देऊन कार्य बिघडलें, फितुरांत होते त्यांचें शीड उभारलें, शुष्क वृक्षास पल्लव फुटून पुस्पित फलित होतो तद्वत्, सहजांची आरती सहजांचा गजर, कल्पवृक्षाखालीं झोलीस गांठी द्याव्या हें अपूर्व, सश्याचे पारधीस वाघाचें साहित्य करावें लागतें, जैसें मरतिया अमृतपान द्यावें तैसें जालें, इ०.

उ ता रे

## रामचंद्रपंत अमात्य

### राज्यास सावकारांची जरूरी—

"साहुकार म्हणजे राज्याची व राजश्रीची शोभा. साहुकाराच्या योगाने राज्य आबादान होतें. .. साहुकाराचे संरक्षणामध्यें बहुत फायदा आहे. तसेंच दर्यावर्दी सावकार यांसही बंदरोबंदरीं कौलें[1] पाठवून आमदरफ्ती करावी. साहुकारांमध्यें फिरंगी[3] व इंग्रज व वेलंदेज[4] व फराशिस[5] व डिंगमारादि[6] टोपीकर हेही लोक सावकारी करितात, परंतु ते वरकड साहुकारांसारखे नव्हेत. यांचे खावद प्रत्येक प्रत्येक राज्यच करीत आहेत. त्यांचे हुकुमानें त्यांचे होत्साते हे लोक साहुकारसि येतात. राज्य करणारास स्थळलोभ नाहीं असें काय घडों पाहतें?....यांची आमदरफ्ती आले गेले इतकीच असू द्यावी." [आज्ञापत्र].

यांत किती अनुभव व चातुर्य साठाविलेलें आहे, तें विचार करणारास कळून येईल

## चिमणाजी आप्पाचें पत्र

### वसईची लढाई—

"... फिरंगीयांनी गरनाळाच्या पोत्यास आग लावून मार केला व रेजगिरीचा मार समिपरता केला. लोकांवरी अग्नीचा पर्जन्य करून भाजून काढिलें. फिरंगीयांनीं

१. करार, वचन. २. मोकळीक .३. पोर्तुगीज. ४. डच. ५. फ्रेंच. ६. डेन्स.

मर्दुमी शिपाईगिरी करावी तैशी केली. त्याप्रमाणें इकडील लोकांनीं भारती युद्धासमान युद्ध केलें. यामागें युद्धें बहुत जालीं परंतु या लढाईस जोडाच नाहीं. सर्व स्वामींच्या दंडकप्रहारे करून फिरंगी बेहिमत होऊन अष्टमीला प्रहर दिवसास कौलास आले. स्वामींनी वसई दिल्ही त्रिवार लिहिले ते शब्द अन्यथा कसे होतील ? अन्यथा वसई बसई होती व फिरंगी आगीचा पुला होता. " इ०.

ही प्रत्यक्ष कार्यकर्त्यांची कसलेली भाषा आहे.

## श्रीमंत नानासाहेब पेशवे

### उत्तरेंतील वैभव, लोकस्थिति—

चिरंजीव नाना ( पुरंदरे ) प्रति बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक आशीर्वाद उपरी. या प्रांती प्राचीन हिंदु राजे सर्व संस्कृतप्रवीण, वेश्यामद्यादिकांचा अति अनादर. सातां पिढ्यांचे श्रीमंत. नृत्यगतिवाद्य यांत प्रवणि. गाणार कम्पतम स्वर. वर्ज्यवर्ज्यादिक शास्त्रप्रमाण रीतीनें गाणार. वेदशास्त्र किंचित् जाणतात. त्यांत मुख्य ते तों पाहिलेच नाहींत...बाग, पुलें, कमळें, इत्यादि शोभा जे महत्प्रयत्नें लहानशी करावी त्याची तो गणना नाहीं.. यांची प्रार्थना करून स्वदेशास न्यावें परंतु ते न येत. इकडील नद्या अमृतोपम. ज्यांचे सहचारें ओढ्याची उपमाही आमच्या राक्षसस्वभाव नद्यांस न ये...हें सर्व तुम्हांसहवर्तमान पाहावें उचित असतां अनेक शोभा टाकून...गेलां हें उचित न केलें. राज्यकार्यप्रसंग विचार करितां भगीरथसमान कैलासवासीयांनीं उत्तरेहून दक्षणपावेतो सुवर्णनदीप्रवाह चोविस वर्षें वाहविला. दक्षण देशांतून सुवर्णनदी मागें रघूजी फत्तेसिंग बावांनी आणिली. परंतु जागां जागां जिरली. हा न्यायअन्याय दृष्टिवंत असतील त्यांनी विचारून पुण्यांतील रुक्षता दूर होय व मध्यें कार्याकारण जिरे ऐसें करणें हें उचित असे. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

## नाना फडनवीस

### पानिपतचा शेवट—

" दुसरे दिवशीं तयार होऊन प्रातःकालचे दोन घटिका दिवसास युद्धास गोळागोळीचा आरंभ जाहला...मी श्रीमंतांसन्निध ईश्वरस्मरण किंचित् करून असें. तों विश्वासराव यांस गोळी लागली. पडले. ते हत्तीवर श्रीमंतांनीं घालून उभेच राहिले. तों पठाण पायउतारा आंत येऊन मिसळले. तोंडातोंडी होऊं लागली. आणि डावे बाजूचे मातबर सरदार चौघड्याचे धनी देखील, पूर्वींच पळाले. उजवे बाजूचेही होळकर, शिंदे, निघोन निशाण निघालें. दोन

तीन शत पायदळ होतें. श्रीमंत दिसतनासे जहाले. तेव्हां ईश्वरें बुद्धि दिली. माघारे फिरलों. लक्ष सैन्य, त्यांत मोठमोठे सरदार असतां एकही त्यासमयीं श्रीमंतांस आप्त न जाहला. बहुत दिवस अन्न भक्षिलें. कृपा पुत्रवत् केली. चांगला काल होता तेव्हां केशास ढका लागल्यास प्राण देऊं अशा प्रतिज्ञा. परंतु ईश्वरघटित विपरीत काळ त्यांत सोबती कोण होतो ? सर्व सुखाचे सोबती. भोजन आदरेंकरून करावें. वस्त्रें, जवाहीर, जागिरा, ध्याव्या. निदानीं इतकें असून ज्यांचे देहाचें ठिकाण कोणास ठाऊक नाहीं ! " [ आत्मचरित्र ].

'स्वराज्याचें साम्राज्य झालें! व्यवहार अफाट झाला. राजकारणें दाही दिशांला खेळूं लागलीं! त्यामुळें वाणीला वैभवाचें तेज चढलें, ती अधिक नटवी, लज्जतदार व प्रौढ झाली, पूर्वींचीं लहान लहान साधीं सोपीं वाक्यें व शुद्ध मराठी वळणाचे शब्द जाऊन प्रौढ संस्कृत समास व लांबलचक घोंसदार वाक्यरचना त्या जागीं आली. व्याकरणाचा बांधेसूदपणा येण्याला यांत कोठेंच अवकाश नव्हता. कारण हे वीरमुत्सद्दी परस्परांचीं मनोगतें एकमेकांस कळविण्यासाठींच लिहित होते. वाङ्मयसेवा करण्यासाठीं कांहीं प्रवृत्त झाले नव्हते' इ० जें प्रो० पोतदार म्हणतात तें वरीलसारख्या पत्रांवरून प्रत्ययास येईल.



# एवढें पुरे

१. मराठी भाषेची उत्पत्ति कशी झाली ? ( पा० १ ते ३ )

२. मराठीचा आरंभकाल कोणता ? कोणत्या साधनांच्या द्वारें तो निश्चित ठरविला आहे ? ( पा० ३, ५, ६ )

३. मराठीचीं स्पष्ट स्थित्यन्तरें दिसून येणारीं मुख्य स्वरूपें कोणती ? ( पा० ६ )

४. ज्ञानेश्वरकालीन मराठी व एकनाथकालीन मराठी यांत फरक काय ? (९,१५)

५. एकनाथकालापासून पेशवाई अखेरपर्यंत फारसीचा मराठीवर वरचष्मा कां कायम राहिला ? ( पा० १३, २३, २७ )

६. मराठींत फारसीमधलि कोणत्या गोष्टी घुसल्या आहेत ? (पा० १५, २३, ३५)

७. 'ज्ञानेश्वरी'लाच मराठी आद्यग्रंथ कां समजतात ? ( पा० ७ )

८. महानुभावीय वाङ्मयाचें महत्त्व कोणत्या दृष्टीने आहे ? ( पा० १० तें १२ )

९. 'क्रिस्तपुराण' कोणीं व कोणत्या हेतूनें लिहिलें ? ( पा० २४ )

१०. 'राजव्यवहारकोश' कोणीं केला ? त्याचा उपयोग कितपत झाला ? ( १७ )

११. पेशवाई अखेरपर्यंतच्या मराठी पद्याचें वळण कोणत्या प्रकारचें होतें ? पेशवाई अखेरपर्यंत महाराष्ट्र–शारदेच्रें सौंदर्य वाढविण्यांत कोणीं काय प्रयत्न केले ?

१२. उत्तर-पेशवाईंतलि शाहीर कवि व इतर कवि यांच्यांत कोणता ठळक फरक दिसून येतो ? तो तसा पडण्याचें कारण काय ? ( पा० २९, ३३ )

१३. पेशवाईच्या पूर्वीचें व पेशवेकालीन गद्य-वाङ्मय कोणत्या प्रकारचें होतें ? (८, ११ व ३३, ३४ )

१४. संस्कृत व मराठी यांच्या झगड्याचें स्वरूप कशा प्रकारचें होतें ? मराठीचा पुरस्कार कोणीं कशा प्रकारें केला ? ( पा० १०, ११, १३, १४ )

१५. ज्ञानेश्वर उपमांवर उपमा देतो व नामांवरून क्रियापदें, विशेषणें किंवा क्रियापदांवरून नामें, विशेषणें, इ० सहज साधतो, याचें उदाहरणांनीं स्पष्टीकरण करा.

१६. वामन, रघुनाथ पंडित, मुक्तेश्वर, मोरोपंत, यांच्या कवितेंतलि विशेष सांगा.

१७. रामदास व तुकाराम किंवा मोरोपंत व रामजोशी यांच्या काव्यांची तुलना करा. ( पा० १८ व २४, २५; २९ व ३३ )

१८. जुन्या कवींनीं देशभक्तीवर किंवा विविध विषयांवर कविता कां केली नाहीं ?

१९. जुन्या कवींचीं आरंभींचीं वृत्तें कोणतीं ? त्यांत पुढें फरक कसकसा पडत गेला ? लावण्या व पोवाडे यांचें सामान्य स्वरूप सांगा. ( छन्दःशास्त्र पहा )

२०. ओवी व अभंग यांत फरक काय ? आरंभीं याच वृत्तांत मराठी कविता कां निर्माण झाली ? ( छन्दःशास्त्र पहा ).

# ८. सद्यःकालीन मराठी

## [ १ ] ( सन १८०० ते १८३६ )

### छत्रे युग ( शालोपयोगी वाङ्मय )

आतां इंग्रजी अमदानींत आपल्या मराठीला कसकसें वळण लागत गेलें, ह्या गोष्टीचा विचार करण्यापर्यंत आपली मजल आली आहे. या कालाच्या आरंभींचा मराठी ग्रंथसंपत्तीच्या दृष्टीनें सुगावा काढितां, महाराष्ट्राच्या बाहेर दृष्टि फेकावी लागते. कलकत्त्याजवळ श्रीरामपूर येथें **डॉ० कॅरे** यांनीं नागपूरच्या पंडित वैद्यनाथशास्त्र्यांच्या मदतीनें सन १८०५ मध्यें एक मराठी व्याकरण व १८१०त एक इंग्रजी-मराठी कोश हे ग्रंथ छापून प्रसिद्ध केले होते. डॉ० कॅरेनें ख्रिस्ती धर्माच्या प्रसारार्थ एकंदर ४० देशी भाषांत बायबलाचीं भाषान्तरें करविलीं होतीं अस म्हणतात.

इकडे मुंबई इलाख्यांत सन १८२२ मध्यें 'बॉंबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी' स्थापन झाली व तिन "बालबोधास बक्षिस १०० ते ४०० रु०, प्रौढ ग्रथ—चांगलीं भाषान्तरें किंवा नवीन ग्रंथ — २ ते ५ हजार रु०, याहूनही विशेष केल्यास विशेष शिफारस गौरनर यांस होईल" अशी घोषणा जाहीर केली. ह्या सोसायटीच्या, कंपनी सरकारच्या व तत्कालिन देशी भाषां-विषयीं आस्थेवाईक अशा बऱ्या युरोपियन अधिकाऱ्यांच्या साह्यानें कोश व बरींच सुबोध; गोष्टीरूप भाषान्तरित पुस्तकें निर्माण झालीं. त्यांत पंडित-मंडळींनीं तयार केलेला महाराष्ट्र-भाषेचा कोश ( म०-म०, किं० ४० रु० ); केनेडी कोश ( इं०-म०, किं० १२ रु० ); मोल्स्वर्थ व कँडी यांचा कोश ( म०-इं०, किं० ९० रु० ); बाळगोष्टी, बाळमित्र, नीतिकथा, इ० गोष्टीरूप मनोरंजक पुस्तकें; ग्रँट डफची 'मराठ्यांची बखर' ( भाषान्तरकार कॅ० केपिन ) या पुस्तकाचें भाषान्तर; पंडित-मंडळाचें व्याकरण व कांहीं जुजबी शास्त्रीय ग्रंथ; इ० कांहीं किरकोळ व कांहीं महत्त्वाचे ग्रंथ प्रसिद्ध झाले.

या काळच्या लेखकांत बापू छत्रे, बाळशास्त्री जांभेकर, जगन्नाथशास्त्री क्रमवंत, बापूशास्त्री शुक्ल, गंगाधरशास्त्री फडके, अशी—विशेषतः अष्टागर प्रांतां-तील मंडळी—प्रमुख होती. विशेष गोष्ट अशी कीं, जॉर्ज जर्व्हिस, मोल्स्वर्थ, कँडी, ले० क० केनेडी, कॅ० केपिन, कॅ० गेस्फर्ड, यांस जरी ह्या शास्त्रीमंडळाचें

महत्त्वाचें साह्य होतें, तरी प्रथमच्या ग्रंथांवर त्यांचीं घातलेलीं नांवें पुढें दिसतनाशीं झालीं, हा चमत्कार म्हणावयाचा.

**सदाशिव काशीनाथ छत्रे** ( बापू छत्रे, मुंबई, १७८८–१८३० ). यांनीं बोधकथा, बोधवचन, बाळमित्र, नीतिकथा, इ० भाषान्तरित ग्रंथ लिहिले. 'महाराष्ट्र–भाषेंत शुद्ध रीतीनें वाक्ययोजना करून रसभरित असे पहिले ग्रंथ यांनीं रचिले, म्हणोन त्यांस **गद्यात्मक ग्रंथांचे जनक** म्हटल्या-सही चालेल ' असें दादोबांनीं लिहिलें आहे. त्याचप्रमाणें 'यांस इंग्रजी भाषा जी येत होती व तिच्या योगाने जी विद्वत्ता यांच्या अंगीं होती ती आताच्या सवातीन हात किताबवाल्यांच्या बरोबरीची जरी नव्हती तरी तेवढ्यावर जे जे ग्रंथ यांनी लिहिले ते इतके उत्कृष्ट उतरले आहेत कीं, किताबवाल्यांच्या हातून अजून एकही ग्रंथ तसा झाला नसेल' असे उद्गार यांच्याविषयीं अर्वाचीन कोशकार रघुनाथशास्त्री गोडबोले यांनीं काढले आहेत.

**बाळशास्त्री जांभेकर** ( १८१० ते १८४६ ). बुद्धिमान्, अष्टपैलू, गणित, ज्योतिष व भाषाशास्त्रज्ञ. मुंबईतील एल्फिन्स्टन कॉलेजमधील गणिताचे अध्यापक. अखेरीस नॉर्मल स्कूलचे सुपरिंटेंडेंट होते. त्यांनीं बाळव्याकरण, नीतिकथा, हिंदुस्थानचा इतिहास, इंग्लंडचा इतिहास, शून्यलब्धि गणित, भूगोलशास्त्र, इ० अनेक भाषान्तरित ग्रंथ रचिले. 'ते जाडे विद्वान् होते त्या मानानें त्यांची वाङ्मयसेवा झाली नाहीं' ( प्रो० पोतदार ). शास्त्रीय वाङ्मयांत त्यांची कामगिरी कांहीं झाली, पण त्यांच्या ग्रथांत मोहकपणा नाहीं. 'गुण्य-गुणक पंचवीस पंचवीस अंकांचे असले तरी त्यांत चूक व्हावयाची नाहीं' इतके बुद्धिमान् ते होते; असें बालबोधांत ओक लिहितात. 'दर्पण' (१८३२) या वृत्तपत्राचे ते संपादक होते.

**भाषाविशेष**—( १ ) शुद्ध, सोपी, बालबोध मराठी भाषा; परंतु ( २ ) भाषान्तर कृत्रिम; सफाईदार नाहीं. ( ३ ) असी, अस्या, नकाश्या, दिवसी, अशा प्रकारचीं रूपें आढळतात. ( ४ ) माझे लाडक्या, त्याचे मनास, माझा बरोबर, मागल्येपेक्षां, त्यांचा कांठाशीं, अशी पहिल्या शब्दांतल्याप्रमाणें षष्ठयन्त सामान्यरूपें आढळतात. ( ५ ) आणायास गेला, पुसायास लागली, भोगायाचें पडतें, इ० यांत हल्लीं असणारा 'व'कार तेव्हां आढळत नाहीं. (६)जाई म्हणत्ये, बोलत्ये, अशीं स्त्रीलिंगी वर्तमानकाळाचीं रूपें आढळतात.

१०७ 'मुकणें, बुडणें, नागवणें' इत्यादि हानि दाखविणाऱ्या क्रियापदांचा उपयोग करितांना हानीचा विषय किंवा प्रमाण चतुर्थींत घालतात. जसें:– 'तो पांचशेंला बुडाला.' 'त्या भामट्यानें मला सर्वस्वाला मुकविलें.'

१०८ 'योग्य, उत्तम, गोड, वाईट, कठिण, साजेसा' इत्यादि विशेषणें बहुधा चतुर्थीला जोडून येतात. जसें:– 'पति मला उचित सुत राजाचा' (खरे.) 'हा तुला शोभेसा नाहीं.'

(क) ही विशेषणें धातुसाधित नामांबरोबर आली म्हणजे त्या नामांची तर चतुर्थी करितातच, पण त्या धातुसाधितांच्या कर्तृपदांचीही चतुर्थी करितात. जसें:– 'कलिंगड तापकऱ्याला खायला ठीक नाहीं.'

१०९ तुलना किंवा संवाद दाखविणारीं विशेषणें व क्रियापदें तुलनेच्या विषयाची चतुर्थी घेतात. जसें:– 'हा स्वर त्या स्वराला जमत नाहीं.' 'दोघेही उंचीला सारखे आहेत.'

(क) क्वचित् तुलनेच्या साधनासही चतुर्थींत घालतात. जसें:– 'ती ढेप ताजव्याला लाव.'

११० 'नमस्कार, रामराम, जोहार, आशीर्वाद, विनंति' वगैरे उपचारांच्या प्रकारांत उपचार ज्याला उद्देशून होतात त्यास चतुर्थींत घालतात. जसें:– 'हरये नमः,' लहानथोरास दंडवत' इ०.

१११ 'रुचणें, आवडणें, वाटणें, भासणें, दिसणें, समजणें, उमजणें, कळणें, येणें, साजणें, साधणें, सांपडणें, गवसणें, आढळणें, शोभणें, लागणें, खपणें, परवडणें, फावणें, जमणें, बनणें' वगैरे इंद्रियगम्य व्यापाराचीं जी दर्शक क्रियापदें त्यांचें कर्तृपद चतुर्थींत येतें. जसें:– 'हरीला व्याकरण आलें, पण गोविंदाला तें जमलें नाहीं.' 'मला हें खपणार नाहीं.'

११२ शक्य क्रियापदांचें कर्तृपदही नेहमीं चतुर्थींत घालण्याचा प्रघात आहे; जसें:– 'मला चालवत नाहीं.' 'दारिद्र्याच्या यातना मनाला असह्य होतात.'

११३ 'करावयास, जावयाचें, जावें, बोलावें, बोलूं, करणें, करितां, इत्यादि धातुसाधित नामें किंवा विशेषणें वाक्यांत कर्तृपदीं असतात तेव्हां त्यांच्या धात्वर्थाचें मूळ कर्तृपद चतुर्थींत घालतात. जसें:—'मला मुंबईस जावयाचें आहे.' 'याला जाऊं दे.'

## [२] (सन १८३६ ते १८५७)

### दादो युग ( व्याकरण व वृत्तपत्रारंभ )

हें इंग्रजी अमदानींतील दुसरें वाङ्मययुग होय. ह्या कालांत हरि केशवजी, भाऊ महाजन, दादोबा पांडुरंग, गोपाळराव हरि देशमुख, इ० नामांकित ग्रंथकार होऊन गेले.

**हरि केशवजी** (१८०४–१८५८). उत्तम भाषान्तरकर्ते म्हणून यांचा लौकिक मोठा होता. 'सिद्धपदार्थविज्ञान' हा त्यांचा ग्रंथ भाषान्तरित असून तो मूळचाच असावा इतकें तें सफाईदार भाषान्तर त्यावेळीं लोकांस वाटलें. रसायनशास्त्रविषयक संवाद, इंग्लंडचा वृत्तान्त, यांत्रिक क्रमण, देशव्यवहारव्यवस्था, इ० यांचे आणखी ग्रंथ आहेत. 'यांची विद्वत्ता बेताची, स्वयंप्रकाश सूर्याचें तेज नसलें तरी त्यांचे ग्रंथ चंद्राप्रमाणें शीतल व सुखदायक आहेत' (प्रो० पोतदार). यांचा अखेर ओढा ख्रिस्ती धर्माकडे फार वळला होता, परंतु त्यांतून ज्ञानेश्वरी इ० ग्रंथांच्या वाचनानें ते बचावले !

**भाऊ महाजन**— यानीं प्रभाकर (१८४०) व धूमकेतु इ० पत्रें चालविलीं. ते अनेकभाषाभिज्ञ असून, त्यांच्या चटकदार लेखनशैलीनें निबंधमालेप्रमाणें लोकांस वाचनाची चटक लाविली. त्यांची अधिक माहिती मिळत नाहीं.

**दादोबा पांडुरंग तर्खडकर** (१८१४–१८८२). हे मराठीचे पहिले व्याकरणकार होत, असें तात्पर्यार्थानें म्हणण्यास हरकत नाहीं. यांच्या पूर्वी महानुभावीयांचीं व्याकरणें–पं० भीष्माचार्य यांचें "पंचवार्तिक" (१३ वें शतक)– व डॉ० कॅरेचें पं० वैद्यनाथशास्त्री यांच्या मदतीनें तयार केलेलें व्याकरण १८०५, इ० प्रयत्न झाले होते. दादोबांनीं आपल्या व्याकरणाची पहिली आवृत्ति १८३६ त छापिली. त्यापूर्वी गंगाधरशास्त्री फडक्यांच्या व्याकरणाच्या हातीं प्रति तयार करून अध्ययन केलें जात असे. अर्थात् दादोबांचें "महाराष्ट्र–भाषेचें मोठें व्याकरण" हाच शिळाप्रेसवर छापलेला पहिला व नांव घेण्यासारखा प्रयत्न होता; म्हणून "**दादोबा हे आमचे पाणिनी आहेत**" असें म्हणतात, तें सामान्यतः बरोबर आहे. त्यांच्या व्याकरणामुळें भाषेला स्थैर्य आलें. 'दादोक्ता' चा अंमल मराठीवर दीर्घकाळपर्यंत टिकला यांत शंका नाहीं. त्यांचें

लेखन स्वतंत्र होतें. व्याकरणाशिवाय, मोरोपंताच्या केकावलीवरील त्यांची 'यशोदा-पाण्डुरंगी' ही आपल्या माता-पित्यांच्या संस्मरणार्थ लिहिलेली टीकाही उत्कृष्ट अशीच आहे. या कालांतील इतर बहुतेक लिखाण रूपान्तरितच होतें, परंतु दादोबांचे वाङ्मय मात्र स्वतंत्र असल्यामुळें मोलाचें झालें आहे.

याच कालांत दर्पण ( १८३२ ), प्रभाकर (१८४०), ज्ञानप्रकाश ( १८४९ ), ज्ञानोदय ( १८४१ ), हीं वृत्तपत्रें व दिग्दर्शन, ज्ञानप्रसारक, इ० मासिकें उदयास आलीं. त्यांत विविध विषयांवरील लेख येऊं लागले. छापखान्यांच्या सोयीमुळें ह्या गोष्टी सुलभ झाल्या.

**'लोकहितवादी'** – रा० ब० **गोपाळराव हरि देशमुख** ( १८२३–१८९२ ). यांनीं प्रभाकर व ज्ञानप्रकाश या वर्तमानपत्रांत 'शतपत्रें' लिहून लोकांत जागृति उत्पन्न केली. त्यांच्या लेखांत जरी विद्वत्ता नव्हती, तरी आस्था व कळकळ ज्यास्त होती. लोकहितवादी–भांडारकर–आगरकर–कर्वे–ह्या प्रागतिक विचारप्रवर्तक गृहस्थांच्या पिढ्या होत. त्यांचे आद्य लोकहितवादी; त्याच्यावर मालाकारांसारख्यांनीं जरी विरुद्ध टीका केली, तरी देशहिताच्या कामीं त्यांचा असलेला जिव्हाळा त्यांच्या वाङ्मयांत दिसून येतो. त्यांनीं राजस्तानचा इतिहास, ऐतिहासिक गोष्टी भाग ३, पृथ्वीराज चव्हाण, इ० ३०–३२ ऐतिहासिक व सामाजिक विषयांवरील ग्रंथ लिहिले आहेत, त्यांत त्यांची चोकसबुद्धि दिसून येते.

**भाषाविशेष**— ह्या काळांतील भाषेला आधुनिकी वळण लागत चाललें होतें. पेशवाईपर्यंतची जुन्या बखरींतील भाषा हे जुन्या गद्याचे नमुने होत; परंतु पेशवाईनंतरच्या गद्याला आधुनिकी वळण लागलें, तें अद्यापि चालूच आहे. ( १ ) आधुनिकी वळण म्हणजे इंग्रजी भाषेच्या संस्कारांमुळें मराठी विविध अंगांनीं संचार करूं लागली. ह्या कालापर्यंत मराठींत कांहीं कोश, व्याकरणें व यशोदा–पांडुरंगीसारखे अगदींच थोडे पण नव्या वळणाचे ग्रंथ तयार झाले. वृत्तपत्रें व मासिकें हीं विविध ज्ञानप्रसाराचीं नवीन साधनें निर्माण झालीं. त्यांतून कांहीं शास्त्रीय, बरेंचसें धार्मिक आणि जगांतील उलाढालींसंबंधाचें ज्ञान लोकांस मिळूं लागलें. ( २ ) एकंदरींत लिखाण रूपान्तरित म्हणून कृत्रिमच होतें. ( ३ ) "मुलें जीं स्वतंत्र व्हायास इच्छीत होतीं" अशा प्रकारचे इंग्रजी धर्तीवरचे प्रयोग ह्या कालच्या गद्य-लिखाणांत पुष्कळ

बुसले. (४) भाषेंत साधेपणा फार. (५) मनोरंजक शालोपयोगी वाङ्मया-वर भर ज्यास्त. (६) ह्या कालांतील मराठी गद्य म्हणजे अंगावर कपडे किंवा दागिने नसलेलें लहान मूल होय असें म्हणतां येईल. मुलांत जें स्वाभाविक सौंदर्य व एकदम उफाड्यानें वाढत जाण्याचे गुण असावयाचे ते ह्या नव्या अवतारांतील बाळांत होते, यांत शंका नाहीं; हें त्याच्या पुढील बाळसे-दारपणावरून सहज दिसून येतें. (७) ह्या काळांतील गद्य-लिखाणांत एक गोष्ट मात्र स्पष्ट आढळून येते कीं, मुसलमानी शब्द व वाक्प्रचार याचें वळण जात चाललें, तें आतां बरेंच कमी झालें आहे; आणि (८) त्याची जागा इंग्रजी शब्द व वाक्प्रचार यांच्या वळणानें भरून काढिली आहे.

उ ता रे

## दादोबा पांडुरंग तर्खडकर

### महाराष्ट्र-भाषा—

"अलीकडेस मराठीत गद्यरूपाने लिहिण्याचा प्रचार चांगला वाढत चालला आहे. तेव्हां अशा समयीं व्याकरणद्वाराने भाषेचें नियमन करणे किती आवश्यक आहे हे सुज्ञ पुरुष जाणतच असतील. हाच हेतु मनांत धरून मी ही दुसरी आवृत्ति सिद्ध केली. इचा मुख्य उद्देश हाच कीं, जितके साधेल तितके करून आजपावेतों जिला नियमांत आणण्याविषयीं कोणीं प्रयत्नच केला नाहीं म्हणोन अत्यन्त विस्कळीत झालेली व व्याकरणरूप फणीनें जिला कोणी विंचरलेंच नाही म्हणोन जींत अनेक ग्रंथि जमून फारच गुंतलेली, अशी जी ही मराठी भाषा तिला कांहीं तरी नियमात आणावी; आणि दीर्घकाल-ग्रथित जी तिची गूत ती हातीं घेऊन तिचे पदर कांहीं सोडवून कांही तरी उकलण्याच्या धोरणांत आणून बसवावी.' (महाराष्ट्र-भाषेचे मोठे व्याकरण, प्रस्तावना, १८३६).

## लोकहितवादी

### शतपत्रांचा इत्यर्थ—

"लोकहितवादीनें कोणाची मजुरी पत्करली नाहीं. कशाची अपेक्षा, आशा, किंवा इच्छा धरली नाहीं. कोणाचे सांगण्यावरून कृत्रिम वर्णन केलें नाहीं. लाभावर किंवा द्रव्यावर नजर देऊन कीर्ति व्हावी या हेतूने लिहिले नाहीं. इतके श्रम जे केले ते फक्त लोकांस त्यांची वास्तविक स्थिति कशी आहे ती कळावी, त्यांनी सुधारावें, त्यांस इहलोकीं सुखवृद्धि व्हावी, परलोकाचें साधन घडावे व आपले बहुत काळापासून दृढ गृह आहेत त्यांपैकीं कांहीं अविचाराने व कांही मूर्खपणानें

जडलेले आहेत ते कमी व्हावे किंवा नाहींसे व्हावे, इतक्याच हेतूनें मीं यथामति व स्वइच्छेनें वेतनावांचून श्रम केले आहेत; व जितके लिहिलें आहे तें अक्षरशः खरें खरें निवडून विचार करून काळजीनें लिहिलें आहे, हें सर्व लोकांस नजर आहे."

## ज्ञानोदय

### दारूबद्दल अर्जी—

"महाराष्ट्र-देशांतील मुसलमान लोक व जैन लोक व चांगल्या जातीचे हिंदु या सर्वांस दारूचा निषेध आहे. आणि या सर्व अब्रूदारांस या दुर्व्यसनाचा कंटाळा वाटला म्हणून ह्या अनर्थाचा प्रतिबंध चांगला होता. परंतु बहुत लोक दारू पिऊं लागले आणि दारूची दुकाने सर्वत्र घातलीं असतां उत्तरोत्तर अधिक लोक पिणारे होऊन भयंकर नाश होईल. मोठ्या शहरांत तर हल्लींच हा अनर्थ चालू झाला आहे व तो दिवसानुदिवस वाढत आहे. तर असल्या अनर्थकारकांस सरकारनें अनुकूल न होतां त्यांचें काम अवश्य बंद केलें पाहिजे." (१८५०).

## [ ३ ] ( सन १८५७ ते १८७४ )

### शास्त्री युग ( ललित-वाङ्मयारंभ )

सन १८५४ त सरकारी विद्याखातें निर्माण झालें. १८५७ त मुंबई, कलकत्ता व मद्रास येथें विद्यापीठें स्थापन होऊन नवीन युगास आरंभ झाला. हें युग शास्त्री-मंडळाचें होय. त्यांच्या कर्तबगारीमुळें मराठीला चांगलेंच बाळसें येऊं लागलें. गद्य व पद्य अशा दोन्ही प्रकारांनीं मराठीला नवीन पालवी फुटूं लागली.

ह्या शास्त्री मंडळींत कृष्णशास्त्री चिपळूणकर, परशुरामतात्या गोडबोले, कृष्णशास्त्री राजवाडे, गणेशशास्त्री लेले, रघुनाथशास्त्री गोडबोले, कृष्णशास्त्री गोडबोले, महादेवशास्त्री कोल्हटकर, ही मंडळी प्रमुख होत. त्याचप्रमाणें विनायक जनार्दन कीर्तने, महादेव मोरेश्वर कुंटे, इ० तडफदार इंग्रजी पदवीधर मंडळीही याच कालांतील होत.

**कृष्णशास्त्री चिपळूणकर** (१८२४–१८७८). ह्यांनीं इंग्रजींतून मराठींत भाषान्तरित ग्रंथ निर्माण केले. कृष्णशास्त्र्यांइतके उत्कृष्ट, सरस व सुरस भाषान्तर करणारे क्वचितच आढळतील. यांनीं रासेलसचें भाषान्तर, अरेबियन नाइट्सचीं भाषान्तरें, अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह, सॉक्रेटिसाचें चरित्र, इ० भाषान्तरित पुस्तकें लिहिलीं. 'दादोबां'च्या व्याकरणावर टीकात्मक असे उत्कृष्ट

निबन्ध लिहिले. 'पद्यमंजरी' हा त्यांचा कवितासंग्रहही प्रसिद्ध आहे. कृष्ण-शास्त्री हे महा बुद्धिमान होते. त्यांचे गुरु मोरशास्त्री साठे, यांना एकदां त्यांनीं वादांत कुंठित केल्यामुळें आपल्या अंगावरची शाल मोरशास्त्र्यांनीं या 'कृष्णा'-ला देऊन त्याचा गौरव केला होता. पुण्याच्या ट्रेनिंग कॉलेजचे ते प्रिन्सिपल होते. त्यांचे ग्रंथ भाषान्तरित असले, तरी त्यांची भाषा शुद्ध, सोपी, खुबीदार आणि गोड अशी आहे. ते ग्रंथ भाषान्तरें आहेत म्हणून भासत सुद्धां नाहीं. आपल्या अलौकिक व मनोरम ग्रंथरचनेनें मराठीचें वैभव वाढवून, पुढील विद्वानांच्या उपयोगाकरितां तिला उत्तम तऱ्हेनें त्यांनीं कमावून दिली, असें म्हणण्यास हरकत नाहीं. बुद्धिमत्तेमुळें त्यांनीं जुन्या नव्या सर्वांवर आपली छाप पाडिली; आणि वाङ्मयांतही उच्च स्थान पटकाविलें आहे. ते गद्य व पद्य असे सव्यसाची पंडित होते.

**परशुराम बल्लाळ गोडबोले** ( १७९९–१८७४ ). वाई येथील राह-णारे. हे वाङ्मयोपवनांतील माळीपणाच्या कामांत फार कुशल होते. त्यांनीं जुन्या कवींच्या उत्कृष्ट वेंच्यांचा 'नवनीत' नांवाचा एक ग्रंथ प्रसिद्ध केला. त्याची योग्यता अद्यापि कायम आहे. ह्याशिवाय त्यांनीं उत्तररामचरित्र, वेणी-संहार, मृच्छकटिक, पार्वती-परिणय, नागानंद, शाकुंतल, इ० संस्कृत नाट-कांचीं गद्य-पद्यात्मक उत्कृष्ट रूपान्तरें केलीं आहेत. मोल्स्वर्थ व कँडी ह्यांच्या कोशाचे कामीं तात्या हे कँडीचे उजवे हात होते. त्यांचें 'वृत्तदर्पण' हें सर्वांच्या परिचयाचें आहेच. संस्कृत नाटकादिकांचीं भाषान्तरें करण्याची प्रथा यांनीं पाडिली, तिचा इतरांनींही स्वीकार केला. मोरोपंताच्या कवितेचे तात्या मोठे भोक्ते होते. पांडित्य आणि रसिकता हीं दोन्ही त्यांच्या ठिकाणीं बल-वत्तर होती. त्यांनीं मराठ्यांच्या इतिहासावर व इतर कांहीं पद्यग्रंथही रचिले आहेत. तत्कालीन क्रमिक पुस्तकांतील गद्य धडे बहुशः कृष्णशास्त्र्यांच्या हातचे व पद्यवेंचे परशुरामतात्यांनीं निवडलेले असत.

**कृष्णशास्त्री राजवाडे** ( १८२०–१९०१ ). ह्यांनीं विक्रमोर्वशीय, मालतीमाधव, मुद्राराक्षस, इ० संस्कृत नाटकांचीं गद्य-पद्यात्मक रूपान्तरें केलीं आहेत. त्याचप्रमाणें उत्सवप्रकाश व ऋतुवर्णन हीं दोन काव्यें लिहिलीं असून, अलंकारविवेक नांवाचा ग्रंथ लिहिला आहे.

**गणेशशास्त्री लेले** ( १८९५–१८९८ ). हे त्र्यंबक येथील राहणारे. यांनीं जानकीपरिणय, मालविकाग्निमित्र, इ० संस्कृत नाटकांचीं वेणीसंहाराच्या धर्तीवर गद्य-पद्य भाषान्तरें केलीं. बालभाषेंतून कर्पूरमंजिरी नाटिका उतरलें. त्याचप्रमाणें रघुवंशाचें रूपान्तर केलें. त्यांनीं साहित्यशास्त्र ह्या नांवाचा मराठींत पद्यात्मक ग्रंथ लिहिला. त्याचप्रमाणें ( शिवचरित्र ( काव्य ) लिहिलें. कुकचा वृत्तान्त, कोलंबसाचें चरित्र, इ० गद्यग्रंथही त्यांनीं लिहिले आहेत.

**रघुनाथशास्त्री गोडबोले**—इंग्रजी फारसें अध्ययन नसतांही या कालांत स्वपराक्रमानें पुढें येणारा यांच्यासारखा महदुद्योगी कोणी झाला नाहीं. भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश, भारतवर्षीय अर्वाचीन कोश, मराठी भाषेचा नवीन कोश व प्राचीन मराठी कवितेंतील शब्दांचा हंसकोश, हीं त्यांचीं एकट्याचीं कामें होत. त्यांचा जन्म वाई येथें. पुण्याचे राहणारे. सोलापूर जिल्ह्यांत करमाळें गांवासारख्या ठिकाणीं मास्तरकीची नोकरी. मोल्स्वर्थ–कँडीप्रमाणें सरकारचा आश्रय नाहीं; कृष्णशास्त्री चिपळूणकर, परशुरामतात्या, अशा अथवा कोणत्याही पंडिताचें साह्य नाहीं; अशा स्थितींत त्यांचें वरील वाङ्मयकार्य कौतुकास्पद ठरतें: ह्यामुळें त्या कालाच्या दृष्टीनें त्यांच्या कामगिरीचें महत्त्व आहे.

**कृष्णशास्त्री गोडबोले** ( १८३१–१८६१ ). वाई येथें जन्म. पुण्याचे रहिवासी. पुणें पाठशाळेंत अध्ययन झालें. गणित, ज्योतिष, या शास्त्रांत निष्णात, अनेकभाषाकोविद; ह्यांनीं 'मराठी भाषेचें नवीन व्याकरण' हा उच्च दर्जाचा ग्रंथ लिहिला. त्यांच्या तोडीचा मराठी व्याकरण-ग्रंथ अद्यापि झाला नाहीं, ह्याचें कारण त्यांचें संस्कृत-प्राकृतादि पूर्वभाषा, अर्वाचीन भाषा आणि फारसी वगैरे भाषा यांचें दांडगें अध्ययन हें होय. १८६७ त त्यांच्या वरील व्याकरण–ग्रंथाची प्रथमावृत्ति प्रसिद्ध झाली. ग्रहलाघव, ज्योतिः-शास्त्र, वेदांचें पुराणत्व, भूमिति, इ० ग्रंथही त्यांनीं लिहिले आहेत.

**महादेवशास्त्री कोल्हटकर**—( १८२२–१८६५ ). संस्कृतांतून मराठींत नाटकें उतरण्याचा जसा वर सांगितल्या प्रकारचा प्रयत्न झाला, त्याचप्रमाणें इंग्रजी नाटकाचें प्रथम भाषान्तर करण्याचा उपक्रम या शास्त्र्यांनींच केला. शेक्सपिअरच्या 'अथेल्लो' चें यांनीं भाषांन्तर केलें व तें निबन्ध–मालाकारांसही उत्कृष्ट वाटलें. कोलंबसाचा वृत्तान्त व कवितेचें पहिलें पुस्तक

ही यांची कृति आहे. ‘ एका लहान काळ्या० ’ इ० मुंगीसंबंधीं व ‘ कज्जे-कफावती होऊत रस्त्यांत० ’ इ० जुन्या क्रमिक पुस्तकांतील कविता यांच्या होत. नाग गारोड्याच्या पुंगीस भुलतो, तसें यांचें वक्तृत्व होतें, असें म्हणतात.

**विनायक जनार्दन कीर्तने** ( १८४०–१८९१ ). पूर्वींचें आडनांव धनतरे. जन्म राजुरी येथें. ह्यानीं “ थोरले माधवराव पेशवे ” हें नाटक तरुणपणींच लिहिलें. त्याचप्रमाणें ‘ जयपाळ ’ नाटक एका इंग्रजी नाटकाच्या आधारें लिहिलें. नवीनच कृति असल्यामुळें ह्या नाटकांचा त्यावेळीं बराच बोलबाला झाला.

याच कालांत घाशीराम कोतवाल ( मोरोबा कान्होबा ), मंजुघोषा ( रिसबूड ), मुक्तामाला ( हळबेशास्त्री ), इ० कादंबऱ्या उदयास आल्या. नीळकंठराव कीर्तने ह्यांनीं ग्रँट डफच्या ‘ मराठ्यांच्या बखरी ’वर शोधक निबंध लिहून हल्ला चढविला.

**ह्या कालांतील वाङ्मयविशेष**—(१) मराठींत नाटकें व कादंबऱ्या यांचें नांवसुद्धां नव्हतें, त्यांची प्रथा सुरू झाली. ( २ ) बहुतेक ग्रंथ संस्कृत किंवा इंग्रजी ग्रंथांचीं रूपांतरें. ( ३ ) संस्कृताचीं रूपान्तरें गद्य-पद्यात्मक असून त्यांच्या विद्वान् कर्त्यांस साजेशीं व सरस अशींच होतीं. ( ४ ) कादंबऱ्यांतील वर्णनें, पात्रें, प्रसंग, ठराविक साच्याचे. ( ५ ) त्या कालाच्या मानानें वाखाणण्यासारख्या कृति असल्या तरी तंत्रहीन व ओबडधोबडच. ( ६ ) रासेलसचें भाषान्तर मात्र भाषान्तर वाटत नाहीं इतकें बेमालूम उतरलें आहे. ( ७ ) इंग्रजींतील शास्त्रीय वाङ्मय मराठींत उतरण्याचा प्रयत्न याच कालांत झाला.

× × × ×

स्वराज्याच्या अस्ताबरोबरच या कालाच्या आरंभापर्यंत ( १८००ते१८५७ ) काव्य-शारदाही विधवा स्त्रीप्रमाणें अज्ञातावस्थेंत दिवस कंठीत होती. स्वराज्यांतील स्फूर्ति देणारा पराक्रम लोपला, त्याबरोबर राष्ट्रांत जी शांतता प्रस्थापित झाली, तशीच काव्यप्रांतांतही हा वेळपर्यंत होती. हंसराज ( १७९९–१८५५ ) याशिवाय नांव घेण्यासारखा एकही कवि वरील अर्धशतकांत झालेला आढळून येत नाहीं.

परंतु ही स्थिति कायम राहिली नाहीं. वर सांगितलेल्या प्रचंड-पंडित शास्त्री-मंडळींनीं महाराष्ट्र-वाङ्मयोद्यानाला टवटवी आणण्याचा यशस्वी उद्योग

केला आणि तें उद्यान फुलवून सोडिलें हें वर आलेंच आहे. यांच्या पद्यांतील विशेष खालीलप्रमाणें—

( १ ) पूर्वी फक्त पुराणकथा, भक्ति व वैराग्य यांवर कविता होती, त्याऐवजीं आतां विविध विषयांवर कविता होऊं लागली; ( २ ) कवितेंत संस्कृत शब्दांची व समासांची रेळचेळ; यामुळें ( ३ ) कविता थोडी क्लिष्ट वाटते; ( ४ ) संस्कृतांतील अलंकारादिकांनीं मराठी कवितेला भूषविल्यामुळें तिचें सौंदर्य वाढलें, यांत शंका नाहीं; ( ५ ) संस्कृतांतल्याप्रमाणें ह्या पंडितांनीं श्लोक-वृत्तांतच बहुशः रचना केली; ह्यामुळें ( ६ ) कविता सरस असली, तरी आधुनिक श्रवणमनोहर चालींच्या कवितांपुढें ती फिक्की वाटेल.

उ ता रे

## कृष्णशास्त्री चिपळूणकर

**शब्दपांडित्य—**

"राजपुत्र ज्या दिवशीं तेथें गेला होता, त्या दिवशीं एक मोठा पंडित उंच स्थानीं बसून श्रोत्यांस उपदेश करीत होता...... 'विवेक आणि सद्वासना यांपेक्षां काम-क्रोधादि दुर्वासना प्रबल झाल्या असतां मनुष्याचा स्वभाव बिघडून तो नीचत्वाला पावतो; तसेंच अविचार म्हणजे भ्रान्ति, दुर्वासनांचें मूळ आहे. त्या अविचाराचें प्राबल्य अंतःकरणांत झालें म्हणजे अयोग्य मनुष्याच्या हातीं राजसत्ता आली असतां जसें होतें तसा जिकडे तिकडे गोंधळ व अव्यवस्था होते; काम-क्रोधादि बंडखोर बुद्धीच्या किल्ल्यांत शिरून विवेकरूप राजाचा अंमल मानीनातसे होतात;' इ० गोष्टी अनेक प्रकारच्या उदाहरणांनीं स्पष्ट करून त्यानें श्रोत्यांच्या मनांत बिंबवून दिल्या." ( रासेलस ).

भाषान्तर असलें तरी कृत्रिमता बिलकूल नाहीं; यांत भाषेचा अस्खलित ओघ, सौंदर्य, शुद्धता, प्रौढता, परकीय वाक्प्रचारांचा अभाव, ह्या गोष्टी स्पष्ट आढळून येतात.

## परशुरामतात्या गोडबोले

**वर्षावर्णन—**

**हा मेघ आर्द्रमहिषोदरतुल्य काळा।**
**शंखाकृती धरि करांत बलाक-माळा॥**
**विद्युत्प्रभा-वसन पीत कसोनि हातें।**
**वाटे दुजा हरिच आक्रमितो नभातें॥ १॥**

मेघोदरांतून जलाच्या धारा। भूमीवरी पडती झरारा।
जैशा शुद्ध रजताच्या तारा। विद्युत्प्रकाशें झळकती॥ २॥
विद्युल्लतांनीं जळतेंच काय?
धारा-जळांनीं गळतेंच काय?
बलाहकांनीं हसतेंच काय?
वायुभ्रमें निःश्वसतेंच काय?॥ ३॥
विद्युज्जिव्हा लांबवोनी। इंद्र-चाप-भुज उभारोनी।
मेघ-हनुवटी खालवोनी। जांभई देतसे अंतरिक्ष॥ ४॥

यांतलि सरसता, प्रौढता, माधुर्य, अलंकारप्रचुरता, हीं स्पष्ट कळून येतील.

## विनायक जनार्दन कीर्तने

राजाचें स्वप्न—

"स्वप्न असें पाहिलें कीं, मी वाड्यांतून निघून गंगातीरी गेलों; आणि तेथें पाहतों तों अमर्याद पूर आला असल्यामुळे ती गंगाबाई दुथड्यांचे उल्लंघन करून, महावेगानें फूं फूं असा शब्द करीत चालली होती. कोणी म्हणेल ही बया गिरिराज जनकावर रुसून, तट्ट फुगून, गाऱ्हाणें गातच, रत्नाकराकडे जात आहे कीं काय कोण जाणे! इतक्यांत तिची ती शीघ्र गति मंद झाली; तिच्या प्रचंड लाटा कमी झाल्या; तिचें विस्तीर्ण पात्र आकुंचित झालें; सारांश, कोणी म्हणेल, सख्या रत्नाकरानें अंजारून गोंजारून हिचें सांत्वन केलें. इकडे आसमंताद्भागींच्या प्रदेशांत नाना तऱ्हेचीं धान्यें इतकीं विपुल उगवलेलीं दिसलीं कीं, आज पृथ्वीनें आपलें सर्वच वैभव बाहेर काढलें आहे की काय, असा मला घटकाभर भास झाला! (जयपाळ नाटक).

## महादेव मोरेश्वर कुंटे

बाल संभाजी—

असें बोलती माय तों शंभु आला।
घुसे आंत, काठीवरी स्वार झाला॥
हंसूं लागली सुज्ञ आजी, मुलाचा—
करी लाड ताईत मानी गळयाचा॥ १॥
चिमुकली पगडी झळके शिरीं।
चिमुकली तरवार धरी करीं॥
चिमुकला बहु शोभत चोळणा।
चिमुकला सरदार निघे रणा॥ २॥
छबुकडा चिमणा करितो गुण।
चिमुकलें धरलें मग रंगण॥

दुडदुडां पळतां पळतां पडे।
गडबडे रडतां मुख बापुडें ॥३॥

ह्या काली मोरोपंताच्या कवितेवर बराच वाद चालू होता; व डॉ० विल्सन, कृष्णशास्त्री चिपळूणकर, इ० बडी मंडळी मोरोपंत हा कविच नव्हे, केवळ भाषान्तऱ्या व यमकें जुळवून क्लिष्ट कविता करणारा आहे, असें प्रतिपादणारी होती. मालाकार हे मोरोपंताच्या बाजूचे. थोरले व धाकटे शास्त्रीबोवा ह्या पिता-पुत्रांचें निबंध-मालेंतील ह्यासंबंधीं भांडण वाचनीय आहे. मराठी साध्या व सोप्या कवितेचा म्हणून त्या काळीं जो आदर्श मानला जात होता तो या प्रकारचा होता. यांतील कांहीं रचना तर आज हास्यास्पदच वाटेल.

## कृष्णशास्त्री राजवाडे

वसंतऋतु—

सारें पलाश-वन लालचि लाल झालें।
आरक्त पातळाचि रम्य वसंत-कालें ॥
हें नेसवूनिच जणों क्षिति-नायिकेला।
येऊनियां बहु दिनीं अति-हर्ष केला ॥ १ ॥
हा मंद चंदन सुगंध सुशीत येतो।
स्पर्शे तनूस सुख फाराचि वात देतो ॥
गुंजद्-भ्रमद्-भ्रमरपुंज निकुंज झाले।
पुष्पें फलेंहि बहु गंधाचि गंध चाले ॥ २ ॥

यावरून त्या कालांतील शास्त्री कविब्रुवांच्या कवितेंत संस्कृत-शब्दप्रचुरता, व अनुप्रासादि शब्दालंकारांनीं व उपमा-उत्प्रेक्षादि अर्थालंकारांनीं संस्कृतांतील सर्व माधुर्य मराठींत आणण्याचा कसा खटाटोप चालू होता, तें कळून येईल.

## [ ४ ] ( सन १८७४ ते १९०० )

### मालाकार युग ( निबन्ध, टीकावाङ्मय, इ० )

सन १८७४ त विष्णुशास्त्री चिपळूणकर, यांनीं आपली ‘ निबंधमाला ’ सुरू केली, ह्या वेळेपासून मराठीच्या नवीन युगास आरंभ होतो. शास्त्रीबोवांनीं आपल्या निबंधमालेंत आमच्या देशाची सांप्रतची स्थिति, मराठी भाषेची

स्थिति, डॉ० जॉन्सन, लोकहितवादी, मोरोपंताची कविता, इ० विषयांवर जे ओजस्वी व तेजस्वी लेख लिहिले, त्यांच्या योगानें सुशिक्षितांत तरी फार मोठी जागृति झाली, ही गोष्ट नाकबूल करून चालणार नाहीं. उत्कृष्ट निबन्ध, उत्कृष्ट उतारे, उत्कृष्ट चरित्रें, उत्कृष्ट टीका, उत्कृष्ट नाट्यकृति, उत्कृष्ट भाषा, ह्या गोष्टी कशा असाव्या हें सांगणारा निबंधमाला हा एक आदर्शच होता; त्यामुळें राजकीय, सामाजिक, धार्मिक, काव्यविषयक, नवलकथात्मक, अशा अनेक अंगांचें वाङ्मय निर्माण झालें. निबंधमालेशिवाय केसरी, सुधारक, करमणूक, ह्या तत्कालीन साप्ताहिकांनीं निरानिराळ्या क्षेत्रांत जें कार्य केलें तें चिरस्मरणीय आहे. केसरीची भारदस्त भाषा, सुधारकाची प्रसंगानुरूप ओघवती सडेतोड भाषा, करमणुकीची साधी, सोपी, गोड व लालित्यात्मक भाषा, ह्यांनीं समाजावर उद्दिष्ट तो परिणाम घडवून आणिला हें स्पष्टच आहे.

**विष्णुशास्त्री चिपळूणकर** (१८५०–१८८२). हे कृष्णशास्त्री यांचे चिरंजीव. उत्कृष्ट निबंधलेखक व टीकाकार. यांच्या पूर्वींच्या लेखकांची विचारसरणी 'इंग्रज प्रभु हे आपल्यावर उपकार करण्यासाठीं परमेश्वरानें पाठविले आहेत' अशा प्रकारची होती, तिला जोराचा धक्का यांच्या लेखांनीं दिला. १८७४ ते १८८० पर्यंत त्यांची 'निबंधमाला' चालली. त्यांतील मोठाले निबंध हे त्यांचे एक प्रकारें ग्रंथच होत. सरकारी नोकरी सोडून स्वार्थत्यागपूर्वक देशहिताच्या कार्यांत उडी घालणारा हा पहिलाच पुरुष. ह्यांनीं टिळक व आगरकर ह्या आपल्याप्रमाणेंच तडफदार पदवीधर सहकाऱ्यांच्या साह्यानें 'न्यू इंग्लिश स्कूल' स्थापन केलें. 'केसरी' हें मराठी व 'मराठा' हें इंग्रजी वर्तमानपत्र हीं त्यांनीं लोकजागृतीसाठीं काढलीं. केसरी काढल्यानंतर लौकरच एक-दीड वर्षानें ते मृत्यु पावले. चित्रशाळा व आर्यभूषण हे छापखाने व 'नवीन किताबखाना' हीं त्यांनीं काढलीं. त्यांच्या या सर्व संस्था आज भरभराटींत आहेत. राजकीय, सामाजिक व धार्मिक विचारांत आणि वाङ्मयप्रकारांत यांच्या लेखांनीं क्रांति घडवून आणिली, म्हणून हे नवयुगप्रवर्तक होत. त्यांचें टीकास्त्र जहाल, एकांगी व केव्हां केव्हां न पटणारें असें वाटलें, तरी 'जशास तसें' ह्या न्यायानें त्या काळीं परिणाम घडवून आणण्याच्या दृष्टीनें तें अपरिहार्य होतें असें विचारांतीं वाटल्यावांचून राहत नाहीं; इतकें 'स्वत्व' महाराष्ट्र या काळीं गमावून बसला होता हें खरेंच आहे.

**गोपाळ गणेश आगरकर** ( १८५६–१८९५ ). हे विष्णुशास्त्र्यांचे न्यू इं० स्कूल काढण्यांतील सहकारी. प्रारंभीं केसरीचे संपादक; नंतर ‘ सुधारक ’ पत्र १८८८ त काढलें. त्यांतील विचारसरणी सडेतोड व स्वतंत्र अशी आहे. सामाजिक जागृतीचे ते महाराष्ट्रांतील मोठे पुरस्कर्ते होते. स्वार्थ-त्यागाचा मूर्तिमंत पुतळा. फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपल. ‘ सुधारकांतील निवडक निबंध ’ भाग ३, तुरुंगांतील आमचे १०१ दिवस व ‘वाक्यमीमांसा’ हा व्याकरणविषयक ग्रंथ, ही त्यांची वाङ्मयात्मक कामगिरी चिरस्थायी स्वरूपाची आहे. सनातन्यांनीं यांची जिवंतपणीं प्रेतयात्रा काढली होती, पण आज ते सर्वांस पूज्य आहेत.

**बाळ गंगाधर टिळक** ( १८५६–१९२० ). हेही विष्णुशास्त्र्यांचे न्यू इं० स्कूल काढण्यांतील सहकारी. ज्योतिष व गणितशास्त्रज्ञ. धडाडीचे राजकीय पुढारी. आगरकरांनंतर ‘ केसरी ’ पत्र यांनीं चालविलें. त्यांच्या जहाल लेखांनीं मोठीच राजकीय जागृति व खळबळ उडाली. सरकारच्या रोषामुळें तीन वेळां त्यांना कारावास भोगावा लागला, तरी त्यांचें धैर्य ढळलें नाहीं. लोक त्यांना ‘ **लोकमान्य** ’ म्हणूं लागले; आणि त्यांच्या निधड्या देशसेवेच्या जाणिवेनें लोकांनीं त्यांना एक लक्ष रुपयांचा आहेर त्यांच्या ६० व्या वाढदिवशीं केला. ‘केसरींतील (अनेक विषयावरील) निवडक निबंध,’ व ‘ गितारहस्य ’ हीं त्यांची वाङ्मयाविषयक भरीव कामगिरी होय. त्यांचा ‘ आर्यांचें उत्तरध्रुवाकडील वसतिस्थान ’ ह्या विषयावरील इंग्रजी ग्रंथ पाश्चात्य देशांतही मान्यता पावलेला आहे.

**शिवराम महादेव परांजपे** ( १८६४–१९२९ ). यांनीं ‘ काळ ’ नांवाचें वर्तमानपत्र मोठ्या धडाडीनें चालाविलें. त्यांचे लेख व वक्तृत्व बहुतांशीं रूपकात्मक व व्याजोक्ति, वक्रोक्ति, उपहास, विडंबन, यांनीं आणि उपमा–उत्प्रेक्षादि अलंकारांनीं नटलेले असत. त्यांच्या उपरोधात्मक लेखन–पद्धतीमुळें त्यांतील मर्म कळणाऱ्यांस गुदगुल्या होत व उपरोधित व्यक्तीस शल्याप्रमाणें ते लेख अत्यंत झोंबत. ‘ काळांतील निवडक निबंध ’ भा० ७ ( जप्त; पण वाङ्मयदृष्ट्या अत्यन्त मूल्यवान् ); साहित्यसंग्रह भा० २; मालविकाग्निमित्र इ० संस्कृत रूपान्तरित व मॅक्बेथ इंग्रजी रूपान्तरित, इ० नाटकें, तर्कसंग्रह, तर्कभाषा, हे त्यांचे ग्रंथ आहेत. वक्तृत्वही असामान्य होतें.

**हरि नारायण आपटे** (१८६४–१९१९). ललितकला-लेखनाचा जन्म जरी यांच्या पूर्वी झाला असला, तरी हे ललित-वाङ्मयाचे मोठेच प्रसारक होऊन गेले यांत शंका नाहीं. 'करमणूक' (१८९०) हें वर्तमानपत्र काढून त्यांनीं आबाल-वृद्धांचें मनोरंजन केलें. त्यांच्या गोष्टी व इतर स्फुट वाङ्मय विपुल असलें, तरी त्यांच्या सामाजिक व ऐतिहासिक कादंबऱ्यांनीं तत्कालिन समाजदृश्यें व ऐतिहासिक प्रसंग साक्षात् डोळ्यांपुढें उभे करून करमणुकीच्या द्वारा समाजांत डोळसपणा आणिला शंका यांत नाहीं. आजकालच्या गोष्टी, मी, पण लक्षांत कोण घेतो, इ० आठ सामाजिक कादंबऱ्या; उषःकाल, सूर्योदय, गड आला पण सिंह गेला, इ० नऊ ऐतिहासिक कादंबऱ्या; संगीत सखूबाई, संगीत पिंगला, हीं नाटकें; भासकवीच्या नाटककथा व स्फुट गोष्टी इ० त्यांचें विपुल वाङ्मय आहे; आणि तें बहुतेक सत्यं, शिवं, सुंदरम्, या सदरांत मोडणारें आहे.

---

उतारे

## विष्णुशास्त्री चिपळूणकर

### कडक टीका म्हणजे काय—

"आमच्या कित्येक कोमल व सभ्य देशबंधूंचा आम्हांवर असा आक्षेप येईल कीं, 'तुम्हांस कोणाचीं मतें अग्राह्य वाटलीं, तर तीं खोटीं म्हणून तुम्ही सिद्ध करा.' ...पण तीव्र व सौम्य लेखाविषयीं आमचें तर असें मत आहे कीं, वरील प्रयोग प्रतिपक्षाचा लेख ज्या मानाचा असेल त्याप्रमाणें करणें वाजवी आहे. जो सभ्यवादी आहे त्यावर जर प्रतिपक्षी तुटून पडेल व तीक्ष्ण वाक्प्रहार करील तर तें शोभणार नाहीं; पण जो मुळींच कोणाची मुरवत न धरतां 'तुम्ही पशु आहां' येथून पांडित्यास आरंभ करील त्याचा अंमळ खरपूस समाचार घेतला असतां कोणी दोषी होईल असें आम्हांस वाटत नाहीं." (निबंधमाला).

## बाळ गंगाधर टिळक

### इंग्रजी शिक्षणाचा परिणाम—

"इंग्रजांच्या सहवासापासून आम्हांस जे पुष्कळच लाभ झाले आहेत, त्यांत शिक्षणाची गणना प्रमुखत्वानें करण्याचा प्रघात आहे; पण जरा विचार केला असतां, आपणांस कळून येईल कीं, हें पाश्चिमात्य शिक्षण अगदीं एकांगी असून, त्या शिक्षणाचा परिणामही तसाच झाला. इंग्रजी शाळांतून पहिल्या पहिल्यानें जी मंडळी

बाहेर पडली, त्यांच्या मनाची स्थिति एक प्रकारे फार भयंकर किंवा शोचनीय झालेली होती. समाजाच्या परंपरागत बंधनांबद्दल आदर असावयाचा तो नाहीसा झालेला, आणि दोन-चार बुकें झाल्याबरोबर बऱ्याच मोठ्या पगाराची जागा त्या-वेळी मिळत असल्यानें, अधिकारमदाचाही बराच अंमल त्यांच्या मनावर बसलेला होता." इ०. ( केसरींतील निबंध ).

## गोपाळ गणेश आगरकर

### स्त्री-पुरुषांचें एकत्र शिक्षण—

"परंतु असला आग्रह काय कामाचा ? असल्या एकदेशीय तत्त्वज्ञानास कोण विचारतो ?...युरोपीय समाजास जी एक प्रकारची उल्हासवृत्ति प्राप्त झाली आहे. ती त्याच्या मिश्रणामुळे प्राप्त झाली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. मिश्र-समाजानें नीति-सूत्र ढिलें पडते, असें कित्येकांचें म्हणणें आहे; पण ज्यांना मिश्र-समाजाचा प्रत्यक्ष अनुभव नाही त्यांचें हें मत आहे, एवढें ध्यानांत ठेविलें पाहिजे. गोषाबाहेर किंवा झनान्याबाहेर नीति असण्याचा संभव नाहीं, हें बोलणें जितक्या शहाणपणाचें आहे, तितक्याच शहाणपणाचें वरील मत आहे."
( सुधारकांतील निबंध ).

## हरि नारायण आपटे

### ती काळरात्र !

"हे शब्द पुरते माझ्या तोंडांतून निघतात न निघतात, तों पुन्हां तें काळरक्त एकदम तोंडावाटे बाहेर आले ! ... मी जवळ गेलें त्याबरोबर माझ्या हातावर हात ठेविला, आणखी कांही ओठ हालविलेसें मला वाटलें. मी, 'दादा, दादा', करून ओरडलें. दादा जवळ आला. दादाचा हात धरून माझ्याकडे पाहिलें. आणखी कांहो बोलण्याची इच्छा आहेसे दाखविलें. मला त्यावेळी कुठलें धैर्य आलें कोणास कळे ! मी अगदी गडबड न करितां तोंडापाशीं कान नेला. तों 'आईला ... अंतर ... देऊं...नको ...कोणी ... नाही ... शंकरमामा ... पॉलिसी ... पेटीत' असे अर्धवट शब्द उच्चारले. पुढें काय म्हणावयाचें होतें तें त्या शब्दाच्या पाठोपाठ आलेल्या गुळणींतच गेले !" ( पण लक्षांत कोण घेतो ? ).

## शिवराम महादेव परांजपे

### रायगडावरील संपत्ति—

या रायगडावर जी अनेक प्रकारची संपत्ति साठविलेली आहे, तीमध्यें स्वातंत्र्य-प्राप्तीच्या साधनांचीही संपत्ति तेथें जी भरलेली होती ती त्या खोरें-कुदळी घेऊन

संपत्ति शोधावयास निघालेल्या दौलतीच्या मनामध्यें प्रकाशित होऊं लागली. त्याची जन्मदात्री आई जी मरण पावली होती, तिचें त्याला यावेळीं स्मरण झालें; पण तिच्या स्मरणामुळें त्याच्या अंतःकरणाला दुःख न होतां सभोवतालच्या सृष्टींतील प्रत्येक उपकारक वस्तूमध्यें त्याला त्याची आई दिसूं लागली. नाना प्रकारचीं धान्यें उत्पन्न करणारी ही भूमि, मधुर फळें निर्माण करणारे हे वृक्ष, जेथे जावें तेथे शीतल पाणी पाजणाऱ्या ह्या नद्या, श्रमपरिहरण करणारा हा मंदप्रवाही वायु, हा सर्व अन्नांचा परिपाक करणारा सूर्यनारायण, आणि मी जेथे निद्रासेवन करूं इच्छीन तेथें माझ्याकरितां प्रेमाचा पाळणा तयार करून देणारी ही भूमि, या प्रत्येकाच्या ठिकाणीं मी माझी आईच पाहत आहें, अशी व्यापक वृत्ति त्याच्या मनामध्यें उत्पन्न झाली. " (काळांतील निवडक निबंध).

या उताऱ्यांवरून आजच्या मराठीला कसकसें वळण लागत गेलें, तें कळून येईल. प्रत्येकाचें भाषावैशिष्ट्य मात्र या छोट्या छोट्या उताऱ्यांत पूर्णपणें आढळून येण्यासारखें नाहीं. तथापि ( १ ) **शास्त्रीबोवांच्या** जोरकस प्रतिपक्षाशीं जशास तसें या प्रकारच्या वाग्युद्ध करण्याच्या व प्रमाणबद्ध आणि शुद्ध अशा भाषेची आपल्यास कल्पना करितां येऊं शकेल. त्यांची जाडी विद्वत्ता, त्यांचा निरुत्तर करणारा कोटिक्रम, त्यांची छाप बसविणारी भाषा-पद्धति, त्यांचा खोंचदार विनोद, त्यांचीं सुभाषितें वगैरे योजून प्रबंध मनोरम करण्याची हातोटी, त्यांची लेखनाची ठाकठिकी, इ० गोष्टी वरील उताऱ्यांवरून 'शितावरून भाताची परीक्षा' या न्यायानें अजमावतां येतील. ( २ ) **टिळकांच्या** मर्मभेदक भाषेचा नमुना जरी त्यांच्या वरील उताऱ्यांत आढळला नाहीं, तरी त्यांच्या जहाल लेखणीची किंचित् तरी जाणीव झाल्यावांचून राहणार नाहीं. त्यांच्या भाषेंत-विवेचनांत-भाषेचा नटवेपणा बहुधा आढळणार नाहींच; पण वकिली भरपूर आढळेल. ( ३ ) **आगरकरांच्या** लेखणींतील समाजहिताविषयींची तळमळ आणि अनेक प्रमाणांनीं आपले विचार निर्भीडपणें मांडण्याची त्यांची हातोटी हीं कांहीं अंशीं ध्यानांत येऊं शकतील. त्यांच्या भाषेचा प्रवाह जलौघाप्रमाणें धावत राहूनही, तिच्यांत उपमा-रूपकादि भरपूर आढळल्यावांचून रहावयाचीं नाहींत. जोरदारपणा टिळक व आगरकर या उभयतांच्या भाषेंत सारखाच असल्यामुळें, दोघांचेंही लेखन उत्कृष्ट परिणामकारी झालें आहे. ( ४ ) **हरीभाऊ आपट्यांच्या** यथातथ्य वर्णनशैलीचा वर दिलेला मासलाही त्यांच्या भाषेचें कौशल्य प्रगट करण्यास पुरेसा आहे;

आणि या कारणानेंच तो तो प्रसंग किंवा तीं तीं पत्रें हुबेहूब डोळ्यांपुढें शब्द-चित्रद्वारां आल्यानें, हरीभाऊंच्या कादंबऱ्यांना मनोरंजक व कलात्मक वाङ्मयांत अग्रस्थान मिळालेलें आहे. ( ५ ) **शिवरामपंत परांजपे** यांच्या भाषेचा विलास, एक एका गोष्टीचें अनेक चढत चढत किंवा उतरत उतरत गेलेल्या व घोळून घोळून केलेल्या वाक्यांनीं विवरण, वेचक व मार्मिक विशेषण-योजना, शून्यांतून सृष्टि उत्पन्न करण्याची- म्हणजे जरी एकादा अल्पसा प्रसंग सांपडला, तरी त्यावर काव्यात्मक कल्पना करून, तें सुंदर रंगवून सोडण्याची–प्रतिभाशक्ति, अप्रतिहत वाणीचा ओघ, मोठालीं लांबलचक वाक्यें असलीं तरी त्यांतील दूरदूरच्या शब्दांचाही व्याकरणदृष्ट्या असलेला संबंध चुकूं न देण्याची तर्कशुद्धता, आणि लेखाचें अंतिम पर्यवसान देशाभिमानयुक्त प्रेरक वाक्यांत; खोंचदार, श्लेषात्मक, अलंकारप्रचुर, प्रौढ आणि व्यंग्यार्थक, उपरोधिक किंवा अप्रस्तुत–प्रशंसात्मक विचारसरणी; ह्यांपैकीं कांहीं गोष्टींचा किंचित् अंश त्यांच्या वरील उताऱ्यांत आढळेल.

## आधुनिक कविता ( आरंभकाळ )

'**केशवसुतां**'ना आधुनिक काव्याचे जनक मानितात; त्यांचा जन्म १८६६ त व मृत्यु १९०५ मध्यें झाला; म्हणजे मालाकारांच्या युगांत त्यांच्या अभिनव प्रकारच्या कवितेचा जरी जन्म झालेला असला, तरी ह्या कालांतील बऱ्याच कवींची कविता मागील शास्त्री–मंडळींच्या पावलावर पाऊल टाकूनच निर्माण झाली. ( १ ) बहुतेक कवींनीं आपली रचना बहुधा जुन्या श्लोकवृत्तांतच केली आहे. ( २ ) यापूर्वीच्या शास्त्री–मंडळानें संस्कृत काव्यांच्या आधारें आपली रचना केली असल्यानें, त्यांच्यांत निदान माधुर्य, सौंदर्य व शब्द-लालित्य हे गुण प्रमुखत्वानें नजरेस येतात, त्या मानानें ( १८७४ ते १९०० ) ह्या कालांत आढळून येत नाहींत. ( ३ ) भक्ति, नीति, यांचा जिव्हाळा तुकाराम-रामदास–मोरोपंतादि जुन्या कवींत उत्कटत्वाने आढळून येतो, तसा यांच्या कांहीं कविता भक्तिपर व नीतिपर असल्या, तरी त्या वरील कवींच्या मानानें फिक्क्याच वाटतात. ( ४ ) इंग्रजीच्या धर्तीवर विविध विषयांवर कविता करण्याचे प्रयत्न झाले, पण त्यांत रामदास-तुकारामांच्या मानानें जिव्हाळा, स्वतंत्रता किंवा ओज, स्फूर्ति, स्वाभिमान, हीं एकंदरींत कमीच आढळतात. ( ५ ) इंग्रजांच्या सुखासीन साम्राज्यांत जोरदार कविता निर्माण

न होतां, झाली ही काव्यनिर्मिति बरीच झाली असें म्हणावयाचें. **ना० वा० टिळक** यांच्यासारखे कांहीं कवि अपवादभूत समजावयाचे.

पाळंदे, महाजनि, चिंतामणि पेठकर, गो० वा० कानिटकर, डॉ० कीर्तिकर, बापूसाहेब कुरुंदवाडकर, ब० रा० प्रधान, पां० गो० पारखी, बा० अ० भिडे, वि० वा० भिडे, ओक, वासुदेवशास्त्री खरे, प्रो० लक्ष्मणशास्त्री लेले, आठल्ये, लोंढे, मोगरे, लिमये, Bee, इ० मंडळी ह्या कालांतील होत.

केशवसुत, विनायक, टिळक, माधवानुज, दत्त, लेंभे, इ० मंडळी ह्याच कालांतील पण निराळ्या वळणाची होत.

**भास्कर दामोदर पाळंदे** ( १८३२–१८७४ ). यांचा ‘ रत्नमाला ’ नांवाचा ईशस्तुतिपर काव्यग्रंथ आहे; त्यांत अनेक वृत्तांत ईश्वरास आळविलें आहे. इतकी विविधवृत्तात्मक रचना मराठींत दुसऱ्या कोणीं केली नाहीं. वृत्त-दर्पणांत घालण्यासाठीं यांनीं अनेक उदाहरणें तयार करून दिलीं होतीं. विक्र-मोर्वशीय नाटकाचें गद्यपद्यात्मक भाषान्तर व गीतेचें ओवीबद्ध भाषान्तर यांनीं केलें आहे. यांची कविता भक्तिरसानें ओथंबलेली असते. मेजर कँडी यांच्या शाळांतील क्रमिक पुस्तकांचे ते सहाय्यक होते.

**विष्णु मोरेश्वर महाजनि** ( १८५१–१९२३ ). वऱ्हाड शाळा-खात्यांत एज्यु० इन्स्पेक्टर होते. तत्कालीन लेखकांत नांवाजलेले. यांचा ‘ कुसुमांजलि ’ नामक काव्यसंग्रह प्रसिद्ध आहे. ह्यांची कविता प्रौढ व हृद-यंगम आहे. ‘तारा’ व ‘मोहविलसित’ हीं रूपान्तरित नाटकें त्यांनीं लिहिलीं आहेत. जुन्या क्रमिक पुस्तकांत यांच्या कविता आढळतात.

**पांडुरंग व्यंकटेश चिंतामणि पेठकर** ( १८५१–१८७९ ). हे अनेक–भाषाकोविद व उत्कृष्ट वक्ते होते. यांच्या ‘ गंगावर्णना ’ काव्यांतील एकेक भाग एकेका भिन्न वृत्तांत रचिला असून, वर्णन हृदयंगम आहे. भाषा प्रौढ, अलंकारप्रचुर व संस्कृत समासादिकांनीं खचलेली अशी आहे.

**गोविंद वासुदेव कानिटकर** ( १८५४–१९१८ ). जुन्या पिढींतील प्रमुख सुधारक. यांनीं अकबरकाव्य, नारायणराव पेशवे यांचा मृत्यु कृष्णाकुमारी व संमोहलहरी, हीं काव्यें रचिलीं आहेत. ‘कविकूजन’ हा त्यांचा स्फुट कविता-संग्रह आहे. स्त्रियांची परवशता, गीतांजलि, हे त्यांचे रूपान्तरित ग्रंथ आहेत.

**बापूसाहेब कुरुंदवाडकर** ( १८३८–१८९९ ). मोरोपंताच्या आर्येचें हुबेहूब अनुकरण करणारे हे राजकवि होत. गंगावर्णना, भट्टवंशकाव्य, स्ववंशवर्णन, इ० यांची कविता आहे.

**विनायक कोंडदेव ओक** ( १८४०–१९१५ ). हे प्रचंड लेखक व कवि होते. यांनीं 'बालबोध' नांवाचें मासिक सुमारें तीन तपें उत्कृष्टपणें चालविलें. यांची भाषा अत्यन्त सुबोध, वाक्यें लहान, अशी आहे. 'बालबोधां'त त्यांनीं अनेक लहान लहान पुष्कळच चरित्रें प्रसिद्ध केलीं आहेत. 'पुष्पवाटिका' हा त्यांचा कवितासंग्रह आहे. मधुमक्षिका, हिंदुस्थानकथारस, पीटर धि ग्रेट, शिकंदर, ग्लॅडस्टन, इ० चीं चरित्रें, वगैरे ४०–५० लहान मोठे ग्रंथ यांनीं लिहिले आहेत. विद्वत्ता बेताची तरी काम पुष्कळ.

**वासुदेवशास्त्री खरे** ( १८५८–१९२४ ). हे मूळ कोंकणांतील गुहागरचे राहणारे. पुढें मिरजचे रहिवासी झाले. प्रमुख इतिहाससंशोधक. यानीं हरिवंशाची बखर, अधिकारयोग, नाना फडनविसाचें चरित्र, पटवर्धन दप्तरांतील कागद-पत्रांचे बारा ग्रंथ आणि अर्थदृष्टया हा व्याप पुरा पाडण्याकरितां गुणोत्कर्ष, शिवसंभव, तारामंडळ, उग्रमंगल, देशकंटक, वगैरे नाटकें लिहिलीं. यशवंतराव महाकाव्य, समुद्र, इ० त्यांची कविता प्रसिद्ध आहे. लक्ष्मीची यांवर कृपा नव्हती, तरी त्यांचें कार्य प्रचंड आहे. यांनीं कधीं कोणाशीं तोंड वेंगाडलें नाहीं.

**कृष्णाजी नारायण आठल्ये** ( १८५२–१९२७ ). हे एक प्राथमिक ट्रेंड शिक्षक व चित्रकार होते. मलबारांत जाऊन तेथून यांनीं 'केरळकोकीळ' नांवाचें मासिक उत्कृष्ट प्रकारें चालविलें. त्यांतील कविता, पुस्तक-परीक्षणें, लोकोत्तर चमत्कार, यांवर त्या काळीं लोकांच्या उडया पडत. त्यांची भाषा चटकदार असे. सासरची पाठवणी, माहेरचें मूळ, ग्रहदशेचा फटका, सुश्लोकलाघव, इ० त्यांची कविता सुप्रसिद्ध आहे. नानावृत्तात्मक 'गीतापद्यमुक्ताहार' या पुस्तकाबद्दल निर्णयसागर प्रेसच्या मालकांनीं त्यांस १२ तोळ्यांचें एक सोन्याचें कडें बक्षिस दिलें. शंकराचार्यांनीं त्यांस 'महाराष्ट्रभाषा–चित्रमयूर' ही पदवी दिली होती. सार्थ ज्ञानेश्वरी इ० त्यांचे आणखीही कांहीं ग्रंथ आहेत.

**मोरो गणेश लोंढे** ( १८५४–१९१९ ). हेही कुलाबा जिल्ह्यांतील एक प्राथमिक शिक्षक होते; तरी यांची मुलांकरितां लिहिलेली कविता विविध विषयांवर व बरीच आहे. तींत सुबोधता हा प्रमुख गुण आढळतो.

**गंगाधर रामचंद्र मोगरे** (१८५७–१९१५). यांनीं बाणकथेचें 'अभिनव कादंबरी' हें पद्यात्मक रूपान्तर केलें आहे. 'मोगऱ्याचीं फुलें' ह्या नांवानें त्यांच्या कविता–संग्रहाचे तीन भाग प्रसिद्ध झाले आहेत. यांनीं आपली बरीच कविता आर्या–वृत्तांत लिहिली आहे.

**लक्ष्मण गणेशशास्त्री लेले** (१८७०–१९३४). हे पुण्याच्या सर परशुरामभाऊ कॉलेजमध्यें प्रोफेसर होते. यांनीं महाराष्ट्र-भामिनीविलास, मेघदूत-समवृत्त भाषान्तर, पद्यमंजूषा, तिलकांजलि, महाराष्ट्रवंदन, सौंदर्यलहरी, इ० अनेक पद्यग्रंथ लिहिले असून, 'अलंकारप्रकाश' नांवाचाही एक ग्रंथ लिहिला आहे.

**बाळकृष्ण अनंत भिडे** (१८७४–१९२९). हे एक जुन्या पिढींतील मार्मिक टीकाकार, कवि व रसिक गृहस्थ होऊन गेले. मुरुड-जंजिरा येथील हायस्कूलचे हेडमास्तर होते. 'फुलांचे झेले,' 'बोधमणिमाला,' हें यांचे काव्य-संग्रह आहेत. नामसुधा, सुबोधकेकावलि व तुकाराम, वामन, मुक्तेश्वर आणि आधुनिक कवींच्या कविता, यांवर त्यांनीं मार्मिक चर्चात्मक निबंध लिहिले आहेत.

**विद्याधर वामन भिडे** (१८६१–१९३६). काव्यापेक्षां यांचें इतर लेखनही बरेंच आहे. मराठी शब्दांचें उद्घाटन, वाक्प्रचार व म्हणी, निबंध-लेखन आणि अनुवाद, अर्थालंकारांचें निरूपण, इंग्रजी–मराठी व संस्कृत–इंग्रजी हे कोश, सरस्वतीकोश, तसेंच 'जीवजागृति' काव्य, इ० त्यांचे ग्रंथ आहेत. यांची कविता कृत्रिम व क्लिष्ट आहे.

**'राधारमण' कृष्णाजी पांडुरंग लिमये** (१८७७–१९२२). यांची भाषा प्रौढ परंतु संस्कृतशब्दप्रचुर आहे. यांनीं विशेषतः जुन्या श्लोक-वृत्तांतच कविता लिहिली असून, जुन्या कवींप्रमाणें कांहीं ठिकाणीं शब्द-चमत्कार व चित्रकाव्यरचनाही साधण्याचा प्रयत्न केला आहे. त्याचा एक नमुना पुढें दिला आहे.

**'Bee' नारायण मुरलीधर गुप्ते** (ज० १८७२). वास्तव्य नागपुरास. आधुनिक कवींत उच्च विचारांच्या कविता रचण्यांत यांचें श्रेष्ठ प्रतीचें स्थान आहे. 'फुलांची ओंजळ' हा त्यांचा काव्यसंग्रह प्रसिद्ध आहे. 'चांफा' इ०

गूढगुंजनात्मक कविता प्रथमतः यांनींच मराठींत आणिली, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**'माधवानुज'** डॉ० **काशीनाथ हरि मोडक** (१८७२–१९१७). यांचें 'मेघनादवध' या नांवाचें एका बंगाली काव्याचें रूपान्तरात्मक महाकाव्य व 'माधवानुजांची कविता' हा काव्यसंग्रह प्रसिद्ध आहे. यांच्या कवितेंत करुणरसाची बरीच छटा असते. कृष्णा-कोयना-संगम ही त्यांची कविता लोकप्रसिद्ध आहे.

**विठ्ठल भगवंत लेंभे** (१८५०–१९२०). ह्यांनीं प्रियदर्शन, विष्णुनिधन, शोकावर्त, सुरतरंगिणी, हीं खंडकाव्यें व पुष्कळ स्फुट कविता रचिल्या आहेत. यांची वर्णनशैली मार्मिक व मनोहर आहे. हे रेलवेंत स्टेशनमास्तर होते.

**'दत्त' दत्तात्रय कोंडो घाटे** (१८७५–१८९९). मराठे. 'दत्तांची कविता' हा त्यांचा काव्य-संग्रह आहे. उत्कृष्ट स्वभाववर्णन हा त्यांच्या कवितेचा विशेष आहे. भाषा सरस व प्रौढ असून, करुणरसाची छटा यांच्या काव्यांत अधिक दृग्गोचर होते.

**रे० नारायण वामन टिळक** (१८६५–१९१९). आधुनिक कवींत त्यांना कृतीनें व मानानें पहिलें स्थान देतात तें योग्यच आहे. 'टिळकांची कविता' हा त्यांचा कवितासंग्रह आहे. प्रेमळ व सहृदय, कवितेचे विषय आधुनिक पण वळण संस्कृती, सहजता हा त्यांच्या काव्याचा विशेष. त्यांना 'फुला-मुलांचे कवि' म्हणतात, पण तात्पर्यार्थानें तें खरें आहे इतकेंच. वनवासी फूल, सृष्टीची भाऊबीज, माझी भार्या, सुशीला, इ० त्यांचीं खंडकाव्यें व अभंगाञ्जलि हा अभंगसंग्रह प्रसिद्ध आहे. 'ख्रिस्तायन' हें ओवीबद्ध काव्य अपूर्ण होतें, तें त्यांच्या पत्नी लक्ष्मीबाई यांनीं पूर्ण केलें. हें एक कविघराणेंच होतें. यांनीं 'बालकवी'स पुढें आणिलें.

**'केशवसुत' कृष्णाजी केशव दामले** (१८६६–१९०५). यांचा 'केशवसुतांची कविता' हा काव्यसंग्रह आहे. नवीन विषय, नवीन चाली, नवीन विचारांची तडफ, यांमुळें त्यांना नवयुगप्रवर्तक म्हणतात. यांची कविता जोरदार आहे. रूढींचीं बंधनें तोडण्यासाठीं यांनीं 'तुतारी' फुंकली. त्यांच्या हयातींत त्यांच्या कृतीचा व्हावा तितका बोलबाला झाला नाहीं.

**'विनायक' विनायक जनार्दन करंदीकर** (१८७२–१९०९). नागांव जि० कुलाबा येथील. यांचा 'विनायकाची कविता' नांवाचा काव्यसंग्रह

आहे. यांच्या कवितेंत देशाविषयीं तळमळ व राष्ट्रीय बाणा ह्या गोष्टी प्रामुख्यानें आढळतात. विलासिनी, दोन बाजी, इ० यांच्या कविता प्रसिद्ध आहेत.

'**गोविंदाग्रज' राम गणेश गडकरी** ( १८८५-१९१९ ). 'वाग्वैजयंती' या नांवानें यांचा काव्यसंग्रह प्रसिद्ध आहे. प्रेमसंन्यास, पुण्य-प्रभाव, एकच प्याला, भावबंधन, हीं त्यांचीं नाटकें व संपूर्ण बाळकराम, रिकाम-पणची कामगिरी, हे त्यांचे विनोदी लेखसंग्रह, त्यांच्या अवितर्क्य कल्पना-शक्तीची व भाषाप्रभुत्वाची साक्ष देतात. यांच्या बऱ्याच कविता प्रेमविषयक आहेत. श्री० कृ० कोल्हटकर यांस ते आपल्या गुरुस्थानीं मानीत.

'**बालकवि' त्र्यंबक बापूजी ठोमरे** ( १८९०-१९१८ ). कवि टिळक व त्यांच्या पत्नी यांनीं यांचा पुत्रवत् सांभाळ केला. 'मधुगीतें' व 'बालकवींची कविता' हे त्यांचे कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. सृष्टिवर्णनाशीं अत्यन्त समरस झालेले असे हे कवि आहेत. आगगाडीखालीं सांपडून हे अकालीं मृत्यु पावले. आनंदी आनंद, फुलराणी, इ० यांच्या कविता हृदयंगम आहेत.

---

उतारे

## भास्कर दामोदर पाळंदे

प्रभो ! प्रणतवत्सला ! बहुत पातकी दीन मी
निराश्रित अजाणता तुज सदैव चित्तीं नमीं
चुकें तर पदोपदीं पण न भीं नसें घाबरा
क्षमाच करशील तूं भरंवसा मला हा बरा १.
बसावें गुंजावें प्रभु तव पदाब्जीं भ्रमर-सें
हंसावें डोलावें मग अमित सौख्यें अमर-सें
मधा प्यावें त्याच्या अनिश अमृताशीं सम रसें
सुधा तीही वाटे विरसचि अशा उत्तम रसें २.

## विष्णु मोरेश्वर महाजनि

ईशप्रार्थना—

देवा ! परमसमर्था ! दीनदयाळा ! प्रभो ! जगन्नाथा !
आलों शरण तुला मी दीन तुझ्या ठेवितों पदीं माथा १.
करितों अपराध सदा आहें मी सर्वथैव अपराधी
बाळक म्हणोनि सोशीं; त्रिजगज्जनका ! करीं न अपरा धी २.

नीत्युपदेश—

दिधलें दुःख परानें उसनें फेडूं नयेचि सोसावें।
शिक्षा देव तयाला करिल म्हणोनी उगेच बैसावें॥

या काळीं मुलांच्या क्रमिक पुस्तकांतून अशा प्रकारच्या कविता असत; व मोठ्या गांभीर्यानें मुलें त्या पाठ करीत.

## राधारमण

हिमालय-वर्णन—

❀ हरित सन्नग-मंडन मानस। हरित-सन्नग-मंडन-मानस
सुरस-सारस-सार-समाकुल। सु-रस-सार ससारस माकुल ॥ ५० ॥
ऽ धरा धराया महती समान। धराधरा या मह तीसमान
धरा धरायामहतीस मान। धराधरा या महती समा न ॥ ५२ ॥
(गजासुरवध; काव्यदोहन ३७१–७२).

आधुनिक कवींच्यावर मोरोपंतादि भगवद्भक्त जुन्या संस्कृती वळणाच्या व अलीकडील पंडिती वळणांच्या कवींची केवढी छाप पडली होती, हें ध्यानांत येण्यासाठीं या कालातील पाळंदे, महाजनि, या प्रथमच्या कवींच्या व राधारमण ह्या अखेरअखेरच्या कवीच्या कृतींचा मासला दिला आहे. अनेकांचे अनेक उतारे देण्यास येथें जागा नाहीं.

आतां काहीं अंशीं नव्या वळणाच्या कवितेचे थोडे मासले पहा.

## Bee (ना० मु० गुप्ते)

चांफा—

| | |
|---|---|
| चांफा बोलेना, | चांफा चालेना। |
| चांफा खंत करी, | कांहीं केल्या फुलेना॥ ध्रु०॥ |
| गेलें आंब्याच्या वनीं, | म्हटलीं मैनासवें गाणीं। |
| आम्हीं गळ्यांत गळे मिळवून. | चांफा० बोलेना १. |

❀ पर्वतश्रेष्ठ हिमालयाचें भूषणभूत, हिरव्या सुंदर वृक्षांनी शोभिवंत, मधानें भरलेली मोठी कमळें आणि गोड व स्वच्छ पाणी असणारें, तसेंच हंसांनीं गजबजलेलें असें मानससरोवर मनाला आनंद देतें. तें लक्ष्मीचें घरच आहे.

ऽ या श्रेष्ठ पृथ्वीला धारण करणारा शेष आहे; त्याचप्रमाणें हा हिमालयही तिला धारण करण्यास समर्थ आहे; तेव्हां ते दोन्ही समान नाहीत का?

मेघ धरूं धावे, वीज चटकन लवे ।
गडगडाट करी दारुण. चांफा बोलेना ६.
लागुन कळिकेच्या अंगा, वायु घाली धांगडधिंगा ।
विसरुनी जगाचें जगपण. चांफा बोलेना ७.
सृष्टि सांगे खुणा, आम्हां मुखस्तंभ राणा ।
मुळीं आवडेना ! रे आवडेना ! चांफा बोलेना ८.
दिठी दीठ जातां मिळुन, गात्रें गेलीं पांगळून ।
अंगीं रोमांच आले थरारून. चांफा बोलेना ११.
चांफा फुलीं आला फुलून, तेजीं दिशा गेल्या दाटुन ।
कोण मी–चांफा ? कोठें दोघेजण ? चांफा बोलेना १२.

वरलि कविता हा 'गूढगुंजनात्मक' कवितेचा एक मासला म्हणून दिला आहे. जुन्या कवींचीं 'कूटें' असत, तसाच हा एक आधुनिक काव्य-प्रकार आहे.

## विठ्ठल भगवंत लेंभे

विष्णु-निधन—(विष्णुशास्त्री चिपळूणकर यांस अनुलक्षून)

'माले,' तुझा बहुत घात खराचि झाला
दैवें तुझा जनक नाक-पथासि नेला !
अर्पील जो मज करें विबुधोत्तमासी
होती अशी बहुत आस तुझ्या जिवाची १.
शृंगार-वीर-नव-लेख अतां कशाचे ?
येईल मात्र भरतें करुणा-रसाचें
गंभीर-धीर-रस-पूरित वाग्विलास
गेला लया तव पित्यासह आजि खास ! २.
ज्यांच्या गुणीं मुदित पंडित सर्व झाले
गर्वोद्धतांसहि जिहीं मदहीन केलें
सर्वत्र ज्यांस जयपत्र मिळेच जाण
ऐसे अतां लिहिल निःस्पृह लेख कोण ? ३.

## दत्तात्रय कोंडो घाटे

शहाणी बाहुली—

या बाइ या, बघा बघा काशि माझि रुसलि बया
ऐकुं न ये तें; हळु हळु अशि माझि छबि बोलते
डोळे फिर्विते, टुलु टुलु काशि माझि सोनि चालते

बघा बघा तें, गुलु गुलु गालांतच कशि हासते
मला वाटतें, इला बाइ सारें कांहिं सारें कळतें
सदा खेळते, कधिं हट्ट धरुन न मागे भलतें
शहाणि कशी, साडि-चोळि नवी ठेवी जशांच्या तशी

## रे० नारायण वामन टिळक

### पांखरा, येशिल का परतुन ?

मत्प्रेमानें दिल्या खुणांतुन, एक तरी अठवून १.
हवेसवें मिसळल्या माझिया, निःश्वासा वळखून २.
थांब घेउं दे रूप तुझें हें, हृदयीं पूर्ण भरून ३.
जन्मवरी मजसवें पहा हीं, तव चंचूची खूण ४.
विसर मला पारि अमर्याद जग, राहीं नित्य जपून ५.
घे आतां घे शेवटचे हे, अश्रू दोन पिऊन ६.

'बालकवीं'च्या मृत्युसमयीं लिहिलेली ही कविता आहे.

## लक्ष्मीबाई टिळक

### पति-पत्नी—

असो. मोदकाख्यान पुरे हें, ऐक एवढी खूण
पति-पत्नीला दोन म्हणुं नये, दिसती दोन म्हणून
कधीं विचारूं नको कुणाला, कीं तुज अमक्या कामीं
साह्य पतीचें असे नसे वा ? शपथ घालितें तुज मी
मूर्तिमंत जें प्रेम तयाचें, नांव जगीं दाम्पत्य
वडिल बहिण मी, माझ म्हणणें, चाल मानुनी सत्य
प्रेमजीवनीं वाढे लतिका,— स्त्री हिचिया साह्याला
सर्व धावती, हीही करिते साह्य समस्त जगाला
नियम हा असा त्यांत पती तर, जीवच निज पत्नीचा
जीवावांचुन उपाय चाले, कोठें काय कुडीचा ?
तशांत मी तर लोहच केवळ, तुला सांगतें स्पष्ट
त्या परिसाच्या संगें झालें, सोनें गे उत्कृष्ट
त्या परिसाचा, कविरायाचा पतिरायाचा मान
पाहुनि माझी कृती कराया, हेंच पुरे मज दान

ह्यापेक्षां आणखी प्रसादगुणानें युक्त अशी कविता कोणती असणार ?

## केशवसुत

तुतारी !—

एक तुतारी द्या मज आणुनि
फुंकिन जी मी स्व-प्राणानें
भेदुनि टाकिन सगळीं गगनें
दीर्घ जिच्या त्या किंकाळीनें; -- अशी तुतारी द्या मज आणुनि, १.
सारंगी ती सतार सुंदर
वीणा बीनःहि मृदंग बाजा
सूराहि सनई अल्गुज माझ्या
कसचीं हीं हो पडतिल काजा ?—एक तुतारी द्या तर सत्वर ३.
रूढी जुलूम यांचीं भेसुर
संतानें राक्षसी तुम्हांला
फाडुनि खाती ही हतवेला --
जलशाची का पुसा मनाला ?-- तुतारिनें ह्या सावध व्हा तर ४

## विनायक जनार्दन करंदीकर

महाराष्ट्र-लक्ष्मी—

महाराष्ट्र-लक्ष्मी मातें जगीं धन्य वाटे
यशोगीत हीचें गातां मनीं हर्ष दाटे ॥ ध्रु० ॥
पूर्व दिव्य ज्यांचें त्यांना रम्य भावि काल
बोध हाच इतिहासाचा सदा सर्वकाळ
कासया वहावी चिंता मनीं मग जहाल
रात्र सरे तेव्हां उगवे, दिनहि पूर्व वाटे ॥ महाराष्ट्र० ॥

वरील उदाहरणांवरून संस्कृती वळणाचे व इंग्रजी वळणाचे आधुनिक कवि असे या कालांतील कवींचे दोन गट स्पष्ट प्रत्ययास येतील.

**आधुनिक कवितेवरील आक्षेप**—( १ ) प्राचीन कवितांचे विषय जरी रामायण, महाभारत, यांतील कथानकांस अनुसरून होते, तरी त्यांची कविता स्वतंत्र वृत्तीची होती; हल्लींचे कवि गुलाम असल्यामुळें त्यांची कविताही परोच्छिष्ट व रडकी आहे. ( २ ) प्राचीन कवींचें आचरण शुद्ध म्हणून त्यांची कविताही शुद्ध, जिव्हाळ्याची व सरस निपजे; हल्लींच्या कवींचें आचरण अशुद्ध म्हणून त्यांची कविताही अशुद्ध व नीरस असते. ( ३ ) पूर्वीचे कवि

ईश्वरभक्ति, नीति, हें काव्याचें जीवित मानीत; आधुनिक कवि सृष्टि, पशु, पक्षी, झाडें, असल्या क्षुद्र गोष्टींवर कविता लिहितात म्हणून त्यांची कविता हीन दर्जाची. ( ४ ) पूर्वींचे कवि प्रसिद्धीसाठीं किंवा द्रव्यासाठीं काव्य करीत नसत; हल्लींचे कवि त्याकरितां हापापलेले असतात, म्हणून त्यांचें काव्य निकृष्ट निपजतें. ( ५ ) पूर्वींची कविता स्वतःच्या मृत पत्नीकरितां रडणारी नव्हती; हल्लींची कविता तशी असल्यानें तिच्यांत रडका सूरच पावलोपावलीं कानीं येतो. ( ६ ) पूर्वींच्या कवितेंत प्रसाद व प्रतिभा भरपूर आढळतात; हल्लींची कविता मारून मुटकून बनविलेली आढळते. ( ७ ) पूर्वींच्या कालांत महाकाव्यांची उत्पत्ति झाली; हल्लींच्या कालांत चार-दोन कविता खरडल्या कीं, त्याला घमेंड महाकवीची उत्पन्न होते. ( ८ ) प्राचीन कविता एकमेकांच्या चुरशीकरितां नसे; हल्लींचे कवि एकमेकांशीं भांडतात, अर्थात् त्यांची काव्यनिर्मितीच क्षुद्र असते म्हणून ! इ०.

अशा अनेक प्रकारच्या आक्षेपांत व टीकाच्या भडिमारांत ह्या कालांतील कविता सांपडल्यामुळें तिचें धड नवें, ना जुनें; धड ना सुष्ट, ना क्लिष्ट; ना ललित, ना साधें; असें स्वरूप आढळतें. या दिव्यांतून आधुनिक कविता आतां शीरसलामत बाहेर पडली आहे.

## [ ५ ] ( सन १९०० ते १९२५ )

## केळकर - कोल्हटकर युग

सन १९०० नंतर विचार-प्रधान व कथा-प्रधान असे दोन ठळक वाङ्मय-प्रवाह विसाव्या शतकाच्या दोन पादांत दिसून येतात. चिंतामणराव वैद्य, पांगारकर, केळकर, वामनराव जोशी, श्री० कृ० कोल्हटकर, खाडिलकर, अ० ब० कोल्हटकर, यांचें वाङ्मय विसाव्या शतकाच्या प्रथम पादांतील होय.

**भारताचार्य चिंतामण विनायक वैद्य** ( १८६१-१९३८ ). यांची विद्यमान परंतु जुन्या पिढीच्या लेखकांत मोठी योग्यता आहे. त्यांची बरोबरी करणारा लेखक आज दुसरा नाहीं. महाभारताचें सूक्ष्म अवलोकन, त्यांतील उल्लेखांवरून प्राचीन संस्कृतीच्या काळासंबंधानें निघणारीं अनुमानें, पूर्वेतिहासाविषयीं संशोधन, व्युत्पत्तिशास्त्रासंबंधानें विचारशुद्ध तर्कपद्धति, हीं यांच्या अनेक इंग्रजी व मराठी ग्रंथांतील लेखनांत आढळून येतात.

माझा प्रवास, दुर्दैवी रंगू, श्रीरामचरित्र, श्रीकृष्णचरित्र, महाभारताचा उपसंहार, मध्ययुगीन भारत, इ० त्यांचीं पुस्तकें होत.

**नरसिंह चिंतामण केळकर** ( ज० १८७२ ). यांची अष्टपैलू लेखक म्हणून प्रसिद्धि आहे. निबंध, नाटक, इतिहास, लघुकथा, कादंबरी, चरित्र, साहित्य व विनोद, असे त्यांच्या वाङ्मयविषयक कामगिरीचे आठ पैलू असून, ते नेहमीं झगझगीत असेच असतात. केसरींतील निवडक निबंध; लोकमान्य टिळकांचें चरित्र; मराठे व इंग्रज; तोतयाचें बंड, अमात्यमाधव, चंद्रगुप्त, कृष्णार्जुन युद्ध, इ० नाटकें; कथासप्तकांतील कांहीं गोष्टी; नवलपूरचा संस्थानिक व बलिदान ह्या कादंबऱ्या; सुभाषित व विनोद; 'काव्योपहार' नांवाचा लहानसा कवितासंग्रह; आणि असंख्य विषयांवरील स्फुट लेख; हा त्यांचा लेखनसंभार आहे. यांचें लेखन, विचार, अभ्यास व भाषेची ठाकठिकी, यांनीं परिपूर्ण असल्यामुळें विद्यमान लेखकांत ते अग्रणी आहेत.

**लक्ष्मण रामचंद्र पांगारकर** ( ज० १८७२ ). यांचें जुन्या संत-कवींच्या काव्यांसंबंधाचें पाठान्तर, वाचन, मनन, तद्रूपता व लेखन, हीं दांडगीं असल्यामुळें, रसाळ संत-चरित्र-वाङ्मयांत व प्रवचनांत त्यांचा हात धरणारा सध्यां महाराष्ट्रांत क्वचितच आढळेल. त्यांचें मोरोपंतांचें चरित्र, मराठी वाङ्मयाचा इतिहास, निबंधमाला व तिचें स्वरूप, निरंजनमाधवाची कविता, भक्तिमार्गप्रदीप, व ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, मुक्तेश्वर, यांचीं चरित्रें, 'आनंदलहरी' कवितासंग्रह, इ० ग्रंथ असून, ते बहुतेक सर्व भाषेच्या दृष्टीनें उत्कृष्ट आहेत. यांनीं 'चरित्र-चंद्र' या नांवानें आपलें आत्मवृत्तही रसाळ भाषेंत प्रसिद्ध केलें आहे.

**प्रो० वामन मल्हार जोशी** ( ज० १८८२ ). यांचा तत्त्वज्ञान हा आवडीचा विषय असल्यानें यांच्या कोणत्याही लेखनांत त्याचा विशेष प्रभाव दिसून आल्यावांचून राहत नाहीं. त्यांचें बहुतेक लेखन स्वतंत्र असल्यानें मोलाचें आहे. रागिणी, आश्रमहरिणी, सुशीलेचा देव, इंदु काळे आणि सरला भोळे, ह्या एकापेक्षां एक सरस व अभिनव-विचारप्रवर्तक कादंबऱ्या; विचारविलास, नवपुष्पकरंडक, इ० विविध विषयांवरील लेखसंग्रह; नीतिशास्त्रप्रवेश, आणि साक्रेटिसाचे संवाद हें भाषान्तरात्मक पुस्तक; तसेंच विस्तवाशीं खेळ हें त्यांचें नवीन नाटक; इ० त्यांचे ग्रंथ होत.

**श्रीपाद कृष्ण कोल्हटकर** ( १८७१–१९३४ ). यांना मराठींतील विनोदी वाङ्मयाचे जनक समजतात. सुदाम्याचे पोहे किंवा साहित्यबत्तिशी हा

त्यांचा त्यासंबंधांचा ग्रंथ आहे. वीरतनय, मूकनायक, गुप्तमंजूष, मतिविकार, प्रेमशोधन, वधूपरीक्षा, इ० सुमारें बारा संगीत व गद्य नाटकें त्यांनीं लिहिलीं. श्यामसुंदर व दुटप्पी कीं दुहेरी या त्यांच्या कादंबऱ्या, 'गीतोपायन' नांवाचें त्यांच्या पद्यसंग्रहाचें पुस्तक असून, भारतीय ज्योतिर्गणित हें एक उत्कृष्ट शास्त्रीय पुस्तक त्यांनीं लिहिलें आहे, नाटकें, कादंबऱ्या, इ०वर विचारप्रवर्तक, खुसखुशीत व शास्त्रशुद्ध टीकात्मक लेख, असा त्यांचा बराच वाङ्मयसंभार आहे.

**अच्युत बळवंत कोल्हटकर** ( १८७९–१९३१ ). कट्टे टिळकानुयायी. हाडाचे देशभक्त. श्रुतिबोध, उषा, इ० मासिकें काढिलीं. 'संदेश' नांवाचें चुरचुरीत, खुसखुशीत, दैनिक वर्तमानपत्र काढून वृत्तपत्री व्यवसायांत त्यांनीं अपूर्व कांति घडवून आणिली. समाजाच्या अगदीं खालच्या थरापर्यंत त्यांनीं आपलें पत्र वाचावयास लाविलें. प्रत्यक्ष टिळकांशींच दोन हात करण्याच्या भरांत त्यांनीं आपली लेखणी बेगुमान रीतीनें चालविल्यामुळें, लोकांची त्यांनीं अप्रियता संपादिली. संदेशनंतर संजय, चाबूकस्वार, इ० अनेक पत्रांत त्यांनीं लिहिलें; पण जम न बसतां यांचा शेवट अखेर दारिद्र्यांतच झाला! 'वत्सला वहिनी' चीं पत्रें; व नारिंगी निशाण, विवेकानंद, ताई तेलीण, बहुया बोळ, असलीं नाटकें; इ० त्यांचें लिखाण आहे.

**कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर** (ज० १८७२ ). टिळकानंतर केसरीचे संपादक. यांच्या इतका राजकीय क्षेत्रांत प्रभावी लेखक दुसरा झाला नाहीं. उत्कृष्ट नाटककार. कीचकवध, भाऊबंदकी, बायकांचें बंड, सवाई माधवरावाचा मृत्यु, इ० आठ गद्य नाटकें; आणि स्वयंवर, मानापमान, इ० सात संगीत नाटकें; त्यांनीं लिहिलीं. हीं सर्व फारच यशस्वी झालीं. हल्लीं ते मुंबईस 'नवाकाळ' दैनिक चालवीत आहेत. त्यांचीं अलीकडील नाटकें व लिखाण पहिल्याइतकें प्रभावी नाहीं. 'नाट्यसुंदरि कावि कृष्णा माळा घाली,' असे जरी ते स्वतःस म्हणवून घेतात, तरी त्यांची नाटकांतील कविता क्लिष्ट व नीरस अशीच आहे.

**वाङ्मयविशेष**—( १ ) ह्या कालांत भाषान्तरित वाङ्मयापेक्षां स्वतंत्र वाङ्मय अधिक निपजलें. त्यांतही ( २ ) ललितवाङ्मयाला ज्यास्त भर आला. ( ३ ) यापूर्वींच्या पिढींत सामान्यतः राजकीय लिखाण–टिळक, सामाजिक लिखाण–आगरकर, करमणुकी लिखाण–हरीभाऊ आपटे, असे त्या त्या वाङ्मय

क्षेत्रांत जे एकांडे शिलेदार होते, त्यांऐवजीं एकेका वाङ्मय-प्रकारांत अनेक साहित्यिक चमकूं लागले; आणि (४) एकेक साहित्यिक विविधांगी साहित्य निर्माण करूं लागला. (५) भाषान्तरित ग्रंथांतील नीरस भाषा मागें पडून प्रत्येक ग्रंथाची भाषादृष्ट्या सजावट अधिक चांगली होऊं लागली. (६) विचारप्रवाह भिन्न भिन्न प्रकारचे उत्पन्न होऊन ते ठाकठिकीनें जनतेपुढें मांडण्यांत कौशल्य दिसून येऊं लागलें. (७) लघुनिबंध, 'लघुकथा' नाट्यछटा, इ० नवे प्रकार वाङ्मयांत आले.

उतारे

## नरसिंह चिंतामण केळकर

### जुने पंडित—

" जुने पंडित हे खरोखरच चालते बोलते ग्रंथ असत. त्यांचे विषयनिष्णातत्व व पाठान्तर हीं पाहून अलीकडच्या काळांतील मनुष्य थक्कच होऊन जावयाचा !...या एकदेशीय पंडितांच्या पदरीं शहाणपण पुष्कळ असे खरें, पण ते सगळे मोहरा-पुतळ्या किंवा बंदे रुपये यांच्या रूपानें; त्यांच्याजवळ परचुरण नाहीं आणि दुकान-दारास तर त्यांची मोहोर घेऊन खपावयाची नाहीं; व पचायचीही नाही. यामुळें पदरीं द्रव्य व व्यवहाराच्या बाजारांत पदार्थ मांडलेले असतां भाजीही घेतल्या-शिवाय हात हालवीत परत यावें लागणार ! बरें, भाजी मिळालीच तर अंगापासून केव्हांही दूर न होणाऱ्या जरीकाठी शालजोडीच्या पदरांत बांधून शास्त्रीबोवा ती घरीं आणणार !"

## प्रो० वामन मल्हार जोशी

### देशाभिमानाचा मक्ता एकाच पक्षास नाहीं—

" सामाजिक सुधारकानें राजकीय सुधारकास पाण्यांत कां पहावें ते समजत नाहीं. ...आपलें हें आर्यावर्तरूपी राष्ट्रशरीर केवढें आबाढव्य, आणि त्याला किती तरी रोग आहेत ! आर्यावर्ताला त्रिदोष नव्हे तर शतदोष झाला आहे. व्यापार नाहीं, पैसे नाहींत, खाण्यापिण्यास पुरेसें नाहीं, देशान्तरीं जाण्याची उमेद नाहीं व त्याला अवसर नाहीं, देशांतल्या देशांत मान नाहीं, मानहानि पुष्कळ वर्षें होत गेल्यामुळें तेजही कमी झालेलें, नीतिधैर्य बेताचेंच, धर्माचा उत्साह तात्पुरताच, विद्येची आवड परंपरागत, पण तीही अवसर नसल्यामुळें मंदावलेली,... सर्व गोष्टींत परावलंबित्व, उष्टें खाण्याशिवाय गत्यन्तर नाहीं, स्त्रिया अशिक्षित आणि कोत्या दृष्टीच्या—म्हणजे अर्धांग विगलित झालेलें,—शूद्रादि वर्गांना पायाचा दाखला दिला

तर हे पाय कमजोर झालेले आणि पोटाशी व डोक्याशी भांडण्यास तयार झालेले, बाहु लुले, डोकें गांगरून गेलेलें! बरे, परिस्थिति अशी की स्वतःला जें औषध घ्यावेंसें वाटतें तें पराधीनतेमुळें घेण्याची सोय नाहीं. ...अशा परावलंबी शरीराला कोणतें औषध किती प्रमाणांत द्यावयाचें तें मलाच तेवढें समजतें, दुसऱ्या कोणाला समजत नाहीं, हें म्हणणें किती धाडसाचे आहे?" (विचारविलास).

## श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

### माझें गाण्याचें शिक्षण!—

"बाबांनीं मला शिकविण्याकरितां एका वस्तादजीस ठेविले. त्याचें नांव टरें-हुसेनखां होतें. टरेंहुसेनखांच्या आवाजांत इतकें मार्दव असे की, त्याचें गाणें चाललें असतांना पुष्कळदां कुंभाराचीं गाढवें भोंवतालीं जमून ते एकचित्तानें ऐकत असत व कधीं कधीं त्याच्या सुरास सूरही देत असत. ... त्याच्या आवाजांत कांहीं लवचिक-पणा होता म्हणावे तर तेंही नाहीं. मानेला सपाटून हिसका द्यावा तेव्हां कोठें लहानसा खटका येत असे. सर्व अंग जेव्हां घुसळावें तेव्हां एकादी तान यावी. ... पुष्कळदां तर ते तान हातांनीच दाखवीत असत. ... गाण्यांतलि मूर्छना म्हणून जो प्रकार आहे तो मला चांगला साधावा म्हणून ते मला खरोखरीची मूर्छना येईपर्यंत यथेच्छ मार देऊन रडवीत असत, खटका यावा म्हणून माझी शेंडी धरून जोरानें हिसका देत व तान चांगली यावी म्हणून हिंवाळ्यांत सकाळीं पाठीवर थंड पाण्याच्या घागरी ओतीत असत. अशा उपायांनी मला शेवटीं हिंवतापाचें दुखणें लागलें. हिंवाची पाळी बहुतकरून टरेंहुसेनखां माझ्या समाचारास येत त्या वेळची असे. ... अखेरीस माझा आजार व वस्तादजींचे आगमन यांमधील कार्यकारणभाव ताडून बाबांनीं त्यांचें येणें बंद केलें; व तेव्हांपासून माझ्या प्रकृतीस उतार पडत चालला. पुढे कांहीं दिवस तंबुऱ्याची आठवण होईल म्हणून भोपळ्याची भाजीही मी बरेंच दिवस वर्ज्य केली होती."

वरीलपैकीं **केळकर** यांच्या उताऱ्यांत अनेक गुण दिसून येतील. त्यांच्या एकंदर लिखाणांत अष्टपैलूपणा, विषयाचें सांगोपांग ज्ञान, तपशीलवार वर्णनाची हातोटी, प्रमाणशीर व आकर्षक विनोद, प्रसंगानुरूप प्रौढ किंवा सोपी भाषा, अलंकारप्रचुरता, विविधता, चातुर्य, कोटिबाजपणा, इ० गोष्टी यथास्थितपणें आढळून येतील.

**प्रो० वा० म० जोशी** यांच्या भाषेंतही संस्कृतप्रचुर शब्दयोजना, मुद्दाम केलेल्या कोट्या, तर्कावर आधारलेलें पांडित्य, योग्य स्थलीं साभिप्राय विशेषणें, भाषेचा कांटेतोलपणा, इ० गोष्टी आढळतील. इंदु काळे आणि सरला भोळे

यांतील 'अमावास्येच्या कडेवर चंद्र' या प्रकारचे मथळे त्यांच्या अलंकार-पटुत्वाची व भाषेच्या कसरतीची साक्ष देतील.

**कोल्हटकरांच्या** लेखनांतील विशेष म्हणजे त्यांना साधणारा विनोद होय. वरील लहानशा उताऱ्यांतही टर्रेहुसेनखां या नामाभिधानानें केलेली मौज; त्यांचे गाण्यास गाढवें सूर देत या उपरोधानें केलेली मजा; मानेचा हिसका म्हणजे गाण्याचा खटका; अंग घुसळणें म्हणजे तान या विरोधक सादृश्यानें उत्पन्न होणारा उपहास; **मूर्छना** येण्यासाठीं मूर्छना येईपर्यंत मार व **खटका** येण्यासाठीं शेंडीला हिसके म्ह० खटके, आणि **हिंवाळ्यांत** डोक्यावर घागरी ओतल्यानें येणारा **हींवताप**, ही शब्द-श्लेषसाधनाची कसरत; वस्तादजींचें व हींवतापाचें एकसमयावच्छेदेंकरून आगमन यांचा विसंगतियुक्त कार्यकारण-संबंध; गाण्याची व तंबुऱ्याची आठवण होईल म्हणून भोपळ्याची भाजी खाण्याचें वर्ज्य करणें हा अतिशयोक्तियुक्त दूरान्वय; इ० विनोद-साधनाचे प्रकार वर वर पाहतांही दिसून येतील. हा विनोद त्यांना सूक्ष्म निरीक्षण, कुशाग्रबुद्धि, तीक्ष्ण शब्दज्ञान आणि चतुरस्रता यामुळें साधतो; त्यांत विनोदाबरोबर त्यांच्या विद्वत्तेचीही जाणीव झाल्यावांचून राहत नाहीं.

## आधुनिक कविता ( उत्कर्षकाल )

'केशवसुतां'नीं आधुनिक कवितेच्या विजयाचें रणशिंग फुंकलें, त्यानें तिची द्वाही दशदिशां दुमदुमूं लागली. त्यांच्या हयातींत जरी त्यांना फारसे अनुयायी मिळाले नाहींत, तरी पुढील काळांत त्यांनीं म्हटल्याप्रमाणें अक्षरशः घडलें यांत शंका नाहीं; आणि आधुनिक कवितेला पूर्वी जरी नाकें मुरडण्यांत आली असलीं, तरी आतां तिनें आपलें प्रभावी सौंदर्य पटवून दिलें आहे खाचित.

'आम्ही कोण म्हणून काय पुससी?–आम्ही असों लाडके–देवाचे'... 'आम्हांला बगळा विकेल कवडीमोलावरी हें जिणें' असा केशवसुतांचा आत्मविश्वास होता. तरी गोविंदाग्रजांनीं 'कवींच्या कारखान्यां'त, केशवकुमारांनीं 'झेंडूच्या फुलां'त, बोबडे यांनीं 'अरे! आला कवी आतां! धावा धावा पळा लपा!' अशा प्रकारें बहुतेक कवींनीं स्वतः उत्कृष्ट कवि असतांही 'कवि व कविता' यांची टर उडविलेली आढळून येते. अर्थात् हें सारें विडंबन विटा-

ह्याची कविता रचणाऱ्या ' सामान्य कवीं 'स अनुलक्षून आहे हें उघडच आहे.

टिळक, केशवसुत, विनायक, गोविंदाग्रज व बालकवि ह्यांना ' आधुनिक कविपंचक ' असें म्हणतात. त्यांच्या संबंधानें मागें उल्लेख आलाच आहे.

कोल्हापूरचे कै० रेंदाळकर, नुकतेच कैलासवासी झालेले बडोद्याचे चंद्रशेखर, तसेंच श्री० कृ० कोल्हटकर, देवल, अनंततनय, नाशिकचे कै० ' गोविंद ' दरेकर, आणि बॅ० विनायकराव सावरकर, इ० विसाव्या शतकाच्या प्रथम पादांतील प्रसिद्ध कवि होत.

**एकनाथ पांडुरंग रेंदाळकर** ( १८८७–१९२० ). कोल्हापूरचे-कोमलांतःकरणाचे कवि म्हणून यांची प्रसिद्धि आहे. अन्योक्तिमुक्तांजलि, मंदार-मंजरी, इ० त्यांचीं काव्याचीं पुस्तकें आहेत. ' रेंदाळकरांची कविता ' या नांवानें त्यांच्या कवितेचे दोन भाग त्यांच्या मागून प्रसिद्ध झाले आहेत. निर्यमक कवितेचा मराठींत पुरस्कार यांनीं प्रथम केला; त्याबद्दल त्यांच्यावर आरंभीं बरीच कडक टीका झाली; पण आता निर्यमक कविताही मराठीच्या अंगवळणीं पडली आहे. त्यांनीं स्वत· निर्यमक कविता फारशी लिहिली नाहीं.

**' चंद्रशेखर ' शिवराम गोऱ्हे** ( १८७१–१९३७ ). बडोद्याचे. ' चंद्रिका ' हा त्यांचा काव्यसंग्रह प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें ' किस्मत-पूरचा जमीनदार ' व ' गोदागौरव ' हीं खंडकाव्यें त्यांनीं लिहिलीं आहेत. त्यांच्या काव्यांत नादमाधुर्य, कल्पनाविलास, रेखींवपणा व अलंकारप्राचुर्य हे गुण प्रामुख्यानें आढळतात. त्यांची कविता प्रसन्नकर असते. ह्यांना श्रीमंत सयाजीराव महाराज यांजकडून ' राजकवि ' ही पदवी मिळाली; पण ती ' फार उशीरा ' असें त्यांस वाटलें तें साहजिक होतें.

**' अनंततनय ' दत्तात्रय अनंत आपटे** ( १८७५–१९२९ ). ' हृदय-तरंग ' नांवाचें यांच्या कवितांचें एक पुस्तक आहे. यांनीं ' तिलक–पुराण ' ओवीबद्ध रचिलें आहे; आणि विनायकाची कविता ' हें पुस्तक प्रकाशित केलें आहे. यांची बरीच कविता देशाभिमानप्रेरक आहे.

**बॅ० विनायक दामोदर सावरकर** ( ज० १८८४ ). यांचा सिंहगडचा पोवाडा, बाजी प्रभु यांचा पोवाडा, सप्तर्षि, गोमांतक, विरहोच्छ्वास, कमला, इ० कविता; संन्यस्त खड्ग, उःशाप, इ० नाटक; मला काय त्याचें,

ही कादंबरी; ' हिंदुपदपादशाही, ' हिंदुत्व, इ० वाङ्मय प्रसिद्ध आहे. मॉझिनचें चारित्र, ' माझा बंदिवास, ' इ० त्यांचीं पुस्तकें हृदय पिळवटून व ओजस्वी भाषेंत लिहिलेलीं आहेत; ह्यामुळें ह्यांचें वाङ्मय परिणामकारी आहे. 'किर्लोस्कर' मासिकांतील यांचे हिंदु धर्मविषयक खुल्या कल्पनांसंबंधीं अलीकडील लेख व अस्पृश्यांसबंधाची कामागिरी खळबळ उडविणारी झाली. त्यांची भाषाशुद्धि व लिपिशुद्धि यांसंबंधाची हल्लींची चळवळ विचारणीय आहे. त्यांच्या अतुलनीय देशभक्तीबद्दल महाराष्ट्रांतील अनेक संस्थांनीं त्यांचा कांहीं दिवसांपूर्वी अभूतपूर्व गौरव केला.

**'गोविंद' त्र्यंबक दरेकर** (१८७३–१९२६). हेही नाशीकचे राष्ट्रीय कवि होत. जातीनें मराठे. हाता-पायांनीं अधु होते. यांची कविता शब्दाशब्दागणिक स्वातंत्र्यप्रेरक अशी आहे. यांची ' मुरली ' ही कविता व काव्यसंग्रह प्रसिद्ध झालेला आहे. यांचें शिक्षण यथातथाच, पण प्रतिभा जाज्वल्य. लहानपणीं नाच–तमाशांत उत्कृष्ट लावण्या करून देत; पण पुढें सुसंगतीनें मनही सुसंस्कृत झालें; आणि त्यांच्या ओजस्वी कवितेनें महाराष्ट्र मंत्रमुग्ध केला. त्यांची कविता विजेप्रमाणें चमकत जाणारी व केव्हां तर हृदयस्पर्शी आहे; त्याला दुसरी तोड नाहीं. स्वतंत्रतेची भूपाळी, टिळकांची भूपाळी, सुंदर मी होणार हो मरणानें जगणार, इ० त्यांच्या कविता प्रसिद्ध आहेत.

## उतारे

### श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

महाराष्ट्रगीत—

**बहु असोत सुंदर संपन्नही महा**
**प्रिय अमुचा एक महाराष्ट्र–देश हा ॥ ध्रु० ॥**
**विक्रम–वैराग्य एकजागीं नांदती**
**जरिपटका भगवा झेंडाहि डोलती**
**धर्म राजकारण समवेत चालती**
**शक्ति युक्ति एकवटुनि कार्य साधिती**
**पसरे यत्कीर्ति अशी विस्मयावहा ॥ प्रिय० ॥ १ ॥**

## बालकवि

### आनंदी आनंद—

आनंदी आनंद गडे       इकडे तिकडे चोंहिकडे
वरतीं खालीं मोद भरे     वायूसंगें मोद फिरे
नभांत भरला
दिशांत फिरला
जगांत उरला
मोद विरहतो चोंहिकडे — आनंदी आनंद गडे १.
सूर्यकिरण सोनेरी हे      कौमुदि ही हंसते आहे
खुलली संध्या प्रेमानें     आनंदें गाते गाणें
मेघ रंगले,
चित्त दंगलें
गान स्फुरलें
इकडे तिकडे चोंहिकडे— आनंदी आनंद गडे २.

## चंद्रशेखर

### गोदा–गौरव

तुज हृदयंगम–रवें विहंगम–भाट सकाळीं आळविती
तरु–तीरींचे तुजवरि वल्लीं पल्लव–चामर चाळविती
तुझ्या प्रवाहीं कुंकुम वाही बालरवी जणुं अरुण करीं
जय संजीवनि, जननि, पयोदे श्रीगोदे, भवताप हरीं १.
अवयव थिजले, शरीर भिजलें, उठले रोम तृणांकुरसे
सद्गद कंठीं बुद्बुद करितें वचन घटोन्मुख नीर जसें
अधर थरारे अश्रु–मलिन–मुख हो मतिसंकर मदन्तरीं
जय संजीवनि, जननि, पयोदे श्रीगोदे, भवताप हरीं २.

## एकनाथ पांडुरंग रेंदाळकर

### पतंग—

ऐसें बोलुनियां पतंग चढला व्योमीं तदा तो जवें
डौलानें हंसुं लागला, न मजला तद्रूपही मोजवे;
झाला स्वार समीरणावरि, हलू स्पर्शी वनांचीं शिरें!
वाटे जीवित धन्य धन्य बहु त्या उन्माद अंगीं शिरे! २

माझें भाग्य किती विशाल! अवनी सोडून आलों इथें
आतां स्वर्ग असेल दूर कितिसा ? जाईन वेगें तिथें;
धिग् धिग् ! दुर्भग मेदिनी ! सुख न हें तूंतें कदाही मिळे
आहे काय तुझ्या समीप ? तिकडे हें चित्त जेणें वळे ३.
होता थोर मदीय हस्ति, हिसडा देतां तया सत्वरीं
झाला भ्रान्त पतंग भीतिवश तो होता जरी अंबरीं;
गेला डौल तुझा कुठें वद अतां ? कां हा असा नाचशी ?
स्वर्गी जा सुख भोग सोड अवनी; मारीं भरारी कशी ! ७.

## गोविंदाग्रज

### निद्रित राजहंस !—

हें कोण बोललें बोला ? । 'राजहंस माझा निजला!' ॥ ध्रु० ॥
दुर्दैव-नगाच्या शिखरीं । नव-विधवा दुःखी आई
तें हृदय कसें आईचें । मी उगाच सांगत नाहीं !
जें आनंदेंही रडतें । दुःखांत कसें तें होई—
हें कुणीं कुणा सांगावें ?
आईच्या बाळा ठावें !
प्रेमाच्या गांवा जावें—
मग ऐकावें या बोला— । 'राजहंस माझा निजला !' १.

## 'गोविंद'

### सुंदर मी होणार—

सुंदर मी होणार, । आतां सुंदर मी होणार
सुंदर मी होणार, । हो मरणाने जगणार ॥ ध्रु० ॥
जुनीं इंद्रियें जुना पिसारा, । सर्व सर्व झडणार
नव्या तनूचे नव्या शक्तिचे, । पंख मला फुटणार ५.
त्या पंखांनीं कर्तृत्वाच्या । व्योमीं मी घुसणार
देशहिताच्या पयःसागरीं, । पोहाया सजणार ६.
नवें ओज मज, नवें तेज मज, । सर्व नवें मिळणार
जीर्ण जुन्यास्तव कोण अवास्तव, । सुज्ञ झुरत बसणार ?
गहनोगहनीं भुवनोभुवनीं, । शोधित मी फिरणार
भूमातेला हुडकुन काढुन, । तद्दर्शन घेणार १०.
आनंदी आनंद जाहला, । मरतां मी हंसणार
हांसत मरणें 'गोविंदा'चा । प्रेमपंथ ठरणार ११

## बॅ० विनायक दामोदर सावरकर

माझें मृत्युपत्र ! —

स्वैंपाक त्वां निजकरें कुशलें करावा । प्रेमें तुझ्या अधिकची सु-रसाल व्हावा
संवाद सर्व मिळुनी करितां नितांत । जेवावयास बसलों जइं चांदण्यांत १.
श्रीरामचंद्र-वनवास-कथा-रसाला । कीं कॆंवि देश इटलीहि सु-मुक्त झाला,
तानाजिचा समरधीर तसा पवाडा । गावा चितोडगड वा शनिवारवाडा २.
झाली कशी प्रियकरा अपुली अनाथा । दुर्दास्य-खिन्न शर-छिन्न विपन्न माता !
शोकें विवंचुनि तिच्या जयिं मोचनाचे । केले अनंत उपदेश तुम्हांस साचे ३.
कीं घेतलें व्रत न हें अम्हि अंधतेनें । लब्ध-प्रकाश इतिहास-निसर्ग यानें
जें दिव्य दाहक म्हणूनि असावयाचें । 'बुध्याचि वाण धरिलें करिं हें सतीचें'४

## अनंततनय

आटप तव हें गान, । पांखरा, आटप तव हें गान ॥ ध्रु० ॥
दिसे न कोणा आज तयाची, । येथें मुलीं तहान १.
श्रमसी कां मग करुनी तगमग, । कोणि न दे अवधान २.
अवघड पैंजण पदीं विलसती, । काय न त्यांचें भान ? ५.
धर्म कशाचा ? घटन कशाचें ? । बुभुक्षितांची खाण ९.
नसे अपेक्षा, न वा तितिक्षा, । नाहीं मान-अमान १०.
नको षड्ज तव, नको खर्ज वा, । कर्णविदारक तान १२.
खडबड धडपड जरि तुज करणें, । जागिव जा तें रान ॥ पांखरा० ॥ १४.

## [ ६ ] ( १९२५ ते चालू. )

## फडके—खांडेकर युग

या कालांत फडके, खांडेकर, अत्रे, वरेरकर; बेहरे, माडखोलकर, बनहट्टी; दाजी नागेश आपटे, वा० वि० जोशी, चिं० वि० जोशी, वि० पां० दांडेकर; ग० वा० कवीश्वर, द० व्यं० पै, इ० लेखक आपल्या विविधांगी कौशल्ययुक्त लेखनानें चमकून राहिले आहेत.

या काळात लघुकथेचें पीक प्रामुख्यानें पिकत आहे. तथापि अनेकांनीं लेखनाचें वारें महाराष्ट्रांतून सुटून चौफेर बृहन्महाराष्ट्रांत इकडे तिकडे स्वैरपणें वाहूं लागलें आहे, असें दिसतें. त्यांपैकीं कांहींचा निर्देश येथें केला आहे.

**ना० सी० फडके** ( ज० १८९४ ). हे कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजांत प्रोफेसर आहेत. साहित्य-संगीत-कलाप्रेमी अशी त्यांची वृत्ति आहे. ' कले-

करितां कला ' याचे ते पुरस्कर्ते आहेत. ' प्रतिभासाधन ' हे त्यांचें पुस्तक लेखन-तंत्राच्या अभ्यासकांस उपयुक्त आहे. ' गुजगोष्टी ' ह्या त्यांच्या कृताने लघुनिबंध-संग्रहाची मराठींत नवीन प्रथा पाडली आहे. अल्ला हो अकबर, दौलत, जादूगार, कलंकशोभा, इ० त्यांच्या बऱ्याच कादंबऱ्या भाषेच्या दृष्टीने कलापूर्ण वाटल्या, तरी त्यांतील कांहींमधील कांहीं ठिकाणचीं वर्णनें व पात्रें तींच तींच, व अनौचित्यदर्शक अशीं वाटतात. ' आजचे तरुण स्त्री-पुरुष व त्यांचीं कर्तव्यें, संततिनियमन; डी० व्हॅलेरा, दादाभाई नौरोजी, इ० चरित्रें; असे त्यांचे आणखी अनेक ग्रंथ आहेत. हल्लींच्या तरुणांचे ते आवडते कादंबरीकार आहेत.

**भार्गवराम विठ्ठल वरेरकर** ( ज० १८८३ ). यांच्या इतका जबरा लेखक विद्यमान वाङ्मय-सेवकांत कमीच आढळेल. त्यांची विशेष प्रसिद्धि नाटकें, कादंबऱ्या, यांमुळें झाली. हे मुंबईस आपला लेखन-व्यवसाय चालवितात. त्यांच्या पुस्तकांचा परामर्श घेण्यांत मुंबई युनिव्हर्सिटीनें व योग्य परीक्षण करण्यांत पुण्याच्या प्रमुख पत्रकर्त्यांनीं कुचराई केली असें त्यांस वाटतें; पण ते एक उच्च दर्जाचे व मतप्रचारक लेखक आहेत असेंच सर्व लोक मानितात. कुंजविहारी, हाच मुलाचा बाप, सत्तेचे गुलाम, सोन्याचा कळस, इ० नाटकें आणि विधवा-कुमारी, गोदू गोखले, वेणू वेलणकर, इ० कादंबऱ्या हें त्यांचें वाङ्मयकार्य होय. सामाजिक सुधारणांचा व स्त्री-स्वातंत्र्याचा जोरदार पुरस्कार करणारे ते आहेत. त्यांचें बरेंच लिखाण एकांगी पण आवेशपूर्ण असतें.

**विष्णु सखाराम खांडेकर** ( ज० १८९८ ). रत्नागिरी जिल्ह्यांतील शिरोडें येथील हायस्कूलचे मुख्याध्यापक, चालू पिढींतील प्रथितयश साहित्यिक. उल्का, दोन ध्रुव, हृदयाची हांक, कांचनमृग, इ० कादंबऱ्या; नवमल्लिका, जीवनकला, ऊन-पाऊस, दंव-बिंदु, इ० लघुकथासंग्रह; आगरकर चरित्र, गडकरी चरित्र व वाङ्मय, इ० प्रसिद्ध व किती तरी संकल्पित असें यांचें लिखाण आहे. लघुकथेचीं अनेक अंगें, वास्तववादी लिखाणाकडे कल आणि उपमांचा वर्षाव, हे त्यांच्या लेखनाचे विशेष आहेत. त्यांनीं कांहीं कविताही केल्या आहेत.

**प्रो० नारायण केशव बेहरे** ( ज० १८९० ). हे नागपूर येथें असून यांचें विविधांगी लेखन आहे. ते एक चांगले कविही आहेत. राष्ट्रीय कविता, मुलांचीं गाणीं, सृष्टीचे बोल, कवीचें तत्त्वज्ञान, संसारी गीतें, हे त्यांचे पांच

खंड ' मोत्यांची माळ ' या नांवानें प्रसिद्ध आहेत. १८५७, पहिले बाजीराव पेशवे, हीं ऐतिहासिक पुस्तकें व आजपासून पन्नास वर्षांनीं सीता–वनवास, अहल्योद्धार, ध्येयाकडे, इ० कादंबऱ्या त्यांनीं लिहिल्या आहेत. त्यांच्या लेखनाची ठसकेबाज व भरींव शैली आणि ओळीओळींतून प्रकट होणारा राष्ट्रिय बाणा, ह्या गोष्टी वाखाणण्यालायक आहेत.

**ग० त्र्यं० माडखोलकर** ( ज० १९०० ). हे नागपूरच्या ' महाराष्ट्र ' वर्तमानपत्राचे उपसंपादक आहेत. उत्कृष्ट व मार्मिक टीकाकार या नात्यानें यांचा महाराष्ट्रांत सर्वत्र लौकिक आहे. ' द्विविधदर्शन, ' मुक्तात्मा व भंगलेलें देऊळ ह्या कादंबऱ्या त्यांनीं लिहिल्या आहेत. त्यांची भाषा अलंकारांनीं व तत्त्वसिद्धान्तांनीं खचलेली असते. यांनीं कविताही केल्या आहेत. आधुनिक कविपंचक, विलापिका, इ० त्यांचें टीकात्मक वाङ्मय आहे.

**प्रो० श्रीनिवास नारायण बनहट्टी** ( ज० १९०१ ). भवानदास स्कॉलर. हल्लीं नागपूरच्या मॉरिस कॉलेजांत अध्यापक. हे व माडखोलकर यांनीं प्रसिद्ध केलेला विष्णुशास्त्री चिपळूणकर–' द्विविधदर्शन ' हा ग्रंथ त्यांच्या टीकापद्धतीची व लेखनशैलीची ओळख करून देण्यास पुरेसा आहे. मयूरकाव्यविवेचन, ज्ञानोपासना आणि भारतीयांचें कर्तव्य, ज्ञानेश्वरदर्शन, हें टीकात्मक वाङ्मय व ' महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास, ' हे त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

**दाजी नागेश आपटे** ( ज० १८८८ ). हे प्राचीन आर्य संस्कृतीचा व अर्वाचीन पाश्चात्य संस्कृतीचा विचार केलेले जाडे पंडित बडोद्यास वकील आहेत. त्यांनीं समाजशास्त्रविषयक ' सुधारणा आणि प्रगति, ' ' हिंदी–सुमेरी संस्कृति ' हा उभय संस्कृतींच्या कालस्थलांचें विवेचन करणारा ग्रंथ, ' नीतिशास्त्रप्रबोध ' हा प्राच्य व पाश्चात्य नीतिशास्त्राचें तुलनात्मक विवेचन करणारा ग्रंथ, मिराबाई व नरसिंह मेहता यांचीं चरित्रें, ' इंद्रधनुष्य ' हा विविध विषयांवरील लेखसंग्रह, श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांचें चरित्र, इ० ग्रंथ लिहिले आहेत. शिवजन्मकाल, संस्कृत वाङ्मयाचा इतिहास, इ० त्यांचे लेख चिकित्सा व व्यासंगपूर्ण असे आहेत. त्यांच्या भाषेंत संस्कृतप्रचुर शब्दयोजना, तर्कावर आधारलेलें पांडित्य व एक प्रकारचा ओघ आढळतो.

**वासुदेव विनायक जोशी** ( ज० १८९४ ). हेही बडोद्यांतील एक सुप्रसिद्ध वकील असून, त्यांचा विविधांगी बराच साहित्यसंभार आहे. त्यांची

मुख्यतः प्रसिद्धि हिंदु स्त्रियांच्या कायदेशीर हक्कांच्या चळवळीसंबंधानें आहे. त्याबद्दल व त्यांच्या साहित्यसेवेबद्दल त्यांस श्री० सयाजीराव महाराज यांजकडून ' राजरत्न' ही पदवी मिळालेली आहे. 'जन्माचा बंदिवास,' 'पराधीन,' 'कठीण कसोटी,' ' ओघळलेलें मोतीं, ' इ० कादंबऱ्या; ' रेशमी चिमटे ' व ' नरम गरम ' हीं दोन विनोदी पुस्तकें; तसेंच मानसशास्त्र, नाटकांतील संगीत, इ० अनेक विषयांवरील यांचे लेख मार्मिक व विद्वत्तापूर्ण असून, त्यांनीं लघुनिबंध व लघुकथा हेही प्रकार हाताळलेले आहेत. कायद्याचें सूक्ष्म ज्ञान व उपरोध हे गुण यांच्या भाषेंत प्रामुख्यानें आढळून येतात.

**चिंतामण विनायक जोशी** ( ज० १८९२ ). हे बडोदा कॉलेजांतील मराठी, पाली व इंग्रजी भाषेचे प्राध्यापक असून, सध्यांच्या पिढींतले श्रीपाद कृष्ण कोल्हटकर होत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. कॅप्टन लिमये यांनीं कथात्मक वाङ्मयांत विनोदाचा पायंडा पाडला असला, तरी श्रीपाद कृष्ण व गडकरी यांच्या मागून विनोदी वाङ्मयांत त्यांना एक स्पृहणीय व स्वतंत्र स्थान आहे, यांत शंका नाहीं त्यांचे लिखाण गंभीर व विनोदी असें दोन्ही प्रकारचें आहे. ' मॅन्युअल ऑफ पाली ' हें व्याकरणाचें पुस्तक, 'जातकांतील निवडक गोष्टी,' ' शाक्यमुनि गौतम ' चरित्र, इ०गंभीर विषयांवरील त्यांचे ग्रंथ होत. त्यांच्या विनोदी लेखनांत एरंडाचें गुऱ्हाळ, चिमणरावांचें चऱ्हाट, व वायफळांचा मळा, हे संग्रह प्रसिद्ध आहेत. ' संशयाचें जाळें ' हा त्यांच्या ललित लेखनाचा नमुना आहे; परंतु ललित लिखाणाचा खुद्द ग्रंथकारांससुद्धां विसर पडत चालल्याची जाणीव त्यांना आहे.

**प्रो० विश्वनाथ पांडुरंग दांडेकर** ( ज० १९०५ ). बडोद्याचेच सुप्रसिद्ध साहित्यिक. बडोदा कॉलेजांत इंग्रजी व मराठी विषयाचे प्राध्यापक. यांनीं ' केळकरांचीं सहा नाटकें ' हा टीकात्मक ग्रंथ, चारित्र्यसुधा व प्रतारणा ह्या कादंबऱ्या, फेरफटका हा लघुनिबंधसंग्रह, कळ्यांची माळ व आजच्या कळ्या हे लघुकथासंग्रह, भारतीय समाजस्थिति, श्री० सयाजीराव व अर्जुन यांचीं चरित्रें, इ० वाङ्मय लिहिलें आहे. यांच्या भाषेत ठाकठिकी, कल्पनाविलास व भाषेचें अगदीं घरगुती वळण ह्या गोष्टी आढळून येतात.

**दत्तात्रय व्यंकटेश पै** ( ज० १८९५ ). हे गोमांतकांतील एक नांवाजलेले साहित्यिक. ' हिंदु ' साप्ताहिकाचे संपादक. गोमांतकीय राज्यव्यवस्था,

पोर्तुगीज भाषाप्रवेश, 'मुसलमानी अमलांतील गोमांतक' व 'निवडक भाषणें', इ० त्यांचे ग्रंथ आहेत. त्यांत त्यांचें भाषाप्रभुत्व, ठसकेबाजपणा, ओज, ओघ व मराठीची शुद्धता राखण्याची शिकस्त, ह्या गोष्टी स्पष्ट दिसून येतात.

उ ता रे

## प्रो० नारायण सीताराम फडके

### आजच्या तरुण स्त्री-पुरुषांचीं कर्तव्यें —

" देशासाठीं घरादारावर तुळशीपत्र ठेवणेंही क्षम्यच नव्हे, तर कर्तव्यच म्हणावें लागत असेल; पण तें असामान्य निकराच्या वेळीं. मायदेशावर शत्रु चालून येऊन समरकुंडच पेटल्यावर बायकोला वैधव्य येईल या भीतीनें घरीं राहणारा माणूस शहाणा ठरणार नाहीं; पण हें नीतिशास्त्र अपवादभूत निकराच्या घटकेपुरतें. नैमित्तिक तेंच नित्याचें मानणें चुकीचें आहे; परंतु ही चूक आमच्या तरुण स्त्री-पुरुषांपैकीं पुष्कळांच्या हातून होत आहे. गांवांत मोफत वाचनालयें स्थापणाराच्या घरांत निरक्षरता माजलेली मी पाहिली आहे; मजुरांचे कष्ट कमी करण्यासाठीं व्याख्यानांची झोड उठविणारांच्या घरांत थकलेली आई आणि कोवळ्या वयाची बायको मजुरासारखी राबून कसाबसा संसार राखण्यासाठीं धापा टाकतात, अशीं उदाहरणें मला माहीत आहेत; ... हे प्रकार अनिष्ट होत. "

## भार्गवराम विठ्ठल वरेरकर

" कां शोभत नाही ? " मी चिडून ओरडलें. ' असें शोभत नाहीं, शोभत नाहीं ' म्हणूनच आम्ही अशा चिरडल्या जात आहोंत. आम्ही दुबळ्या आहोंत असं आम्हांलाच जर वाटूं लागलं–असं आम्हीच जर ओरडून सांगूं लागलों–तर पुरुषांनीं तरी आम्हांला कां तुडवूं नये ? चुकतं आहे तें इथंच ! आम्हांला त्रास होत असला तर त्याला आमच्या आम्हीच जबाबदार आहोंत. आम्ही दुबळ्या आहोंत असं एकदां आम्ही कबूल केलं कीं भेकड पुरुषांस आपण बलवान् आहोंत असें वाटूं लागतं. मग ते आमचा छळ करूं लागतात. बदनामी करूं लागतात. " ( गोदू गोखले, भा० २, पान ३१ ).

## विष्णु सखाराम खांडेकर

" मराठी वाङ्मयाची गंगा प्राकृताच्या पर्वतांतून निघाली असली, तरी तिला तीर्थाचें माहात्म्य ज्ञानेश्वरांनीच आणिलें. या अलौकिक प्रतिभावंताच्या प्रभावानें मराठी भाषा इतकें गोड बोलूं लागली कीं, अमृत इहलोकीं असतें तर तें लाजून पुनः समुद्रांत जाऊन लपलें असतें. पण ज्ञानेश्वरांच्या उदयाच्या वेळची महाराष्ट्रीय समाजाची परिस्थितिच अशी विचित्र होती कीं, तिच्यांत काव्याची–व तीही पुनः

निवृत्तिपर काव्याची—वेलच फक्त फुलावी. वाङ्मयांतील सर्व वृक्ष-वेलांना मानवेल अशी हवाच नव्हती ती! यामुळें संस्कृत वाङ्मयांत सुंदर फुलांनीं नटलेली नाट्य-कल्पलता मराठी उद्यानांत आरंभीं अदृश्यच झाली." (मराठी नाटकें व नाटककार).

## प्रो० नारायण केशव बेहेरे

### झांशीची राणी—

"राणी ही एक अबला होती, परंतु वेळ येतांच ती विद्युल्लतेप्रमाणें हिंदुस्थानांत चमकून गेली. एक नाजुक, सडपातळ बांध्याची, केतकीप्रमाणें गौरवर्ण, नाकीडोळीं नीटस अशी अत्यन्त सुंदर रमणी, तासचे तास घोड्यावरील मांड ढळूं न देतां, हातांतील समशेरीनें शत्रूशीं लढतांना पाहून तिच्या शिपायांना ती प्रत्यक्ष महिषासुरमर्दिनी देवि अंबिका वाटली असल्यास त्यांत नवल नाहीं. ... ही स्वातंत्र्याची ज्योति, ही हिंदु रमणीची मूर्तिमंत वीरता, ही स्वधर्माची मूर्ति, ही स्वर्गीय तेजस्विता, क्षणभर तळपली व अस्तास गेली! परंतु हिंदु धर्माचें मुख तिने उज्ज्वल केलें." (१८५७).

## प्रो० चिंतामण विनायक जोशी

### गृह्यसंस्कार—

श्रीमंत नलमहाराज, माजी निषधाधिपति, यांस कळविण्यांत येतें कीं, आपण वनांत माझा त्याग करून ... फरारी झालांत, त्यास एक वर्ष होत आलें. तेव्हांपासून (जिवंत राहण्याकरितां) मला दास्यवृत्ति पत्करावी लागली व आतां तर मी माहेरीं तुकडे मोडीत आहें. निषधदेशाच्या माजी महाराणीस हें लाजिरवाणें नाहीं काय? मन्मानसराजहंसा, ही जाहिरात पाहिल्यापासून (लौकरच) कुंडिनपुरास हजर झालां नाहीं, तर मी जिवाचें बरें-वाईट करून घेईन व मग ह्याबद्दल तुम्हांला पश्चात्ताप झाल्यावांचून राहणार नाही.

मु० कुंडिनपूर }<br>मिति ....... }

आपली,<br>**सौ० दमयंती**

[ हा उतारा थोडा विचित्र वाटला, तरी त्यानें लेखकाच्या भाषेचें खरें रूप-दर्शन होईल; म्हणून किंचित् फरकानें तो येथें दिला आहे ].

## प्रो० विश्वनाथ पांडुरंग दांडेकर

### नियमितपणा—

"नदी नाहीं का वळणावळणानें वहात जात? मग आपल्याही आयुष्यांत वळणें लागलीं म्हणून काय झालें? उलट आयुष्याचें सौंदर्य वाढेलच त्यानें. काचित् एकाक्ष

वळणावर बांबूंचे बन लागेल आणि तिथलें संगीत ऐकून आपणालाच थांबावेसें वाटेल; क्वचित् फळां–फुलांनी बहरलेल्या वृक्षांना वळसा घालून जावें लागेल; आणि मग पक्ष्यांचा मंजुल रव व भ्रमरांचा गुंजारव हीं ऐकावयास सांपडतील. याहीपेक्षां क्वचित् वाटेंत खडक आल्यानं पाणी जोराने उसळेल; आणि मग पाणी जरी दुभंगले तरी हवेवर किती तरी मोतीं उधळलीं जातील; आणि त्यांवर किती तरी इवलालीं इंद्रधनुष्यें नाचतील. वळणावळणानें वाहण्याची मौज तर खरीच. अमुक इतके अक्षांस व रेखांश साधूनच आपण जाणार असा हट्ट धरल्याने आयुष्यांतलि आनंद नाहींसा होईल. नियमितपणाचा बडेजाव करावयाचा नाहीं तो देखील एवढ्याच-करितां. ”

## दत्तात्रेय व्यंकटेश पै

### केळकरांचें लेखनकौशल्य—

“ हरीभाऊ आपट्यांच्या कादंबरीप्रसवतेच्या व रचनाकौशल्याच्या दृष्टीने पाहतां तात्यासाहेबांची कूस विती (प्रसवती) ठरणार नाहीं; खाडिलकरांची ध्येयनिष्ठ नाट्यकला तात्यासाहेबांस माळा घालणार नाहीं; कोल्हटकरांची समाजहितदर्शी उच्च हास्यरसोत्पादक कोटिबाज दृष्टि केळकरांच्या डोळ्यांत दिसणार नाहीं; वामनराव जोशांचा अतिचिकित्सक विचारविलास व सत्यनिष्ठा तात्यांच्या लेखनांत ठाण मांडून बसणार नाहींत;सातां मजल्यांवरून कल्पनांशीं कुस्ती खेळण्याची गडकऱ्यांची बेमुर्वतखोरी तात्यासाहेबांना साधली तरी साजणार नाही; आणि त्यांची अर्थहानिकर अनुप्रासप्रियता तात्यासाहेबांना प्रियही होणार नाहीं; केतकरांच्या अवाढव्य पण अधांत्री ज्ञानभांडाराचें व समाजस्वभावाच्या यथार्थदर्शनप्रियतेचे वारें केळकरांना एकादे वेळीं मानवणार नाही; शिवरामपंत परांजप्यांचें वक्रोक्ति–व्याजोक्ति–पूर्ण रूपकात्मक वैभवशाली वक्तृत्व व प्रतिभावान् लेखन तात्यासाहेबांपाशीं सांपडणार नाहीं; परंतु नियतकालिकांचे संपादक, चरित्रकार, इतिहासतत्त्ववेत्ते, नाटककार, कथालेखक, गद्य–पद्य–कवि, राज्यशास्त्रकार, टीकाकार, इ० कोणत्याही दृष्टीने केळकरांच्या वाङ्मयाचा अभ्यास केला, तर ते उच्चतम कोटींतलें असल्याचा अभिप्राय निष्पक्षपाती परीक्षकाला द्यावा लागेल. अनुरूपता, अकृत्रिमता, शुद्धि, ओज, मार्दव, प्रसाद, इ० गुणांनीं नेहमी युक्त; अतिविस्तार, अल्पविस्तार, संदिग्धता, इ० दोषापासून सदा अलिप्त; विषय कितीही दुर्गम शास्त्रांतला असला तरी उपमा-दृष्टान्तादि अलंकारांनीं आणि सुटसुटीत अशा घरगुती म्हणींनीं रसभरित; विस्तार आणि खोली यांनीं प्रमाणबद्ध; असें सर्वगुणसंपन्न, नितांतमनोहर, सहजस्फूर्त, वाङ्मय तात्यासाहेबांइतकें अन्य कोणत्याही महाराष्ट्रीय लेखकानें निर्माण केलेलें नाहीं. ”

निरनिराळ्या वळणांनीं भाषेचा ओघ कसा वाहत चालला आहे, तें ह्या मागील त्रोटक उताऱ्यांवरून कळून येईल.

## आधुनिक कविता ( शाहीर कवि )

ह्या कालाच्या अगोदरच्या पिढीपर्यंत आपली कविता गाऊन दाखविण्याची पद्धत नव्हती. कवितांचें बाड खाकोटीस मारून कोणी कवि आपल्या मित्र-मंडळीस कविता गाऊन दाखविण्याचा प्रयत्न करी; पण त्याचा प्रायः उपहासच होत असे. परंतु यशवंत, गिरीश, मायदेव, अत्रे, टेकाडे, इ० कवींनीं बहुजन-समाजांत आपल्या कविता गाऊन दाखवून यशस्विता संपादन केली; त्यामुळें आतां तो विषय उपहास्य असा उरला नाहीं. तथापि 'फसल्यें ग बाई, सुख कपाळीं माझ्या नाहीं' इ० प्रकारें त्या गोष्टीची विनोदार्थ किंचित् टर उडविली जातेच. हे स्वतःची कविता स्वतःच गाऊन दाखविणारे कवि आपल्यास **शाहीर** म्हणवून घेतात; त्यामुळें शाहीर शब्दाचा मूळार्थ कवि, किंवा त्यानंतर आलेला अर्थ पोवाडे म्हणणारे कवि, हे दोन्ही अर्थ जाऊन, आतां स्वतःची कविता स्वतःच गाऊन दाखविणारे आधुनिक कवि, असा अर्थ त्या शब्दाला आला आहे. तरीपण सगळेच आधुनिक कवि आपल्या कविता समाजांत गाऊन दाखवितात असें नाहीं.

## सद्यःकालीन कवि

यशवंत, गिरीश, वनमाली, माधव-जूलिअन, गोपीनाथ, केशवकुमार, ह० स० गोखले, श्री० बा० रानडे, वा० भा० पाठक, अज्ञातवासी, काव्यविहारी, शं० ब० चव्हाण, ग० ह० पाटील, ना० गं० लिमये, 'माधव', साधुदास, कृष्णाग्रज,, रणदिवे, अनंत काणेकर, हिंगणेंकर, इ० महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध कवि आहेत.

आनंदराव टेकाडे, बेहेरे, खापर्डे, तिवारी, गु० रा० देशपांडे, गु० ह० देशपांडे, अनिल ( आ० रा० देशपांडे ), भवानीशंकर पंडित, माडखोलकर, बोबडे, उपाध्ये, वि० भि० कोलते, राजा बढे, सोनाळकर, गोरे, नारखेडे, इ० मध्यप्रांत व वऱ्हाड यांतील सुप्रसिद्ध कवि आहेत.

ग्वाल्हेरचे तांबे; इंदूरचे सरवटे, काळेले व रहाळकर, बडोद्याचे नंदुरबारकर व संत; नांदेडचे दास गणू, देवीदास महाजन व दत्तकिंकर; औरंगाबादचे

'पद्माकर;' वेरूळचे विनायकबोवा टोपरे; गुलबर्ग्याचे 'कान्त;' हैद्राबादचे श्री० वा० गाडगीळ, य० स० कारेकल; आणि गोमांतकांतील दा० अ० कारे, बाळकृष्ण भ० बोरकर; ही मंडळी काव्यप्रांतांत उल्लेखनीय असून, तांबे, दास गणू, इ० ची योग्यता तर उच्च दर्जाची आहे.

## सद्यःकालीन कवयित्री

प्राचीन काळापासून महानुभाव आद्य कवयित्री महदांबा, तसेंच जनाबाई, राजाई, इ० संत–मालिकेंतील पुष्कळ स्त्रिया यांनीं चांगल्या प्रकारची कविता केली आहे; त्यांच्या भक्तिपर कविता आणि झोपाळ्यावरच्या ओव्या, अंगाई गीतें, यांपैकीं कांहीं संग्रह करण्यासारखीं उज्ज्वल आहेत. त्याचप्रमाणें नव्या वळणाच्या उत्कृष्ट कविता रचणाऱ्या अलीकडील कवयित्रींत लक्ष्मीबाई टिळक, लक्ष्मीबाई बेहेरे, विमलाबाई देशपांडे, मनोरमाबाई रानडे, डॉ० कमलाबाई देशपांडे, अपर्णा देशपांडे, रमाबाई काटदरे, इ० नांवें चमकणारीं आहेत.

## सद्यःकालीन कवितेचे प्रकार

सृष्टिवर्णनपर, कल्पनाविलासात्मक, विचारप्रवर्तक, विकारदर्शक, भावगीत, नाट्यगीत, व्यक्तिचित्र, व्यंगकाव्य, विडंबनकाव्य, शिशुगीत, ग्रामिक गीत, नाविक गीत, ऐतिहासिक कविता, देशाभिमानोत्तेजक कविता, गूढगुंजनात्मक कविता, सुभाषितें, समस्या, विलापिका, रूपान्तरित काव्य, इ० अनेक प्रकार आजच्या कवितेंत आढळून येतात. थोड्या निराळ्या स्वरूपांत भक्तिपर व नीतिपर कविताही आहे.

जातिवृत्तांचे असंख्य प्रकार आणि सुनीत, गज्जल, दोहा व रुबाई, हे परकीय वाङ्मयांतील वृत्तप्रकार, आधुनिक काव्यांत नव्यानें दृग्गोचर होऊं लागले आहेत. 'मुक्तछंद' हाही एक प्रकार रूढ होऊं पहात आहे.

आधुनिक कवितेंत स्फुट कविता पुष्कळ, लघुकाव्यें किंवा खंडकाव्यें थोडीं, आणि प्रदीर्घकाव्य किंवा महाकाव्य रचण्याचा प्रयत्न साधुदास, खरे, इ० थोड्याच कवींनीं केलेला आहे.

वरीलपैकी कांहीं कवींची त्रोटक माहिती—

**'दास गणू,' गणेश दत्तात्रय सहस्रबुद्धे.** नांदेडचे. हे संतकवि व नामांकित कीर्तनकार असून, यांची कविता फार प्रेमळ व प्रासादिक आहे. त्यांनीं महीपतीप्रमाणें भक्तलीलामृत, संतकथामृत, भक्तिरसामृत, इ० भगवद्भक्तचरित्रवर्णनपर

ग्रंथ लिहिले असून, ज्ञानेश्वरांच्या अमृतानुभवावर ' भावार्थमंजिरी ' नामक टीका, आणि इतर बरेच ग्रंथ लिहिले आहेत. नुकतेच त्यांनी कीर्तनोपयोगी असे एकनाथचरित्रही लिहिलें आहे.

**भास्कर रामचंद्र तांबे** ( ज० १८७४ ). हे ग्वाल्हेर येथे शिक्षणाधिकारी असून, त्यांचें नांव माहीत नाहीं असा सुशिक्षित महाराष्ट्रीय आढळणेंच कठीण. हे अखिल महाराष्ट्राचे कवि आहेत; व त्यांच्या मधुर काव्यानें आबाल-वृद्धांना मोहिनी घातली आहे. आपल्या प्रतिभेनें रागदारीच्या व इतर तरल भावनायुक्त काव्यांनीं त्यांचें काव्य नितांत सुंदर असे झालें आहे. हे विद्यमान कवींत वयाने व मानानें अग्रेसर आहेत. **प्रो० मायदेव** यांनी रसिक व विद्वान् कवि **माधव-जूलिअन** यांजकडून संशोधित असा ' तांबे समग्र कविता ' हा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे.

**' यशवंत, ' दिनकर पेंढारकर** ( ज० १८९९ ). कोमल अंतःकरणाने हृदयद्रावक व भावनायुक्त कविता रचण्यांत यांचा हातखंडा आहे. खड्या सुरांत ते आपल्या कविता गाऊन दाखवितात, यामुळे आधुनिक कवींत ते प्रथित-यश आहेत. यशवंती, यशोधन, यशोगंध, भावमन्थन, हे काव्यसंग्रह आणि बन्दीशाळा व जयमङ्गला हीं खंडकाव्ये त्यांनीं प्रसिद्ध केलीं आहेत.

**' गिरीश, ' शंकर केशव कानिटकर**( ज० १८९३ ). हे फर्ग्यूसन कॉलेजमध्यें मराठी विषयाचे प्रोफेसर आहेत. यांचे काव्यगान आणि कविता हृदयंगम आहेत. काञ्चन-गङ्गा, फलभार, ह्या काव्यसंग्रहांत त्यांची स्फुट कविता प्रसिद्ध झाली असून, अभागी कमल, कला व आम्बराई हीं खंडकाव्ये त्यांनी रचिली आहेत. त्यांच्या काव्यकला नामक पुस्तकांत त्यांनीं सुनीत, नाट्यगीत, वगैरेवर चर्चा केली असून, ' नाट्यछटा ' या विषयावर व्यासंगपूर्ण असे पुस्तक नुकतेंच प्रसिद्ध केलें आहे.

**' वनमाली, ' वासुदेव गोविंद मायदेव** ( ज० १८९४ ) . हे महिला-पाठशाला, एरंडवणें; यांत अध्यापक आहेत. यांनीं मुलांकरितां ' अभिनयगीत ' व ' शिशुगीत ' हे काव्यसंग्रह प्रसिद्ध केले असून, ' भावतरंग ' हे त्यांच्या स्फुट कवितांचें पुस्तक आहे. ' गरीबांची गोष्ट ' हें खंडकाव्यही त्यांनीं लिहिलें आहे. यांचा आवाज मधुर व कविता म्हणण्याची शैली आकर्षक व गोड आहे. तांब्यांची कविता गाऊन, ती पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्याचें श्रेय प्रथम यांनी संपादिलें. यांच्या कवितेंत भावनो-त्कटता, माधुर्य व वात्सल्य, हे गुण अधिक आढळतात.

**' माधव-जूलिअन,' माधव त्रिंबक पटवर्धन** ( १८९४-१९३९ ). हे कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजमध्यें प्राध्यापक आहेत. यांच्याइतकी विविध प्रकारची रचना आधु-निक कवींत कोणीं केलेली नाही. विरहतरङ्ग, उमर खय्यामच्या रुबाया, द्राक्षकन्या, गज्जलाञ्जलि, व स्वप्नरंजन हे त्यांचे काव्यग्रंथ असून ' सुधारक ' हें खंडकाव्यही त्यांनीं प्रसिद्ध केलें आहे. ' तांबे समग्र कविता ' हा प्रो० मायदेवांनीं प्रसिद्ध केलेला

ग्रंथही त्यांनीं चिकित्सक पद्धतीनें व कवीच्या मान्यतेनें सुधारून दिलेला आहे. फार्शी–मराठी कोश आणि छन्दोरचना हीं त्यांची पुस्तकें त्यांचे नांव चिरंतन राखणारी आहेत. छन्दोरचनेसंबंधीचा त्यांचा खटाटोप अपूर्व आहे. गज्जल व रुबाया हे परकीय वृत्तप्रकार यांनी विशेषतः प्रचारांत आणिले. नाना ढंगांनीं विनटलेली अशी यांची कविता आहे. यांनीं व यांच्या संप्रदायाने अन् व नि यांचा प्रचार, अनुस्वारां-बद्दल परसवर्ण अनुनासिक लिहिण्याची पद्धति (पञ्चखण्डान्तरी, इङ्गरजी, खण्डणी, याप्रमाणें), हीं बेधडक सुरू केली आहेत. तसेच भर्जरी, मख्मली, तल्खली, असे फारसी शब्दही यांच्या आरंभीच्या काव्यांत बरेच आढळतात; परंतु आतां ही पद्धति त्यांनी सहेतुकपणे कमी केली आहे; आणि फारसी, इंग्रजी, ह्या भाषांतील शब्दांचे मराठीवर आक्रमण–वर्चस्व–नसावे, या मतप्रचाराचे ते एक अध्वर्यु आहेत.

**'गोपीनाथ' गणेश तळवलकर** ( ज० १९०७ ). हे 'आनंद' मासिकाचे संपादक असून, 'दूर्वांकुर' नांवाचा यांचा कवितासंग्रह प्रसिद्ध आहे. निरनिराळ्या चालीं-वर सोप्या भाषेत मुलांना आकर्षक अशा यांच्या कविता असतात. आशियाचे धर्म-दीप, छाया–प्रकाश कादंबरी, इ० यांचें लेखन आहे.

**'केशवकुमार,' प्रल्हाद केशव अत्रे** ( ज० १८९८ ). यांना सामान्यतः विडंबन-काव्याचे जनक समजतात. 'झेंडूचीं फुलें' हा त्यांचा विडंबनात्मक काव्यसंग्रह प्रसिद्ध आहे. उपहास व विनोदप्रचुर असे अनेक लेख आणि गोष्टी यानीं लिहिल्या असून, साष्टांग नमस्कार, भ्रमाचा भोपळा, घराबाहेर, इ० नाटकें त्यांनीं लिहिलीं आहेत. ते शिक्षणतज्ज्ञ असून पुण्याच्या कॅप एज्युकेशन सोसायटीचे प्रमुख सभासद आहेत. यांच्या भाषणावर विद्यार्थ्यांच्या उड्या पडतात, इतकें तें विनोदप्रचुर असतें. प्रत्यक्ष विनोदमूर्ति म्हणजेच अत्रे, असें ते आपल्याला अनेकदां म्हणवून घेतात.

**हरि सखाराम गोखले** ( ज० १८९५ ). हे कॅपमधील अमेरिकन मिशनच्या ट्रेनिंग संस्थेत शिक्षक असून, साध्या व सोप्या भाषेत कविता रचण्यांत कुशल आहेत. थोड्या शब्दांत हे पटापट सुंदर शब्द–चित्र निर्माण करूं शकतात. 'कांहीं-तरी' हा प्रो० लागूसारख्यांनीं पुरस्कारिलेला त्यांच्या कवितेचा संग्रह प्रसिद्ध आहे. अंतःकरणाचे मृदु असल्याने त्याच्या कवितेंत मार्दव व साधेपणा अधिक आढळतो.

**श्री० बा० रानडे** ( ज० १८९४ ). हे डेक्कन कॉलेजमध्यें प्रोफेसर होते. हल्लीं अंधेरी येथील इस्माईल कॉलेजमध्यें जीवशास्त्राचे प्रोफेसर आहेत. यांनीं बऱ्याच स्फुट कविता लिहिल्या असून, 'कालाच्या दाढेंतून' हें खण्डकाव्य प्रसिद्ध केलें आहे. यांनीं खानोलकर यांच्या सहकारित्वानें हायस्कुलांत चालविण्यासाठीं चांगलीं गद्य–पद्य वाचन-पुस्तकें प्रसिद्ध केली आहेत. यांच्या पत्नी **मनोरमाबाई रानडे** ह्या पदवीधर असून, उत्तम कवयित्री होत्या.

**वामन भार्गव पाठक** ( ज० १९०५ ). नवीन पिढीत यांची कविता बऱ्याचें स्वतंत्र विचारांची असून, सरस आहे. ' आशागीत ' हा त्यांचा स्फुट कवितासंग्रह प्रसिद्ध आहे. त्यांनीं ' प्रवासी ' नांवाचें एक लघुकाव्यही लिहिले असून, ' नकोत त्या गोष्टी ' हे लघुनिबंधाचें एक पुस्तक प्रसिद्ध केले आहे. त्यांची भाषा मनाला प्रसन्न करिते. नगर-मॉडर्न हायस्कूलचे ते प्रमुख आहेत.

' **अज्ञातवासी,** ' **दिनकर गंगाधर केळकर** ( ज० १८९८ ). यांचा ' अज्ञातवासींची कविता ' नांवाचा स्फुट कवितासंग्रह असून, त्यांची कविता देशाभिमानपरिपोषक व ओजस्वी अशी आहे. त्यांनी ' महाराष्ट्र-शारदा ' भाग १ ला हें आधुनिक कवींच्या कवितांचे सुंदर पुस्तक प्रसिद्ध केले आहे.

' **काव्यविहारी,** ' **धोंडो वासुदेव गद्रे** ( ज० १८९५ ). हे सांगलीच्या विलिंग्डन कॉलेजांत प्रोफेसर होते. ' काव्यविहार ' ह्या नांवाचा यांचा कवितासंग्रह आहे.

**अनंत आत्माराम काणेकर** ( ज० १९०४ ). हे मुंबईस असतात. ' चांदरात ' हा यांचा कवितासंग्रह असून, हे उत्कृष्ट लघुकथा-लेखकही आहेत. यांचें लेखन अंतःकरणाला भिडणारें असतें. ' पिकलीं पानें ' हा त्यांचा लघुकथासंग्रह आहे.

**गोविंदराव हिंगणेकर.** हे ज्ञानप्रकाश वर्तमानपत्राच्या संपादक-वर्गात होते. दक्खनचा वीर इ० त्यांची कविता आहे.

' **किशोर,** ' **शंकर बळवंत चव्हाण** ( ज० १९०३ ). काव्य-किशोरी व मधुमालती हे त्यांचे काव्यसंग्रह असून भावलहरी नांवाचे एक गद्यकाव्यही त्यांनी प्रसिद्ध केलें आहे. हे कोल्हापूर येथे असतात.

**गणेश हरि पाटील** ( ज० १९०६ ). यानीं ' रानजाई ' नांवाचा स्वतःचा एक कवितासंग्रह प्रसिद्ध केला आहे; आणि मुलांकरितां ' बालशारदा ' नांवाचें अनेक कवींच्या कविता-संग्रहाचे एक छोटें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. लहान मुलांकरितां सोप्या व चांगल्या कविता लिहिणारे हे एक कवि आहेत.

**ना० गं० लिमये** ( ज० १८८९ ). लहान मुलांकरितां कविता लिहिणारे हेही एक कवि असून, ते मुंबईच्या म्युनिसिपल शाळांचे सुपरिंटेंडेंट आहेत. त्यांचीं ' बालगीतें ' व ' स्फुट कविता ' हीं पुस्तकें प्रसिद्ध असून, ' मातृगीतांजलि ' नांवाचा अनेक कवींच्या राष्ट्रगीतांचा संग्रह त्यांनीं प्रसिद्ध केला आहे.

' **माधव** ' **केशव काटदरे** ( ज० १८९२ ). ध्रुवावरील फुलें, फेकलेलीं फुलें, हे यांचे कवितासंग्रह असून, ' घेरियाची लढाई ' हें खंडकाव्य त्यांनी लिहिलें आहे.

' **साधुदास,** ' **गोपाळ गोविंद मुजुमदार** ( ज० १८८४ ). हे सांगलीचे राजकवि असून, त्यांची फुटकळ कविता बरीच आहे. त्यांनीं श्रीरामायण महाकाव्य रचण्याचा प्रयत्न केला असून, त्याचे गृहविहार, वनविहार, रणविहार हे मोठे खंड प्रसिद्ध झाले आहेत. त्याचप्रमाणें त्यांनीं ' मराठीची सजावट ' नांवाचे अनेक साहित्यांगांचें

विवेचन असलेले दोन भाग प्रसिद्ध केले आहेत. कृष्णालहरी व निर्माल्य-संग्रह हे त्यांचे स्फुट कवितासंग्रह आहेत. ' बुद्धिबळांचा मार्गदर्शक ' हेंही एक पुस्तक त्यांनीं लिहिलें असून ते बुद्धिबलक्रीडा-पटु आहेत. ' मराठेशाहीचा वधपक्ष ' या नांवाची कादंबरीमाला ते लिहीत असून पौर्णिमा व प्रतिपदा ह्या त्यापैकी दोन कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत.

**' आनंद ' आनंदराव कृष्णाजी टेकाडे** (ज० १८८८). नागपूरचे. हे एक राष्ट्रीय बाण्याचे कवि असून, ' आनंदगीत ' ह्या नांवाने त्यांचे तीन कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. खड्या सुरांत व मनोहर चालींवर त्यांनीं आपल्या कविता गाऊन दाखविल्यामुळें त्या चटकन अधिक लोकप्रिय झाल्या. ' हा हिंददेश माझा ' हें त्यांचें राष्ट्रगीत आबाल-वृद्धांस परिचित आहे.

**व० ग० खापर्डे** ( ज० १८९० ). हे बनारसच्या विश्वविद्यालयांत प्रोफेसर आहेत. ह्यांस ' कविभूषण ' ही पदवी मिळालेली आहे. काव्यकांतार, काव्यकांतारांतलि फुलें, सर्वस्वाची गद्यगाणी, इ० त्यांचे काव्यसंग्रह आहेत.

**दुर्गाप्रसाद आसाराम तिवारी** ( १८८७-१९३९ ). हे जळगांव,-खानदेश येथलि एक प्राथमिक शिक्षक असून, यांच्याही शाहिरी वळणाच्या कविता आहेत; आणि ह्या समाजांत सर्वतोमुखी झालेल्या आहेत. त्यांच्या कवितांचे काव्यरत्नमाला, मनोहरलीला, मराठ्यांची संग्रामगीते, झांशीची संग्रामदेवता, शिवाबावनी, इ० संग्रह व ' नंदिनी ' नांवाचे खंडकाव्य हीं प्रसिद्ध आहेत.

**गुणवंत हनुमंत देशपांडे** ( ज० १८९७ ). वाटखेड, जि० यवतमाळ. हे आपल्या कविता स्वतः गाऊन दाखवितात. ते एक प्रथितयश कवि आहेत.

**वा० ना० देशपांडे** ( ज० १९०३ ). हे न्यू इं० स्कूल-यवतमाळ, येथे शिक्षक असून ' आद्य मराठी कवयित्री ' महदंबा हे यांचें पुस्तक प्रसिद्ध झालें आहे. यांनीं कपटवेष हे नाट्यकाव्य, एक लघुतम कथाप्रकार आणि मुक्तछंद व विवेकपूर्ण गूढवाद या गोष्टींना मराठींत प्रमुखत्वानें चालना दिली आहे. यांनी नवीन नवीन छंदांचे प्रकार घडविण्याच्या बाबतींत बरेच पद्धतशीर व नेटाचे प्रयत्न चालविले आहेत.

**' अनिल, ' आत्माराम रावजी देशपांडे** ( ज० १९०१ ). वऱ्हाडांत वर्धा येथें सबजज आहेत. यांनींही अनेक नवीन छंद मराठींत आणण्याचा उपक्रम केला आहे. ' महाराष्ट्रशारदा ' व ' काव्यकौमुदी ' यांत त्यांच्या कांहीं कविता प्रसिद्ध झाल्या असून, ' फुलवात ' हा काव्यसंग्रह, प्रेम आणि जीवन व भग्नमूर्ति ही मुक्तछंदांतलि खंडकाव्यें त्यांनीं लिहिलीं आहेत. ' मुक्तछंद ' यावर वागीश्वरी मासिकांत पहिला लेख लिहून त्यांनीं ह्या विषयास चालना दिली. हेही एक गूढगुंजनवादी कवि असून त्यांच्या कवितांत भावनेची उत्कटता, कल्पना-लालित्य, भाषेची सहजता, शब्दसौंदर्य व नादमाधुर्य इ० गुण आढळतात.

**भवानीशंकर श्रीधर पंडित** (ज० १९०५). हेही नागपूरचेच. यांच्या इतकी संख्येनें व गुणांनी श्रेष्ठ असलेली रचना थोड्यांनींच केली असेल. भावगीत, नाट्यगीत व शिशुगीत हे तिन्ही प्रकार ते फारच कुशलतेने हाताळतात. निरनिराळ्या स्फुट कवितांशिवाय 'पिचलेला पावा' हें त्यांचें काव्य प्रसिद्ध आहे. 'कृष्णकीर्तन' हेंही एक खंडकाव्य त्यांनी लिहिले आहे.

**प्रो० वि० भि० कोलते** (ज० १९०८). हे उमरावती येथें किंग् एडवर्ड् कॉलेजांत प्राध्यापक असून, महानुभावीय वाङ्मयाचे चिकित्सक संशोधक म्हणून यांची प्रसिद्धि आहे. यांनी महानुभावीय 'भास्करभट बोरीकर चरित्र' चिकित्सक पद्धतीनें लिहून प्रसिद्ध केलें आहे. त्यांची वऱ्हाडी भाषेतील गीतें त्या भाषेचा व सरस काव्याचा उत्कृष्ट नमुना ठरतील अशीं आहेत. 'उद्धवगीत' हा एक ग्रंथ त्यांनीं संशोधित करून प्रसिद्ध केला आहे. 'लव्हाळी' हा त्यांचा कवितासंग्रह आहे.

**श्रीनिवास रामचंद्र बोबडे** (ज० १८९०). नागपूर येथें वकील असून, वागीश्वरी मासिकाचे संपादक आहेत. शृंगार-संगीत नांवाचें एक खंडकाव्यही त्यांनी लिहिलें आहे.

**जयकृष्ण केशव उपाध्ये** (१८८३-१९३७). हेही नागपूरचेच. यांची विडंबन-कविता लिहिण्याची हातोटी प्रसिद्ध आहे. 'श्रीलोकमान्यतिलकचरितामृत' हा ओवीबद्ध ग्रंथ, आणि 'पोपटपंची' नांवाचा स्वतःच्या कविताचा संग्रह यांनी प्रसिद्ध केला आहे.

**पांडुरंग श्रावण गोरे** (ज० १९०५). हे मराठा जातीचे गृहस्थ यवतमाळ जिल्ह्यांतील 'निळोणें' गांवचे शेतकरी असून, याच्या कांही कविता शेतकरी वर्गाच्या राहणीसंबंधाच्या आहेत.

**नरहर शंकर रहाळकर**. इंदूरचे. 'पुष्पांजलि' नामक पुस्तकांत यांची कांहीं कविता प्रकाशित झाली आहे. भारदस्त भाषाशैली, तडफदार आवेश, मर्यादित शृंगार, कोमल सहृदयता, हे गुण त्यांच्या कवितेत आढळतात. त्यांनीं संस्कृत नाटकाधारें उत्तररामचरित्र, वरिधर्मदर्पण, इ० नाटकेंही लिहिलीं आहेत.

**'पद्माकर' दत्तात्रेय बापूराव पद्माकर** (ज० १८९५). हे औरंगाबाद येथील कीर्तनकार असून, 'प्रफुल्ल पद्माकर' या नांवानें त्यांनीं आपला कवितासंग्रह प्रसिद्ध केला आहे.

---

उ ता रे

## भास्कर रामचंद्र तांबे

**कुस्करूं नका हीं सुमनें—**

**जरि वास, नसे तिळ यांस, तरी तुम्हांस, अर्पिलीं सु-मनें १.**
**मधु जरी, नसे तिळभरी, अंतरीं तरी, करीं हीं धरणें २.**

यां वर्ण, नसे सौवर्ण, जों न हीं शीर्ण, तोंवरी धरणें ३.
घ्या करीं, क्षणाभीतरीं, वाळतिल तरी, तयांना जपणें ४.
घरिं मुलें, तशीं हीं फुलें, हृड वत्सलें, लोचनें बघणें ५.
अञ्जली, धरुनि अर्पिली, भक्तिनें दिली म्हणुनि तरि घेणें १०.

## दास गणू

महाराष्ट्र—मुलूख—

महाराष्ट्र-मुलुख बहु खट । त्यांतुन विशेष गोदेचें तट ।
उमगूं न देति कधि वाट, सुखाची कवणा ॥
अरि सर्वशक्ति भगवान्, परी केली दैना ॥ ध्रु० ॥
कुणि दिल्या खांद्यावर कावडी । कुणि केला बिनपैशाचा गडी ।
चोख्याची अवघ्यांवर कडी, वोढविलिं ढोरं
वैकुंठपति दाम्यानें बनविला महार ॥ १ ॥
अवदसा जनी आगजाळी । दळण्या बैसवीत वनमाळी !
मोठा कठिण सावता माळी, लावि खुरपाया ॥
गोरा नेत धरुनि हातास चिखल तुडवाया ॥ २ ॥
इकडील संत ते बरे । केलें नाहीं माझें कांधें मातेरें ।
जेथें तेथें उभयतां बा रे, गेलों थाटानं ॥
मेहेत्याचें लग्न पहा ‘ दास गणू ’ कांथे खूण ॥ ४ ॥

## यशवंत

न्ह्यारी—

न्ह्यारिचा वकुत होईल मैतरणी बिगिबिगि चाल
नाह्गूरसुटीच्या आंत पोचाया होव तत
सोडितील हात बैलाला धुण्डील नदर कोनाला
नदरे न पडन मी जरी
जाईल मार्जे ग तरी
उरिं रुतल माझ्या सुरी
नग नग गमाऊ येळ मैतरणी बिगिबिगि चाल १.

हें एक ‘ ग्रामिक गीत ’ सर्वांच्या आवडीचें आहे. ग्रामिक भाषेंत, ग्रामिकांच्या हालचालीसंबंधीं किंवा स्वतः ग्रामिकांनीं रचलेलें तें ‘ **ग्रामिक गीत** ’ होय.

## गिरीश

शारदा—वन्दन—

छाया तरूंच्या किती रंगलेल्या तुझ्या भोंवतीं थाटुनी राहती;
स्वर्गांतुनी पाझरे तेज खालीं; फुलें, पर्णराजी, तृणें, नाहती;
तरीं शिळेच्यावरी भव्य मूर्ती तुझी शुभ्रवस्त्रांकिता हासते
वीणा मृदु स्पर्शनें छेडुनी ही, तरंगावली अंगुली निर्मिते १.
ओवी-अभंगाञ्जलि-श्लोक-आर्या-मुखांनीं तुला आळविलें कुणीं
माते ! कृपावृष्टि केलीस त्यांच्या मनोभूत आर्तस्वरा ऐकुनी
मी दीन, मी लीन; तेथें कशाला बरें अल्पधीनें उभें राहणें ?
ध्यावें तुझें ध्यान येथून, आई ! इथूनी तुला भक्तिनें वंदणें ४.

यांतील शब्दसौष्ठव आणि हृदयंगमता सहज कळून येतील.

## वनमाली

पांखरूं ! —

चाले भंवतीं सुंदर खासे ठुसकें पांखरुं गोड
विचारवंतालागीं लावी निमिषामध्यें वेड !
ठुमकत जाई, थबकत गाई, पाहुनि भंवतीं भंवतीं
चिमणा दाणा चटकन वेंचुनि घेइ भरारी वरतीं !
गवताहि हंसलें ! डुललें पाहुनि सुंदर गोजिरवाणें
असलें पांखरुं पाहुनि कुणि का राहिल केविलवाणें ?
गड्या पांखरा, क्षमा करीं मज उर माझें कालवतें !
नको सांगणें-असेच माझें गेलें रे बागडतें !

यांत वात्सल्य व कोमलता हे गुण स्पष्ट दिसून येतात.

## माधव—जूलिअन

तुझा मी तूंहि हो माझी —

बुझावूं मी किती तूंतें ? । करावी मी किती हांजी ?
कितीदां मन्त्र उच्चारूं ? । तुझा मी तूंहि हो माझी !
उभे मल्लोचनीं आंसूं । कपोलीं अन् तुझ्या हांसूं;
नको गे जिन्दगी नासूं ! । असे का इष्क ही बाजी ?
फुलांचे कुंज हे नामी; । रमूं ये गे सुखारामीं
वसन्तीं जीविताच्या मी । तशी तूं-सोड नाराजी.

संस्कृत व फारसी शब्दांची सारखीच पखरण, 'अन्'चा व 'परसवर्ण अनुनासिका' चा उपयोग ध्यानांत येण्यासाठीं इतर अधिक चांगल्या कवितां-ऐवजीं हा उतारा दिला आहे.

## प्रल्हाद केशव अत्रे

कषाय-पेय-पात्र-पतित-मक्षिकेप्रत —

अयि नरांग-मल-शोणित-भक्षिके । जंतुविनाशक जंतु-सुरक्षिके
असु-परीक्षित-हारक-तक्षिके । क्या हुवा अफसोस ! मक्षिके १,
या प्रभात-समयास मंगल । चमकती दंव-मौक्तिक निर्मळ
गात पक्षि-गण हा गगनीं फिरे । पण दशा तव काय ? अरे ! अरे! २.

फडफडफड पंखा हालवी ती तराया
तडफड बहु केली, जाहले कष्ट वांया !
मिटवुनि इवलेसे, पाय ती शांत झाली !
अहह ! तडक आणी खालतीं खोल गेली ! १५.

टाकुनी लांब सुस्कारा, । उमाळा दाबुनी उरीं
चहा तो शांत चित्तानें । प्राशिला वरचेवरी ! ।। १६.

यांतील पहिल्या श्लोकानें संस्कृत प्रचंड शब्द व समास वापरून क्लिष्ट व नीरस अशी जड-जंबाल कविता रचणाऱ्या वि० वा० भिडे यांच्यासारख्यांच्या कवितेची आठवण होते; 'कलकलकल हंसें फार केला मुटाया, फडफड निजपक्षीं दाविलें कीं उडाया' या रघुनाथ पंडितांच्या चरणांची आठवण पुढल्या श्लोकानें होते; शोभो किंवा न शोभो, शेवट अनुष्टुप्-वृत्तांत असावा, इ० संस्कृत साहित्यांतील नियम कडकडीतपणें पाळणाऱ्या गणेशशास्त्र्यां-सारख्यांची आठवण शेवटच्या श्लोकानें होते. याप्रमाणें कवि दुसऱ्याच्या काव्य-कृतीचें किंवा समाजांतील व्यंगांचें किंवा एकाद्या व्यक्तीच्या गुण-दोषांचें हास्यास्पद वर्णन कवितेंत करितो, त्या काव्याला 'विडंबनकाव्य' म्हणतात. विडंबनानें व्यंग्य व्यक्तीसुद्धां सर्वांमध्यें फक्त विनोद व हास्य उत्पन्न झाल्या-सच तें उत्कृष्ट विडंबन ठरेल; त्याचा हेतु विषारी नसला पाहिजे.

## हरि सखाराम गोखले

माझी सोनी —

मृदुल हृतुकी नच मना बोंचणारी । प्रबल हृतुकी दृढ पाश घालणारी
नवल मोठें आनंद तींत पूर्ण । अशी आज्ञा ओळखा करिल कोण ?१.

मुकुल-कलिकेपरि गाल ते फुगीर । राग उसना सांचला जणुं अधीर
तरल आशाकुल साश्रु दृष्टिपात । रंगवीतो अनुराग क्षणार्धांत २.
रुष्ट उत्सुकता उघडुनी मुखातें । म्हणे-'मजला ने आज फिरायातें'
माझि भारी लाडकी सोनुबाई । असा साधा अनिवार हट्ट घेई ३.
'नको' म्हटलें क्षणमात्र अश्रु आले । 'बरें, नेतों' म्हणतांच कुठें गेले !
शब्द केवळ बदलतां मनाजोगी । सृष्टि बाळांची, आमची अभागी ! ४.

हें साध्या व सोप्या शब्दांत आणि झटपट किती सुंदर चित्र रेखाटलें आहे !

## डॉ० कमलाबाई देशपांडे

### जीवित-कोडें —

या जीवाला जीवित-कोडें जन्मान्तरिं तरि सुटेल का ?
ही जीवाची हुरहुर जाची; काज तियेचें कळेल का ?
कांक्षित हृदया, मिळोनि चित्ता, ठाव तयाचा दिसेल का ?
जी जीवाला जाणिव झाली उदित खरी ती ठरेल का ?
जिव धावतो त्या सौख्याचें स्थान अचल तें दिसेल का ?
या जीवाची तळमळ साची पूर्णानंदीं विरेल का ?
पूर्णानंदीं आशावादी हृदय कधीं हें बनेल का ?
या जीवाला जीवित-कोडें जन्मान्तरिं तरि सुटेल का ? १.

## आनंदराव कृष्णाजी टेकाडे

### संग्राम —

संग्राम अतां कोठला ? , मित्र जाहला; शत्रु जेथें —
खड्गाग्र उलटुनी, छेदि आप्त-कंठातें १.
जल जला,सि अडवी पथीं, दिसे संमतीं, नवें नवल—
हें बघुनि हंसे गिरि, उभा पुढति जो अचल
सुंदोप, सुंद संग्राम, देह आराम, काय हृदया ?—
म्हणुनीच नाचतें छातीवर जग तुझिया ३.
स्वातंत्र्य,-कल्पना अतां, सोड भारता, अंतरींची —
पळ, घटिका, मोजित; वाट पहा मरणाची ! ४.

## प्रो० बलवंत गणेश खापर्डे

### ज्योतिष —

शुभांबरी शोभे जी गगनसम नीलांबरवती
जरीचे बिंदू हे गगनिं शुभ तारे चमकती

स्वयें चंद्राची कीं वदानें वसते हो सरसता
    अशीचे अंधांनो, ग्रह तरि तुम्ही काय बघतां ? १.
गुणातें एकेका रदन करुनी ठेवि सदनीं
    अशी रम्या माझी प्रियसखि गणी कुंदरदनी
शुभांगी सर्वांगा त्यजुनि निज-पंचांग रडतां !
    अतां कैसे वानूं ? जरठ मजला सत्य दिसतां ! २.

## अनिल

फुलवात —

हृदयींच्या अंधारांत । लावियेली फुलवात
तुवां आपुलिये हातीं । उजळली दिव्य ज्योति १.
कोनाकोनीं खुले कांती । सरे जीवनाची भ्रांती
तेज पसरे प्रशांत । हृदयींच्या मंदिरांत २.
अनंताचें द्वार खुलें । सान्तामधूनीयां झालें
तमांतुनी घे प्रकाश । व्यापी हृदय-आकाश ३.
मूर्तिमधूनी प्रचिती । अमूर्ताची होई चित्तीं
फुटे शब्द निःशब्दाला । हृदयींच्या जिव्हाळयाला ४.

## प्रो० विष्णु भिकाजी कोलते

छकुली !—

माझ्या छकुलीचे डोळे । दुध्या कवडीचे डाव
बाई कमळ कमळ । गोड चिडीचं ग नांव १.
जरी बोलते ही मैना । माझी अजून बोबडें
मला लागती ते बाई । खडीसाकरेचे खडे २.
सार्‍या जगाचं कौतुक । इच्या झांकुल्या मुठींत
कुठें ठेवूं ही साळुंकी । माझ्या डोळयाच्या पिंजर्‍यांत ३.
कसें हासल ग खुद्कन । माझ्या बाईचे हे ओठ
नजर होईल कोणाची । लावुं द्या ग ‘गालबोट’ ! ४.

## सौ० विमलाबाई देशपांडे

वसंत !—

वसंत वेडा उन्मत्त । वसंत नाचे हृदयांत !
वाऱ्यामधिं गिरके घेतो । सुकलीं पानें नाचवितो

कानीं कुजबुज
करितो हितगुज
उडे बागडे स्वच्छन्द । वसंत नाचे हृदयांत ! १.
आंब्याच्या झाडावरतीं । मोहर कवळा फुटे किती
वातावरणीं
सुगंध झोंकुनि
जिवास करितो उत्कंठ । वसंत नाचे हृदयांत ! २.

## विष्णु सोमनाथ सरवटे

ग्रंथान्योक्ति —

शृंगार सुंदर सुशोभित रम्य देहीं
विद्या कलादि गुण वाहसि सर्व कांहीं
अज्ञांस देशि उपदेशहि सुज्ञतेचा
ग्रंथा, परंतु नुमजे तुज लेश त्यांचा ॥ १ ॥

## नरहर शंकर रहाळकर

दैववादी ! —

रडा रडा बाईल होउनी, घरांत बसुनी रडा रडा
दिवस आमुचे गेले ! फिरलें दैव ! म्हणूनी रडा रडा ! ॥ ध्रु० ॥
जरी खिळखिळीं हाडें झालीं, खातां मारा फटक्यांचा
स्वस्थ रडा तरि तुम्हीं म्हणोनी, 'खेळ असे हा दैवाचा'
उद्यमविरहित मूर्खपणाची
बाईलपणा लपवायाची
'दैव' असे ही ढालच साची
लपा लपा, तुम्हि तिच्याच मागें, निर्लज्जांनो, लपा लपा !
दैववादि ते पूर्ण बनोनी, अश्रू ढाळा, टपा टपा ॥ १ ॥

## यशवंत खंडेराव कुलकर्णी

लक्ष्मीपूजन —

प्रातःस्नान चतुर्दशीस करिती अभ्यंग उष्णोदकें,
पक्वान्नें सुखवस्तु सेविति किती नाना तऱ्हेचीं सुखें.
कोणाच्या नशिबीं त्रिकाळ करणें ये स्नान बाष्पोदकें !
हृद्वन्हीवरतीं सदा शिजविणें कोंड्यांत मांडे निके ॥ १ ॥

‘ लक्ष्मीपूजन ’ थाटतां विलसती शालूमयी त्या किती !
कोणी गुंफित अश्रुमाळ पुजण्या लक्ष्मी गृहाची सती
पुष्पें अत्तर नाच-रंग उठती, लाह्या किती वाटिती,
आशेच्या फुटतीं चिताग्निवरतीं लाह्या कुणी फाकिती ! ॥ २ ॥

## पांडुरंग रामचंद्र नंदुरबारकर

अजरामर स्थिति—

अवलंबीं आत्मबला हरिच्या स्तवनासिही करीं भावें
स्मरतां धावुनि येउनि दे हृदयीं धीर संकटीं पावे १.
सख्य करीं श्रीहरिशीं हृदयस्थाशीं तदीय अंशाशीं
बाहिर काढुनि लावीं मात्सर्य-द्वेष-कोप-मोहासीं २.
स्वान्तर शुद्ध करावें कष्टाची भीति सोडुनी द्यावी
दुःखा मित्र करावें मोठीं हीं दोन दैवतें भावी ३.
जीव तुझा आनंदें चढतो मग गिरि-गिरीश-शिखरातें
लोकालोकांवरुनी अजरामर त्या परेश पदवीतें ४.

## कृष्णाजी रामचंद्र संत

वसंतपूरची एक मौज—

एके दिवशीं लीला बाला वन-भोजनास ती नेई
गडबड शहराची ती सोडुनि आली प्रशांतशा ठाई १.
त्या रम्य टेकडीवर खेळत होतीं मुलें प्रमोदांत
थोडीशी वर गेली बंडोबा ते पुढें तिला दिसत २.
त्यांचा परिचय झाला होता. झालें तुम्हांस का विदित ?
लीला-बंडू यांचें भाषण आलें विशेष रंगांत ३.
वृक्षावरतीं किलबिल तिकडे तैशीं मुलेंहि खेळत तीं
भाषण यांचें चाले विदित कुणाला न काय तें वदती ४.
त्यांचे विचार सुंदर असतिल परि ज्ञात ना कुणा झाले
वृक्षावरील पक्षी ऐकत होते तयांस हें कळलें— ५.

## दत्तकिंकर

मोठा कोण ? —

द्रव्याचा निधि थोर संनिध तरी, मोठा न तो होतसे
शक्तीनें जरि मत्तही कुणि असो, मोठा न तो होतसे
सत्ता थोर जरी नृपा-करिं तरी, मोठा न तो होतसे
विद्या-अंकितही असो कुणि परी, मोठा न तो होतसे ! १.

सत्कार्यी धन वेंचि, जो निज-बळें, दुष्टांस संहारितो
सत्तायुक्त असोनि जो निज-जनां, पुत्रांपरी पाळितो
विद्यादान सदा करोनि विनयें, लोकोपकारा करी
' मोठा तो ' जगिं दत्त-किंकर वदे, जो राष्ट्र-सेवा करी २.

## कान्त

हंसली ! —

प्रकाश हा कसला ? — हांसली छकुली लडिवाळ
ओघच मेघांचा — वाहतो सदनीं तेजाळ
अ-कपट हृदयाची — सरलता वाहे निर्व्याज
याच जलीं देवें — शिंपिला स्वर्गीं तरु-राज
वसंत तो जन्मे — घेउनी पुष्प-श्री इथुन
स्मित स्नात-गालीं — जन्मली उषा मूर्तिमंत
दन्त–दीप्तियोगें — शिलाधर धरा रत्नवंत
मंदाकिनि वाहे — सुरधुनीसह या हास्यांत
कलंक तूं अपुला — जा चंद्रा घालिव ये त्यांत
पन्नग–शशि–गंगा — कशाला ? सदाशिवा, वाया.
बालहास्य पुरतें — हलाहल दाह शांतवाया
दुभंगल्या हृदया — सांधि तें हास्य बालकाचें
दुःखाश्रू होती — स्मितें या थेंब अमृताचे (सांजवाती

कोणाचे व किती उतारे द्यावे ? याप्रमाणें आधुनिक कविता संपन्न आहे. ती जागतिक सौंदर्ययुक्त, राष्ट्रीय वळणाची व महाकवींच्या योग्यतेची नाहीं. असे आक्षेप तिच्यावर आहेत; पण ते हळू हळू दूर होतील.

## वि हं ग मा व लो क न

आतां आधुनिक वाङ्मयाचा विषयवार व पूर्वापर असा थोडासा आढावा घेऊं. यांत कादंबऱ्या, नाटकें, लघुकथा, इतिहास, चरित्र, कोश, भाषाशास्त्र, तत्त्वज्ञान, विनोदी वाङ्मय, बालवाङ्मय व इतर शास्त्रीय वाङ्मय, यांचा समावेश होतो. थोडीशी पुनरुक्ति होईल, पण त्यास इलाज नाहीं.

### मराठी कादंबऱ्या

अद्भुतरम्य, सामाजिक, ऐतिहासिक, ध्येयात्मक, कलात्मक, वास्तववादी, आत्मवृत्तपर, राजकारणविषयक, मनोविश्लेषणात्मक व जगाशीं बंडखोरी करणाऱ्या वृत्तीच्या, अशा कादंबऱ्यांचा मराठींत एकामागून एक असा उदय झालेला स्थूलमानानें आढळून येतो.

**बाबा पद्मजी** ह्या पुण्यांतील ख्रिस्ती झालेल्या गृहस्थांनीं सन १८५७ त 'यमुनापर्यटन' ही सामाजिक स्वतंत्र कादंबरी लिहून, तींत उच्चवर्णीय हिंदु विधवांची दुःस्थिति, आणि हिंदुधर्माची अवनति व ख्रिस्ती धर्माचा गौरव प्रकट केला होता; तथापि अद्भुतरम्य कादंबऱ्यांचा काल वाईचे **हळवे शास्त्री** यांची 'मुक्तामाला' (१८६१), **रिसबूड** यांची 'मंजुघोषा' (१८६८), आणि **गुंजीकरांची** 'मोचनगड' (१८७१), यांच्या वेळेपासूनच सुरू झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. यांपैकीं 'मोचनगड' ही कादंबरी शिवचरित्रावर लिहिली असून, मराठी ऐतिहासिक कादंबऱ्यांत ती प्रथमची आहे. **मोरोबा कान्होबा** यांनीं 'घाशीराम कोतवाल' हें शेवटच्या रावबाजीच्या कारकिर्दीतील प्रसंगांवर एक पुस्तक लिहिलें; पण त्याला ऐतिहासिक कादंबरी असें म्हणतां येणार नाहीं. वरील मुक्तामाला, मंजुघोषा, इ० या कालांतील कादंबऱ्यांचा सांचा जवळ जवळ एकसारखाच होता. कादंबऱ्यांतील नायक-नायिका म्हणजे मदन व रति यांचे पुतळे, प्रतिनायक-नायिका दुर्गुणांचे पुतळे, कनक-कांता-राज्य यांवर कथानकाची उभारणी, मध्यन्तरीं अरिष्टें व शेवट गोड, आणि अद्भुत गुंफणानें मधले दुवे जुळविलेले, अभिप्राय-गांभीर्य-सूचकता बिलकूल

नाहीं; मात्र 'अशा नावलांची कीड आतांशी फार झाली आहे' हे **रा० ब०** मराठे यांचे उद्गार पुष्कळांशीं खरे दिसतात. ह्याच कालांत जरठ-तरुणीविवाह, विधवाविवाह, स्त्रीशिक्षण, इ० सामाजिक प्रश्नासंबंधींच्या वसंतकोकिला, रत्नप्रभा, इ० बऱ्याच कादंबऱ्या निर्माण झाल्या. त्याचप्रमाणें **नागेशराव बापट** यांच्या पहिले बाजीराव पेशवे, संभाजी, चितुर-गडचा वेढा, पानिपतची मोहीम, इ०; तसेंच १८५७ सालच्या बंडासंबंधीं 'हंबीरराव व पुतळाबाई,' आणि 'लालन बैरागीण;' वासुदेव बळवंत फड-क्याच्या बंडावर 'सुशील यमुना,' शेवटच्या बाजीरावाच्या कारकिर्दीसंबंधीं 'जुना वाडा,' इ० ऐतिहासिक कादंबऱ्या आणि भाषान्तरित व रूपान्तरित अशा शेंकडो कादंबऱ्या निर्माण झाल्या. त्या सर्वांत 'यमुना-पर्यटन' या कादंबरीच्या अगोदर तीन-चार वर्षें प्रसिद्ध झालेलें **कृष्णशास्त्री चिपळूण-कर** यांचें 'रासेलस'चें भाषान्तर आणि 'व्हिकार ऑफ वेकफील्ड'चें **धनु-र्धारी** यांनीं केलेलें 'वाईकर भटजी' हें रूपान्तर, ह्या दोनच कादंबऱ्या नांव घेण्यासारख्या व सरस अशा उतरल्या आहेत.

यानंतर **हरीभाऊ आपटे** यांनीं मात्र समाज-स्थितिदर्शक, ऐतिहासिक व ध्येयात्मक कादंबरी-लेखनांत क्रान्ति घडवून आणिली. संख्येनें व गुणांनीं श्रेष्ठ असा त्यांच्या तोडचा कादंबरीकार मराठींत झाला नाहीं. संख्या आहे तर गुण नाहीं, असा प्रकार कदाचित् आढळेल. मी, पण लक्षांत कोण घेतो, उषःकाल, सूर्योदय, इ० त्यांच्या सुमारें एकवीस कादंबऱ्या सर्वांस परिचितच आहेत. त्यांच्या कादंबऱ्यांत प्रमाणबद्धता, ठाकठिकी हीं कमी आढळलीं, तरी स्वभावपरिपोष व सदभिरुचीस पोषक असें वर्णन, यांमुळें त्यांची योग्यता केव्हांही उच्चच ठरते. यांच्यानंतर **द्वारकानाथ पितळे** ऊर्फ '**नाथमाधव**' ह्यांच्या कादंबऱ्या डोळ्यांपुढें येतात. हे गृहस्थ प्रथम सैन्यांत असून, लंगडे झाल्यामुळें लेखकाच्या धंद्यांत पडले आणि त्यांतही त्यांनीं बरेंच यश मिळविलें याचें कौतुक वाटतें. 'सांवळ्या तांडेल' ही मराठींतील आरमारविषयक पहिली कादंबरी, व 'रायक्लब अथवा सोनेरी टोळी' इ० यांच्या सुमारें वीस भाषां-तरित व स्वतंत्र कादंबऱ्या, आणि 'स्वराज्याचा श्रीगणेशा' इ० ऐतिहासिक कादंबऱ्या, यांनीं त्यांचें नांव कादंबरी-क्षेत्रांत चिरकाल राहील. त्यांच्या लेखनांत कल्पकता व वैचित्र्य आढळून येतें. नाथमाधवांच्याप्रमाणेंच **वि० वा० हडप** हेही एक खंदे व फर्डे कादंबरी-लेखक आहेत. प्रचलित विषयांबद्द

झटपट कथानक रचण्यांत त्यांचा हातखंडा आहे. 'बहकलेली तरुणी,' 'वांकडें पाऊल,' असल्या नांवांच्या जरी त्यांच्या कादंबऱ्या असल्या, तरी नांवावरून त्या सर्व अश्लील या सदरांत मोडतील असें नाहीं. झांकली मूठ, दुलारी, विभावरी, इ० सुमारे वीसच्या वर सामाजिक विषयांवरील कादंबऱ्या, आणि 'पेशवाईचें पुण्याहवाचन' येथपासून तों 'पेशवाईचें मन्वंतर' येथपर्यंतच्या तेरा ऐतिहासिक कादंबऱ्या लिहून, त्यांनीं नाथमाधवांचें अपूर्ण कार्य पुरें केलें आहे. याशिवाय **वि० सी० गुर्जर** यांनीं 'मनोरंजनां'त भाषान्तरित व रूपान्तारित किती तरी कादंबऱ्या चटकदार भाषेंत लिहून लोकांचें मनोरंजन केलें आहे. **वासुदेव गोविंद आपटे** यांनींही दुःखाअंतीं सुख, माणिकबाग, इ० रूपान्तरित कादंबऱ्या लिहिल्या असून, बंकिमचंद्रांच्या सर्व कादंबऱ्यांची मराठी वाचकांस ओळख करून दिली आहे. **नारायण हरि आपटे** हे एक नामांकित ध्येयवादी कादंबरीकार आहेत. त्यांनीं समाजाच्या नीतीला आणि शीलाला अपकर्षात्मक अशी एक ओळही लिहावयाची नाहीं असा जणुं कांहीं निश्चयच ठरविल्यामुळें 'न पटणारी गोष्ट' वगैरे त्यांच्या एकून एक कादंबऱ्या एका दृष्टीनें उच्च दर्जाच्या झाल्या आहेत. त्यांची भाषा सरळ व साधी असते. **चिंतामणराव वैद्यांची** 'दुर्दैवी रंगू' व **शिवरामपंत परांजपे** यांची 'गोविंदाची गोष्ट' ह्या कादंबऱ्या भाषादृष्ट्या उत्तम असल्या, तरी या उभयतांना कादंबरीकारांत गणतां येत नाहीं.

**प्रो० वा० म० जोशी** हे विशेष नांव घेण्यासारखे सद्यःकालीन कादंबरीकार होत. यांच्या 'रागिणीं'तील काव्य-शास्त्र-विनोद मोहक आहे; 'आश्रमहरिणी' ही छोटी असली, तरी गुणांनीं मोठी आहे; 'सुशीलेचा देव' व 'इंदु काळे आणि सरला भोळे' ह्या त्यांच्या कादंबऱ्या ध्येयात्मक, वस्तुस्थितिनिदर्शक, कलायुक्त व सरस अशा आहेत. **डॉ० श्रीधर व्यंकटेश केतकर** यांच्या गोंडवनांतील प्रियंवदा, गांवसासू, ब्राह्मणकन्या, परागंदा, आशावादी, विचक्षणा, इ० कादंबऱ्यांत समाजशास्त्रदृष्ट्या चिकित्सा आढळते. त्यांची भाषा ओबडधोबड, कथानक विस्खळीत, स्वभावपरिपोषाचा अभाव, लांबट संवाद, इ० असलीं, तरी त्यांच्या कादंबऱ्यांत विचारवैचित्र्य आणि जगांतील जीवनाचा चौकसपणा व त्यामुळें कांहीं अंशीं विक्षिप्त वाटणारीं मतें

पहावयास मिळतात. त्यांचें कोणतेंही पात्र सुष्ट किंवा दुष्ट नाहीं. ते त्या पात्राच्या वागणुकीची घडण तशी कां बनली याचें सखोल निरीक्षण वाचकास करावयास लावितात. या कारणानें त्यांच्या कादंबऱ्यांचें स्थान एका दृष्टीनें उच्च ठरतें. यानंतर **प्रो० ना० सी० फडके** यांच्या जादूगार, दौलत, कलंकशोभा, निरंजन, इ० कादंबऱ्या डोळ्यांपुढें येतात. त्या बहुतेकांत कथानकाचा बांधेसूदपणा, निवेदन-कौशल्य, भाषेचा चटकदारपणा, मार्मिकता व लालित्य, हे गुण उत्कटत्वानें असले, तरी विषयवैचित्र्य व स्वभाववैचित्र्य यांचा अभाव असल्यानें, तींच तींच पात्रें पुनःपुनः डोळ्यांपुढें आल्यासारखीं वाटतात. त्यांनीं नुकतीच लिहिलेली 'प्रवासी' ही कादंबरी मात्र ह्या गोष्टीस अपवाद ठरेल. प्रो० वा० म० जोशी यांच्या मताप्रमाणें 'सरस्वतीनें जीवनाच्या व्यासपीठावर बसणें चांगलें,' तर प्रो० फडके म्हणतात कीं, " मत्तमयूरपिच्छांच्या सुबक सिंहासनावर बसण्यांतच तिचें खरें सौंदर्य प्रकट होणार आहे." 'कलेकरितां कला' कीं ' नीतीकरितां कला ' हा सध्यां विद्वानांपुढें वादाचा प्रश्न आहे. **भा० वि० वरेरकर** यांच्या विधवाकुमारी, गोदू गोखले, परतभेट, इ० कादंबऱ्या स्त्रियांच्या योग्य हक्कांचा पुरस्कार करणाऱ्या आहेत; आणि त्या सर्वांत स्वमतप्रसाराला अधिक प्राधान्य आहे. ' विधवेचें कुंकू ' यांसारख्या प्रश्नांची मार्मिक चर्चा, साधी पण प्रसंगोपात्त कठोर भाषा, हृदयभेदक प्रसंग, भावनांचा हृदयस्पर्शी आविष्कार, इ० गुणांमुळें त्यांच्या कादंबऱ्या आकर्षक झाल्या आहेत. **वि० स० खांडेकर** यांच्या हृदयाची हाक, कांचनमृग, दोन ध्रुव, उल्का, ह्या कादंबऱ्या जीवन व कला यांचा परस्परसंबंधदर्शक आहेत. त्यांच्या कादंबऱ्यांत उत्तानपणा आढळत नसून, उत्कृष्ट उपमादिकांनीं खच्चून भरलेली भाषा, व लालित्य हे गुण आढळतात. **प्रो० भाटे** यांनीं ' प्रेम कीं लौकिक ' ही आत्मवृत्तपर कादंबरी लिहिली आहे. तींत कादंबरीमय आत्मवृत्त रेखाटण्यांत स्वसमर्थनार्थ ' जुन्या ' वर वाटेल ते आरोप लादण्याचा हेतु तिऱ्हाइताच्या ध्यानांत आल्यावांचून राहत नाहीं. **तात्यासाहेब केळकर** यांनीं ' नवलपूरचा संस्थानिक ' ही उत्कृष्ट राज्यघटनेच्या ध्येयानिदर्शक अशी कादंबरी लिहून, त्याही क्षेत्रांत प्रवेश केला आहे. नुकतीच त्यांनीं 'बलिदान' ही एक कादंबरी लिहिली आहे. **दत्तोपंत तुळजापूरकर** यांनीं ' माझें रामायण ' ही एक उत्कृष्ट कादंबरी लिहून, तत्कालीन अनेक चळवळींचा इतिहासच जणुं कांहीं त्यांत गुंफला आहे. शेवटीं त्यांनीं ' आदर्शमासिका'च्या नादीं लागून, एका पाताळयंत्री तरुणाच्या हातून फसणाऱ्या नायि-

केला कोटांतून सोडविलें आहे, तेथें त्यांचें कायदेपंडितत्व प्रत्ययास आल्यावांचून राहत नाहीं. व्यापकपणा हा त्यांच्या कादंबरीचा विशेष गुण होय. **रा० भोपटकर** यांची 'मृत्यूच्या मांडीवर' ही कादंबरी हल्लींच्या तरुणांचें पौरुषात्मक आयुष्य कसें असावें, याची निदर्शक आहे. रा० **निरंतर** यांनींही 'जीवननृत्य' ही मनोविश्लेषणात्मक कादंबरी लिहिली आहे.

**प्रो० आळतेकर** यांनीं अपराध कोणाचा, शंभुनाद, मुक्तबंध, ह्या कादंबऱ्या लिहिल्या आहेत. **शिखरे** यांची 'थोरली आई' (मातृभूमि) ही राजकारणविषयक कादंबरी आहे. 'महाराष्ट्रकुटुंबमालें'तून **ना० वि० कुळकर्णी** यांनीं मजूर, शिपाई, इ० दहा बारा कादंबऱ्या लिहिल्या आहेत. ते आपल्यास 'गरीब लोकांचे गरीब लेखक' म्हणवितात. उद्यान मासिकाचे संपादक कै० **ग० वि० कुळकर्णी** यांनीं कर्मसंन्यास, जन्मठेप, चंद्रचूड, इ० कादंबऱ्या लिहिल्या आहेत. यांशिवाय '**सहकारी कृष्ण**' ऊर्फ कृ० अ० एकबोटे यांनीं 'शापित महाराष्ट्र' वगैरे पंधरा वीस लहान लहान कादंबऱ्या लिहिल्या आहेत, त्यांतील चित्रण वाचकांसही स्वानुभवाचें असें वाटते. **दातारशास्त्री** यांचीं रेनाल्डस्च्या कादंबऱ्यांचीं 'इंद्रभुवनगुहा' इ० रूपान्तरें, आणि 'सरसवाङ्मयरत्नमाला' व 'सुरसग्रंथमाला' इ०नीं मराठी कादंबरी-वाङ्मयांत चांगलीच भर घातलेली आहे; व त्यांनीं बरेच नवीन लेखक उदयास आणिले आहेत.

विदर्भांत हरीभाऊंप्रमाणे किंचित्काल लौकिक पावलेले **बाळकृष्ण संतुराम गडकरी** हे होत. यांचा 'सुधारणेचा मध्यकाल' जेव्हां प्रसिद्ध झाला, तेव्हां त्यांच्याविषयीं लोकांस उदयोन्मुख नवा कादंबरीकार म्हणून बरीच आशा उत्पन्न झाली होती, परंतु ते आतां मागेंच पडले आहेत. त्यांच्या 'पुष्पमाला' व 'वृंदा' एवढ्याच आणखी कादंबऱ्या प्रसिद्ध झालेल्या आहेत. **साहित्याचार्य तात्यासाहेब कोल्हटकर** यांच्या 'दुटप्पी कीं दुहेरी' व 'श्यामसुंदर' अशा दोन कादंबऱ्यांत अनुक्रमें राजकीय व सामाजिक ध्येयवाद आढळतो. त्यांच्या बुद्धिप्रधानतेमुळें ह्या कादंबऱ्या थोड्या बोजडच उतरल्या आहेत; तरीपण भाषेच्या दृष्टीनें त्या अमूल्यच ठरतात यांत शंका नाहीं. **पु० य० देशपांडे** हे नवमतवादी नवीन कादंबरीकार आतां पुढें आले

आहेत. त्यांच्या ‘ बंधनाच्या पलीकडे ’ ह्या कादंबरीनें बरीच खळबळ उडवून दिली होती. ‘ सुकलेलें फूल ’ व ‘ सदाफुली ’ ह्या त्यांच्या आणखी दोन कादंबऱ्या आहेत. भावाविष्करण व भाषासौष्ठव हे त्यांच्या कादंबरीचे विशेष होत. यांच्याप्रमाणेंच दुसरे एक खंदे लेखक **ग० त्र्यं० माडखोलकर** यांनीं ‘ मुक्तात्मा ’ व ‘ भंगलेलें देऊळ ’ ह्या दोन कादंबऱ्या लिहून, त्याही क्षेत्रांत स्पृहणीय यश संपादन केलेलें आहे. यांची भाषा अलंकारांनीं आणि तत्त्व-सिद्धान्तांनीं खच्चून भरलेली असते. ‘मुक्तात्मा’ ही कादंबरी राजकीय विषया-संबंधीं मराठींत लिहिलेली पहिलीच आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं !

बडोद्याचे वकिली–साहित्यिक **वा० वि० जोशी** यांनीं ‘ जन्माचा बंदिवास,’ ‘ पराधीन ’ व ‘ रोहिणी ’ ह्या कादंबऱ्या लिहिल्या आहेत; त्यांत त्यांनीं स्त्रियांचें वकीलपत्र घेऊन त्यांची दुःखें वेशीवर टांगण्याचा प्रयत्न केला आहे; आणि त्यांतही त्यांचा वकिली बाणा चांगलाच प्रत्ययास येतो. हैद्राबादचे **दिवाकर कृष्ण केळकर** याची ‘ किशोरीचें हृदय ’ ही कादंबरी उल्लेखनीय आहे. त्याच्या लेखनांत खोल व नाजूक भावना आणि मनाचे पापुद्रे चांगले दाखविले जातात.

वामनराव जोशी यांची ‘ इंदु काळे व सरला भोळे ’ ही कादंबरी पत्ररूप आहे, तर ‘ देशसेविकेचें रहस्य ’ ही एक सत्याग्रहावरील छोटीशी कादंबरी नामांकित सात साहित्यिकांनीं, प्रत्येकाने पुढलें एकेक प्रकरण लिहीत लिहीत पुरी केली आहे; पण ही ‘ टूम ’ कांहीं साधलेली दिसत नाही.

जुन्या स्त्री-लेखिकांत **काशीताई कानिटकर** यांची ‘ पालखीचा गोंडा ’ ही कादंबरी ध्येयात्मक व स्त्रियांविषयींच्या जिव्हाळ्यानें लिहिलेली असल्यानें उल्लेखनीय आहे.

**विभावरी शिरूरकर** (?) ह्यांनीं अत्यन्त नाजूक हातानें लिहिलेली ‘ हिंदोळ्यावर ’ ही कादंबरी कलेच्या दृष्टीनें उत्कृष्ट असून, तींत ‘ सदभिरुचीला धक्का बसेल असें एक वाक्यही काढून दाखवितां येणार नाहीं ’ हें म्हणणेंही यथार्थच आहे. **कमलाबाई बंबेवाले** यांची ‘ बंधमुक्ता ’ ही घटस्फोटाच्या प्रश्नावर लिहिलेली कादबरी, **शांताबाई नाशिककर** यांचा ‘ लग्नाचा बाजार ’ ही हिंदु स्त्रियांचें दुबळें जीवन चितारणारी कादंबरी, **इंदिराबाई सहस्रबुद्धे** यांची ‘ केवळ ध्येयासाठीं ’ ही विवाहसंस्थेची

अनावश्यकता प्रतिपादन करणारी कादंबरी, **आनंदीबाई जयवंत** यांची ' जगाशीं बंडखोरी ' ही कादंबरी, **कुमुदिनी प्रभावळकर** यांच्या अनियमित जग, शकुनी मोहोर, कर्तव्याची जाणीव व निर्माल्याची कळी, ह्या कादंबऱ्या; **गीता साने** यांच्या लतिका, हिरवळीखालीं, वठलेला वृक्ष, ह्या कादंबऱ्या; इ० स्त्री–लेखिकांच्या कादंबऱ्या उल्लेखनीय आहेत.

मराठींतील हल्लींचे अनेक वाङ्मयप्रकार बोलून चालून परकीय वाङ्मयाच्या अवलोकनानें निर्माण झालेले असल्यानें, त्यांत कलेचें संपूर्ण सौंदर्य व सर्वांगीणत्व उतरलेलें नाहीं, यांत आश्चर्य नाहीं. ह्या दृष्टीनें मराठी कादंबऱ्यांतील पात्रें, वर्णनें, विचार, दृश्यें, हीं सर्व एकांगी, एकजिनसी, एकवर्गीय व एकाच प्रेमविषयक केंद्राभोंवतीं घुटमळत असलेलीं आढळतात; त्यांतील अनुभव व निरीक्षण हीं फारशीं विस्तृत नसतात; विषयवैचित्र्यही नाहीं: हे दोष कबूल केले पाहिजेत.

## मराठी लघुकथा

तेराव्या शतकांतील 'पंचतंत्रा'नंतर एकोणिसाव्या शतकाच्या मध्यन्तरीं वेताळपंचविशी, सिंहासनबत्तिशी, शुकबहात्तरी, बाळमित्र, बाळकथा, हितोपदेश, बादशहा व बीरबल, आरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी, इसापनीति, इ०नीं महाराष्ट्रीय जनतेचें प्रारंभीं मनोरंजन केलें; परंतु पाश्चात्यांच्या अनुकरणानें मराठी लघुकथेला आतां कोठें कलात्मक स्वरूप येऊं लागलें असून, ती अगदीं बाल्यावस्थेंत आहे.

प्रो० ना० सी० फडके यांनीं 'प्रतिभासाधनां'त लघुकथेची व्याख्या पुढीलप्रमाणें प्रतिपादिली आहे. "शक्य तितक्या परिणामकारक रीतीनें आणि शक्य तेवढ्या कमी पात्र–प्रसंगांच्या साह्यानें सांगितलेली एकच गोष्ट म्हणजे लघुकथा." अर्थात् आकर्षक आरंभ, निवडक कथानक, त्यास अनुरूप मोजकीं तेवढींच पात्रें, योग्य वर्णनानें उत्पन्न केलेलें रसानुरूप वातावरण, एकाच कल्पनेचा किंवा प्रसंगाचा उठाव, तोलून मापून योजिलेली भाषा, यथार्थ मथळा व उत्कृष्ट परिणामकारी शेवट, इतक्या गोष्टींची लघुकथेंत आवश्यकता असते. म्हणजे पानांचें लघुप्रमाण हेंच काय तें लघुकथेचें लक्षण नसून, वरील तंत्रें पूर्णाशानें संभाळलीं जाणें हें लघुकथेचें तंत्र होय.

ह्या दृष्टीनें पाहतां, प्रारंभीं हरीभाऊ आपटे, न० चिं० केळकर, श्री० कृ० कोल्हटकर, शि० म० परांजपे, प्रो० वा० म० जोशी, इ० साहित्याचार्यांनीं व काशिबाई कानिटकर, सौ० गिरिजाबाई केळकर, सौ० आनंदीबाई शिर्के ह्या सुप्रसिद्ध लेखिकांनीं अनेक सुंदर व मनोरम कथा लिहिल्या असल्या—आणि क्वचित् त्यांपैकीं एकादी लघुकथेच्या साच्यांत बसत असली—तरी वरील अनेक तंत्रांच्या संयमाभावामुळें त्यांस 'स्फुट गोष्टी' च म्हणावें लागेल. त्यांच्याप्रमाणेंच 'सहकारी कृष्ण' एकबोटे यांच्या कुटुंब-शिक्षण-मालेंतील गोष्टी, वि० सी० गुर्जर, वा० गो० आपटे, कृ० के० गोखले, यांच्या रूपान्तरित गोष्टी, वरील सदरांतच जातील.

जाणून बुजून 'लघुकथेचे तंत्र' संभाळून लिहिण्याचा प्रयत्न **प्रो० फडके** आणि **वि० स० खांडेकर** यांनीं केला. त्यांतही खांडेकर यांनीं आपल्या अलीकडच्या कथासंग्रहांत समान्तर पद्धति, पत्रलेखन पद्धति, नागमोडी पद्धति, दैनंदिनी पद्धति, परावर्तनी पद्धति, असे लघुकथेचे नवे नवे निरनिराळे नमुनेही पुढें मांडले; आणि रम्यकथा, बालकथा, अद्भुतकथा, लोककथा, नवलकथा, सत्यकथा, शोककथा, शब्दचित्रें, व्यंगचित्रें, नवलिका, मरीचिका, इ० प्रकार लघुकथेमध्यें निर्माण झाले.

फडके-खांडेकरांशिवाय वरेरकर, काणेकर, ना० ह० आपटे, य० गो० जोशी, कॅप्टन लिमये, कुमार रघुवीर, 'एक विद्यार्थी,' प्र० के० अत्रे, सौ० क्षमाबाई राव, सौ० कमलाबाई टिळक, बडोद्याचे चिं० वि० जोशी, व प्रो० दांडेकर, पु० ग० सहस्रबुद्धे, गुर्जर, वि० बा० आंबेकर, इ० नांवें लघुकथा-लेखकांत प्रामुख्यानें सांगतां येतील.

प्रारंभी बोधकथा व नीतिकथा, नंतर रम्यकथा व अद्भुतकथा, नंतर समाजचित्रें व मतप्रचारात्मक कथा, त्यानंतर व्यंगचित्रे व वास्तवकथा, अशा प्रकारें ह्या कथा-प्रकाराचा उत्तरोत्तर विकास झालेला आढळतो. '**विभावरी शिरूरकर**' यांच्या स्त्री-मनोविश्लेषणात्मक गोष्टी ह्या कथास्वरूप असल्या, तरी त्या 'लघुकथा' नव्हेत; लघुकथेच्या सर्व अंगोपांगांनीं परिपूर्ण अशा लघुकथा मराठींत अजून फारशा निर्माण होऊं लागल्या नाहींत; तरी मासिकें, साप्ताहिकें, इ० तून दर महिन्यास सुमारें **दोन हजार** एवढें लघुकथांचें जबर पीक मराठींत होऊं लागलें आहे.

## मराठी नाटकें

**विष्णुदास भावे** हे मराठी नाट्यकलेचे जनक होत. सन १८४२–४३ सालीं सांगलीस श्री० आप्पासाहेब पटवर्धन यांच्या प्रोत्साहनानें व त्या काळीं रंगभूमीवर कानडी नाटक–मंडळ्या जे प्रयोग करीत त्यांच्या प्रेरणेमुळें, कल्पक विष्णुदासांनीं आपलीं पौराणिक नाटकें रंगभूमविर करण्यास सुरुवात केली. सुभद्राहरण, कच-देवयानी, नारदाची नारदी, हरिश्चंद्र, द्रौपदीवस्त्रहरण, राम–रावण–युद्ध, असल्या प्रकारच्या कथानकांच्या आधारावर फारसें पाठ न करितां समयीं सुचेल तें बोलून वेळ मारून नेण्यांत त्या काळचे पार्टी तयार असत. गाण्याचा मक्ता एकट्या सूत्रधाराकडे असे. अरण्य व रंगमहाल यांतील प्रसंगां-करितां क्वचित् उलट सुलट पडदे खपत. स्त्रियांचीं कामें तरुण पोरांकडे असत; आणि हा धांगडधिंगा कसा व किती वेळ चालेल, याला कांहीं ताळतंत्र नसे. हीं नाटकें मनोरंजन करीत, तरी त्यांपैकीं ग्रंथरूपानें प्रसिद्ध होऊन, वाङ्मयांत स्थान पटकावण्याचा मान कोणासच मिळण्यासारखा नव्हता. मराठी नाटकांचा आरंभेतिहास कळण्यापुरतें त्यांचें महत्त्व.

ह्या गणपती–सरस्वतीच्या आशीर्वादानें सुरुवात होणाऱ्या ' अललल डुर्र ' पौराणिक यंत्र–तंत्र–शास्त्र-कलाविहीन नाटकांचें युग संपल्यानंतर वाङ्मयांत ज्यांना श्रेष्ठ प्रकारचें स्थान मिळेल अशीं गद्य-पद्यात्मक रूपान्तरित नाटकें उदयास आलीं; आणि कॉलेजांतील हौशी तरुणांकडून संमेलन-प्रसंगीं त्यांच्या होणाऱ्या प्रयोगांनीं रसिक–जन–मनें अगदीं मोहून गेलीं. **गोडबोले, चिपळूणकर, राजवाडे, लेले**, प्रभृति शास्त्री मंडळी आणि **कीर्तने, महाजनि, रानडे**, प्रभृति ऑंग्लविद्याविभूषित मंडळी यांचीं शाकुंतल, मृच्छकटिक, वेणीसंहार, मुद्राराक्षस, व अथेल्लो, तारा, जयपाळ, इ० नाटकें त्या काळीं गाजलीं; आणि त्यांमुळें पडदे, पोशाख, देखावे, नाट्यप्रसंग, यांतही नावीन्य व विविधता आली. मुंबईंत एल्फिन्स्टन कॉलेजांत केलेल्या शाकुंतलाच्या इंग्रजी प्रयोगासाठीं शकुंतलेकरितां मद्रासेहून ४०० रु० चीं वल्कलें व तिसऱ्या अंकांतील तिच्या पुष्पशय्येकरितां पुण्याहून फुलांच्या दोन वाघिणी नेल्या होत्या असें म्हणतात! (अ० म० सा० पृ० १४०).

यानंतर **किर्लोस्कर, देवल, कोल्हटकर, खाडिलकर, गडकरी, वरेरकर, अत्रे**, हे प्रमुख नाटककार त्या त्या कालांत आपापल्या नाट्य-

कृतींनीं चमकले. प्रथम **सोकर बापूजी त्रिलोकेकर** यानीं पात्रानुरूप पद्यांची विभागणी करून आपलीं नल-दमयंती, हरिश्चंद्र, इ० नाटकें १८७९ च्या सुमारास पुढें आणून संगीत नाटकांचा पाया घातला असला, तरी नाट्याचार्य **बलवंत पांडुरंग किर्लोस्कर** यांनीं आपल्या नाटकांनीं संगीताला मुकुटस्थानीं बसविण्यांत फार मोठें यश संपादिलें; म्हणून त्यांसच मराठी संगीत नाट्याचे जनक समजतात. यांनीं शाकुंतल, सौभद्र व रामराज्यवियोग हीं उत्कृष्ट अशीच नाटकें लिहिलीं; पण त्यांतही सौभद्र, आत्मगुणांमुळ अद्यापि टिकून राहिलें आहे. दुसरे नाटककार **गोविंद बल्लाळ देवल**. यांच्या मृच्छकटिक, शारदा, शापसंभ्रम, संशयकल्लोळ, इ० सुंदर नाट्यकृति होत. शारदा ही त्यांची सामाजिक कृति साध्या विनोदात्मक भाषेनें व सोप्या अर्थयुक्त पद्यांनीं बरीच टिकून राहिली. यानंतर **श्रीपाद कृष्ण कोल्हटकर** पुढें आले. त्यांनीं वीरतनय, गुप्तमंजूष, मतिविकार, वधूपरीक्षा, इ० बरींच नाटकें लिहिलीं. त्यांच्या नाटकांतील मुख्य गोष्टी म्हणजे सामाजिक व्यंगदर्शन, विनोद, चमत्कृति व मनोहर गुजराती-पार्शी चालींनीं पद्यांची सजावट, इ०. भाषा कितीही बोजड व कृत्रिम असली, तरी कोल्हटकरांनीं कांहीं काळ आपल्या कृतींनीं लोकांस चांगल्या प्रकारें रंजविलें यांत शंका नाहीं. यानंतर **कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर** यांनीं कीचकवध, भाऊबंदकी, बायकांचें बंड, मानापमान, सत्त्वपरीक्षा, विद्याहरण, इ० चौदा नाटकें लिहिलीं. परिमित, भूमिका, विविध रसांचा उत्कर्ष, संयम, आटोपशीर मांडणी व परिणामकारक संवाद, यांमुळें त्यांचीं नाटकें उच्च दर्जाचीं झालीं. आरंभीं 'कवि कृष्णा'ला नाट्यकलेनें माळ घातली असली, तरी त्यांचीं पुढील नाटकें तितकीं सरस उतरलीं नाहींत. **शिवरामपंत परांजपे, श्री० कृ० कोल्हटकर**, इ०च्या मागाहूनच्या कृतींत असाच प्रकार आढळतो. याच काळांत **केळकर** यांचीं तोतयाचें बंड, चंद्रगुप्त, अमात्यमाधव, कृष्णार्जुनयुद्ध, इ० नाटकें निर्माण झालीं व त्यांनींही भाषाविलास, नाट्यकौशल्य व विनादचातुर्य, यांयोगें कांहीं काळ लोकरंजनाचें उत्कृष्ट कार्य केलें.

**वासुदेवशास्त्री खरे** यांच्या गुणोत्कर्ष, तारामंडळ, शिवसंभव, इ० नाटकांमधील जोरदार, सफाईदार भाषा व नाट्यरचनाचातुर्य यांमुळें तीं नाटकें चांगलीं रंगलीं. **औंधकर** यांच्या बेबंदशाही व आग्र्याहून सुटका या नाटकांत

उत्कट प्रसंगांची गुंफण, विरोधी स्वभावांचें चित्रण, अनुकूल भाषेची घडण, व अनुभवामुळें रंगभूमीस अनुकूल अशी सजावट, या गोष्टी उत्कृष्ट साधल्या आहेत. शाहूनगरवासी नाटक मंडळीचे कांहीं नाटककार–हॅम्लेटचे **आगरकर**, त्राटिकेचे **केळकर**, इ०च्या कृतींमध्यें रूपान्तराचें उत्कृष्ट कौशल्य आढळतें. **माधवराव जोशी** यांचें म्युनिसिपालिटी नाटक यथादर्शन चित्रणाच्या दृष्टीनें चांगलें आहे; पण त्यांच्या इतर कांहीं नाट्यकृति करमणूक करीत असल्या तरी सदभिरुचीस धरून असतात असें म्हणवत नाहीं. **राणे** यांच्या संत तुकाराम, दामाजी, इ० कृतींमध्यें भाविक व सामान्य दर्जाच्या विशिष्ट वर्गाला आवडणारी अद्भुतता व तास तास चालणारे अप्सरादिकांचे नाच असल्यामुळें, त्यांनींही उत्तम रंजन होतें; पण त्या नाटकांना किंवा **पाटणकरांच्या** सत्यविजयादि गद्य-पद्य कृतींना वाङ्मयांत उच्च स्थान प्राप्त होण्यासारखें नाहीं. वीर **वामनराव जोशी** यांच्या राक्षसी महत्त्वाकांक्षा, रणदुंदुभि, इ० नाटकांतून वीररस प्रत्येक शब्दा-शब्दांतून नुसता ओथंबून राहिला आहे; त्याचप्रमाणें करुण-रस निर्माण करण्यांतही त्यांचा हातखंडा आहे. आपल्या कृतीच्या द्वारें स्वातंत्र्याचा संदेश देण्याचे ध्येय त्यांच्यासमोर असल्यामुळें ते क्वचित् कलेची गळचेपी करण्यास मागें-पुढें पाहत नाहींत; तरी एका काळीं त्यांनीं महाराष्ट्राची रंगभूमि जिंकली होती, ह्यांत शंका नाहीं. यांच्याप्रमाणेंच विदर्भातील दुसरे सुप्रसिद्ध नाटककार **वामणगांवकर** यांचीं आत्मतेज, धनुर्भंग, इ० नाटकेंही त्या त्या कालात गाजलीं. शिरपूरचे **शं० प० जोशी** यांची विचित्रलीला इ० नाटकें वैचित्र्यपूर्ण आहेत.

हे नाटककार सोडले की, कोल्हटकर–खाडिलकर–केळकर–खरे यांच्या मागून कोल्हटकर–शिष्य **गडकरी** व गडकरी–शिष्य **अत्रे** ही जोडी आपल्यापुढें उभी राहते. **गडकऱ्यांचीं** प्रेमसंन्यास, पुण्यप्रभाव, एकच प्याला व भावबंधन, हीं नाटकें त्यांची कीर्ति अजरामर करणारीं आहेत. त्यांच्या कृतींत पुष्कळदां काव्यमय भाषा आढळत असली, गोकुळासारखा विसरभोळा गृहस्थ कोट्यांवर कोट्या करीत असला, तरी त्यांच्या कांहीं पात्रांचें चित्रण दुसरी तोड नाहीं इतकें उत्कृष्ट साधलें आहे. एकच प्याल्यांतील सिंधु खरी आर्य-स्त्री दाखविली आहे; तळीराम हें अट्टलाचें दारूबाज

उत्कृष्ट चित्रण आहे; त्यांच्या इंदु-बिंदु काहीं कुरूप स्त्रियांना वयोक्तक टीका-स्पद वाटल्या, तरी त्यांचें चित्रण यथातथ्य नाहीं असें कोण म्हणेल? तात्पर्य, अतिशयोक्तीवर आधारलेला भरपूर विनोद, विसंगतियुक्त उलटसुलट प्रसंगांमुळें टिकविलेली उत्कटता, सामाजिक विषयांनीं भावनांना दिलेले धक्के, आणि हें सर्व रचण्याचें कौशल्य, यांमुळें त्यांच्या नाटकांना विपुल लोकप्रियता लाभली हें साहजिकच आहे.

यानंतर आजकालचे दुसरे नाटककार **वरेरकर**. यांचीं कुंजविहारी, हाच मुलाचा बाप, सत्तेचे गुलाम, सोन्याचा कळस, स्वयंसेवक, इ० कालानुसारी चळवळीस अनुसरून व मतप्रचारकाची भूमिका घेऊन लिहिलेलीं नाटकें पुष्कळच यशस्वी झालीं आहेत, यांत शंका नाहीं. त्यांनीं गडकऱ्यांप्रमाणें विधवापुन-र्विवाह किंवा मद्यपानाचा दुष्परिणाम एवढेच विषय रेखाटले नसून, स्त्रियांचीं व गरिबांचीं दुःखें वेशीवर टांगणें; हुंडा, वगैरे अनेक सामाजिक प्रश्नांना चालना देणें आणि सदभिरुचीस पोषक अशा सुटसुटीत, सुबोध व चटकदार संवादांनीं नाट्यकृतीस उठावदारपणा आणणें; ह्या गोष्टी साधल्यामुळें त्यांच्या नाटकांचें वैशिष्ट्य कायम राहील. **अत्रे** यांचीं साष्टांग नमस्कार, घराबाहेर, भ्रमाचा भोपळा, लग्नाची बेडी आणि नुकतेंच नवीन निघालेलें वन्दे भारतम्, इ० नाटकें एकामागून एक रंगभूमीवर येत आहेत; व त्यांत समाजापुढील नवीन सामाजिक प्रश्नांची चर्चा उपस्थित केली आहे. 'माझीं नाटकें लोकांना मन-मुराद हंसण्याकरितां मीं लिहिलीं; लोक पोट धरधरून हसतात ना? बस झालें' असें ते म्हणतात, त्याप्रमाणेंच त्यांचीं नाटकें आहेत. तसेंच, **वर्तकांचें** आंधळ्यांची शाळा हें नाटक त्यांनीं नवीन पाश्चात्य नाट्यतंत्रास अनुसरून— म्हणजे नाटकांत समाजाचें वस्तुदर्शन जसेंच्या तसें हवें; एकच काल व एकच प्रसंग हवा; सुखान्तच नाटक हवें असे नसून जसा घडतो तसा प्रकार व तशी स्वाभाविक भाषा असावी; एक-प्रवेशीच अंक असावा; स्त्रियाच आपलीं आपलीं कामें करीत आहेत असें समजून त्यांचें चित्रण तदनुरूपच असावें; त्याचप्रमाणें रंगभूमीची कृत्रिम सजावट बिलकूल नसावी;—इ० तंत्रें संभाळून लिहिलें आहे असें ते म्हणतात. शेवटचे हे दोन प्रकार मराठींत कितपत टिकाऊ व चिरपरिणामी होतात, तें पुढें काल ठरविणार. सध्यां तरी कमी वेळ, कमी पैसा व भरपूर मनोरंजन, यांयोगें बोलपटांनीं मराठी रंगभूमीला आसन्नमरण

स्थितीस आणून सोडलें आहे, एवढें खरें. या प्रसंगाशीं टक्कर देण्याकारितां कांहीं नाटिका निघाल्या, पण त्यांत कोणतेच गुण नसल्यानें त्या अ-यशस्वी ठरल्या; अशी आज मराठी रंगभूमीची स्थिति आहे.

## नाट्यछटा

हें नाटकाचेंच लहानसें भावंड आहे. एकच पात्र आपले विचार सागत असतें; किंवा दुसरें कोणी आपल्याशीं बोलत आहे असें कल्पून, जणुं काहीं त्याच्याशीं संभाषण करीत आहे, अशा आविर्भावानें बोलत असतें; ह्या प्रकारास 'नाट्यछटा' असें म्हणतात. हा प्रकारही इंग्रजीवरूनच व अगदीं अलीकडे मराठींत आला आहे. लघुकथेप्रमाणेंच यात एकच प्रसंग उत्कटत्वानें श्रोत्यांपुढें मांडावयाचा असतो, परंतु तो दृश्यस्वरूपांत. लघुकथेंत नियमित पण अनेक पात्रें चालतात; नाट्यछटेंत एक किंवा दोनच पात्रें चालूं शकतात; तरीही बोलणारें पात्र एकच असतें. एकच प्रसंग किंवा भावना यांचा उठाव दोहोंत साधावयाचा असतो, परंतु लघुकथेच्या लांबीला निश्चित मर्यादा घालतां येणार नाहीं; तसे नाट्यछटेचें नाहीं. नाट्यछटा अगदींच लहान असल्यास रसपरिपोष होत नाहीं व फार मोठी असेल तर रसभंग होण्याचा संभव असतो. दोहोंत संयमाची व रेखीव तोलीव भाषेची आवश्यकता असते; तरी लघुकथा हा एक लेखन-प्रकार असल्यानें, त्यांत लेखन-तंत्र संभाळलें म्हणजे पुरें असतें; परंतु नाट्यछटा हा भाषण-प्रकार असल्यानें, पात्राच्या हालचालीबरोबर किंबहुना श्वासाश्वासाबरोबर परिणाम भिन्न प्रकारचा होण्याचा संभव असतो; म्हणून लघुकथा-लेखकापेक्षां नाट्यछटा-लेखकाची जबाबदारी अधिक असते; आणि त्यांतच त्याची खरी कला दिसून येते. संस्कृत नाटकांतून 'भाण' हें पात्र अशाप्रकारें एकाकी बोलणारें असें आढळून येतें.

**'दिवाकर'** म्हणजेच **शंकर काशीनाथ गर्गे** (१८८९–१९३१). हे हा प्रकार मराठींत आणणारे पहिले लेखक होत. ते पुण्याच्या नूतन मराठी विद्यालयांत शिक्षक होते. शिक्षण स्कूलफायनलपर्यंत. तथापि प्रो॰ वासुदेवराव पटवर्धन यांजवळ त्यांनीं इंग्लिश नाट्य-छटा-लेखकांच्या ग्रंथांचें सूक्ष्म अध्ययन केलें. तात्यासाहेब केळकरांना त्यांच्या नाट्यछटा आवडल्या व केसरींत त्यांनीं त्यांपैकीं कांहीं प्रसिद्ध केल्या. आतां तर नवोदित लेखकांनीं ह्या प्रकाराचें भराभर अनुकरण करण्यास सुरुवात केली आहे. दिवाकर एकेक शब्द किंवा

एकेक विराम देखील श्रोत्यांच्या मनावर काय परिणाम करील याची चिकित्सा करून मगच आपला लेख सजवीत. त्यांच्या नाट्यछटांचा शेवट गरीबांचें दैव-दुर्विलसित हृदयद्रावक रीतीनें रेखाटण्यांत होतो.

## मराठी इतिहास

पाश्चात्यांचे किंवा मुसलमानांचे इतिहास–लेखनाच्या दृष्टीनें जे प्रयत्न झाले, तसे निवृत्तिमार्गी हिंदवासीयांकडून झाले नाहींत; त्याचप्रमाणें मराठींतही इतिहास-लेखन पूर्वी नाममात्रही न होतां, अव्वल इंग्रजीपासूनच त्यास जुजबी रीतीनें सुरुवात झाली असें म्हणावें लागतें. ( पेशवे कालांत झालेल्या इतिहास–वाङ्मयाचा मागें पृष्ठें ३३-३४ यांत उल्लेख आलाच आहे ).

साताऱ्चे **श्रीमंत छत्रपति प्रतापसिंह महाराज** ह्यांनीं **मल्हार रामराव चिटणीस** यांजकडून मराठ्यांच्या इतिहासासंबंधीं कांहीं बखरी लिहून घेण्याचा प्रयत्न केला. शास्त्रीय ऐतिहासिक ग्रंथांचें अचूकपणा इ० गुण त्यांत आढळले नाहींत, तरी रसाळ कथा ह्या दृष्टीनें त्या वाचाव्याशा वाटतात.

ग्रँट डफ, एल्फिन्स्टन, माल्कम, इ० नीं प्रारंभीं मराठ्यांचे इतिहास इंग्रजी-मध्यें सजाविले; आणि त्यांचींच आपल्या लोकांनीं केलेलीं भाषान्तरें किंवा रूपान्तरें कित्येक वर्षें अभ्यासलीं जात होतीं. आज तीं पाहतां अगदींच क्लिष्ट वाटतील. ग्रँट डफच्या ( History of the Mahrattas ) ह्या ग्रंथाचें **कप्तान केपनि व बाबा साने** ह्यांनीं मराठींत केलेलें भाषान्तर (सन १८२९) हा मराठी इतिहास-लेखनाचा केवळ श्रीगणेशा होता. **लोकहितवादी** यांनीं बऱ्याच ऐतिहासिक दन्त-कथात्मक गोष्टी जमा करून प्रसिद्ध केल्या, पण ते इतिहास-ग्रंथ नव्हेत; तथापि त्यांतील माहिती अद्यापि वाचनीय अशीच आहे.

मराठ्यांचा पहिला इतिहासकार ह्या नात्यानें ग्रँट डफचें जरी महत्त्व असलें, तरी **नीळकंठराव कीर्तने** ह्या विद्यार्थ्यानें कॉलेजांत असतांच पंख फुटूं लागतात न लागतात तोंच डफच्या विधानांवर साधार टीका करून त्याचा ग्रंथ अपुरा व अधुरा असल्याची प्रथम धीटपणें घोषणा केली ( १८६८ ). **विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या** निबंधमालेंतील ‘ इतिहास ’ ह्या विषयावरील निबन्धामुळें आणि **महादेव गोविंद रानडे** यांच्या ‘ Rise of the Maratha power ’ ह्या इंग्रजी ग्रंथामुळें, तसेंच **शालिग्राम** यांच्या संग्रहित पोवाड्यांमुळें, महाराष्ट्रांत कांहीं जागृति झाली. ह्यांपैकीं माधवराव रानडे ह्यांस मराठी इति-

हासाचे द्रष्टे आचार्य म्हणतात, तें त्यांच्या वरील चतुरस्र ग्रंथावरून यथार्थच ठरेल. ह्या पुस्तकाचें ' मराठी सत्तेचा उत्कर्ष ' हें भाषान्तर झालेलें आहे.

रावबहादुर **काशीनाथ नारायण साने** ( १८५१–१९२७ ). यांना यानंतर मराठी इतिहास-संग्राहक ह्या नात्यानें मोठा मान देणें अवश्य आहे. त्यांनीं पूर्वींचें बखरींचें वाङ्मय ठिकठिकाणांहून महाप्रयासानें जमवून, अनेक प्रतींशीं ताळ-मेळ पाहून, विपुल टीपा देऊन, प्रसिद्ध केलें. इतिहास-संशोधनाची शास्त्रीय दृष्टि त्यांना नसली, तरी त्यांनीं आपल्याकडून शुद्धाशुद्धतेसिहत कोणत्याही गोष्टीची चालढकल केली नाहीं. ' काव्येतिहाससंग्रह ' मासिकांत व अन्य प्रकारें त्यांनीं पेशव्यांची बखर; भाऊसाहेबांची बखर; पानिपतची बखर; सभासदकृत श्रीशिवछत्रपतींचें चरित्र; संभाजी, राजाराम, शाहू, इ०चीं चरित्रें; चिटणीसविरचित श्रीशिवछत्रपतींचें सप्तप्रकरणात्मक चरित्र ( पुनर्मुद्रण ); राजव्यवहारकोश; इ० विपुल वाङ्मय प्रसिद्ध केलें.

**वासुदेव वामनशास्त्री खरे** ( पृ० ६० ) यांनीं मिरज येथील पटवर्धन दफ्तरांतील सुमारें चार लक्ष कागद वाचून, त्यांपैकीं पांच-सात हजार कागद निवडून, मान मोडून नकलून, त्यांचे सारांश काढून, संगतवार व प्रकरणवार हकिकती जुळवून, सुमारें ४० वर्षें विनावेतन खपून, कोणाजवळही तोंड न वेंगाडतां अभिमान व बाणा कायम ठेवून, प्रचंड उद्योग-सातत्यानें ऐतिहासिक कागदपत्रांचे सुमारें १२–१३ खंड प्रसिद्ध केले. इतिहास-क्षेत्रांत हें त्यांचें काम अपूर्वच होय. त्यांनीं नाना फडनविसाचें चरित्र, हरिवंशाची बखर, इ० आणखीही ग्रंथ लिहिले. यांच्या ग्रंथांवरून खास पेशव्यांची बाजू कळून येते. यांच्या साक्षेपास जगांत देखील क्वचितच तोड आढळेल.

रावबहादुर **दत्तात्रय बळवंत पारसनीस** यांचीही इतिहास-क्षेत्रांतील कामगिरी अशीच प्रचंड आहे. उद्योगी, हौशी, तरुण, भाषणानें दुसऱ्यावर छाप पाडणारा, अशा ह्या गृहस्थांचा पुण्याच्या ' पेशवे दफ्तरां'त प्रथम प्रवेश झाला. त्यांनीं मुंबईचे पुरुषोत्तम विश्राम मावजीशेट ह्या धनाढ्य गृहस्थांच्या साह्यानें पेशवे दफ्तरांतील पेशवे रोजनिशीचे १४।१५ खंड प्रसिद्ध केले आहेत. त्यांनीं सुमारें ८।१० हजार पत्रें निवडून नकलून ठेविलीं. सातारकर राजे, नाना फडनविसाचे वंशज, इ०कडून त्यांनीं अनेक महत्त्वाचे कागद व वस्तु विकत घेऊन त्यांचा संग्रह केला. विलायतेंतूनही त्यांनीं दुर्मिळ ऐतिहासिक पुस्तकें व

वस्तु आणिल्या. हातांनीं काढलेल्या जुन्या रंगीत चित्रांचा त्यांनीं संग्रह केला. ब्रह्मेंद्रस्वामींचें व झांशच्या राणीचें चरित्र, बाजिराव व चिमणाजी आपा यांचीं पत्रें, सवाई माधवरावांचा दरबार, इ० पुस्तकें प्रसिद्ध केलीं. त्यांचा सातारा येथील अमूल्य ग्रंथसंग्रह व वस्तुसंग्रह सरकारनें विकत घेऊन संरक्षिला आहे, तो पहाण्यासारखा आहे.

**विश्वनाथ काशीनाथ राजवाडे** (१८६४–१९२६). यांस इतिहासाचार्य म्हणण्यास हरकत नाहीं. पुणें येथील 'भारत-इतिहास–संशोधक-मंडळ' व धुळें येथील 'राजवाडे–संशोधन–मंदिर,' यवतमाळ येथील 'शारदाश्रम' संस्था व नागपूर येथील 'मध्यप्रांत-संशोधन–मंडळ,' ह्या संस्थांची प्रेरकशक्ति राजवाडे होत ह्यांत शंका नाहीं. 'मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें' ह्यावर त्यांनीं एकंदर बावीस खंड प्रसिद्ध केले. इतिहास-संशोधकाची विवेचक व सूक्ष्म दृष्टि, यांमुळें त्यांनीं आपल्या खंडांच्या प्रस्तावने-दाखल जे विस्तृत लेख लिहिले, त्यांवरून त्यांची प्रचंड व बहुधा अचूक अशी अनुमान व तर्कशक्ति प्रत्ययास येते. राजवाडे यांनीं महानुभावीय लिखाणाची किल्ली (पृ० १२) आपल्या बुद्धिसामर्थ्यानें शोधून काढून तें दालन त्यांनीं महाराष्ट्री-यांस खुलें केलें. त्यांनीं स्थापन केलेल्या पुण्याच्या इतिहास-संशोधक–मंडळांत अनेक ग्रंथ, कागदपत्रें, ताम्रपट, नाणीं, शिलालेख, वस्त्रें, पात्रें, शस्त्रें, चित्रें, व्युत्पत्ति, गाणीं, म्हणी, आख्यायिका, स्थल–वर्णनें, नकाशे, मूर्ति, इ० साहित्य जमवून, वर्णून, संरक्षून, विभागून, षड्विध पद्धतीनें पुढें ठेविलें आहे. राज-वाड्यांनीं स्वतः जमविलेला संग्रह धुळ्यासच राजवाडे संशोधन–मंदिरांत जपून ठेविला आहे. त्याच्या विविध कार्याचें नुसतें उल्लेखनही येथें पूर्णपणे करितां येणें अशक्य आहे. वेद–वेदांगें, महाभारत, पाणिनि, गणित, प्रमुख भौतिकशास्त्रें, लिपिशास्त्र, व्युत्पत्तिशास्त्र, फारसी, इ० चें त्यांनीं बारकाईनें अध्ययन केलें होतें, त्यामुळें त्यांस विविध व्यापक दृष्टि प्राप्त झाली होती व त्यांचें कामही भरदार असेंच झालें. राजवाड्यांच्या ऐतिहासिक लेखसंग्रहांच्या प्रस्तावना हल्लीं निराळ्या छापिल्या आहेत. त्याशिवाय राधा–माधव–विलास–चंपू, महिकावतीची बखर (मुकुंदराजी ?), जुनी ज्ञानेश्वरी, आणि मराठी छंद, इ० त्यांचे असंख्य लेख प्रसिद्ध झाले आहेत. त्यांनींच पुढील इतिहासप्रेमी मंडळी निर्माण केली.

मुंबईचे **राजारामशास्त्री भागवत** (१८५१-१९०८). हे राजवाड्याच्याच कालांतील दुसरे इतिहास-पंडित होते. दोघेही नैरुक्तिक, विक्षिप्त, सडेतोड, बाणेदार, मऱ्हाटी व मऱ्हाटे याचे जाज्वल्य अभिमानी व स्वतंत्र विचारसरणीचे होते; परंतु राजारामशास्त्री यांचें लेखन ब्राह्मणी काव्याच्या कल्पनांनीं व्याप्त व विक्षिप्त सिद्धान्तात्मक असल्यामुळें त्याचप्रमाणें तें राजवाड्याइतके विपुल व प्रभावी नसल्यामुळें टिकूं शकलें नाहीं. 'मराठ्यांसंबंधीं चार उद्गार' हें त्यांचें पुस्तक वरील गोष्टींची साक्ष देईल.

ठाण्याचे **विनायक लक्ष्मण भावे** (१८७१-१९२६). ह्यांची महानुभावीय वाङ्मयसंशोधनाची कामगिरीही अपूर्व आहे. मिठागराचा धंदा करीत असले, तरी यांची वाङ्मयेतिहासासंबंधीं आवड विलक्षण होती. 'महाराष्ट्र-सारस्वता' चे २ भाग त्यांच्या रसाळ लेखणीची व संशोधक वृत्तीची साक्ष देतात. त्यांनीं महानुभावीय वाङ्मयाच्या सुमारें ५००० ग्रंथांची यादीच प्रसिद्ध करून तें दालन उघडें केलें. नेपोलियनचें चरित्र, इ० त्यांचे आणखीही कांहीं ग्रंथ आहेत.

प्रो० **दत्तो वामन पोतदार**. हे पुण्याच्या इतिहास-संशोधक-मंडळाचे हल्लींचे आधारस्तंभच आहेत. राजवाड्यांप्रमाणेंच संसारांत गुरफटून न जातां आपल्या आवडत्या विषयाच्या सततोद्योगासाठीं म० शि० प्र० मं० मधून सेवानिवृत्त होऊन ते मंडळाचें काम साक्षेपानें करीत असतात. 'महाराष्ट्र-विद्यापीठा' चें कामही त्यांनीं सध्यां अंगावर घेतलेलें आहे. त्यांचें 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार' हें पुस्तक सन १८०० ते १८७५ पर्यंतच्या पाऊणशें वर्षांचा मराठी भाषेचा शोधनपूर्वक लिहिलेला इतिहासच आहे; त्यांत त्यांचा महाराष्ट्र-वाङ्मयेतिहासाविषयीं जाज्वल्य अभिमान व ओघवती भाषा हीं स्पष्ट दिसून येतात. भा० इ० सं० मं० नें गेल्या सुमारें २५ वर्षांत एक लाख रुपये खर्च करून, मंडळाची इमारत, वस्तुसंग्रहालय, हीं सरकार, विद्यापीठ व राजेरजवाडे ह्यांच्या मोठ्या मदतीशिवाय केवळ लोकाश्रयावर सिद्ध करून दाखविलीं आहेत. मंडळानें सुमारें ७५ ग्रंथ प्रसिद्ध केले असून, सुमारें ५० हजार कागद, चार-पांच हजार पोथ्या, एक हजार नाणीं, एक हजार बहुमोल चित्रें, आणि पांच-सहा हजार पुस्तकें, एवढा संग्रह मंडळामध्यें आहे.

रावसाहेब **गोविंद सखाराम सरदेसाई** (ज० १८६५).यांचें नांव मोठे मराठी इतिहास-संग्राहक ह्या नात्यानें घ्यावें लागेल. 'किति कठिण बडोद्याची चाकरी' करून, हल्लीं ते पुण्याजवळ कामशेत येथें असतात. बडोद्यास असतां मुसलमानी रियासत, मराठी रियासत (पूर्वार्ध) व ब्रिटिश रियासत (पूर्वार्ध) ह्या त्यांनीं सजविल्या. त्यानंतर मराठी रियासतीच्या उत्तरार्धाचे चार खंड प्रसिद्ध केले. मराठी इतिहासाचें विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें संकलनात्मक असें एवढें प्रचंड कार्य आतांपर्यंत कोणींच केलें नाहीं. यापूर्वी पुण्याच्या 'पेशवे दफ्तरां'त रा० ब० पारसनीसांशिवाय कोणाचा शिरकाव झाला नव्हता; परंतु सरदेसाई यांचा सरकारी विश्वासानें त्यांत प्रवेश झाल्यानंतर त्यांनीं सततोद्योगानें पेशवे दफ्तराचे ४५ खंड प्रसिद्ध केले; आणि त्यांस पुढें सरकारकडून रावसाहेब हा किताबही मिळाला. सत्तरी उलटल्यानंतरही अजून त्यांचा इतिहास-साक्षेप चौगुणित उत्साहानें चालूच आहे.

**यशवंत खुशाल देशपांडे.** यांनीं यवतमाळ येथें 'शारदाश्रम' संस्था स्थापन करून तेथें महानुभावीय वाङ्मयाचे संशोधनाचा उपक्रम आरंभिला आहे. त्यांचे महानुभावीय मराठी वाङ्मय, ऋद्धिपूर वर्णन, एलिचपूर, इ० बहुमोल ग्रंथ सर्वांस परिचितच आहेत. त्याचप्रमाणें **वा० ना० देशपांडे** यांनीं संपादलेलीं 'आद्य कवयित्री महदंबा इचीं काव्यें,' **नेने-भवाळकर** यांचीं 'चक्रधरसिद्धान्त सूत्रें' आणि 'महावाक्यप्रमेय', श्री० **बाळकृष्ण-शास्त्री** यांचें 'श्रीचक्रधरभूमिकापर ऐतिहासिक दृष्टि' आणि 'महानुभाव पंथावरील आक्षेप व त्यांचें निरसन' इ० प्रबंध हे ह्या संशोधकांच्या कर्तृत्वाची साक्ष देत आहेत. उमरावतीचे **प्रो० कोलते** यांनींही 'उद्धवगीता' व 'भास्करभट्ट बोरीकर चरित्र' हे ग्रंथ संपादून, ह्या कार्यास हातभार लाविला आहे.

ह्यांशिवाय मध्यप्रांतांत **के० ल० दफ्तरी** व **कृष्णशास्त्री घुले** हे संशोधक, मतांच्या दृष्टीनें उत्तर-दक्षिण ध्रुवांप्रमाणें असले तरी त्या दोघांचीही विद्वत्ता व व्यासंग दांडगा आहे. श्रुति-स्मृत्यादि ग्रंथांवर यांच्यासारखे अधिकारी लेखक विरळाच सांपडतील. दफ्तरींचा धर्मरहस्यावरील ग्रंथ प्रसिद्ध आहे. **प्रो० मिराशी** ह्यांचें ताम्रपट-शिलालेखांचें संशोधन व त्यांसंबंधीं लेखन सतत चालू असतें. 'कालीदास' हा त्यांचा महत्त्वाचा ग्रंथ असून, त्यांत संशोधन, चिकित्सा व रसिकता यांचा सुंदर संगम पहावयास सांपडतो.

श्री० **यादव माधव काळे** यांचें ऐतिहासिक कार्य प्रसिद्ध आहे. त्यांनीं लोणार-वर्णन, वऱ्हाडचा इतिहास व नागपूर प्रांताचा इतिहास हे ग्रंथ लिहिले असून, ते त्यांच्या दीर्घोद्योगाची व श्रमसातत्याची चांगली ओळख करून देतात.

**काशीनाथ कृष्णाजी लेले.** ह्या पाय भुईस लागलेल्या ८५ वर्षांच्या वृद्ध मालवीय इतिहास-संशोधकांचा उद्योग कौतुकावह होता. त्यांना इंदूर, धार व देवासचे गेल्या पिढीचे पूज्य गुरु म्हणून यथार्थतेनें संबोधीत. त्यांच्या इतका माळव्याच्या इतिहासासंबंधीं दांडगा व्यासंग कोणाचाही नसेल. धारचा इतिहास, पवारांची कामगिरी, इ० पुस्तकें त्यानीं लिहिलीं आहेत. ते धारेस पवारांच्या दफ्तराचें संशोधन करीत असतांना नुकतेच निवर्तले ( १९३७ ), ग्वाल्हेरचे **कॅप्टन मोडक** यांनीं 'प्रतापगडचें युद्ध ' हा आपला बहुमोल ग्रंथ प्रसिद्ध केला आहे, तो लष्करी इतिहासाच्या दृष्टीनें लिहिलेला मराठींतला अपूर्व ग्रंथ होय. त्यांनीं प्रत्यक्ष रणभूमि ठिकठिकाणीं जाऊन, पाहून, तपासून, त्याचा कागद-पत्रांशीं मेळ घालून व युद्धशास्त्रदृष्ट्या हालचालींचा ऊहापोह करून, ग्रंथ लिहिला असल्यानें तो बहुमोल उतरला आहे. त्याचप्रमाणें लष्करी इतिहासदृष्ट्या लिहिणारे दुसरे लेखक म्हणजे बडोद्याचे सेनापति **नानासाहेब शिंदे** हे होत. त्यांनीं हिंदुस्थानचा लष्करी इतिहास, मराठ्यांच्या प्रसिद्ध लढाया व आत्म-चरित्र, इ० ग्रंथ लिहिले असून, तेही उत्कृष्ट असेच उतरले आहेत.

ह्यांशिवाय निरनिराळ्या प्रकारें इतिहास-क्षेत्रांत वाङ्मय-कार्य केलेली पुढील मंडळी आहेत. जुन्या पिढींतील **डॉ० भांडारकर**, **डॉ० गुणे**, यांचे लेख; **चिंतामणराव वैद्य** यांचे 'मध्ययुगीन भारता'चे ग्रंथ; **नाना पावगी** यांचे 'भारतीय साम्राज्य' हे ग्रंथ; **श्री० त्र्यं० केतकर** यांचे महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासासंबंधींचे अपूर्व संशोधनात्मक ग्रंथ; **ओकांचे** हिंदुस्थानकथारस, इतिहास-तरंगिणी, इ० ग्रंथ; **केळुसकरांचें** शिवाजी चरित्र; **वाकसकरांचीं** अप्रसिद्ध ऐतिहासिक चरित्रें; **शं० बा० दीक्षित** यांचा 'भारतीय ज्योतिषशास्त्राचा इतिहास;' टिळकांच्या इंग्रजी पुस्तकाचें **ओगलेकृत** ' आर्यांचे मूल वसतिस्थान ' हें भाषान्तर; **केळकरांचें** अत्युत्कृष्ट पुस्तक ' मराठे व इंग्रज;' **दत्तोपंत आपटे** यांचें मुधोळच्या घोरपड्यांचा इतिहास व इतिहासमंजरी; **वेंद्रे** यांचे साधन चिकित्सा इ० ग्रंथ; **आबा चांदोरकरांचें** लेखनालंकार; **ना० गो० चापेकरांचें** 'माझा गांव बदलापूर'; व शिवचरित्रकार्यालय व संभाजी चरित्रकार्यालय

यांमार्फत प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें; **भाटे** यांचें अस्पृष्टांचा प्रश्न, व **विठ्ठलराव शिंदे** यांचें त्याच विषयावरील पुस्तक; **रा० न० केळकर** यांचे ऐतिहासिक पोवाडे; इ० कार्यें त्रुटिक असलीं तरी उल्लेखनीय आहेत. जातीय व संस्थानी इतिहास कांहीं बाहेर पडले आहेत, पण त्यांचें स्वरूप बहुधा एकांगीच असतें. सत्कार्योत्तेजक संस्था–धुळें यांचे रामदासी पंथाचे ग्रंथ, रामदासाच्या चरित्रांचे चिकित्सक प्रो० **न० र० फाटक**, रामदास–शिवाजीच्या भेटीचे चिकित्सक प्रो० **भाटे**, शिवजन्मतिथींचे विवादक **दा० ना० आपटे**, 'नाना आणि महादजी'चे लेखक प्रो० भानु; 'कोदंडाचा ठणत्कार' उडविणारे ठाकरे, 'महाराष्ट्रधर्म'कार देव, 'ऐतिहासिक गुच्छां'चे लेखक V० S० C०, 'महाराष्ट्रकविचरित्रकार आजगांवकर; 'दादोबांच्या आत्मचरित्रा'चे संशोधक पांगारकर, 'पेशवेकालीन महाराष्ट्रा'चे लेखक भावे, इंदूरचे भागवत, ग्वाल्हेरचे फाळके व भालेराव, पणजीचे दप्तरनवीस पिसुर्लेकर, भा० इ० सं० मं० तील नाण्यांचे संग्राहक गाडगीळ, शिवाय शेजवलकर, ग० ह० खरे, दि० वि० चांदोरकर, काळे, इ० कितीकांचें तरी कार्य उल्लेखनीय आहे; पण स्थलाभावीं येथेंच थांबणें प्राप्त आहे.

## मराठी चरित्रें

मराठींत चांगले चरित्र–ग्रंथ फारसे झाले नाहींतच म्हटलें तरी चालेल. **महीपति**बुवांनीं कांहीं संतांचीं चरित्रें गायिलीं आहेत, त्याचप्रमाणें विद्यमान कवि **दास गणू** यांनींही कांहीं संतचरित्रें गायिलीं आहेत. **पांगारकर** यांनीं ज्ञानेश्वर, एकनाथ, मुक्तेश्वर व मोरोपंत यांचीं चरित्रें भाविक, रसाळ भाषेंत व तन्मय होऊन लिहिलीं आहेत. **ज० र० आजगांवकर** ह्या साक्षेपी गृहस्थांनीं ह्याच प्रकारें 'महाराष्ट्र–कविचरित्रें' लिहिलीं आहेत. ह्या सर्वांचा संतकृत चमत्कारादिकांवर दृढ विश्वास असल्यानें हीं चरित्रें एक प्रकारें सुंदर असलीं, तरी त्यांत यथातथ्य रेखनाभाव, एकांगीपणा व अद्भुतत्व हे दोष स्पष्ट दिसून येतात.

मराठींत संत–चरित्र–वाङ्मयाचा उदय जरी वरीलप्रमाणें इंग्रजांपूर्वीचाच असला, तरी संत–चरित्रांशिवाय इतर चरित्रें लिहिण्याचा पायंडा अगदीं अलीकडेच पडला. विशेषतः **वि० कों० ओक** यांनीं शिकंदर, पिटर धि ग्रेट,

आल्फ्रेड धि ग्रेट, ड्यूक ऑफ वेलिंग्टन, मन्रो, हेस्टिंग्स, अब्राहाम लिंकन, ग्लॅडस्टन, इ० चीं चरित्रें इंग्रजीवरून मराठींत उतरलीं. 'बालबोध' मासिकांत ३४ वर्षें अत्यन्त नियमितपणें त्यांनीं एकंदर ४०८ छोटीं एतद्देशीय व विदेशीय यांचीं मिळून बोधरूप व सुबोध भाषेंत चरित्रें रेखाटलीं; हा त्यांचा साक्षेप वाखाणण्यासारखा आहे. आरंभीं भाषान्तरित व रूक्ष अशीं विदेशीयांचीं व कांहीं एतद्देशीयांचीं अशाच प्रकारचीं त्रोटक चरित्रें लिहिलीं गेलीं. त्यानंतर ऐतिहासिक चरित्रें मराठींत लिहिण्याचा पायंडा पडला, परंतु त्यांत बहुधा इतिहासापेक्षां भाषेची रंजकताच अधिक आढळून येते. '**लोकहितवादी**' चें पृथ्वीराज चव्हाण, '**धनुर्धारी**' चीं जवानमर्द ब्राह्मणभाई व जवानमर्द मराठे गडी इ० पुस्तकें, **पारसनीसांचीं** ब्रह्मेंद्रस्वामींचें व राणी लक्ष्मीबाईचें चरित्र, **नागेशराव बापटांचें** थोरले बाजिरावसाहेब पेशवे चरित्र, हीं सर्व कल्पनादेवीच्या प्रसादाचीं व चुरचुरीत आणि खुसखुशीत भाषेचीं फळें होत असें म्हणतात, तें सामान्यतः बरोबर आहे.

अलीकडे लिहिलेल्या अलीकडील व्यक्तींच्या चरित्रांचा येथें उल्लेख करणें अवश्य आहे. साधारणतः चांगल्या प्रकारचें व वर्णित व्यक्तीचें वैशिष्ट्य ज्यांत स्पष्ट दिसून येईल अशा प्रकारचें चरित्र लिहिण्याचा पाया डॉ० जॉन्सन यांचें छोटेखानी चरित्र लिहून **मालाकार** यांनीं घातला. त्यानंतर कांहीं पाश्चात्यांचीं व कांहीं या देशांतील थोर व्यक्तींचीं मराठींत चरित्रें निर्माण झालीं. त्यांत **केळकर** यांचें गॅरिबॉल्डीचें चरित्र, **सावरकर** यांचें मॅझिनीचें चरित्र, **विनायकराव भाट्यांचें** नेपोलियन बोनापार्टचें चरित्र, प्रो० **फडके** यांचीं मॅकस्विनी व डी० व्हॅलेरा यांचीं चरित्रें, **भसे** यांचें कौंट टॉलस्टाय चरित्र, **भुस्कुटे** यांचें समाजसत्तावादी कार्ल मार्क्स यांचें चरित्र, **ओगले** यांचें टॉमस आल्व्हा एडिसन यांचें चरित्र, त्याचप्रमाणें रवींद्रनाथ ठाकूर, लाला लजपतराय, गांधींचें आत्मचरित्र अथवा सत्याचे प्रयोग ह्यांचें भाषांतर, इ० चरित्रग्रंथ उल्लेखनीय आहेत.

रा० **हंस** यांचे तुकाराम, वामनपंडित व मोरोपंत यांविषयींचे निबंध विशेषतः वाङ्मय-विवेचनात्मक आहेत. तसेंच **पांगारकरांचें** मोरोपंत चरित्र हेंही वाङ्मय-विवेचन-प्रधानच आहे. हनुमानगडचे **परांजपे** यांचें मोरो-

पंताच्या केकावलीवरील ग्रंथ वाङ्मय-प्रधान आहेत. त्याचप्रमाणें **वि० स० खांडेकर** यांचें 'गडकरी व्यक्ति व वाङ्मय' हें चरित्रही याच प्रकारचें आहे.

जुन्या व्यक्तींच्या चरित्रांत **ह० ग० केळकर** यांचें लोकहितवादींचें चरित्र, **बोरवणकर** यांचें 'सार्वजनिक काकां'चें चरित्र, **लक्ष्मणराव चिपळूणकर** यांचें विष्णुशास्त्री चिपळूणकरांचें चरित्र, हीं त्या त्या व्यक्तींची ओळख पटवून देण्यास समर्थ आहेत. याच तऱ्हेचें **काशीबाई कानिटकर** यांनीं लिहिलेलें डॉ० आनंदीबाई जोशी यांचें चरित्र आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या मतांसंबंधीं अनुकूल व प्रतिकूल असे जोरदार टीकेचे पुष्कळ प्रबंध झाले; परंतु त्यांतही **बनहट्टी-माडखोलकर** यांचा 'चिपळूणकर-द्विविधदर्शन' हा सारग्राही बहुमूल्य ग्रंथ आहे, असें म्हणतां येईल. **बापूराव आंबेकर** यांनीं हरिभाऊ आपटे यांचें चरित्र व आठवणी लिहिल्या आहेत. त्याचप्रमाणें **वेणूबाई पानशे** यांनीं ह० ना० आपटे यांची पत्ररूपानें व कै० **वाग्भटराव देशपांडे** यांनीं त्यांच्या कादंबऱ्यांवरील टीकांच्या रूपानें चांगली ओळख करून दिलेली आहे.

जात्यभिमान, पक्षाभिमान किंवा एकादें नैमित्तिक कारण यांमुळेंही मराठींत कांहीं चरित्रें निर्माण झालीं आहेत. त्यांपैकीं **द्वारकानाथपंत वैद्य**कृत डॉ० भाण्डारकर यांचें आणि **कर्नाटकी**कृत डॉ० भाण्डारकर, न्यायमूर्ति तेलंग यांचें, या चरित्रांचा उल्लेख करितां येईल. प्रो० **वासुदेवराव पटवर्धन** व रा० **साने** यांनीं गोखले यांचीं चरित्रें लिहिलीं आहेत. प्रो० **माधवराव आळतेकर** यांनीं आगरकरांचें व प्रो० **न० र० फाटक** यांनीं न्यायमूर्ति रानडे यांचें, अशीं उत्कृष्ट चरित्रें लिहिलीं आहेत. **वि० स० खांडेकर** यांनींही एक आगरकरांचें चरित्र लिहिलें आहे. 'आमच्या आयुष्यांतील आठवणी' यांत **रमाबाई रानड्यांनीं** आपल्या पतीचें स्वभावचित्र उत्कृष्टपणें व जिव्हाळ्यानें रेखाटलें आहे.

लो० टिळकांच्या वाट्याला मराठींत अधिक लेखक लाभले आहेत. **कृ० आ० गुरुजी, कुळकर्णी, पांगारकर, दामले, फाटक, आंबेकर** व **केळकर**. पैकीं पहिल्यांनीं आत्मीय भावनेनें लिहिलेलें, दुसऱ्यांनीं टिळकांच्या सान्निध्यांत आठ वर्षें राहून रेखाटलेलें, अशीं तीं चरित्रें असल्यानें तीं त्या मानानें सरस उतरलीं आहेत. **केळकर** यांनीं मात्र टिळकांचें चरित्र

समतोल वृत्तीनें लिहिण्याचा प्रयत्न केला असल्यानें, तें मराठींतील एक उत्तम चरित्र म्हणून म्हणतां येईल; परंतु केळकर व टिळक यांची मूलतःच प्रकृति भिन्न असल्यानें, टिळकांचें खरें वैशिष्ट्य त्यांत उतरावें तसें उतरलें नाहीं, असें म्हणतात तें एकंदरींत बरोबरच वाटतें.

मराठींत केळकर–ग्रंथ, अ० ब० कोल्हटकर-लेखसंग्रह, तात्यासाहेब कोल्हटकर स्मारक-ग्रंथ, अण्णा किर्लोस्कर वाङ्मयग्रंथ, श्री० सयाजीराव गायकवाड स्मारक–ग्रंथ, इ० ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत, त्यांत त्या त्या व्यक्तींचीं चरित्रात्मक, वाङ्मयात्मक व इतर कामागिरी वर्णन केली आहे.

मराठींत 'नाना फडनविसाच्या आत्मचरित्रा'नंतर इंग्रजी अमदानींत कांहीं आत्मवृत्तपरही ग्रंथ व लेख प्रसिद्ध झाले आहेत. त्यांत **दादोबा पांडुरंग** यांचें आत्मचरित्र, **विष्णुबुवा ब्रह्मचारी** यांचें आत्मवृत्त, **धर्मानन्द कोसंबी** यांचें 'निवेदन,' **अण्णा कर्वे** यांचें आत्मवृत्त, **पावगी** यांचें आत्मवृत्त, **पार्वतीबाई आठवले** यांची 'माझी कहाणी,' **सावरकर** यांचें 'माझी जन्मठेप,' ह्या लहान-मोठ्या ग्रंथांचा समावेश होतो. कै० **लक्ष्मीबाई टिळक** यांनीं लिहिलेले 'स्मृतिचित्रां'चे तीन भाग हे आत्मवृत्तपर या सदरांतच घालतां येतील.

**चित्रावशास्त्री** हे १९३७ पर्यंतचा चरित्रकोश छापीत आहेत. **मोने** यांनीं 'मराठी भाषेचे व्याकरणकार' यांचीं सुमारें ७५ चरित्रें आपल्या त्या ग्रंथांत समाविष्ट केलीं आहेत. **खानोलकर** यांनीं 'अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक' भाग १ व २ प्रसिद्ध केले आहेत. अशा प्रकारें कांहीं जुजबी व फारच थोडें भरींव असें मराठींतील चरित्रग्रंथांचें स्वरूप आहे; नियतकालिकांतून प्रसंगानुरोधानें कांहीं चांगले चरित्र–लेखक येतात, पण ते एकत्रित केले जात नसल्यानें, त्यांचें वाङ्मयीन चिरस्थायित्व उरत नाहीं.

## मराठी साहित्य व व्याकरण

ह्या सदरांत कोश, व्याकरणें, व्युत्पत्ति, इ० साहित्याचा समावेश होतो. अव्वल इंग्रजीमध्यें कोश–रचनेचे जे प्रयत्न झाले, त्यांचा उल्लेख पूर्वी (पृष्ठ ४० मध्यें) केलाच आहे. ह्यांशिवाय अलीकडे झालेले कांहीं प्रयत्न विद्यार्थ्यांस माहीत हवेत. **श्री० व्यं० केतकर** (१८८३–१९३७) यांच्या ज्ञानकोशाचे मोठाले २३ खंड प्रसिद्ध झाले आहेत. त्यांत निव्वळ शब्द किंवा व्यक्ति

यांचीच माहिती न देतां व्यापक ज्ञानाचा समावेश होईल अशी त्याची रचना आहे. **ज० वि० ओक** यांचा जरी 'गीर्वाण–लघु-कोश' असला, तरी मराठींत येणाऱ्या संस्कृत शब्दांचा योग्य अर्थ आकलन होण्यास त्याची मदत पावलोपावलीं होते. **वासुदेवराव आपटे** यांचा 'मराठी शब्दरत्नाकर' विद्यार्थ्यांची सामान्य भूक भागविणारा आहे. **विद्याधरपंत भिडे** यांचा 'सरस्वतीकोश' याच प्रकारचा आहे. प्रो० **माधवराव पटवर्धन** यांचा 'फारसी मराठी कोश' मराठींत येणाऱ्या आरबी व फारसी शब्दांचें यथार्थ ज्ञान करून देणारा व अत्यंत उपयुक्त असा आहे. **दाते** यांच्या मराठी शब्द-कोशाचे पांच भाग प्रसिद्ध झाले असून, तो लौकरच पूर्ण होईल. यांशिवाय **रघुनाथशास्त्री गोडबोले** यांचे हंसकोश आणि **चित्रावशास्त्री** संपादित व पुनर्मुद्रित भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश व अर्वाचीन कोश, आणि मध्ययुगीन चरित्रकोश, हे अपूर्ण दिग्दर्शक असले, तरी संग्राहक माहितीच्या दृष्टीनें बरेच उपयुक्त आहेत. **वासुदेवराव आपटे** यांचा 'मराठी भाषेचे संप्रदाय व म्हणी' व **विद्याधरपंत भिडे** यांचा 'मराठी वाक्प्रचार व म्हणी' हे ग्रंथ, **सुळे** यांचा संख्यावाचक शब्दार्थ कोश, हे अभ्यासकांस फार उपयुक्त आहेत.

**राजवाडे** संशोधन-मंडळामार्फत प्रसिद्ध होऊं घातलेला राजवाड्यांचा मराठी धातुकोश, कोल्हापूरच्या एका गृहस्थांनीं लिहिलेला व्यावहारिक ज्ञान-कोश, इंदूरचे **काळेले** यांचा समानार्थक शब्दांचा कोश, बडोद्यांतील भाषाकोविदांनीं रचलेला व ज्यांत एका इंग्रजी शब्दाला गुजराती, मराठी, संस्कृत, उर्दू, पर्शियन, हिंदी व बंगाली ह्या सात भाषांतील प्रतिशब्द दिलेले आहेत असा 'श्रीसयाजी–शासनकल्पतरु', त्याचप्रमाणें **माट्यांचा** विज्ञानबोध व महाराष्ट्र–सांवत्सरिक हे प्रयत्न, उल्लेखनीय आहेत. नुकताच वाईच्या 'प्राज्ञ–पाठशाळे'मार्फत 'धर्मकोश' भाग १ ला प्रसिद्ध झाला आहे.

**दादोबांच्या** 'महाराष्ट्र–भाषेच्या मोठ्या व्याकरणा'नंतर दुसरा चांगला व्याकरण-ग्रंथ लौकर बाहेर पडला नाहीं. त्यांच्या व्याकरणावरील कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे टीकात्मक निबंध उत्कृष्ट आहेत. **कृष्णशास्त्री गोडबोले** यांचें 'मराठी भाषेचें नवीन व्याकरण' १८६७ त छापलें. त्यानंतर **दामले** यांचें 'शास्त्रीय मराठी व्याकरण' १९११ त छापलें गेलें. त्याला **मार्गे**

सारील असा दुसरा मराठी व्याकरण–ग्रंथ अजून झाला नाहीं. **राजवाडे** यांचें ‘ ज्ञानेश्वरी मराठीचें व्याकरण ’ आणि ‘ सुबन्तविचार ’ व ‘ तिङन्त-विचार ’ ह्या दामल्यांच्या व्याकरणावरील टीका छोट्या पण मोठ्या योग्यतेच्या आहेत. **आगरकर** यांचें ‘ वाक्यमीमांसा ’ हें पुस्तक त्या विषयाचे बाबतींत उत्कृष्ट आहे. **कृ० पां० कुलकर्णी** यांचें ‘ मराठी भाषेचा उद्गम व विकास ’ हें त्या विषयासंबंधाचें सध्यां तरी शेवटचें पुस्तक आहे. डॉ० **भांडारकर**, भारताचार्य **चिंतामणराव** वैद्य, डॉ० **गुणे**, **राजाराम-शास्त्री भागवत**, **शिवरामपंत परांजपे**, यांचीं नांवें आपल्याकडील भाषाशास्त्र व व्युत्पत्तिशास्त्र विवेचक म्हणून घेतां येतील. ‘व्युत्पत्तिप्रदीप’कार कै० **गोविंद शंकरशास्त्री बापट**, आणि विद्यमान गृहस्थांत **गो० कृ० मोडक**, **विठ्ठलराव शिंदे** व **भास्करराव जाधव** हेही या विषयांत लक्ष घालणारे विद्वान् आहेत.

मराठी वाङ्मयाचा आढावा घेण्याचे प्रयत्न **रानड्यांच्या** काळापासून आतांपर्यंत मराठी साहित्यसंमेलनें व ठाणें–मुंबई–पुणें येथील ग्रंथसंग्रहालयांच्या वार्षिकोत्सवाचे विद्वान् अध्यक्ष यांनीं केले आहेत; पण ते किरकोळ स्वरूपांत प्रसिद्ध झालेले असल्यानें त्यांस चिरस्थायित्व आलें नाहीं. **चिंतामणराव वैद्य** यांचीं भाषणें आणि निबंध, **रामभाऊ जोशी** यांचें ‘ मराठी भाषेची घटना ’, **विनायकराव भावे** यांचें ‘ महाराष्ट्र-सारस्वत, ’ **पांगारकर** यांचा ‘ मराठी वाङ्मयाचा इतिहास ’, **बा० अ० भिडे** यांचें ‘ मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास,’ बडोद्याचे रा० **दंडवते** यांचें मराठी साहित्यविषयक समालोचनात्मक पुस्तक आणि माळव्यांतील प्रो० **बा० ग० चव्हाण** यांचें ‘ महाराष्ट्र–सारस्वत–मार्गदर्शिका ’ हें पुस्तक, त्याचप्रमाणें श्रीं० सयाजीराव गायकवाड यांच्या ज्युबिलीनिमित्त प्रसिद्ध झालेलें **वि० पां० नेने** इ०नीं संपादित ‘ अर्वाचीन मराठी साहित्य,’ प्रो० **पोतदारांचें** ‘ मराठी गद्याचा इंग्रजी अवतार ’, आणि याच प्रकारचें ‘ अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका ’ हें **गं० बा० सरदार** यांचें नवीन निघालेलें पुस्तक, हीं वाचनीय आहेत. **लालजी पेंडसे** यांनीं ‘ साहित्य व समाज–जीवन ’ हें एक अशा प्रकारचें निराळ्या दृष्टीनें लिहिलेलें पुस्तक आहे.

यांशिवाय **गोरे**—अलंकारचंद्रिका व काव्यदोष-दीपिका, **भिडे**—साहित्य-कौमुदी, **द० के० केळकर**—काव्यालोचन, प्रो० **जोग**—अभिनव-काव्य-

प्रकाश, रा० **आगाशे**—सारस्वतसमीक्षा, **ना० गो० चापेकर**—साहित्य-समीक्षण, **वा० गो० आपटे**—लेखनकला, प्रो० **फडके**—प्रतिभासाधन, सौ० **बाळूताई खरे**—अलंकारमंजूषा, कु० **गोदूबाई केतकर**—भारतीय नाट्यशास्त्र, **मुजुमदार**—मराठीची सजावट, इ० चे साहित्यशास्त्रावरील अलीकडेच लिहिलेले चांगले ग्रंथ आहेत.

वृत्तदर्पणानंतर छन्दःशास्त्रावर **माधवराव पटवर्धन** यांनीं 'छन्दोरचना' (दुसरी आवृत्ति) हा उत्कृष्ट ग्रंथ व विद्यार्थ्यांकरितां 'पद्य-प्रकाश' हें वृत्तदर्पणाच्या धर्तीवरील छोटेंसें पुस्तक, हीं नुकतींच प्रसिद्ध केलीं आहेत.

## विनोद, शास्त्र, इ०.

विनोदी वाङ्मय मराठींत फारसें नाहींच. **श्री० कृ० कोल्हटकर** ह्यांचें 'सुदाम्याचे पोहे,' **गणेश सदाशिव मराठे** ह्यांचें 'नाट्यकलारुक्कुठार' (गुप्तमंजूष नाटकावरील टीका), व 'थालीपीठ,' **का० ना० पटवर्धन** ह्यांचें 'नाटक्याचे तारे,' **ना० के० बेहेरे** यांचें बोथट बाण,' **गडकरी** यांचें 'संपूर्ण बाळकराम' व रिकामपणची कामगिरी,' **अत्रे** यांच्या गोष्टी, नाटकें व झेंडूचीं फुलें (कवितासंग्रह), **कॅ० गोपाळ गंगाधर लिमये** यांचें 'विनोदी लेखसंग्रह' व 'जुना बाजार,' प्रो० **चिं० वि० जोशी** याचे 'एरंडाचें गुऱ्हाळ,' व 'चिमणरावांचें चऱ्हाट,' **य० न० केळकर** यांचें 'विषयान्तर अथवा विनोदलहरी,' **सोमण** यांचें 'कॉलेजविहार,' व 'खेडेगांवचीं स्वभावचित्रें,' **वि० मा० दी० पटवर्धन** यांचें 'साहित्य-गुदाम,' **ओक** यांचें 'कोपरखळ्या,' गाडगीळ यांचें 'वाङ्मयांतील खुसखुशीत मेवा,' **य० गो० जोशी** यांनीं प्रसिद्ध केलेला 'उपहासिनी' हा अनेक कवींच्या विडंबन-काव्यांचा संग्रह, इ० चा नामानिर्देश करितां येईल. नुकतेंच **न० चिं० केळकर** यांनीं 'हास्य-विनोद-मीमांसा' हें ह्या विषयाच्या शास्त्रीय चर्चेचें पुस्तक लिहिलेलें आहे.

रावसाहेब **म० का० कारखानीस** यांचीं शिक्षणविषयक पुस्तकें व कविता; प्रि० **भा० धों० कर्वे** यांचे 'शिक्षणविषयक नवे विचार' व 'अध्यापन आणि मानसशास्त्र;' प्रि० **तावडे** यांचें 'उत्साही शिक्षकाचें कार्यक्षेत्र;' प्रि० **पटवर्धन** यांचें 'इंदूचें शिक्षण'; प्रो० **वा० म० जोशी** व प्रि० पटवर्धन, प्रि० अत्रे व कानेटकर, अत्रे व घाटे, प्रो० रानडे व खानोलकर, धों० स०

कुलकर्णी, वैद्य, कु० आनंदकर व श्री० पाठक इ० चीं गद्य–पद्य उताऱ्यांचीं क्रमिक वाचन–पुस्तकें; पटवर्धन, मोडक, नेने, यांचीं भूगोलविषयक; देशमुख, मांडके यांचीं गणितविषयक; **कृ० पां० कुलकर्णी** यांचें 'अर्वाचीन मराठी' व **मोने** यांचें 'मराठी साहित्य व व्याकरण', तसेंच 'अभिनव-साहित्य-सोपान' हीं व्याकरणविषयक; इ० विषयांवरील शालोपयोगी पुस्तकें नवीन दृष्टींचीं व चांगलीं अशीं आहेत.

आधुनिक भौतिक शास्त्रीय वाङ्मयांत मात्र पडावी तितकी भर अजूनही पडत नाहीं हें खरें असलें, तरी एकंदरींत मराठी भाषेच्या भावी उत्कर्षाचीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## इंग्रजीचा मराठी भाषेवर परिणाम

इंग्रजांच्या साहचर्यामुळें व इंग्रजी भाषारूपी वाघिणीच्या दुधाचें पान करावयास सांपडल्यामुळें आमच्या वाङ्मयावर, विचारांवर व भाषेवर मोठाच परिणाम घडून आला आहे. वर लिहिल्याप्रमाणें कादंबरी, नाटक, लघुकथा, नाटयछटा, उच्च दर्जाचे निबंध, टिकात्मक, निबंध, चरित्र, विनोदी लेख, कोश, व्याकरणें, शास्त्रीय ग्रंथ, इ० अनेक अंगांनीं वाङ्मयावर परिणाम घडला आहे; आणि व्यक्तिस्वातंत्र्याचें महत्त्व कळूं लागून धार्मिक, सामाजिक व राजकीय विचारांमध्येंही मोठीच क्रांति घडून आलेली आहे.

त्याचप्रमाणें इंग्रजी भाषेचा मराठी भाषेवर पुढीलप्रमाणें परिणाम घडलेला आढळून येतो—( १ ) 'नेपोलियन जो मोठा जगविख्यात सेनापति होता' अशा प्रकारची वाक्यरचना; ( २ ) 'तो आपल्या घरीं गेला' याऐवजीं 'तो त्याच्या घरीं गेला' अशा प्रकारची अप्रत्यक्ष–निवेदनपद्धति; ( ३ ) कोणत्याही चळवळींत भाग घेणें ( To take part in a movement ), परीक्षेंत चांगलें करणें ( To do well or all in an examination), उमेदवार म्हणून उभें राहणें ( To stand as a candidate ), इ० शेंकडों वाक्प्रचार; तसेंच (४) पुरुषांच्या व स्त्रियांच्या कॉलेजांतील विद्यार्थ्यांत 'फादरचं लेटर आलं होतं कीं, मदर सिक आहे, सेव्हन् अपनें निघून ये,' 'बॉंबे युनिव्हर्सिटीच्या सेनेटपुढें रेझोल्युशन आला आहे कीं, कॉलेजस्टूडंटूस्‌ना फिजिकल एज्युकेशन कंपल्सरी करावं म्हणून,' 'हिस्टरीच्या पेपरांत सेव्हंटी पर्सेंट मार्क्स मिळाले, तर मॅथेमेटिक्समध्यें मी अगदीं बॉर्डरवर पास झालों,' या प्रकारचीं वाक्यें मिनिटागणिक ऐकूं येतात; ( ५ ) बेबी ( बाळ ), हा शब्द तर फॅशन

म्हणूनच वापरण्यांत येतो; ( ६ ) सॉरी, थँक्स, हिअर, माय गॉड, एक्सक्यूज्, इ० शब्द इंग्रजी सुशिक्षितांच्या बोलण्यांत नित्याचेच होऊन बसले आहेत; ( ७ ) ज्या शब्दांवांचून प्राथमिक शाळांत कांहींच नडत नाहीं, असे शब्द हायस्कुलांतील विद्यार्थ्यांच्या जिव्हाग्रींच खेळत असतात; इतकेंच नव्हे, तर त्या इंग्रजी शब्दांचे उत्कृष्ट अर्थदर्शक मराठी शब्द उच्चारणें त्या अर्धवट अवस्थेंत विद्यार्थ्यांना कमीपणाचें वाटतें. उदा० –कॅटलॉग (हजिरीपत्रक), प्रेझेंट (हजर), अब्सेंट ( गैरहजर ), क्लास ( वर्ग ), टाईमटेबल ( वेळापत्रक ), हेडिंग ( मथळा ), मार्जिन (समास), नोटस् (टांचणें), हिस्टरी (इतिहास), जॉग्रफी (भूगोल), ड्रॉइंग (चित्रकला), कॉपी (नक्कल), ~~एसे~~ (निबंध), प्रोज (गद्य), पोइट्री (पद्य), रेसिटेशन (पाठांतर), ॲर्थमेटिक (गणित), सायन्स (विज्ञान), इलेक्ट्रिसिटि (वीज), क्लास-टीचर (वर्ग–शिक्षक), बोर्ड (फळा), रिव्हिजन (उजळणी), एक्झरसाईज बुक (वही), एक्झॅमिनेशन (परीक्षा), वुइक्ली–क्वार्टरली–टर्मिनल-ईअरली, (आठवडी-तिमाही-सहामाही-वार्षिक), इ०. ( ८ ) क्रिकेट, फुटबॉल, टेनिस, बॅडमिंग्टन, पिंगपॅंग, बॉल, ग्राउंड, मॅच, टीम, अंपायर, कॅप्टन, औट, डिफीट, सक्सेस, वेल् प्लेड, असे खेळांतील व निरनिराळ्या शास्त्रांतील शेंकडों शब्द मराठींत नवीन गोष्टींबरोबर नवीनच आले आहेत आणि आणखी येऊन मराठी शब्द-संपत्तींत भरच पडत आहे. (९) सायकल (पायगाडी), मोटारसायकल (फटफटी), नेकटॉय (गळपट्टी), टेलिफोन (दूरध्वनि), बेबी वीक ( शिशुसप्ताह ), हँडबिल ( हस्तपत्रक ), इझिचेअर ( आरामखुर्ची ), डबल गव्हर्नमेंट ( द्विदल राज्यपद्धति ), सोशिआलिझम ( समाजसत्तावाद ), इ०.

ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन ( अध्यापक–शाला ), ट्रेनिंग कॉलेज फॉर वुइमेन ( अध्यापिका-शाला ), फर्स्ट ईअर सीनिअर ( पुरोगामी पहिलें वर्ष ), फर्स्ट ईअर जूनिअर ( अनुगामी पहिलें वर्ष ), प्रॅक्टिसिंग स्कूल ( अध्यापन-शाला ), असे शेंकडों शब्द जरूरीप्रमाणें इंग्रजी शब्दांबद्दल आपल्या टांकसाळींतून आपण प्रत्यहीं घडवीतच आहोंत व कांहीं ठिकाणीं ते रूढही झाले आहेत. ह्याप्रमाणें इंग्रजी वाङ्मयाचा व भाषेचा आपल्या वाङ्मयावर व भाषेवर परिणाम घडला आहे.

कै० राजवाडे यांनीं एकदां शारदोपासक संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणाच्या वेळीं, इंग्रजीचा सुशिक्षितांच्या खाजगी पत्रव्यवहारांत, रस्त्यावरील दुकानांच्या धेडगुजरी पाट्यांच्या नांवांत ( आर० पी० मेहेंदळे अँड को० ); मिस्टर दाते,

मिसेस् रानडे, लेडी चंदावरकर, इ० हव्या तेथें इंग्रजी शब्दांचा मराठींत धुडकूस चाललेला पाहून 'मराठी भाषा मरणार' असे भविष्य वर्तविलें होतें. सुदैवानें हें भविष्य खरें ठरलें नाहीं, याचें कारण वरील सर्व वाङ्मयोपासकांची तपश्चर्या हेंच नाहीं का?

## प्रांतिक मराठी

'दर बारा कोसांवर भाषा बदलते' असें भाषेसंबंधानें म्हणतात, तें खरेंच आहे; कारण आपल्या एकाच मराठीची नागपुरी, माळवी, वऱ्हाडी, खानदेशी, बडोदी, पुणेरी, कोल्हापुरी, सातारी, कर्नाटकी, कोंकणी, चित्पावनी, अशीं भिन्न भिन्न स्वरूपें आढळतात. त्याचप्रमाणें पुरुष–स्त्रिया–मुलें, नागर–खेडवळ, अधिकारी व सेवक, भिन्न भिन्न जाति, यांमुळें असंख्य प्रकार होतील ते निराळेच. त्या सर्वांसंबंधानें थोडी-फार कल्पना प्रत्येकास असतेच; म्हणून येथें ज्यास्त न लिहितां, मराठीच्या मुख्य उपभाषांचें स्थूल स्वरुप कळण्यासाठीं त्या भाषांतील एकेक वाक्य (पृष्ठ १२९ मधील कोष्टकांत) दिलें आहे. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांत सध्यां चालू असणाऱ्या भाषांचा व मराठीचे निरनिराळे प्रकार कोठें चालतात तें दर्शविणारा, असे दोन नकाशेही पुढील १३० व १३१ पानांत जोडिले आहेत.

नागरभाषा म्हणजे त्या त्या कालांतील पुढारलेल्या वर्गाची किंवा सुशिक्षितांची बोलभाषा. ही व ग्रंथांतील भाषा थोडासा फरक असला तरी साधारणतः एकाच स्वरूपाची असते. आतांपर्यंतच्या मराठी भाषेच्या इतिहासावरून आपल्याला दिसून येईल कीं, यादवकालांत नागरभाषा 'मराठवाडा' किंवा नेवाश्याच्या आसपास वावरत होती; त्यानंतर ती पैठणाकडे झुकली; त्यानंतर पेशवेकालापासून आतांपर्यंत ती हल्लींच्या महाराष्ट्रांत–पुणें ते कोल्हापूरपर्यंत–आपल्या दिमाखानें संचारत आहे.

सन १९३१ च्या खानेसुमारीवरून महाराष्ट्र, नागपूर, वऱ्हाड, माळवा, बडोदें, निजामचे सहा मराठी जिल्हे, कर्नाटक, कोंकण व गोंवा, ह्या सर्व ठिकाणच्या मराठी भाषा बोलणारांची संख्या सुमारें दोन कोटि पंधरा लक्ष आहे.

## आजच

गेल्या एक-दोन वर्षांत कांहीं महत्त्वाचे ग्रंथ झाले, त्यांचा येथें नामनिर्देश करणें अवश्य आहे.

**विनायक सीताराम सरवटे**. ह्या आमच्या इंदूरस्थ साहित्यिक घराण्यांतील नामवंत लेखक-मित्रांनीं ' मराठी साहित्यसमालोचन ' हें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. त्यांत सन १८१८ ते १९३४ ह्या कालांतील साहित्यिकांच्या कार्याचा आढावा घेतला आहे. ह्या ग्रंथाचा विशेष असा कीं, त्यांतील समालोचनात्मक विवेचन, लेखकांनीं ग्रन्थ प्रत्यक्ष वाचून केलेलें असल्यानें, त्यांतील विवेचन अधिकृत असें उतरलें आहे. भाषा ओघवती व सहजसार्थ अशा पडलेल्या शब्दांनीं मंडित असल्यामुळें त्या लेखनाला मौलिक स्वरूप प्राप्त झालेलें आहे. आधुनिक सुप्रसिद्ध गद्य-लेखक, कवि, नाटककार, कादंबरीकार, कथा-लेखक, इ० चा निर्विकार मनानें यथातथ्य परामर्ष लेखकानें घेतला आहे. ह्या ग्रंथांत वरीलशिवाय इतर प्रकारच्या ग्रंथांचें समालोचन आलेलें नाहीं, तें दुसऱ्या भागांत करण्याचा लेखकांचा मानस आहे.

आमचें देवास येथील इतिहाससंशोधक मित्र व कवि **कृष्णाजी गंगाधर कवचाळे** यांनीं " मध्यभारतीय मराठी वाङ्मय " या नांवाचें एक पुस्तक प्रकाशित केलें आहे. त्यांत सन १८६१ पासून १९३६ पावेतों फक्त मध्यहिंदुस्थानांतच निर्माण झालेल्या वाङ्मयाचा परिश्रमपूर्वक आढावा घेतलेला आहे. अशा प्रकारचा प्रांतिक वाङ्मयासंबंधीं विस्तृत विवेचन केलेला ग्रंथ दुसरा नाहीं. लेखक हे चिकित्सक असल्यामुळें त्यांचें विवेचन अधिकृत असें झालेलें आहे.

**रा० गो० कानडे**—ज्ञानप्रकाशचे उपसंपादक, यांनीं ' मराठी नियतकालिकांचा इतिहास ' हें एक पुस्तक प्रकाशित केलें आहे. त्यांत ' दर्पण ' ह्या १८३२ त निघालेल्या वृत्तपत्रापासून आतांपर्यंतच्या वृत्तपत्रांसंबंधीं छाया-चित्रांसह मनोरंजक माहिती दिली आहे. एका दृष्टीनें हा प्रयत्न अपूर्वच आहे.

  

आमचे आणखी एक मित्र श्रीयुत **पुरुषोत्तम गणेश सहस्रबुद्धे** यांनीं " **स्वभाव-लेखन** " या नांवाचा एक ग्रंथ नुकताच प्रकाशित केला आहे.

त्यांत कादंबऱ्या, नाटकें व लघुकथा यांतील पात्रांचें " स्वभाव-लेखन " कसें असावें याचें परकीय ग्रंथांच्या आधारें तात्त्विक विवेचन केलें असून मुख्यतः सन १८६१ पासून आतांपर्यंत मराठींत झालेल्या कादंबरी, नाटक व लघुकथा ह्यांतील पात्रांचें विपुल उदाहरणांनीं मार्मिक परीक्षण केलेलें आहे. या ग्रंथाबद्दल मुंबई विद्यापीठानें श्रीयुत सहस्रबुद्धे यांस पी. एच. डी. ही पदवी समर्पिली आहे. मराठींत अशा प्रकारचाही हा पहिलाच ग्रंथ होय.

  

मुंबईस **तात्याराव सावरकर** यांच्या अध्यक्षतेखालीं मागें अपूर्व असें मराठी साहित्य-संमेलन भरलें होतें. त्यांत वाङ्मय-विषयक खालील विषय परिणामकारक रीतीनें चर्चिले गेले.

१. भाषाशुद्धीची आवश्यकता ( परकीय शब्दांचा वरचष्मा नको ).

२. लिपिशुद्धीची आवश्यकता ( नागरी लिपीच श्रेयस्कर ).

३. निर्भेळ हिंदी हीच हिंदुस्थानाची राष्ट्रभाषा ( उर्दूमिश्रित नव्हे ).

---

## प्रांतिक मराठीचें स्थूल स्वरूप

| | पुणेरी | कोंकणी | चित्पावनी | वऱ्हाडी | नागपुरी | खानदेशी | कारवारी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | तुझें नांव काय ? | तुजें नांव कित्तें ? | तुझाँ नावँ किताँ ? | तुह नांव काय ऱ्हय् ? | तुझा नाव का आहे ? | तुन्हं नांव काय से ? | तुयेले नाँवँ इत्तेँ ? |
| २ | त्याचा भाऊ त्याच्या बहिणीपेक्षां उंच आहे. | ताचों भाव ताच्या बइणी-बार्न उबार आसा. | तेचो भाऊस तेच्या बेहणी-पेक्षां उंच से. | त्याचा भाऊ त्याच्या बहिणीहून उच्चा आहे. | त्याचा भाऊ त्याच्या बहिणहून उंच आहे. | त्याना भाऊ त्याना बहीं-नथो उच्चा से. | तागेलो भावु तागेल्या बहिणीपेक्षां लाब आस्स. |
| ३ | त्याची किंमत अडीच रुपये आहे. | ताचें मोल अडीच रुपोइ आसा. | तेची किमत अडीच रुपये से. | त्याच मोल अडीच रुपये आहे. | त्याची किंमत अडीच रुपये आहे. | त्यानी किमत अडीच रुप्या से. | ताझे मोल अडेच रुपये. |
| ४ | माझा बाप त्या लहान घरांत राहतो. | माझो बापुइ त्या धाकय्या घरां आसा. | माझी बापुस ते धाकटे घरांत रहेचे. | माहा बाप त्या लहान्या घरांत राहते . | माझा बाप त्या लहानशा घरांत राहते. | मना बाप त्या धाकला घरमा ऱ्हास. | मागेलो बापुसु त्या सानाँ घरांतु राबता. |
| ५ | माझ्या पुढें चाल. | मोज्या मुकार चाल. | माझें पुढाँ चाल | माह्या सामने चाल | माझ्या सामने चाल. | मन्हा मोन्हे च्याल. | मज्येइदूर चंक . |

( म० भा० उ० व वि०, पृष्ठ २८७, थोडी सुधारणा करून )


मराठी भाषा
प्रांतिक भेद
गुजराथी
राजस्तानी
पश्चिम हिंदी
सिवनी
बैतूल
नेमाडी
पूर्व हिंदी
लाजी
गोंड
वैरागड
तेलगु
सातपुडा पर्वत
खानदेशी (अहिराणी)
गाविलगड
अमरावती
बुलढाणा
अकोला
वाशीम
यवतमाळ
वर्धा
नागपुरी
नागपूर
चांदा
माहूर
पैनगंगा
दमण
वसई
मुंबई
ठाणा
उ. कोंकणी
नासिक
औरंगाबाद
पैठण
अहमदनगर
बीड
देगलूर
बार्शी
बेदर
पुणें
सातारा
पंढरपूर
सोलापूर
अक्कलकोट
विजापूर
सांगली
कोल्हापूर
जंजिरा
रत्नागिरी
कोंकणी चित्पावनी कुडाळी गोमांतकी
कानडी
गोवा
पणजी
कारवार
कारवारी


मराठी
व
इतर भारतीय भाषा.
काश्मिरी
पुश्तु
बलोच
बलोच
ब्राहुइ
सिराय की
मकराणी
पंजाबी
पश्चिम पहाडी
मध्य पहाडी
पूर्व पहाडी
हिंदुस्तानी
ग्वाल्हेर
व्रज
राजस्थानी
धार
माळवी
इंदूर
गुजराती
बडोदा
बुंदेली
बघेली
मैथिली
बिहारी
मगधी
आसामी
बंगाली
नागपूर
उरिया
मराठी
मुंबई
पुणे
रत्नागिरी
सोलापूर
हैद्राबाद
हुबळी
म्हैसूर
तंजावर
कोचीन

## एवढें पुरें

१. अर्वाचीन मराठी वाङ्मयाची सुरुवात केव्हांपासून मानिता येईल? सुरुवातीस कोणत्या प्रकारची वाङ्मयनिर्मिति झाली ? (पा० ४० )

२. अर्वाचीन वाङ्मयाचे आतांपर्यंत कोणते ठळक कालविभाग पाडितां येतील ? (पा० ६ ).

३. प्रारंभींच्या मराठी वाङमयनिर्मितीला कोणत्या परकीय व स्वकीय पंडितांनी हातभार लाविला ? ( पा० ४० ).

४. छत्रेयुग, दादोबुग, शास्त्रीयुग व चिपळूणकरयुग यांतील वाङ्मय-रचनेत कसकसा फरक होत गेला ? ( पा० ४१, ४४, ४९, ५३, ५७, ७० ).

५. मराठीत ललित-वाङ्मयाला केव्हांपासून सुरुवात झाली ? अद्भुतावरून वास्तवापर्यंत मराठी कादंबरी-रचनेंत कसकसा फरक पडत गेला ? ( पा० ४६, १०० ते १०६ ).

६. मराठीतील नाट्यकृतीचा विकास कसकसा होत गेला ? आज मराठी नाट्यकलेची स्थिति कशा प्रकारची आहे ? ( पा० १०८ ते १११ ).

७. लघुकथेचें तंत्र कोणतें ? हा प्रकार केव्हांपासून निर्माण झाला ? कथा व लघुकथा यांत फरक काय ? ( पा० १०६ ).

८. निबंध व लघुनिबंध किंवा गुजगोष्टी यांतील फरक उदाहरणांनी स्पष्ट करा.

९. 'मराठी नाट्यछटा' ह्या प्रकारासंबंधानें विशेष खुलासा करा (पा० ११२ ).

१०. लोकहितवादी, दादोबा पांडुरंग, कृष्णशास्त्री चिपळूणकर, परशुरामतात्या गोडबोले, विष्णुशास्त्री चिपळूणकर, आगरकर, टिळक, यांनी मराठी वाङ्मयांत कोणती भरींव कामगिरी केली ?

११. हरीभाऊ आपटे, वा० म० जोशी, फडके, खांडेकर, यांच्या वाङ्मयीन कामगिरीचा उल्लेख करा व वैशिष्ट्य सांगा.

१२. केळकर, कोल्हटकर, गडकरी, अत्रे, चिं० वि० जोशी, कॅ० लिमये, यांच्या विनोदासंबंधानें चर्चा करा.

१३. साने, पारसनिस, राजवाडे, खरे, सरदेसाई, पोतदार, य० खु० देशपांडे, यादवराव काळे, प्रो० कोलते, यांच्या संशोधनात्मक कामगिरींचा उल्लेख करा.

१४. अस्पृष्टांचा प्रश्न, माझा गांव बदलापूर, गीतारहस्य, हास्य-विनोद-मीमांसा, विज्ञानबोध, अर्वाचीन मराठी साहित्य, मराठी भाषा-उद्गम व विकास, काव्यालोचन, छन्दोरचना, प्रतिभासाधन, ह्या ग्रंथांसंबंधानें व त्यांच्या लेखकांच्या योग्यतेसंबधानें कांही माहिती असल्यास लिहा.

१५. आधुनिक कविता—आरंभकाल, उत्कर्षकाल व शाहीर. कवि,—ह्या तीन प्रकारांत आढळून येते; तिचें आरंभींचें स्वरूप कसें होतें ? मध्यन्तरींचें कसें होतें ? आतांचें कशा प्रकारचे आहे ? याचा खुलासा करा. ( पा० ५८, ७३, ८५-८६ ).

१६. प्राचीन कविता व अर्वाचीन कविता यांतील भेद स्पष्ट करा (पा० ६७–६८).

१७. अर्वाचीन कवितेवर जुन्या वळणाच्या पंडितांकडून कोणते आक्षेप येत होते? आज ते आक्षेप कितपत उरले आहेत? (पा० ६७–६८).

१८. 'निर्यमक कविता' म्हणजे काय? ती तुम्हाला कितपत आवडते? विद्यमान कवींत महाकाव्यें लिहिणारा कोणी नाहीं; तसेंच विद्यमान कवींत राष्ट्राला स्फूर्ति किंवा संदेश देणारा कोणी कवि नाहीं, ह्या विधानासंबंधानें तुमचें मत लिहा.

१९. सृष्टीचे भोक्ते, विलापिका गाणारे, आशा व स्फूर्ति यांचे उद्गाते, तत्त्वप्रतिपादक, बालगीतें रचणारे, नैराश्यवादी, स्वातंत्र्यसंदेशक, भावगीतें व वीणागीतें स्फुरणारे, विडंबक, ह्या प्रकारच्या विद्यमान प्रमुख कवींचीं नांवें सांगा; व त्यांच्या काव्यांतलि वैशिष्ट्य सांगा.

२०. 'आधुनिक कविता अनेकांगांनी संपन्न होत चालली आहे,' ह्या विधानाला पोषक असें साधार विवेचन करा.

२१. मराठी कोश-रचनेचा इतिहास लिहा. (पा० १२२।१२३).

२२. मराठी व्याकरणाची पूर्वपीठिका सांगा; त्यांत दादोबा, कृष्णशास्त्री चिपळूणकर, कृष्णशास्त्री गोडबोले, व मोरो केशव दामले, यांच्या व्याकरणविषयक कामगिरीचें महत्त्व स्पष्ट करा. (पा० १२३।१२४).

२३. तांबे, चंद्रशेखर, यशवंत, गिरीश, मायदेव, सावरकर, गोविंद, Bee, अत्रे, रेंदाळकर, बा० अ० भिडे, रे० टिळक, ठोमरे, यांच्या कवितेचें वैशिष्ट्य सांगा.

२४. चालू वर्षातील खालीलसारख्या वाङ्मयविषयक महत्त्वाच्या गोष्टींचा उल्लेख करा; त्यांत पडलेल्या साहित्यिकांच्या कामगिरीचा निर्देश करा.

(१) ग्रंथ—'हास्य-विनोद-मीमांसा' (केळकर), 'छन्दोरचना' (माधवराव-पटवर्धन), 'प्रवासी' कादंबरी (फडके), इ०.

(२) भाषाशुद्धि व लिपिशुद्धि—माधवराव पटवर्धन, सावरकर, क्षीरसागर, आठवले, कालेलकर, वा० वि० जोशी, इ०.

---

# काव्य-विचार



## काव्य-लक्षण

१. प्रतिभानिर्मित व कल्पनारम्य अशी जी सुंदर वाक्यरचना तिला काव्य असें म्हणतात. (प्रतिभा=स्फूर्ति).

(१) "वाक्यं रसात्मकम् काव्यम्," (२) " रमणीयार्थ-प्रतिपादकः शब्दः काव्यम्," (३) "गुणालंकार-सहितौ शब्दार्थौ दोष-वर्जितौ," (४) "काव्यस्यात्मा ध्वनिः", (५) "भावनोद्दीपकः शब्दः काव्यम्," इ० काव्याच्या पुष्कळ व्याख्या निरनिराळ्या ठिकाणीं केलेल्या आहेत; त्या सर्वांचा मथितार्थ असा कीं, काव्यांत प्रतिभा, आल्हादजनकत्व, रसोत्पत्ति; रमणीयार्थ-प्रतिपादन; ओज, माधुर्य, प्रसाद, इ० गुण; अलंकार; ध्वनि म्हणजे सूचकता; भाषा-प्रौढता व सुबोधता; शब्दार्थदोषरहितता (निर्दोषत्व); शब्द-चमत्कृतीं-पेक्षां अर्थ-चमत्कृतीचें प्राधान्य; इ० गोष्टी असाव्यात.

बालकवींच्या 'फुलराणी' ह्या कवितेंतील खालील उताऱ्यावरूनही ह्या गोष्टींची नीट स्पष्टता होईल; फुलराणी व रविकर यांच्या विवाहाचें वर्णन—

**तेजोमय नभ-मंडप केला । लक्ख पांढरा दहा दिशांला**
**जिकडे तिकडे उधळित मोतीं । दिव्य वऱ्हाडी गगनीं येती**
**लाल सुवर्णी झगे घालुनी । हांसत हांसत आले कोणी**
**कुणीं बांधिला गुलाबि फेटा । झकमकणारा सुंदर मोठा**
**आकाशीं चंडोल चालला । हा वाङ्निश्चय करावयाला**
**हें थाटाचें लग्न कुणाचें ? । साध्या भोळ्या फुलराणीचें**

\+ + + +

**गाउं लागले मंगलपाठ । सृष्टीचे गाणारे भाट**
**वाजवि सनई मारुत-राणा । कोकिळ घे तानांवर ताना**
**गाउं लागले भारद्वाज । वाजवितो निर्झर पखवाज**
**नवर-देव सोनेरी रवि-कर । नवरी ही फुलराणी सुंदर**
**लग्न लागतें, सावध व्हा रे । सावध पक्षी, सावध वारे**
**दंवमय हा अन्तःपट फिटला । भेटे रवि-कर फुलराणीला**

\+ + + +

**वधू—वरांना दिव्य रवांनीं । कुणीं गाइलीं मंगल गाणीं**
**त्यांत कुणीसें गुंफित होतें । परस्परांचें प्रेम अहा तें**

आणिक तेथिल वनदेवींहीं । दिव्य आपुल्या उच्छ्वासांहीं
लिहींत होत्या वातावरणीं । फुलराणीची गोड कहाणी
गुंगत गुंगत कवि त्या ठायीं । स्फूर्तीसह विहराया जाई
त्यानें तर अभिषेकच केला । नव-गीतांनीं फुलराणीला

नीट कल्पना येण्यासाठीं हा एवढा उतारा दिला आहे; त्यावरून कवीला एक फुलराणीचें फूल दिसलें तें काय, आणि तेवढ्यावरून त्यानें आपल्या कल्पना-निर्मितीनें परिस्थितीचा त्याच्याशीं संबंध जुळवून, रवि-किरणाशीं त्या फुलराणीचें लग्न लावून दिलें तें काय! त्याला वऱ्हाड्यांची पंचाईत पडली नाहीं; मौल्यवान् कपड्या-लत्त्यांची कमतरता भासली नाहीं; वाङ्निश्चयाला कोण उभा करावा ह्याची फिकीर पडली नाहीं; त्यानें साध्या भोळ्या फुलराणीचें सुंदर छबुकड्या रवि-किरणाशीं, मोठ्या थाटानें सृष्टीच्या भाटांकडून मंगलपाठ म्हणवून, मारुतराण्याला सनई वाजवावयाला लावून, कोकिळाला गावयाला लावून, भारद्वाजाकडे नर्तन सोंपवून, निर्झराना पखवाजी बनवून, ‘ सावधान ’ ‘ सावधान ’ असें मोठ्यानें म्हणत असता, दंवमय अंतःपट बाजूला सारून, लग्न लावून दिलें; आणि शेवटीं आपण स्वतः स्फूर्तीसह तेथें गुंगत गुंगत येऊन त्यांच्यावर त्यानें नव-गीतांचा जणूं अभिषेकच केला!

किती सुन्दर कल्पना! उसन्या नसून स्वयं-प्रतिभा-निर्मित! अशा रचनेला **काव्य** म्हणतात; एवढें येथें स्पष्टीकरण पुरे.

२. ‘ मोगरे यांची कविता ’ या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत **ह० ना० आपटे** यांनीं काव्याचें जें लक्षण केलें आहे तेंही अत्यन्त मार्मिक व सुबोध असल्यानें येथें उद्धृत करितों—

“ काव्यपृथक्करण केलें तर काव्याचे घटकावयव तीन दिसतात; **नाद** (Sound), **अर्थ** (Sense) व **ध्वनि** (Suggestion). नाद यांत तालबद्धता व माधुर्य सूचित होतात. या अवयवत्रयीची अत्यन्त प्रमाणशील घटना झालेली दिसली म्हणजे रसिकजनांना काव्यानंद हा झालाच पाहिजे. नुसती शब्द-रचना म्हणजे काव्य नव्हे. ती नादवती, अर्थवती व ध्वनिवती पाहिजे; शब्द यथोचित पाहिजेत; बाह्यार्थ सुंदर पाहिजे; आणि त्या बाह्यार्थाच्या अंतरंगीं असणारा अर्थ—जो रसिकानें आपल्या रसिकतेनेंच काढावा लागतो—तो अर्थही फार सुंदर पाहिजे. ... नुसत्या नादयुक्त शब्दांच्या रचनेनेंच काव्य होत नाहीं, परंतु तसल्या रचनेसच सामान्य लोक काव्य समजतात;...त्याहून

वरच्या दर्जाचे लोक फक्त बाह्यार्थ-परिपाकाचें महत्त्व समजतात;...परंतु खरे रसिक आहेत ते मात्र काव्याची परीक्षा करावयाची ती काव्याच्या शब्द-रचनेंतील **नाद, अर्थ** व **ध्वनि** या तिन्हींवरून करितात. या तीनही गुणांचें अस्तित्व ज्या कविकृतींत असेल ती कविकृति अज्ञ, मुज्ञ व विशेषज्ञ, या तिघांस सारखाच मोह घालिते.''

नीट कल्पना येण्यासाठीं एकेक उदाहरण देतों.

**नाद**— ( जाति–अवनी )

**रुणुझुणु ये, रुणुझुणु ये । झणकारित वाळा ॥**
**लुटुलुटुलुटु, दुडुदुडुदुडु । ठुमकत ये बाळा, ॥रुणुझुणु०॥**
**धुंद अजुनि, रजनि–नयनीं । सावरूनि, पदर धरुनि**
**शुभवदना, उडुरदना । देह जांभयांला ॥ रुणुझुणु०** ( तांबे )

यांतील तालबद्धता व माधुर्य हीं सहज ध्यानांत घेण्यासारखींच आहेत. त्याचप्रमाणें म्हणून पाहिल्यास किंवा चांगल्या काव्यगायकानें म्हटल्यास, यांतील अनुप्रासादिकाची मौज चांगलीच प्रत्ययास येते; अशा रचनेला **नादवती** कविता म्हणतात

**अर्थ**—

**छान किती दिसतें ! । फुलपांखरूं ॥ ध्रु० ॥**
**या वेलीवर । फुलांबरोबर ।**
**गोड किती हंसतें । फुलपांखरूं ॥ १ ॥**
**पंख चिमुकले । निळे जांभळे ।**
**हालवुनी झुलतें । फुलपांखरूं ॥ २ ॥**
**मी धरूं जातां । येइ न हाता ।**
**दूरच तें उडतें । फुलपांखरूं ॥ ३ ॥**(ग०ह०पाटील)

यांत वर्ण्य अर्थालाच प्राधान्य आहे व तो सुंदर आहे. यांत मुद्दाम कोठें अनुप्रासादि अलंकार आणण्याचा अट्टाहास नाहीं, पण फुलपांखराचें वर्णन यथातथ्य आहे; अशा रचनेला **अर्थवती** कविता म्हणतात.

**ध्वनि**—

**तें श्वान एक तुकड्यास्तव चार नाना ।**
**दावी धन्यास जठरार्थ कसें पहाना ॥**
**दे आळवूनि जरि हस्ति–प बाप, भाई, ।**
**घे तोंच घास गजराज कशी बढाई ! ॥** ( वामन )

येथें केवळ पोट भरण्याकरितां कुत्रें धन्याजवळ नानाप्रकारें गोंडा घोळतें, पण त्याच कारणासाठीं हत्तीला बाबा, भाई, असें गौरवावें लागतें तेव्हांच तो खातो; असा बाह्यार्थ आहे. (परंतु क्षुद्र गोष्टीसाठीं क्षुद्र लोक लाचारी दाखवितात; पण मानी लोक तिकडे ढुंकूनही पहात नाहींत; हा ध्वनि किंवा सूचित अर्थ यांत आहे; हें उघडच आहे ). बहुतेक अन्योक्ति या सदरांत येतील; अशा रचनेला **ध्वनिवती** कविता म्हणतात.

## गद्य-काव्य

काव्य पद्यांतच असतें असें नसून, गद्यांतही त्याचीं विपुल उदाहरणें सांपडतील. परंतु येथें ज्यास्त जागा नसल्यामुळें, खालील एकच उदाहरण दिलें आहे.

## विषमूर्ति भुजंग

" ओहो! तो पहा वितळलेल्या रुप्याचा छोटासा ओघळ जमिनीवरून चालला आहे. चालला आहे कशाचा? वाहतो आहे. याची गति किती गमतीची! चपल असून शांत, पाण्याची लाट कीं वाऱ्याची झुळूक! पुनः लाट म्हणावी तर गर्जत नाहीं, ओघ म्हणावा तर धबधबा नाहीं. जणूं कांहीं टिकल्यांच्या चंद्रहाराचा सर घसरतो आहे, कीं सुबक बुंदक्यांचा गळपट्टा पडला आहे, कांहीं ओळखत नाहीं. रेशमाहून मृदु, कदलीगर्भाहून शीतल, पुष्पहाराहून सुखतर स्पर्श, पण या सौम्यपणाला फसूं नका. दाढेंत जिवंत मृत्यु उभा आहे. थोडे वाटेस जा, म्हणजे समजेल चंद्रहार कीं कट्यार, आणि गळपट्टा कीं गळा उतरणारा पट्टा आहे तो! रुपेरी पाण्याचा ओघळ आतां नव्हे, आतां झाली विषाची लाट. गवताचे गर्दीतून हा विषारी बाण सणाणतो आहे. क्रोधानें नुसता फणकारा चालला आहे. आतां त्याला शांति नाहीं, उष्ण नाहीं. पुष्पांचें मृदुत्व जाऊन पाषाणाचें कठोरपण उभें राहिलें आहे. अखिल ब्रह्मांडांतील क्रूरता, दुष्टपणा, हिंस्रता, एकवटून तुमच्या पुढें स्वारी खडी आहे. तिचे आटोक्यांत या, कीं स्वर्गद्वाराचीच भेट!"

—( म० ह० मोडक, सुख व शांति )

जुन्या क्रमिक पुस्तकांतील कृष्णशास्त्री चिपळूणकरांचा 'समुद्र' हा उतारा, उदास यांचा 'एल्फिन्स्टन पॉइंट' हा उतारा, इ० गद्यकाव्याचे नमुने होत. शिवरामपंत परांजपे यांचे पुष्कळसे लेख शुद्ध गद्यकाव्यात्मकच आहेत.

## काव्य-गुण

**प्रसाद**, **माधुर्य** व **ओज** असे काव्याचे मुख्य तीन गुण आहेत.

१. सहज अर्थप्रतीति होईल अशी शब्द-योजना ज्या रचनेंत असते, तिला **प्रसाद** असें म्हणतात. ( अर्थबोध सहज झाल्यानें मन त्या त्या वृत्तींनीं भरून जातें. तसेंच या रचनेंत समास क्वचितच असतात, व असल्यास तेही अगदीं लहान असेच असतात ). उदा०—

( १ ) सत्यभामा व द्रौपदी यांचें संभाषण—

**[ १ ] सत्या कृष्णेसि म्हणे, " वदतें तें तूं खरेंच मान सये।**
**लोक म्हणोत परि पळहि, माझ्या हातीं न कांत-मानस ये " ॥**
**कृष्णा हांसोनि म्हणे, " भामे, मोहावयासि पतिला जे।**
**मंत्राद्युपाय करणें, या श्रवणें बहु मदीय मति लाजे।**
**प्रेमें पति-चरणांसि न, देउनि दे हात तायिताला जे॥**
**ते स्त्री न रुचे पतिला, कीं तीतें आततायिता लाजे " ॥** ( मोरोपंत )

**[ २ ] या बाइ या — बकुळिच्या झाडाखालिं फुलें वेंचु या।**
**उन पडलें — पान फुल दिसे कसें गोड गोडुलें।**
**गोड गोडुलें — मोतियांचे दाणे कोणिं खालिं पाडिले।**
**रान हाललें — पहाटेला शुक्र-देव गाणें बोलले ॥** ( बालकवि )

२. ज्या रचनेच्या योगानें चित्तवृत्ति तल्लीन होते, ज्यांतील विशेषतः कोमल व मधुर वर्णांच्या रचनेमुळें नाद उत्पन्न होऊन, तें गुणगुणावेंसें वाटतें, अशा प्रकारच्या रचनेला **माधुर्य** असें म्हणतात. या रचनेंतही समास क्वचितच असतात; आणि केव्हां केव्हां गोड वाटणारी अनुप्रासात्मक रचनाही आढळते. उदा०—

( १ ) दमयंती हंसाला धरण्याचा प्रयत्न करीत आहे तें वर्णन—

**हे मंदमंद पद सुन्दर कुन्द-दन्ती।**
**चाले जसा मद-धुरंधर इंद्र-दन्ती ॥**
**हंसा धरूं जवळि जाय कृशोदरी ते।**
**निष्कंप-कंकण करासि पुढें करीते ॥** (रघु० पं०)

( २ ) "**उघाडि नयन रम्य उषा०**" हें रेंदाळकरांचें पद्य या गुणानें युक्त आहे; तें छन्दःशास्त्रांत पुढें आलेलें आहे, म्हणून येथें दिलें नाहीं.

**३.** ज्या रचनेनें अन्तःकरण उद्दीपित होतें, व जोरदारपणा उत्पन्न होतो, अशा रचनेला **ओजस्** किंवा **ओज** असें म्हणतात. दीर्घ समास, कठोर वर्णांचें आधिक्य, इ० गोष्टी यांत आढळतात. उदा०—

(१) **कोठें रथ? मुशल पुरे; कवच कशाला? धनुष्य राहों द्या।**
**वत्सेला निज-धर्षण-कर-खल-दंडोत्सवासि पाहों द्या॥** (मोरोपंत)

(२) संग्रामांत झांशीची राणी लक्ष्मीबाई—
**आरक्त उषा ती गमली — आरक्त चंडिका गमली।**
**संतप्त भासली संध्या — संतप्त भासली काली।**
**संक्षुब्ध तिच्या नेत्रांत — क्रोधाची चढली लाली।**
**लखलखाट मार्तंडाचा**
**चकचकाट पूर्णेंदूचा**
**दाविला खेळ तेजाचा**
**रक्तानें शरिरीं न्हाली — मर्दानी झांशीवाली॥** (तिवारी)

## काव्यांतील रस

"रसात्मकं काव्यम्" म्हणजे रस हा काव्याचा आत्मा आहे असें म्हणतात. कोणतीही भावना उत्कर्षाला पोंचणें ह्या गोष्टीस **रस** असें म्हणतां येईल.

शृंगार, वीर, करुण, अद्भुत, हास्य, भयानक, बीभत्स, रौद्र व शांत हे **नव-रस** मानण्यांत येतात. कोणी कोणी भक्ति हा आणखी एक रस मानितात. ह्या प्रत्येकाची कल्पना येण्यापुरतीं उदाहरणें येथें देतों.

**१. शृंगार**—यांत विशेषेंकरून स्त्रियांचें सौंदर्य, राग, अनुराग, इ०चें वर्णन असतें. [गोपीक्रीडा, राधाविलास, इ० मराठी कवींच्या प्रकरणांतून या रसाचीं उत्तान अशीं उदाहरणें हवीं तेवढीं सांपडतील; पण तीं देणें इष्ट नसल्यामुळें येथें दिलीं नाहींत].

दमयंतीचें स्वरूप —

[१] **चांपेकळीपरिसही सरलत्व नाकीं।**
**जीचा धरी अधर विद्रुम-भावना कीं॥**
**भासे मनांत मज बिंबफल भ्रमानें॥**
**कीं सत्य चंचु-पुट वोढविलें शुकानें!॥** (रघु० पं०)

कृष्णावर रागावलेली सत्यभामा—

[२] **गडबडां धरणीवरि लोळते। वदवती न कवीसाहि लोळ ते॥**
**रडत मूर्च्छित होय घडीघडी। पवन निश्चळ नेत्र न उघडी॥** (वामन)

**२. वीर**—कोणत्याही प्रकारच्या धीरोदात्त व पराक्रमयुक्त वर्णनाचा यांत अन्तर्भाव होतो. उदा० —

अर्जुनाचें युद्धकौशल्य—( भीष्मपर्व ).

**सूं सणणण सणणणणण, वाजति शर-निकर काय हानि-कर ।**
**वदले सुर-मुनि " करितो, नर-रूपें रुद्र काय हा निकर ! " ॥**
**शराधि शर-जलधि फुटले, कीं दैवें पाश एकदा तुटले ।**
**ते काळ-व्याळ करटि-घोटक-भट-भेक खावया सुटले ! ॥** (मोरो०)

**३. करुण**—हृदयद्रावक अशा गोष्टींच्या वर्णनाच्या योगानें ह्या रसाची उत्पत्ति होते. उदा० —

**'आई,' म्हणोनि कोणी । आईस हाक मारी**
**ती हाक येइ कानीं । मज होइ शोक-कारी !**
**नोहेचि हाक मातें । मारी कुणी कुठारी !**
**'आई,' कुणा म्हणूं मी ? । 'आई' घरीं न दारीं !**
**ही न्यूनता सुखाची । चित्ता सदा विदारी !**
**स्वामी तिन्ही जगांचा । 'आई' विना भिकारी ! १.** (यशवंत)

**४. अद्भुत**—यांत आश्चर्यकारक असें वर्णन असतें. उदा० —

[ १ ] **वनासि रघुराज जाय अशि वाणि जों ऐकिली ।**
**तदा भरत-माय दारिं नच माय-शी फूगली ॥**
**परंतु निज-पुत्र राज्य न करी असें ऐकतां ।**
**तिचीं गळति कंकणादि वलयें बहु वारितां ! ॥**

[ २ ] **पडतांचि गांठि झाले समर-चमत्कार फार न वदवती ।**
**लिहितां सरस्वतीच्या सरतिल शत-कलश-सदृश नव दवती** (मो०)

**५. हास्य**—असंबद्ध प्रलाप, परचेष्टानुकरण, व्यंगदर्शन, इ० गोष्टींच्या योगानें या रसाची उत्पत्ति होते. उदा० —

एक आत्मप्रतिष्ठित आधुनिक शाहीर कवि —

**आनंदातिशयें पटापट उड्या मारून तो ओरडे**
**'या रे या' मज नाचवा; रसिक हो, डोक्यावरी घेउनी**
**फुंका दुंदुभि वाजवा चहुंकडे सत्कीर्तिचे चौघडे**
**कीं पृथ्वीवर आज ये मजमुळें सत्काव्य-संजीवनी !' १.**
**ऐसें बोलुनि हात तो वर करी सर्वांपुढें जों कुठें**
**आले तेतिस कोटि देव गगनीं, तें पाहण्या अद्भुत !**

संपे संशय-काल, मूठ उघडे, भाण्डार सारें फुटे !
हातीं एक दिसे ‘ सुनीत ’ तुटकें ! ! झाली मती कुंठित ! २.
( केशवकुमार झें० फु० )

६. **भयानक** — उदा० –भीमाचें दुःशासन-रक्त-प्राशन.

मग कंठनाळ चरचर, तो सत्य करावया बिरुद कापी
मिटक्या देउनि मटमट, घटघट त्या स्वाहितासृगुदका पी १.
...ऐसें वदोनि ओष्ठ-प्रांत जिभेने पुनःपुन्हां चाटी
अवलंबी अत्युग्रा, भीम अतृप्तद्विपारिची धाटी २.
रिपु शूर दूर तेथुनि तें दारुण-कर्म पाहतां पळती !
किति पडती, किति दडती, कितिएकांचीं धृतायुधें गळती ! ! ३. (मोरो०)

७. **बीभत्स** — यांत किळस उत्पन्न होईल अशा प्रकारचें वर्णन असतें.
एका विचित्र योग्याचें वर्णन —

[ १ ] गोचर्मांवर साजुक ऐसें पांघरला उफराटें ।
मस्तकिं मासे भारामध्यें मत्स्य भाक्षितो वाटे ॥
लक्ष मक्षिका घोंगावति वरि पोर लागती पाठीं ।
लोकामाजीं योगिराज तो देखुनियां निज-दृष्टीं ॥ १ ॥ ( उ० चि० )

आपलें शरीर —

[ २ ] श्मश्रु रोम नख केश कातडीं । आंत मांस, कफ, पित्त, आंतडीं ॥
मूत्र, शेंबुड, मळादि वाहती । त्यास सुंदरपणेंच पाहती ॥१॥ (वामन)

८. **रौद्र** — याचें भयानक रसाशीं बहुधा सान्निध्य असते.
उदा० — अश्वत्थाम्यानें पांडवांच्या शेष सैन्याचा केलेला प्रळय —

सदनीं शिरोनि पाहे, सुख-सुप्ता तात-घातका मत्ता
धृष्टद्युम्ना उठवी, हाणुनि नागासि गरुड-सा लत्ता १.
...पार्षत म्हणे “ गुरुसुता, मजला शस्त्रेंकरोनि मारावें
पावेन वीर-लोकाप्रति, बा, शरणागतासि तारावें ” २.
द्रौणि म्हणे “ मारावा शस्त्रें तो जो असेल अधमान्य
गुरुघातका, तुझा तों गुरुभक्त-जनीं असाचि वध मान्य ” ३.
ऐसें वदोनि मर्मीं, हाणी तो शत्रुघात-कर टांचा
बुकलुनि मारी, चित्तीं धूक-कृत स्मरुनि घात करटांचा ४.
उग्रें कर्में, रूपे, भासे तो भूत ! विप्र भासेना !
केल्या त्रासें हरिष्या, दश-कंठें जेंवि विप्रभा सेना ! ५. (मोरो०)

[ वीर, भयानक व रौद्र हे सहचारी रस असल्यामुळें बरेच वेळां ते एकमेकांत मिसळलेले आढळतात. ]

९. **शांत** — यांतच भक्ति, उदात्त, वत्सल व प्रेयान्, यांचा समावेश करितात. त्याचें एकेक उदा० —

**भक्ति** — ( ईश्वरविषयक प्रेम )

दयाब्द वळशिल तूं तरि न चातकां सेवकां।
उणें किमपि भाविकां उबगशिल तूं देव कां ? ॥
अनन्य-गतिका जनां निरखितांचि सोपद्रवा।
तुझेंचि करुणार्णवा, मन धरी उमोप द्रवा ॥ १ ॥ (मोरो०)

**उदात्त** — ( गाम्भीर्यात्मक रचना )

ज्यांचें पात्र पवित्र पाणि-युग हें भिक्षान्न जे भक्षिती।
ज्यांचें वस्त्र दिशा, जयां भय नसे, शय्या जयांची क्षिती॥
ज्यांला दैन्य नसे, विरक्ति-वनिता जे तीसवें नांदती।
ज्यांला कर्म-कलाप बांधित नसे, ते धन्य येणें रिती॥ (वामन )

**वत्सल** — ( पुत्र–कन्या–विषयक प्रेमाचें वर्णन )

देखोनि दन्त–मुकुला अनिमित्त हासें ।
तें बोबडें वच तसें परिसोनि खासें ॥
अंकावरी बसवुनी तनया पहाती ।
त्याच्या रजें मळाति ते जगिं धन्य होती॥ ( पर० तात्या

**प्रेयान्** — ( मित्रविषयक प्रेम ). सुदाम्याचें कृष्णगृहीं आगमन —

(साक्या) श्रीरुक्मिणिच्या मंदिरिं तेव्हां होता जगन्निवास
तेथें कळलें कीं भेटाया आलासे निज-दास १.
झडकरि उठला दयाळु बांधव वस्त्रादिक नावरितां
धावत आला पुढें रमेला सोडुनि दासाकरितां २.
‘ ये ये बंधो, ’ ऐसें सद्गद बोलत धांवत आला
कडकडुनी भुज–युग्में स्व–सखा हृदयीं धरिता झाला ! ३.( मोरो०)

**टीप** — काव्यगुण किंवा रसोत्पत्ति यांविरहित काव्य एक प्रकारचें बेचव म्हणजे नीरस असतें; म्हणून प्रसाद, माधुर्य व ओज, ह्या तीन काव्यगुणां-संबंधानें व नव–रसासंबंधानें येथें किंचित् दिग्दर्शन केलें आहे.

# भाषेचे अलंकार

कविप्रतिभानिर्मित, मनोल्हादक, चमत्कृतियुक्त, भाषेला शोभा देणारी अशी जी शब्दरचना तिला " **अलंकार** " असें म्हणतात.

**वेडिवाकडीं घेउनि वळणें । नागिण धावे जणुं रोषानें**
**वाफा टाकित धापापरि हीं, गाडी धडधडते १.**
**वरतीं भिडली घन घनमाला । धूम धावते दिग्भागाला**
**रथचक्रांच्या घर्घरीपरी, गगनीं गडगडतें २.** ( मायदेव )

वरील ठिकाणीं नुसतें 'आगगाडी जात आहे' असें न म्हणतां, तिला 'जणुं कांहीं रोषानें नागीण धावत आहे' असें म्हटलें आहे. तसेंच 'आकाशांत ढग गडगडत आहेत' असें नुसतें न म्हणतां 'रथचक्रांच्या घर्घरीप्रमाणें गडगडतें' असें म्हटलें आहे.

त्याचप्रमाणें '**वाफा** टाकित **धापा**परि;' 'वरतीं भिडली **घन घनमाला**; **धडधडतें, गडगडतें**; अशा प्रकारची शब्दयोजना केल्यामुळें ती साध्या वाक्यापेक्षां आपल्यास श्रुतिमधुर व मनोल्हादक वाटते. अशा प्रकारें बोलण्याचा मनुष्यस्वभाव आहे. अशा भाषणानें भाषेला अधिक शोभा येते. ह्या भाषेला शोभा देणाऱ्या गोष्टी म्हणजेच भाषेचे अलंकार होत. हिंदुस्थानचा आकार त्रिकोणाप्रमाणें आहे;" " ही भिंत चुन्याप्रमाणें पांढरी आहे;" या दोन वाक्यांत फक्त वस्तुस्थिति आहे. कल्पना व चमत्कृति ह्या गोष्टी नाहींत व तज्जन्य मनोहरत्वही नाहीं, म्हणून हें वाक्य वरच्यासारखें अलंकारयुक्त नाहीं. असेल त्यापेक्षां निराळ्या रीतीनें कल्पना लढवून, अतिशयोक्ति करून, किंवा चमत्कार वाटेल अशी योजना करून बोलण्याची मनुष्याची बलवत्तर प्रवृत्ति असल्यानें भाषेंत अलंकार-निर्मिति होते.

भाषेला केव्हां शब्द-चमत्कृतींनीं व केव्हां अर्थ-चमत्कृतींनीं शोभा येते; ह्यामुळें अलंकारांत **शब्दालंकार** व **अर्थालंकार** असे दोन भाग पडतात.

## शब्दालंकार

**यमक, अनुप्रास, श्लेष** व **चित्र**, असे शब्दालंकारांचे मुख्यतः चार प्रकार आहेत. ( येथें भिन्न भिन्न मतांचा विचार केला नाहीं ).

**१. यमक** -- पद्याच्या एकाच चरणांत किंवा भिन्न चरणांत एकदां **ज्या क्रमानें अक्षरें आलीं त्याच क्रमानें** पुनः तींच अक्षरें आल्यास ह्या अलंकार होतो. उदा०—

( १ ) एकाक्षरी व अनेकाक्षरी अन्त्ययमक--

एकाक्षरी {
**एक्या पदें भूमि भरोनि थोडी**
**दुज्या पदें अंड-कटाह फोडी**

द्व्यक्षरी {
**दे तीसरा पाद म्हणे बळीला**
**म्हणोनि पाशीं दृढ आकळीला ॥ १ ॥**

चतुरक्षरी {
**बाहु ज्यां उगवतांच रवीला**
**दाट घालुनि दही चरवीला**
**त्यांत गे फिरवितांच रवीला**
**सार काढुनि हरी चरवीला ॥ २ ॥** ( वामन )

**कुरु-सैन्यांत गमे ज्यापरि रंभा-काननांत वारा हो ।**
**त्या विजय-श्री देउनि, परिरंभा कां न नातवा राहो ?** ( मोरो० )

( २ ) अन्त्य व आदि चरण यमक—( एकाचा अन्त्य व दुसऱ्या चरणाचा आरंभ यांतील यमक ).

**सेवुनि संतत पाला, संत तपाला यदर्थ करितात ।**
**तो प्रिय या स्तवना कीं, यास्तव नाकींहि तेंच वरितात ॥** ( मोरो० )

( ३ ) दामयमक—( दाव्याप्रमाणें एकाचा अन्त्य व दुसऱ्याचा आरंभ याप्रमाणें अनेक चरणांचें यमक ).

**श्रीपति झाला दशरथ-सुत राम दशाननासि माराया ।**
**मा राया जनकाची होय सुता त्रिजगदाधि साराया ॥**
**सारा या प्रभुची हे, लीला गाती सदैवही सु-कवी ।**
**सुकवी; भव-जल-निधितें; निरुपमसुख रसिक-जन-मनीं पिकवी** (मो०)

( ४ ) पुष्पयमक—( फुलाच्या पाकळ्यांप्रमाणें एकेका चरणांत यतीचे ठिकाणीं अनेक वेळां येणारें यमक ).

**सुसंगति सदा घडो, सुजन-वाक्य कानीं पडो, ।**
**कलंक मतिचा झडो, विषय सर्वथा नावडो, ॥**

**सदंघ्रि-कमळीं दडो, मुरडितां हटानें अडो,।**
**वियोग घडतां रडो, मन भवच्चरित्रीं जडो. ॥** ( मोरो० )

( ५ ) अश्वधाटीयमक—( अश्वाच्या विवक्षित गतीप्रमाणें असणारें यमक ).

**वाजत गाजत साजत आज तया जतन करुनि आणा हो ।**
**मज मार्गे मत्स्यांचा हा रिपु-शशि-राहु-बाहु राणा हो ॥** ( मोरो० )

( ६ ) युग्मकयमक—( पहिला व दुसरा आणि तिसरा व चवथा या चरणांचें साधलेलें यमक ).

**पायां नमीं देइन वंश सारा । पा या न मी दे इनवंशसारा ॥**
**न या वयामाजि भला जना दे । न यावया 'मा' जिभ लाज ना दे ॥** (आ०त०)

अर्थ—दशरथ विश्वामित्रास म्हणतो, " मी पायां पडतों; सारा वंश देईन, परंतु या सूर्यकुलभूषण रामाला मी देणार नाहीं; भला मनुष्य ह्या वयामध्यें दुसऱ्याला आपला मुलगा कसा देईल ? ' नाहीं ' असें तोंडानें म्हणावयास माझ्या जिभेला कांहीं लाज वाटत नाहीं. "

( ७ ) समुद्गकयमक—( पद्याचें एक अर्ध व दुसरें अर्ध यांतील सर्व शब्दसमुच्चयानें साधलेलें यमक ).

**अनलसमीहित साधी राया, वारा महीवरा कामा ।**
**अनलस मीहि तसा धीरा यावा रामही वराका मा ॥** ( मोरो० )

अर्थ—" हे पृथ्वीपते धर्मा, वारा जसें अग्नीचें कार्य साधितो, तसें तुझें साह्य करण्यास मी सदैव तत्पर आहें. हे धीरा, बलरामही हवे तर येतील; मग वराका ( बिचारी ) मा ( रुक्मिणी ) तुझ्या साह्यास कां येणार नाहीं ? सहजच येईल. " ( पांगारकर, मोरोपंत चरित्र ).

याप्रमाणें यमकांचें मौजेचे प्रकार पुष्कळच आहेत.

**२. अनुप्रास**—पद्यांत किंवा गद्यांत कोठेंही येणाऱ्या वर्णांच्या पुनरावृत्तीमुळें हा अलंकार होतो. उदा०—

( १ ) **मल्लवेष रचिला अभिराम । श्रीधर प्रभुसवें बळराम ॥**
**मोर-पत्र मुकुटीं तरु-पत्रें । नेत्र सुंदर जशीं शत-पत्रें ॥** ( वामन )

यांत 'र' या व्यंजनाची अनेक वेळां पुनरावृत्ति झालेली आहे.

( २ ) **तल्लीलेमधिं तल्लीन न हो कल्लोलिनि कवि कवण तरी ?**
**जय संजीवनि जननि पयोदे, श्रीगोदे, भवताप हरीं** ( चंद्रशेखर )

यांत अनेक व्यंजनांची पुनरावृत्ति आहे, हें सहज कळून येईल.

(३) देवि दयावति, दवडिसि दासाची दुःख दुर्दशा दूर।
पापांतें पळवितसे परम-पवित्रे, तुझा पयःपूर॥ (गंगास्तुति, मोरो०)
यांत 'द्' व 'प' या वर्णांची पुनरावृत्ति आहे.

**३. श्लेष**—एकाच वाक्यांतील शब्दांच्या द्व्यर्थी योजनेनें हा अलंकार होतो. शब्द-श्लेषांत श्लिष्ट शब्दाऐवजीं तदर्थक दुसरा शब्द चालत नाहीं. उदा०—

(१) ती शीतलोपचारीं, जागी झाली हळूच मग बोले।
'औषध नलगे मजला,' परिसुनि माता 'बरें' म्हणुनि डोले (मोरो०)
(२) नलराजकथा सुधाचि साजे। दमयंती वरवर्णिनी विराजे॥
मिळणी उभयांशि होय जेथें। अधिकारी अधिकानुराग तेथें (र० पं०)

येथें सुधा=अमृत व चुना; वरवर्णिनी=सौंदर्यसंपन्न व हळद; आणि अधिकानुराग=अधिक प्रीति व आधिक रक्तिमा; याप्रमाणें द्व्यर्थी शब्द-योजना केली आहे व "नलराजकथा अमृताप्रमाणें असून, द्रौपदीही तशीच उत्तम-सौंदर्यसंपन्न-आहे; या उभयतांच्या मिळणीनें अधिक प्रीतिच उत्पन्न होणार" हा एक अर्थ व्यक्त केला आहे; आणि "चुना व हळद यांच्या मिश्रणानें रक्तवर्णच निर्माण होणार" हा दृष्टान्तयुक्त अर्थही साधिला आहे; म्हणून येथें श्लेष हा अलंकार आहे.

**४. चित्र**—जेथें पद्म, खड्ग, चक्र, इ० आकृतीमध्यें किंवा विवक्षित वर्ण ठराविक ठिकाणींच आणण्याची रचना करून वैचित्र्य साधिलेलें असतें, तेथें हा अलंकार होतो. विठ्ठल कवि व मोरोपंत यांची या प्रकारची बरीच रचना आढळते. मोरोपंताची मंत्र, दीर्घ, लघु, परंतु, निरोष्ठ, इ० रामायणें चित्रकाव्यांतच मोडतील. उदा०—

मंत्र—श्रीमान् राजशिरोमणि दशरथ जो निज-यशें वरा महित।
द्विजसेवक यज्ञ-निरत, जनभयहर्ता, धरा निकामहित॥
दीर्घ—श्रीराम स्वामी दे सर्वांला सर्व अर्थ साधूनी। } फक्त १३ वें
त्यातें गावें भावें केला हा सूपदेश साधूंनीं॥ } अक्षर लघु
लघु—दशमुखवधमति विधिसुरनुतपद जगदधिप अजित वरद हरी।
परम करुण म्हणउनि दशरथनरवरतनुज मनुजपणाहि धरी॥

**परंतु—** श्रीरामचरित करितें मुक्त, सकृत् किमपि सेवितां भावें ।
पार न लागे दशशत-वदनांहि परंतु वाटतें गावें ॥

**निरोष्ठ—**श्रीहरि दशरथनंदन झाला दशकंठ-संक्षय कराया ।
दर शेष चक्रही जनि घेती जगदखिल संकट हराया ॥

वरील रचनेंतील वैशिष्ट्य स्पष्ट कळण्यासारखेंच आहे.

**पद्मबंध**—खालील आकृतींत चरणांच्या शेवटचीं व आरंभीचीं तीन-तीन अक्षरें कमलाकृतींत बसाविलेलीं आहेत.




**हाय कामचि हा गेला । लागे हाता न गेय हा ॥**
**हाय गे न जहाला का । कालाऽहारार्थ काय हा ? ॥**

**अन्वय**—वृद्धत्व आलेली एक स्त्री म्हणते, " हाय हा कामाचि गेला ! हा गेय न व हाता लागे न; हाय गे ! हा काय कालाहारार्थ न जहाला का ? "

( केवळ चित्रकाव्याच्या नमुन्यापुरतेंच हें उदाहरण दिलें आहे, अशा अनेक उदाहरणांनीं जागा अडविण्याचें कारण दिसत नाहीं. )

## अर्थालंकार

अर्थालंकारांचें निरीक्षण केल्यास असें दिसून येईल कीं, बऱ्याचशा अलंकारांच्या मुळाशीं साम्य किंवा विरोध ह्यांपैकीं एक गोष्ट आहे. ' मुख चंद्रासारखें आहे ' असें म्हटल्यानें ' उपमा ' हा अलंकार होतो; पण ' मुख जणुं काय चंद्रच आहे ' असें आपण म्हटल्यानें उपमेची ' उत्प्रेक्षा ' झाली. ' तो मुख-चंद्र पहा ' असें म्हटल्यानें दोहोंचा अभेद दर्शविला; म्हणजे ' रूपक ' झालें. मुख व चंद्र हीं नुसतीं एकच आहेत असें दर्शविण्यापेक्षां ' हें मुख कीं

चंद्र ? ' असें दोहोंमध्यें घोटाळा होण्याइतकें साम्य दर्शविल्यानें ' संदेह ' उत्पन्न झाला. ह्याच्याही पुढें जाऊन ' अहो, ह्या मुखाला मी चंद्रच समजलों कीं ! ' या वाक्यानें ' भ्रांति ' उत्पन्न झाली. ' हें मुख नव्हे, चंद्र आहे ' अशी वस्तुस्थिति लपवून आपण तीवर दुसरांच आरोप लादतों, तेव्हां ' अपह्नुति ' होते. ह्याप्रमाणें वाढवीत गेल्यास एकांतून दुसऱ्या अलंकारांची उत्पत्ति होते, असें दिसून येईल. म्हणूनच कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं उपमेसंबंधानें म्हटलें आहे कीं, " उपमा हीच कोणी नटी निरनिराळीं सोंगें घेऊन आपल्या पुढें येते; व आपण त्या त्या प्रसंगीं त्या रचनेला अलंकारांचें भिन्न नांव देतों. "

## १. उपमा

यांत दोन वस्तूंचें आल्हादजनक रीतीनें **साम्य** वर्णिलें असतें.

[ या अलंकारांत उपमेय, उपमान, साधारण धर्म व साम्यसूचक जसें ज्याप्रमाणें, इ० शब्द, ह्या गोष्टी हव्या. क्वचित् यांपैकीं एकादीचा लोपही आढळतो ].

**( १ ) राजा तृणाच्छादित कूप जैसा । नृपा असत्य–प्रिय चार तैसा ॥**
**नाशास हो कारण जो तयास । ये ना मुळींही चुकवावयास ॥**
( वि० वा० भिडे )

**( २ ) तो शर गर–वर–खर–सा, पवि–सा रवि–सा स्मरारिसायक–सा**
**पार्थभुजांतरिं शिरला, वल्मीकांमाजि नाग–नायक–सा** ( मोरो० )

**( ३ ) असेल तेथें वाहत सुंदर दुधासारखी नदी,**
**असतिल डोलत निळीं तांबडीं कमळें पाण्यामधीं ॥**
**घरें तेथलीं सुरेख असतिल चमकत सोन्यापरी,**
**आंत लाविल्या असतिल रंगीबेरंगी तसबिरी ॥** ( ठोकळ )

## २. उत्प्रेक्षा

उपमेय हें जणुं कांहीं उपमानच आहे असें जेथें वर्णन असतें, तेथें हा अलंकार होतो. यांत जणुं, जाणो, इ० शब्द असतात; क्वचित् नसतातही.

**( १ ) ही आम्र–पंक्ति पवनें बहु डोलताहे ।**
**शाखाग्र–पल्लव–करें कुसुमांस वाहे ॥**
**जाणो स्व–पोषक वसंत गृहास आला ।**
**तत्पूजनार्थ बहु हर्षचि हसि झाला ॥** ( कृ० राजवाडे )

(२) समरीं मत्त मतंगज, कीं दोघे व्याघ्र, कीं मृगाधिपती,।
कीं वृष, कीं घन, कीं ग्रह, कीं नग, कीं, अंधक स्मराराती (मो०)

येथें इंद्राजित व लक्ष्मण जणुं कांहीं वरीलप्रमाणें भासत होते, असें वर्णन असल्यामुळें **उत्प्रेक्षा** हा अलंकार झाला आहे. (अंधक=एक दैत्य; स्मर+अराति=मदनशत्रु).

(३) किती उंचावरूनी तूं। उडी ही टाकिसी खालीं
जणो व्योमांतुनी येसी। प्रपाता खालिं पाताळीं ॥ १ ॥
उभीं ताळ्यांत जीं झाडें। तयांचीं मोडिसी हाडें
कुशीं घेसी लव्हाळ्यांना। तयांचा तूं जणो वाली ॥ २ ॥ (भ० पं०)

## ३. रूपक

उपमेय व उपमान यांचा अभेद वर्णिला असतो, तेथें हा अलंकार होतो.

(१) मद्दुःख-सागराचा अगस्त्य तूं, काय बा तुझें नांव ?
चिंता-नदींत बुडतां, दैवें कोठोनि धाडिली नाव ? (मोरो०)

(२) माझा मनोमधुप लुब्ध बहुत झाला।
तूझें पदांबुज-युगीं रहिवास केला ॥ (सामराज)

(३) पहा पांखरें चरोनि होतीं झाडांवर गोळा।
कुठें बुडाला पलीकडिल तो सोन्याचा गोळा ? (म०का० कारखानीस)

## ४. अतिशयोक्ति

वस्तुस्थिति असेल त्यापेक्षां फारच फुगवून सांगितलेली असते, तेव्हां हा अलंकार होतो.

(१) जो अंबरीं उफळतां खुर लागलाहे।
तो चंद्रमा निज-तनूवरी डाग लाहे ॥
जो या यशास्तव कसें धवलत्व नेघे।
शृंगारिला हय तयावरि भूप वेंघे ॥ (र० पं०)

(२) कदा नेणो ओढी शरधितुनि काढी शर कदा।
कदा धन्वीं जोडी वरिवरिहि सोडी तरि कदा ॥
विपक्षाच्या वक्षावरि विवरलक्षास्तव रणीं।
कळे राजेंद्राची त्वरित शरसंधान-करणी ॥ (र० पं०)

## ५. अपह्नुति

जेथें एकादी वस्तु काय आहे ती निश्चित माहीत असून, ती ती नाहींच असा निषेध करून, ती दुसरीच वस्तु आहे असें प्रतिपादन असतें, तेथें हा अलंकार होतो. (यांत 'न'काराची आवश्कता असते. अपह्नव=लपविणें).

( १ ) न हें नभोमंडल, वारि-राशी । न तारका, फेसचि हा तयाशीं ॥
न चंद्र हा नावचि चालताहे । न अंक तो, तीवर शीड आहे ॥

( २ ) हुंकारा टाकीतो, बाळ हुंकारा टाकीतो—
नाहिंग बाई, हुंकारा हा, पारवा घुमतो १.
मानेला उचलीतो, बाळ मानेला उचलीतो—
नाहिंग बाई, फडा काढुनि, नाग हा डोलतो २.
घोडा घोडा करीतो, बाळ घोडा घोडा करीतो—
नाहिंग बाई, मागें-पुढें, हत्ती हा झुलतो ३.

द्व्यर्थी शब्दांची योजना करून, त्या दोन अर्थांपैकीं एकाचा निषेध व लगेच दुसऱ्याचा आरोप ज्यांत केलेला असतो, तिला '**छेकापन्हुति**' असें म्हणतात. तिचें **रामजोशी** यांचें उत्कृष्ट उदा०—

( ३ ) राधा-सखि-संवादीं छेकापह्नुति ही आयका—
रसिक हो किती चतुर बायका ॥ ध्रु० ॥
अंबरगत परि पयोधरातें रगडुनि पळतो दुरी —
काय हा धीट म्हणावा तरी ! ॥
तो नंदाचा मूल काय गे सांग कन्हय्या हरी ?—
नव्हे गे मारुत मेघोदरीं ॥ १ ॥

## ६. व्याज-स्तुति

बाह्यतः स्तुति व खरोखर निंदा किंवा बाह्यतः निंदा पण खरोखर स्तुति, असें जेथें वर्णन असतें, तेथें हा अलंकार होतो.

( १ ) पितामह वदे तदा प्रबळ ! तूं पृथानंदना ।
रमेश रथिं सारथी चतुर वागवी स्यंदना ॥
स्वयें गत-वयस्क मी, सरस वीर तूं रे नवा ।
भिडें; रणधुरंधरा जय घडो सुखें वा न वा ॥ ( वामन )

येथें अर्जुनाला भीष्म 'तूं मोठा प्रबल आहेस, तुला चतुर सारथी आहे, तूं सरस व नवा वीर आहेस,' इ० बाह्यतः स्तुतिपूर्वक म्हणत आहे; परंतु आंतून 'माझ्यापुढें तुझी काय मात्रा चालते, पाहूं तुझा पराक्रम काय आहे तो !' इ० गर्भित निंदा आहे.

( २ ) सर्वांस सर्व देशीं ही मिथ्या स्तुति तुझी महीपाला ।
न परस्त्रियां दिलें त्वां वक्ष, न वा पृष्ठ तव विपक्षांला (वि०वा०भिडे)

येथें बाह्यतः निंदा असली तरी गर्भित स्तुतिच आहे.

## ७. अन्योक्ति

प्रस्तुत वस्तूविषयीं बोलावयाचें असतां अप्रस्तुत–अन्य–वस्तूविषयीं बोलून प्रस्तुत वस्तूची कल्पना आणून दिली असते, तेव्हां **अन्योक्ति** किंवा '**अप्रस्तुत–प्रशंसा**' हा अलंकार होतो.

( १ ) **सांबाच्या पिंडीतें बससि अधिष्ठून वृश्चिका, आज ॥**
**परि तो आश्रय सुटतां खेटर उतरील रे तुझा माज ॥** ( वि० वा० भिडे)

येथें विंचवाला पुढें करून, मोठ्याच्या आश्रयाला राहून माजलेल्या क्षुद्र मनुष्याबद्दल अप्रत्यक्षतः विधान केलेलें आहे.

( २ ) **देखोनी उदया तुझ्या द्विज–कुळें गाती अती हर्षुनी ।**
**शार्दूलादिक सर्व दुष्ट दडती गिर्यंतरीं जाउनी ॥**
**देशी ताप परी जसा वरिवरी येसी नभीं भास्करा, ।**
**अत्युच्चीं पदिं थोरही बिघडतो हा बोल आहे खरा ॥** ( कृ० चि०)

येथें सूर्याला पुढें करून, पूर्वी चांगल्या पण मागून त्रासदायक झालेल्या अधिकारारूढ मनुष्याला अनुलक्षून ही उक्ति आहे.

## ८. अर्थान्तरन्यास

जेथें सामान्य सिद्धान्ताच्या समर्थनार्थ विशेष गोष्टीचें उदाहरण दिलें जातें, किंवा विशेष गोष्टीच्या समर्थनार्थ सामान्य सिद्धान्त सांगितलेला असतो, तेथें हा अलंकार होतो. उदा०—

( १ ) **"आली जरी कष्ट–दशा अपार । न टाकिती धैर्य तथापि थोर " ॥**
**केला जरी पोत बळेंचि खालें । ज्वाला तरी ते वरतीं उफाळे** ( वामन )

( २ ) **तदितर खग भेणें वेगळाले पळाले ।**
**उपवन–जल–केली जे कराया मिळाले ॥**
**स्व–जन गवसला जो त्याजपाशीं नसे तो ।**
**" कठिण समय येतां कोण कामास येतो ? "** ( र० पं० )

## ९. दृष्टान्त

एका विशेष गोष्टीवरून जेव्हां दुसरी एकादी विशेष गोष्ट अधिक स्पष्ट केली असते, तेव्हां हा अलंकार होतो.

( १ ) **न कळतां पद अग्निवरी पडे । न करि दाह असें न कधीं घडे ॥**
**अजित–नाम वदो भलत्या मिषें । सकल पातक भस्म करीतसे** (वामन)

( २ ) विद्यासमन्वितहि दुष्ट परी त्यजावा ।
त्याशीं बुधें न सहवास कधीं करावा ॥
ज्याच्या असे विमलही मणि उत्तमांगीं ।
तो सर्प काय न डसे खल अंतरंगीं ? ॥ ( वामन )

## १०. विरोधाभास

वास्तविक विरोध नसूनही जेथें विरोध आहे असें वर्णन असतें, तेथें हा अलंकार होतो.

( १ ) मारी यांत बुडी जो तो तरे, यास सकर्दमा ।
मानवाधमही पावे पाहतां गति उत्तमा ॥ ( मुजुमदार )

येथें बुडी मारील तो वस्तुतः बुडावयास हवा; परंतु ' तरेल ' असें म्हटल्यानें बुडणें व तरणें ह्या दोन विरोधदर्शक गोष्टी एकत्र आल्या आहेत.

( २ ) वज्रापेक्षांहि कठिणें, पुष्पाहूनि मृदू अशीं ।
लोकोत्तरांचीं हृदयें कोणा जाणवतील तीं ? ॥ ( प० गोड० ),

येथें लोकोत्तर पुरुषांचीं मनें आति कठिण व मृदुही असतात, असा विरोध दाखविला आहे; परंतु तो प्रासंगिक असल्यामुळें वस्तुतः विरोध नाहीं; म्हणून **हा विरोधाभास** अलंकार होय.

## ११. यथासंख्य

पहिल्यानें ज्या क्रमानें शब्द आले असतील त्याच क्रमानें त्यांचा दुसऱ्या शब्दांशीं संबंध जुळविलेला असतो, तेथें हा अलंकार होतो.

( १ ) तृणें मृगाला सालिलें झषाला । संतोष हे वृत्ति महा-जनांला ॥
तयांस निष्कारण तीन वैरी । किरात, कैवर्तक, दुष्ट, भारी ॥ (वामन )

( २ ) सुविद्यता, शौर्य, विनीतता, खरी ।
कुमारकांची अवलोकिल्यावरी ॥
कृतार्थता, भीति, मुदा, हृदन्तरीं ।
गुरूंस, शत्रूंस, पित्यास, वाटली ॥ २ ॥ (वि०वा० भिडे)

## १२. स्वभावोक्ति

एकाद्या गोष्टीचें हुबेहूब वर्णन असलें म्हणजे हा अलंकार होतो.

( १ ) अंग वक्र अधरीं धरि पावा । गोप-वेष हरि तोचि जपावा ॥
वाम-बाहुवरि गालहि डावा । तो ठसा स्व-हृदयांत पडावा ॥ (वामन )

(२) **चिमकुली पगडी झळके शिरीं। चिमकुली तरवार करीं धरी ॥**
**चिमकुला बहु शोभत चोळणा। चिमकुला सरदार निघे रणा ॥** (कुंटे)

येथें पहिल्या पद्यांत कृष्णाचें व दुसऱ्यांत बाल-संभाजीचें यथातथ्य वर्णन केलेलें आहे.

(३) **किती माझा कोंबडा ऐटदार। चाल त्याची किति बरें डौलदार ॥**
**शिरोभागीं सर्वदा तुरा हाले। जणूं जास्वंदी फूल उमललेलें ॥१॥**
**पंख सुंदर चिमुकले रंगदार। चोंच त्याची किति तरी बांकदार ॥**
**अर्धपायीं पांढरीशी विजार। गमे विहगांतिल, बडा फौजदार ॥२॥**
(दत्तप्र० कारखानीस)

## १३. पर्यायोक्ति

एकादी गोष्ट स्पष्टपणानें न सांगतां आडवळणांनीं सूचित करणें, या योगानें हा अलंकार होतो.

**केलेंचि धन्य दर्शन-दानें, येऊनि कानना मातें।**
**अजि देवेश ! निवावे, बहु हे सेवूनि कान नामातें ॥** (मोरो०)

येथें सावित्रीनें यमाला "तुमचें नांव काय?" असें प्रत्यक्ष न विचारितां, 'आपलें नांव ऐकून कानही संतुष्ट व्हावेत,' असें पर्यायानें विचारिलें आहे.

## १४. सार

एकापेक्षां दुसऱ्याचे गुण अधिक, त्यापेक्षां तिसऱ्याचे अधिक, त्याप्रमाणें जेथें गुणांचें उत्तरोत्तर आधिक्य वर्णिलें असतें, तेथें हा अलंकार होतो.

(१) **आधींच मर्कट तशांतहि मद्य प्याला।**
**झाला तशांत जरि वृश्चिक-दंश त्याला ॥**
**झाली तयास तदनंतर भूत-बाधा।**
**चेष्टा वदूं मग किती कपिच्या अगाधा ! ॥** (वामन)

(२) **वाहे महीतें स्वशिरीं फणींद्र तो। पाठीवरी कूर्म तयास वाहतो ॥**
**त्यालाहि घे सागर मांडियेवरी। थोरांचिये थोरिव जाण यापरी ॥** (वामन)

## १५. दीपक

जेव्हां अनेक कर्त्यांचा एकाच क्रियापदाशीं किंवा अनेक क्रियापदांचा एकाच कर्त्याशीं त्यांमधील साधारण धर्म दाखविण्यासाठीं संबंध जुळलेला आढळतो, तेव्हां हा अलंकार होतो.

**( १ ) पुरे. पुराणें, स्मृति, वेद, शास्त्रें । आमुष्मिकें वैदिक कर्म-तंत्रें ।**
**जेणें सरे हा भव तें विचारी । यावेगळी सर्व दुकानदारी ॥** (वामन)

येथें पुराणें, स्मृति, वेद, शास्त्रें, आमुष्मिकें (पारलौकिक गोष्टी) व वैदिक कर्मतंत्रें या कर्त्यांचा ' **पुरे** ' या एकाच क्रियापदाशीं संबंध आहे.

**( २ ) भुलला धर्म श्रुतिला, धृतिला, मतिला, तिच्या तथा स्तुतिला ।**
**न करुनि विचार जावी, मार्गे म्हणवुनि म्हणे ' तथास्तु ' तिला ॥** (मोरो०)

## ✓ १६. निदर्शना

दोन वस्तूंमधील संबंध अशक्य किंवा असंभाव्य आहे असें जेथें वर्णन असतें, तेथें हा अलंकार होतो.

**( १ ) जे कां ज्ञानें लाधले सद्विचारा । संपत्तीचा त्यांपुढें काय तोरा ?**
**पद्माचा जो तंतु तो वारणाला । वारायाला पै म्हणे सिद्ध झाला !**(वामन)

**( २ ) सर्पातें बिस-तंतुनें सुदृढ तो बांधावया इच्छितो ।**
**किंवा वज्र-मणी शिरीष-कुसुमें छेदावया पाहतो ॥**
**किंवा तो मधु-बिंदुनें मधुरता क्षाराब्धिला आणितो ।**
**जो मूर्खास सुभाषितें वश करूं ऐसें क्षणीं बोलतो ! ॥** (वामन)

## १७. परिसंख्या

एकाद्या गोष्टीचें विशेषत्व वर्णिल्यानें साहाजिकपणें इतर गोष्टींचें त्या मानानें निराकरण स्पष्ट होतें; तेव्हां हा अलंकार होतो.

**( १ ) श्रुतेंचि कीं श्रोत्र न कुंडलानें । दानेंचि कीं पाणि न कंकणानें ॥**
**साजे तसा देहहि हा न आनें । परोपकारेंचि न चंदनानें ॥ १ ॥** (वामन)

येथें श्रुतेंचि श्रोत्र साजे हें विशेषत्व, कुंडलानें नाहीं, हें त्याचें निराकरण; इ० स्पष्ट कळत आहेत.

**( २ ) कोणा अंध म्हणावें ? न दिसे सन्मार्ग उघडही ज्यास ।**
**कोण बधिर ? जो नाहीं परिसत केल्या हितोपदेशास ॥** ( कृ० चिप० )

येथें सन्मार्ग दिसत नाहीं तो आंधळा, ही विशेष गोष्ट; आणि तद्विरुद्ध तो डोळस; इ० सहजच निराकरण होत आहे.

## १८. समुच्चय

अनेक कारणांनीं एखाद्या गोष्टीची सिद्धि होते, असें जेथें वर्णन असतें, तेथें हा अलंकार होतो.

**( १ ) चंद्राला दिवसा प्रकाश नसणें, ये कामिनीला जरा,**
**पद्मावीण जलें, निरक्षर मुखीं जो साजिरा गोजिरा,**

दात्याला धन-लाभ, नित्य असणें दारिद्य विद्वज्जनीं
दुष्टाचा पगडा महीपति-गृहीं, हीं सात शल्यें मनीं. १. (वामन)

(२) विपत्कालीं धैर्य, प्रभुपणिं सहिष्णुत्व बरवें,
सभे पांडित्याचा प्रसर, समरीं शौर्य मिरवे,
स्वकीर्तीच्या ठायीं प्रचुर रति, विद्या-व्यसन जें,
तयांचे हे स्वाभाविक गुण सहा सत्पुरुष जे. २. (वामन)

## १९. सम

परस्परानुरूप असा योग्य संबंध जेथें प्रतिपादिला असतो, तेथें हा अलंकार होतो.

(१) ज्याचे पल्लव मंगल-प्रद शिणा छाया जयाची हरी।
गंधेंयुक्त फुलें फळेंहि असती ज्याचीं सुधेच्या परी ॥
वाटे जो रमणीय भूषण वनश्रीच्या मुखींचें भला,।
आम्रा त्या पिक सेवितां सम-समा संयोग कीं जाहला ॥ (कृ० चिप०)

(२) श्रीकृष्ण रुक्मिणीला, श्रीकृष्णा रुक्मिणी जशी आतां।
दमयंतीस नळ, नळा दमयंती, आयको जनें गातां ॥ (मोरो०)

## २०. विरुद्धगुणन्यास

परस्परविरुद्ध गुण असलेल्यांची जेथें तुलना केलेली असते, तेथें हा अलंकार होतो.

(१) धनपति जरि तूं रे; मी असें शास्त्रवेत्ता।
भट समरिं जरी तूं; मी महावादि-जेता ॥
अनुचर जरि तूंतें; सेविती छात्र मातें।
न गणिशि मज जातीं; तुच्छ मानूनि तूंतें ॥ (वामन)

(२) तूं राजा जरि मी श्रुतिस्मृति महाविद्याभिमानी असें।
भाग्यें विश्रुत तूं; मदीय कविता-सत्कीर्ति लोकीं वसे ॥
आहे अंतर फार तुज मज रे, तूं गर्व जें दाविशी।
मींही निःस्पृह भाग्यवंत-गणना नाहीं मला फारशी ॥ (वामन)

## २१. प्रश्न

वाक्यांत प्रश्न केलेला असतो, परंतु त्यांतच त्याचें निश्चित उत्तरही असतें; त्यावेळीं हा अलंकार होतो.

(१) अपराध काय घडला ? हलवा केला दयानिधे कां ? जी।
अमृत प्राशन करवुनि, पाजावी काय शेवटीं कांजी ? ॥

(२) **व्रणार्त पशुच्या शिरावरि वनीं उभे काकसे।**
**स्मरादि रिपु मन्मनीं, अहि न काळ भेका कसे?** (मोरो०)

यांतील दुसऱ्या अर्धातील प्रश्नांचीं उत्तरें त्यांतच स्पष्ट सांगितलेलीं आहेत.

## २२. श्लेष

जेव्हां केवळ एकाद्या शब्दामुळेंच दोन अर्थ उत्पन्न होत नसून, सबंध वाक्याचेच दोन अर्थ उत्पन्न होतात, तेव्हां हा अलंकार होतो.

[शब्द-श्लेषामध्यें एका शब्दाबद्दल दुसरा पर्याय-शब्द घालून चालत नाहीं; अर्थ-श्लेषांत तें चालूं शकतें; हा या दोहोंत मुख्य फरक].

(१) **तूं मलिन, कुटिल, नीरस, जडहि, पुनर्भवपणेंहि, कच-साच।**
**धरिला शिरींहि न स्वप्रकृतिगुण त्यजिसि; नाम कच साच॥** (मोरो०)

येथें सर्व पद्याचा अर्थ केश व कच या दोहोंकडेही लागत आहे; आणि केश हा शब्द व त्याचीं सर्व विशेषणें बदलून तदर्थक दुसरीं विशेषणें घातलीं, तरी अर्थ दोहोंकडे लागूं शकेल.

## २३. चेतन-गुणोक्ति

अचेतन वस्तूंमध्यें चेतन वस्तूंचे गुण जेथें वर्णिलेले असतात, तेथें हा अलंकार होतो.

(१) **दावी रडोनि झाले; जे गंध उगाळितां स्व-हात किणी।**
**भीम म्हणे, 'विधि-लेखानि, लेखानि नच वचकलीस घातकिणी॥** (मोरो०)

(२) **वृक्षा, त्वज्जन्म-साफल्य, साधूचें व्रत पाळिशी।**
**स्वतां सोसूनियां ताप, छाया पांथांस वांपिशी॥** (वि० वा० भिडे)

येथें लेखणी व वृक्ष यांवर चेतन-गुणांचा आरोप केला आहे.

## २४. लोकोक्ति

प्रचारांत असलेल्या म्हणींचा जेथें काव्यांत उपयोग केलेला असतो, तेथें हा अलंकार होतो.

(१) **हरिच्या पुनःपुन्हां कां 'काड्या नाकांत घालिशी?' मशका,**
**यश काय पक्षि-पतिचें, येइल हे चार करुनि तुज मशका?॥**

(२) **जो किंकर पायांला, स्व-शिर करुनि पाद-पीठ आतळतो।**
**धिक्कारानें न करावा, प्रभुनीं 'पाण्यापरसि पातळ' तो॥** (मोरो०)

याप्रमाणें येथें विद्यार्थ्यांस आवश्यक तेवढे प्रमुख अलंकार दिले आहेत. मतभेदात्मक व शास्त्रीय भानगडींत पडण्याचा येथें प्रयत्न केला नाहीं.

---

## भाषा-कला-विलास

काव्यगुण व काव्याला शोभा देणारे अलंकार यांचा येथवर विचार झाला. यांशिवाय भाषेचा '**कलाविलास**' दर्शविणाऱ्या आणखीही कांहीं गोष्टी असतात; त्यांची ढोबळ कल्पना येथें देतों.

### सुभाषित

**१.** स्वाभाविक अर्थमनोहरत्वामुळें केव्हां केव्हां भाषा सुन्दर वाटते, तिच्यांत अलंकारांप्रमाणें मुद्दाम सौन्दर्य आणावें लागत नाहीं, अशा रचनेला '**सुभाषित**' असें म्हणतात. सु-भाषित ह्या शब्दाचा "चांगलें भाषण" किंवा "चांगलें वाक्य" एवढाच अर्थ आहे; मात्र तें मनोहर, स्वयंपूर्ण व कोणत्याही कालीं त्या त्या प्रसंगाला लागू पडणारें असलें पाहिजे.

(१) **को न याति वशं लोके मुखे पिंडेन पूरितः?।**
**मृदंगो मुखलेपेन करोति मधुर-ध्वनिम्॥**

(२) **गुळ-खोबरें विलोकुनि, भलत्याहि जनास बालक वळावा।**
**सत्य प्रेमचि दावुनि, सुज्ञें तो विश्वपाळ कवळावा॥** (मोरो०)

(३) **बह्वर्थ, जन-मनोहर, स्वल्पाक्षर, मधुर, सत्य, बोलावें।**
**ज्या सद्वाक्य-श्रवणें, श्रोत्यांचें चित्त, शिरहि डोलावें!** (मोरो०)

(४) **वृक्ष फार लवती फल-भारें। लोंबती जल-द घेउनि नीरें॥**
**थोर गर्व न धरी विभवाचा। हा स्वभाव उपकार-परांचा॥** (वामन)

यांतील १ हें संस्कृत व २, ३, ४, हीं मराठींतील '**सुभाषितें**' आहेत.

### कोटि

**२.** जेव्हां एकाद्या श्लेषात्मक शब्दाच्या योगानें आगाऊ ध्यानीं-मनीं नसतां एकदम व्यंग्यार्थ उत्पन्न होऊन आपणांस आश्चर्य वाटतें व हसूं येतें, तेव्हां तेथें "**कोटि**" झाली असें म्हणतात.

(१) "आमच्या तिबूनानांच्या ठकीकडे बघितल्यास **सहस्रदेवींचें** दर्शन होतें।"

येथें ठकीच्या तोंडावर देवीचे हजारों वण आहेत, इतकी ती कुरूप आहे, हा व्यंग्यार्थ एकदम ध्यानांत येऊन, एक प्रकारें त्या रचनेची मौज वाटते व हास्याकडे कल झुकतो; म्हणून 'सहस्र–दोवि' ह्या शब्दावर येथें गडकऱ्यांनीं **कोटि** केली आहे, असें म्हणतां येईल.

( २ ) "त्याला **डोकें** आहे" असें कोणीं म्हटल्यास, एकदम तो नुसताच 'डोकें' असलेला बुद्धिहीन प्राणी आहे, असा व्यंग्यार्थ उत्पन्न झाल्यास, तेथें डोकें या शब्दावर **कोटि** झाली असें म्हणतां येईल.

( ३ ) "सिमला येथें लांब पल्ल्याला जावयाचें असल्यास '**चौघांच्या खांद्यावरून**' जावें लागतें" ह्या ठिकाणीं 'चौघांच्या खांद्यावरून जाणें' या वाक्संप्रदायावर कोटि आहे.

## विनोद

३. जेव्हां विचारांस असंबद्ध, विकृत किंवा अद्‌भुत स्वरूप प्राप्त होऊन एकंदर परिणाम हास्योत्पादनपर होतो, तेव्हां त्या वाक्यरचनेस "**विनोद**" किंवा "**विनोदवचन**" असें म्हणतात ( न० चिं० केळकर ).

"चिंतोपंत नांवाप्रमाणेंच भ्रमिष्टे असत. त्यांना जेव्हां खाण्यास मीं तिसऱ्यादा सुचाविलें तेव्हां ते कोठें ठिकाणावर आले. परंतु आश्चर्य, त्यांनीं हातांतील सुपारी जोरानें नदींत फेकली व दुसऱ्या हातांतील वाळू सुपारीच समजून चटकन् तोंडांत टाकली!" (करमणूक). [भ्रमिष्ट मनुष्याचें हें असंबद्ध व थोडेंसें विकृत वर्णन केलेलें वाचून, हंसूं आल्याशिवाय राहत नाहीं; म्हणून हें **विनोद-वाक्य** किंवा **विनोद-वचन** होय ].

केव्हां केव्हां विनोदामध्यें परानुकरण व त्याबरोबरच परकृतीचा किंचित् उपहास, या गोष्टी असतात; तेव्हां त्याला "**विडंबन**" असें म्हणतात. उदा०—( १ ) टिळकांच्या "पांखरा, येशिल का परतून?" या कृतीचें "परिटा, येशिल का परतून?" हें विडंबन आहे. ( २ ) केशवसुतांच्या "आम्ही कोण?" ह्या कवितेचें "आम्ही कोण म्हणून काय पुसतां दांताड वेंचाहुनी!" हें विडंबन आहे. हीं दोन्ही विडंबन–पद्यें 'केशव-कुमारांचीं' आहेत.

## वाक्प्रचार

४. भाषेंत विशिष्ट शब्द ठराविक शब्दांच्याच साहचर्यानें ठराविक रूपांत व ठराविकच क्रमानें आले पाहिजेत; अशी रूढि किंवा प्रचार आढळतो; त्याला "**वाक्प्रचार**" असें म्हणतात. भाषागौरवार्थ त्यांचीही जरूरी असते; त्यांविरुद्ध भाषण किंवा लेखन झाल्यास, तें शिष्टमान्य समजत नाहींत. उदा०—(१) घबाड म्हणजे मोठें; यावरून घबाड मुहूर्त, घबाड वशिला, हे शब्द-प्रयोग चालतात; पण घबाड शरीर, घबाड अंमलदार, असले शब्दप्रयोग चालत नाहींत. (२) "चोराच्या उलट्या बोंबा" याऐवजीं "उलट्या चोराच्या बोंबा" हा शब्दप्रयोग ग्राह्य मानीत नाहींत; तसेंच (३) 'पायांत जोडा घालणें,' (४) 'डोक्यांत पागोटें घालणें,' (५) 'तो माझ्या घरावरून गेला,' हे शब्द-प्रयोग वस्तुस्थितीच्या अगदीं विरुद्ध असूनही ते आपण खुशाल ग्राह्य समजतों. हे **वाक्प्रचार** होत.

## म्हण

५. वारंवार म्हटली गेलेली जी शब्द-संहति ती "**म्हण**" होय. म्हणींत पुष्कळ दिवसांचा एकादा अनुभव किंवा ज्ञान सांठविलेलें असतें आणि बरेच वेळां यमक-बद्धतेमुळें तिला चटकदारपणा आलेला असतो. उदा०—(१) कर नाहीं त्याला डर नाहीं, (२) करावें तसें भरावें, (३) असतील शितें, तर मिळतील भुतें, (४) कधीं तुपाशीं, कधीं उपाशीं, (५) आपला हात जगन्नाथ, (६) अपापाचा माल गपापा, (७) भीड भिकेची बहीण, (८) पुराणांतलीं वांगीं पुराणांत, इ०.

---

# कांहीं काव्य-दोष

काव्याचे गुण कळल्यानंतर प्रौढ अभ्यासकांस त्यांतील ढोबळ दोषही कळणें अवश्य आहे. व्याकरण-दोष, शब्द-दोष व छन्दोदोष असे तीन प्रकारचे दोष केव्हां केव्हां आढळून येतात. व्याकरण-दोषालाच 'च्युत-संस्कृति' असें म्हणतात.

## ( १ ) च्युत-संस्कृति

**क.**

| | |
|---|---|
| १. **श्रिकृष्ण** वेणु वाजवी । विधी **भुगोळ** गाजवी<br>२. रामाची बहु **अप्रिती** मजवरी होईल गे सर्वथा<br>३. हलवीत **विराची** काया. | येथें अप्रयुक्त ऱ्हस्व-दीर्घ हा दोष आहे. |

**ख.**

| | |
|---|---|
| १. दिलें बापें **भावें** त्यजुनि बरवे ते क्षितिपती | भाऊ याची अप्रयुक्त तृ० |
| १. **कोशागारमधूनि** फार कनका सांगोनियां काढवी | सामान्यरूपाचा अभाव |
| १. नगां त्यागुनि वैराग्य तुवां **घेलें** ( घेतलें ) | अप्रयुक्त क्रियापदरूप |
| १. **त्वां प्रल्हाद-ध्रुवादि** स्वहित कथुनियां नारदा, धन्य **केला** ( लें ) | प्रयोग-शैथिल्य |
| १. धूलिनें धुंद **दिक् चारी** (दिक् एकवचन, चारी अने० व० ) | वचन-दोष |
| १. हे वारितां **ध्वनि** उठे **कर-कंकणाची**<br>२. सख्या रे **जीवघेणी** हा सरायाचा कधीं **खेळ** ? | लिंग-दोष |

**ग.**

| | |
|---|---|
| १. जया कंदनीं **तोषलाऽनंग-दाहो** ( तोषला+अनंग )<br>२. **मगैश्वर्या** हानी सहजचि घडे भानुसदनीं ( मग+ऐश्वर्या )<br>३. सौदागरांनीं **धरिलाऽधमासी** ( धरिला+अधमासी ) | अपसंधि |
| १. कवळित **पयधारा** अंजुळीनें वरोनी ( पयोधारा हवें )<br>२. अर्पूनि चित्तें **जग-जीवनांत** ( जगज्जीवनांत हवें )<br>३. शक्तिरूपें जगन्माता वर्तते **जगद्अंतरीं** ( जगदंतरीं हवें )<br>४. पतीत-पावन **जगदोद्धारक** नाम तुझें राया (जगदुद्धारक) | नियमाविरुद्ध संधि |
| १ ध्याती **रमा-अब्जभवादि** ज्यातें<br>२ **हय-अनुरूप** परस्पर दंपती<br>३ **लोचन-आनन-अंबुज-कानन-अंबु-रुहें** सकळें विमळें<br>४. वदे ऐसें ठेवी हरि **जननि-अंकीं** आणि निघे | विसंधि |

घ.

| | | |
|---|---|---|
| १. नको रे मना या जिवा **कर्म-बेडी** | (सं० व य०) | अप्रयुक्त समास |
| २. नसे साधिला युक्तिचा **यत्न-किल्ला** | (सं० व य०) | |
| ३. वनातेंही केलें श्रम न गणुनी **स्वात्म-घरसें** | (सं० व म०) | |
| ४. व्योमासि चुंबित असे **द्विज-होम-धूर** | (सं० व म०) | |

## ( २ ) शब्द-दोष

च.

| | | |
|---|---|---|
| १. वीर **गच्छले** सैन्य घेउनी | ( सं० शब्दाला म० प्रत्यय ) | भलत्याच ठिकाणीं अप्रयुक्त यवनी, संस्कृत, मराठी, शब्द-योजना |
| २. म्हणे पार्थ आतां करूं **फैसला** हो | (मध्येंच अरबी शब्द) | |
| ३. हलुच मग दटावी ते **दरोगीण** त्यासी | ( ,, ) | |
| ४. प्रभुसम पूज्य मला तो म्हणतां ' तुभ्यं नमो रमाजाने " | | |
| ५. न केला मुळीं **संग्रहो** सद्गुणांचा । अतां भोगितों मी **विपाकू** तयाचा | (वि० कों० ओक) | |

छ.

| | | |
|---|---|---|
| १. जरठसा शिशिर तो ध्रुव पदीं **वि**-रतला | | निष्कारण अधिक शब्द |
| २. सख्या वाचका, गीत कविचें ऐकुनियां **निज**-कानीं | | |
| ३. नव-शिशूवरिल या जननिची **सु**-ममता | | |
| ४. बस तुं **मौनपणें** अथवा **उगा** | ( वामन ) | |

ज.

| | | |
|---|---|---|
| १. तत्रापि जे प्रिय बहू स्ववधूं **च्चि** माजी ते स्थापणें तरु तिच्या सदना **च्चि** माजी | ( वामन ) | निरर्थक पादपूरणार्थक शब्द |
| २. हें न म्हणे कृपाळू प्राण **पै** गा | (ज्ञानेश्वर) | |

झ.

| | | |
|---|---|---|
| १. कटकीं होते वाजी, वारण जे काय बहु **मर्दे** उतले । ते त्यापुढें न तगले, **हगले** तात्काळ गर्जतां **मुतले** ॥ | | अश्लील शब्द-योजना |
| २. बोल बोलतां सोपे वाटे । करणी करितां **टीर** फाटे | (तुका०) | |

ञ.

| | |
|---|---|
| ' त '-वर्गान्त्योपान्त्यां करुनि उलटें लाहिभर दे [ न व ध यांच्या उलट म्हणजे ' धन ' दे हा अर्थ ] | क्लिष्टत्व |

ट.

| | |
|---|---|
| १. म्हणे हंस क्षोणी–पतिस **तुज** कोणी **सम** नसे (दूरान्वय)<br>२. असे हे गोसावी **रहित** समजा **राम–भजना**<br>३. लंगोटी **भर वीत** रुंद मळक्या चिंध्या शिरीं बांधुनी<br>४. **मुळें या**, आखिल जीवांना नवीशी चेतना येई<br>५. जादूनेंच तुझ्या बा रे। **वन नंदन** बनलें सारें | शब्दानुक्रम उलट |

ठ.

| | |
|---|---|
| १. " **गाढव** शृंगारिलें कोडें । कांहीं केल्या नव्हे घोडें ।।<br>त्याचें **भुंकणें** न राहे । स्वभावासी करिल काये ? "<br>२. घंटा जड घण घण । वाजताती मण मण ।<br>**मक्षिकांचा खण खण** । मध्यें जेव्हां धांवला । | अयोग्य वाक्प्रचार |

ड.

| | |
|---|---|
| १. **भयाण** अन् **भेसूर** श्वापदें क्रूर तियेच्या उरीं<br>२. **मुकुल–कालिके**परि गाल ते फुगीर ( ह० स० गोखले ) | एकार्थक शब्दांची पुनरुक्ति |

## ( ३ ) छन्दो–दोष

अ.

| | |
|---|---|
| १. तळ्तें **रक्त-प्रवाह** वाहवुनियां भूमीवरी स्थापिलीं<br>२. **निराश-प्रद** निष्फला तुज कशास आशा जरी ?<br>३. बळकट **पिंजराही** तूज नाहीं बसाया<br>४. होती तामस जी वदे, ' **गुंफुनि** मी घालीन वेणी शिरीं ' | लघु–गुरु यांकडे दुर्लक्ष |

आ.

| | |
|---|---|
| १. उत्कर्ष स्वामि-निष्ठा होती **सा**,चार ती<br>२. ठेविलें **दा**,रीं न जों **पा**,ऊल तूझ्या मंजुळे,<br>३. प्रभूतें म्हणे हे पहा आंग; **लीला–**<br>**वती** मी वरावें मला चांगलीला ।। | यति–भंग |

इ.

| | |
|---|---|
| १. नाम–प्रतापहि यथा–मति याच **रीती** ।<br>सीमा न पावति तथापि मुनींद्र **गाती** ।।<br>२. स्वप्नमय **चित्रा** । अर्पीन मनोहर **कविता** ।।<br>३. नमस्कार तुज **पूर्णत्वा** । हात जोडितें तुला **अतां** ।। | यमक–दोष |

| | |
|---|---|
| ४. पद्में प्रफुल्ल करितो सविता स्वयें **हा** ।<br>रात्रीं विकास कुमुदांप्रति फार दे **हा** ॥<br>५. शुक भवनिधि तरले, परि थोगालाबू **धरूनियां पोटीं** ।<br>एकोबाही तरले, भव-प्रस्तर दृढ **धरूनियां पोटीं** ॥ | एकार्थकच शब्दांमुळें यमक-दोष |
| ६.<br>**त्याचा हेतु पुरे अशीस अपुरें आयुष्य जेणें वढे ।**<br>**दोघां एक जडे कळा न विघडे ऐसें करूं रोकडें ॥**<br>**पाहूं गंधर्व आतां जगविति वनिता दाउनी विक्रमासी ।**<br>**केवीं आम्हांपुढें ते सकळहि निरखूं आजि शौर्य क्रमासी ॥**<br>(वामन) | स्रग्धरा व शार्दूलविक्रीडित यांचें मिश्रण. **छन्दो-दोष.** |

## पवढें पुरे

१. **गद्य** व **पद्य** यांत फरक काय? (पान १६५)

२. **काव्य** कशाला म्हणतात? (१३४-१३५)

३. खालील ओळी **काव्य** नव्हेत, कां तें ओळखा.

—" त्या तावडींत सांपडलेल्या हरिणाला जसा चित्ता
बघतो तशा प्रकारे तत्परतेनें व पूर्ण समचित्ता—
ने वाचक जर माझा प्रस्तुतचा लेख नीट बघतील
तर त्यांना कवितेचे पुष्कळसे ज्ञान खास होईल (गडकरी)

४. खालील ओळी **गद्य** कीं **काव्य**? का तें सांगा.

" झाडाच्या फांदीवर चिमण्या बसाव्यात तशीं पोरें बांकावर एकमेकांला बिलगून बसलीं होतीं. **गुलाबाच्या गेंदाप्रमाणें गोजिरवाणीं** त्यांचीं तोंडें, चिमणेसे ओंठ, चिमणेसे गाल आणि हरणासारखे काळेभोर टपोरे डोळे; भित्र्या डोळ्यांनीं ससा बघतो तसें त्यांनीं मास्तरांकडे पाहिलें. बांधावरचें कोंवळें गवत उघड्या वाऱ्यांत कांपतें तशीं तीं कांपत होतीं!" (अत्रे)

५. हरीभाऊ आपटे यांनीं काव्याचें कोणतें लक्षण सांगितलें आहे? **नाद, अर्थ** व **ध्वनि** यांचीं एकेका उदाहरणानें स्पष्टता करा.

६. नवरसांसंबंधीं वाटल्यास खालील श्लोक पाठ करा.

" शृंगार-वीर-करुणाद्भुत-हास्य-भयानकाः
बीभत्स-रौद्रौ च रसौ शांतोऽपि नवमः स्मृतः "

७. खालील अलंकार ओळखून, कारणें द्या.

१. " जिच्यावरि वितान **हें** गगन इंद्रनीला**परी**
जिच्या तळपतो शिरीं हिम-गिरी किरीटा**परी**
{ जिच्यावरि नद्या, झरे, **नहि** जवाहिरें गोमटीं
{ जिच्या घन वनस्पती, परि **न** पैठणी पोपटी " (चं० शे०)

२. ' पुष्पवर्ण नटला **पळसाचा** । पार्थ सावध नसे **पळ साचा** (वामन)

३. ' सहजस्फूर्त कल्पनेच्या झुळकीसरशी **का काव्यकलेची**
**कैलासलेणी कोरली** जातात ? (मा० पट०)

४. " रक्षावा **धर्म** असा कारिसी उपदेश तरि असे मान्य
रक्षितसों **धर्मातें** आम्हांला **धर्म** ठाउका नान्य " (मोरो०)

५. माझा **मनोमधुप** लुब्ध बहूत झाला । तूझे **पदांबुज-युगीं** रहिवास केला

६. ' जिवंत बहु बोलकें किति सुरम्य तें उत्पल !
नरें धरुनि नाशिलें, खचित **थोर बुद्धीबल** ! ' (टिळक)

७. ' रडूं नको गं अहं मी । देतें बाईला मुलूजाई
**हांसतील** कशा मग। ओंठावर **जाईजुई** (प्रो० कोलते)

८. " जणूं काय जगच्चालक सुवर्णकाराने हा लाल तापविलेला सुवर्णगोल ( सूर्य )
निवण्याकरितां पर्वतावर ठेविला आहे. " ( काशीबाई कानिटकर )

९. " आपुलिया बळे, नाही मी बोलत । सखा भगवंत, वाचा त्याची
साळुंकी मंजुळ, बोलतसे वाणी । बोलविता धणी, वेगळाची " (तु०)

१०. " लंघुनि तट जे प्रावृट्कालीं, सैरावैरा धावतसे
तवौदार्य ते असीम होउनि, सलील वाहे, **सलिल नसे** ( चं० शे० )

११. शाळिग्रामा**सम** काळा, देह कसा घोटीव ।
तेजदार नागा**वाणी**, दिसे कोवळा जीव ॥ ( गोपीनाथ )

१२. " की **नाम स्पर्शमणि** स्पर्शे, परि काय करिल **खापर मी** ? (मोरो०)

१३. " ऐसें सहसा करूं नये । ' दोघे भांडतां तिसऱ्यासि जाये '
धीर धरून महत्कार्य । समजून करावे (रामदास)

१४. **उदार बहु शूर** हा नर खरोखरी जाहला !
वधून मज पांखरा, निरपराध कीं दुर्बला ! (टिळक)

१५. **कर** नाहीं त्याला **डर** कसली ? खाकेंत **कळसा,** गांवभर **वळसा**

१६. तूं गा कोण ? **अपूर्व**; कोठ वससी ? हें **विश्व** जी तत्त्वतां
पाळी कोण तुंते ? **अनाथ** अजि मी, त्राता न माता-पिता (वामन)

१७. त्वां काय कर्म करिजे लघु **लेंकरानें** । बोलोनियां मग धनू धरिलें **करानें** (वा०)

८. **अन्योक्ति, व्याजोक्ति** व **अर्थान्तरन्यास** म्हणजे काय ? त्याचें एकेक उदाहरण द्या.

९. **सुभाषित** व **कोटि** आणि **वाक्प्रचार** व **म्हण** यांतील फरक स्पष्ट करा.

१०. **प्रसाद**–तुकाराम, मायदेव; **माधुर्य**–वामन, तांबे; **ओज**–मोरोपंत, केशवसुत; यांच्या काव्यांत हे गुण शोधून पहा.

---

# छन्दःशास्त्र

## प्रास्ताविक

( १ ) मनोरंजक व कल्पनारम्य अशा प्रकारची जी वाक्यरचना असते, तिला **काव्य** असें म्हणतात, हें मागील प्रकरणांत आलेंच आहे. गद्यांतही अशा प्रकारची रचना असूं शकते व पद्यांतही असूं शकते. पद्यांतील रचनेंत पाद म्हणजे चरण असतात, गद्यांत ते नसतात, एवढाच फरक. शिवाय पद्यांत **लयबद्धता**ही असते, ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यास हवी. पद्याची रचना ज्या ठराविक नियमांनीं होते, त्यासंबंधानें आतां येथें विचार करावयाचा आहे.

( २ ) कोणत्या पद्यामध्यें कोणत्या प्रकारचें नियमन आहे, हें समजण्यासाठीं ऱ्हस्व-दीर्घादिकांची नीट समजूत पाहिजे. **परशुरामतात्या गोडबोले** यांचें वृत्त-दर्पणांतील लघु-गुरुसंबंधाचे खालील पद्य प्रसिद्ध आहे.

ऱ्हस्व स्वरांतें **लघु** बोलताती । दीर्घ स्वरांतें **गुरु** नाम देती
पुढें अनुस्वार विसर्ग येतो । संयोग ऱ्हस्वास गुरुत्व देतो

वदन, नमन, यांतील सर्व अक्षरें **लघु** आहेत; काका, मामा, आई, यांतील **गुरु** आहेत; सुंदर, चिंता, घंटा, धंदा, अंगण, उंट, उंबर, इंदिरा, यांतील अनुस्वार असलेलीं अक्षरें ऱ्हस्व असलीं तरी वरील नियमास अनुसरून **गुरु** आहेत; विद्या, बुद्धि, गर्व, शिक्षा, सत्य, यांतील जोडाक्षरापूर्वीचीं अक्षरें **गुरु** आहेत; तसेंच दुःख, निःसंदेह, निःपात, प्रातःस्नान, यांतील विसर्गापूर्वीचीं अक्षरें ऱ्हस्व असलीं तरी **गुरु** आहेत; आ, ई, ऊ, ॠ, ए, ऐ, ओ, औ, हे स्वर व हे स्वर असलेलीं अक्षरें नेहमींच **गुरु** असतात. अ, इ, उ, हे स्वर व हे स्वर असलेलीं अक्षरे **लघु** असतात.

१. **अपवाद**—अनुस्वार व जोडाक्षर यांपूर्वींच्या अक्षरांवर उच्चारणांत जोर असतो त्यावेळींच तीं **गुरु** असतात; जोर नसल्यास त्यांस गुरुत्व येत नाहीं. उदा० –" **जंव** चाले मोठा धंदा, **तंव** बहीण म्हणे दादा " येथें 'ज,' 'त,' यांवर अनुस्वार; व 'ण'च्या पुढें जोडाक्षर असूनही त्या अक्षरांवर उच्चारण्यांत जोर नसल्यामुळें तीं **गुरु** नाहींत.

२. **अपवाद**—केव्हां केव्हां कवि पद्याच्या जुळणीसाठीं ऱ्हस्व अक्षराचें उच्चारण लांबट करितात, तेव्हां त्यास **गुरु** अक्षर व दीर्घ अक्षराचें उच्चारण आंखूड करितात, तेव्हां त्यास लघु अक्षर म्हणावयाचें. उदा०—"मनीं धरिलेंसें रूप अमं**गळ**" येथें शेवटचीं 'गळ' हीं अक्षरें उच्चारण्यात लांबट असल्यामुळें तीं गुरु आहेत; तसेंच "**गे**लें तुझ्यावर जडून् **रा**मा मन०" यांत '**गे**' व '**रा**' हीं अक्षरें मूळचीं दीर्घ असलीं तरी उच्चारणांत तीं आंखूड केल्यामुळें लघु आहेत. (पद्यातींचें अक्षर मूळचें ऱ्हस्व किंवा 'अ'कारयुक्त असून त्याचें उच्चारण लांबट असल्यास तें **गुरु** असतें).

(३) ऱ्हस्व अक्षराच्या उच्चारणाला जो वेळ लागतो त्याला **मात्रा** असें म्हणतात. लघु अक्षराची एक मात्रा व गुरु अक्षराच्या दोन मात्रा.

(४) लघु-गुरु-भेदानुसार पद्याचें मापन करण्यासाठीं तीन तीन अक्षरांचा एकेक गट ठरविला आहे, त्यास **गण** असें म्हणतात. हे गण खालीलप्रमाणें **आठ** आहेत.

**य**–यमाचा, **न**–नमन, **त**–ताराप, **र**–राधिका
**म**–मानावा, **स**–समरा, **ज**–जनास, **भ**–भास्कर (प० गोडबोले)

ह्यांशिवाय चरणांच्या अंतीं एक किंवा दोन अक्षरें लघु किंवा गुरु कशीं आहेत हें सांगण्यासाठीं **ल** व **ग** या संज्ञांचा वरील गणांतच समावेश करितात, म्हणजे **य**, **र**, **त**, **न**, **भ**, **ज**, **स**, **म**, **ल**, **ग**, ह्या एकंदर गणांच्या दहा संज्ञा होतात.

[ पिंगलापासून आज शेंकडों वर्षें ह्याप्रमाणेच **त्र्यक्षरी गण** मानण्याची पद्धति रूढ व परिचित अशी झाली आहे; त्याऐवजीं चतुरक्षरी किंवा पंचाक्षरी गण मानण्याकडे हल्लीं कल होऊं लागला आहे; परंतु जुन्या पद्धतींत त्र्यक्षरी गणामुळें शब्दाचा मध्येंच कर्णकटु विस्खलित तुकडा पडणें, ( मना सा|ज्जना-भा|क्तिपंथें| चि जावें ) इ० दोष आहेत, तर नवीन पद्धतींतही कांहीं निराळेच दोष आहेत; म्हणून परिचित पद्धतीच या ग्रंथांत कायम ठेविली आहे ].

(५) पद्यांत चरणाच्या शेवटीं थांबावें लागतें; मोठ्या वृत्तांत मध्यन्तरींही थांबावें लागतें; त्या ठिकाणास **विराम** किंवा **यति** म्हणतात ( यति=यम् +ति, हा मूळ स्त्रीलिंगी शब्द आहे; पण तो पुल्लिंगीच रूढ झाला आहे ). उदा०—" कारंजें हें, छान आहे मजेचें। पाणी चाले, शोभती बाग साचे "

" तो नदींत पोहणें शिकला ". " की जरि म्हणाल ' असतां जन्मशुचि स्वपद-नीरजा मिळतो' " ( मोरोपंत ).

संस्कृतांत जीं ' दुहादि ' विकल्पानें दोन कर्मे घेणारीं क्रियापदें सांगितलीं आहेत त्यांपैकी ' जि ' या क्रियापदाची समानार्थक ' लुबाडणें, बुचाडणें, नागवणें ' एवढींच क्रियापदें दोन कर्मे घेतात व त्यांची दोघांचीही मराठींत सप्रत्यय द्वितीया असते. जसें:—" त्यानें मला हजाराला बुडविलें–नागविलें–बुचाडलें. " बाकीच्या क्रियापदांपैकी ' याच् ' ( मागणें ), ' प्रच्छ् ' ( विचारणें, पुसणें ), आणि ' नी, हृ, वह् ' ( नेणें, धाडणें, पाठविणें, पोंचविणें ) या क्रियायदांचें गौण कर्म मराठीत अव्ययार्थी चतुर्थीत असतें. जसें:—" तो मला प्रश्न विचारितो. '

' देणें, शिकविणें, सांगणें, पाठविणें ' इ० इंग्रेजीत द्विकर्मक मानलेल्या क्रियापदांचे गौण कर्मही मराठींत अव्ययार्था चतुर्थीत असतें. जसें:—" मी तुला एक नामी युक्ति सांगतों. "

कांहीं कर्मे क्रियार्थकवाचक शब्दांचीं बनलेली असतात, त्यांना सजातीय कर्मे म्हणतात. जसें:—' तो रडगाणें गातो. ' ' आम्ही साधें जेवण जेवतों. '

## कर्माचा विस्तार.

कर्माचा विस्तार उद्देश्याच्या विस्ताराप्रमाणेंच ( १ ) विशेषण किंवा कृदन्त ( २ ) षष्ठ्यन्त शब्द, ( ३ ) समान विभक्त्यन्त शब्द, ( ४ ) शब्दसमुदाय किंवा ( ५ ) नामवाक्य अथवा विशेषणवाक्य घालून करितां येतो. जसें:— ' तो अवघड काम करितो. ' ' मी माधवाच्या मुलास—तात्यास बोलावीन. ' ' तूं आज ऐनवेळीं हजर राहणें साधलेंस. ' ' मारुति ब्रह्मांडाचा भार वाटावा असा पर्वत उचलता झाला. ' ' गुरुजी, नीतीनें वागावें हें ठीकच सांगतात. '

## विधेयाचा विस्तार.

विधेयाचा विस्तार ( १ ) क्रियाविशेषण ( २ ) क्रियाविशेषणार्थी कृदन्त किंवा ( ३ ) इतर—विभक्त्यन्त शब्द घालून करितां येतो:—'ती हळू चालते.' ' तो हसत बोलतो. ' ' ते वेगानें पळाले. ' ' सुतार झाडावर चढला. '

अशा रीतीनें विधेयाच्या होणाऱ्या विस्ताराचें वर्गीकरण पुढील नऊ प्रकारांत येतें:—( १ ) कालदर्शक ( २ ) स्थलदर्शक ( ३ ) रीतीदर्शक ( ४ ) कार-

## अक्षर–वृत्तें

संस्कृतांत एका अक्षरापासून सव्वीस अक्षरांपर्यंतचीं अक्षरगण–वृत्तें आहेत. (**श्री**–एकाक्षरी; **स्त्री**, **मही**–द्व्यक्षरी; **पांचाल**, **मृगेंद्र**–त्र्यक्षरी; इ० ). हीं वृत्तें अर्थदृष्ट्या काव्योपयोगी होत नाहींत, म्हणून मराठींत नित्य येणारीं आठ अक्षरांपासून तेवीस अक्षरांपर्यंतचीं कांहीं प्रमुख वृत्तें येथें दिलीं आहेत; आणि प्रचारांत बरेच वेळां येणाऱ्या आणखी कांहीं वृत्तांचीं लक्षणें विद्यार्थ्यांस पाठ करण्यासाठीं प्रकरणाच्या शेवटीं दिलीं आहेत.

अक्षरगण-वृत्तांत सम–वृत्तें, अर्धसम–वृत्तें आणि विषम–वृत्तें असे तीन प्रकार आहेत. ज्याच्या चाऱ्ही चरणांचीं अक्षरें व लघु–गुरु–क्रम समान तें **समवृत्त**; ज्याचे १।३ व २।४ हे चरण समान तें **अर्धसम–वृत्त**; व ज्याचे चारही चरण भिन्नाक्षरांचे तें **विषम–वृत्त**; ( मराठींत विषम–वृत्तें नाहींत ).

### समवृत्तें

**१ अनुष्टुभ्** ( अक्षरें ८; य० पा० )

**तमालपिष्टनीलांनीं । मेघांनीं नभ लिंपिलें**
**संसक्तशाति–सुरभि । वातांनीं उपवीजिलें** ( पर० गोडबोले )

**२. इंद्रवज्रा** ( अक्षरें ११; य० ५, ११ )

**गण—त**, **त**, **ज**, व शेवटीं दोन **गुरु**.

**हे तों गुरू पापतरू म्हणावे । अंधासवें अंध तसे गणावे**
**हे प्रीति रामीं गुरु तोच साच । श्रुत्यर्थ इत्यर्थ असे असाच** ( वामन )

**३. उपेंद्रवज्रा** ( अक्षरें ११; य० ५, ११ )

**गण—ज**, **त**, **ज**, व शेवटीं दोन **गुरु**.

**तया वनीं एक तडाग तोयें । तुडुंबलें तामरसानपायें**
**निरंतरामंद मरंद वाहे । तपांतही यास्तव रिक्त नोहे** ( रघु० पं० )

**४.शालिनी** ( अक्षरें ११; य० ४, ११ )

**गण—म**, **त**, **त**, आणि शेवटीं दोन **गुरु**.

**कारंजें हें, छान आहे मजेचें । पाणी तेथें, नागमोडींत नाचे**
**त्याच्यामध्यें, चक्र आहे समोर । पाणी चाले, शोभती बाग फार** ( कुंटे )

५. **रथोद्धता** ( अक्षरें ११; य० पा० )

**गण—र, न, र** व शेवटीं **लघु, गुरु.**

**मोकळा करुनि कंठ तेधवां । आठवूनि मनिं जानकीधवा**
**ते रडे, भरतही तसा रडे । जोंवरी नयन होति कोरडे** (वामन)

६. **स्वागता** ( अक्षरें ११; य० पा० )

**गण—र, न, भ** व शेवटीं दोन **गुरु.**

**एक ते सदय लेकुरवाळी । पोळतां शिशु तया कुरवाळी**
**धावते हृदयिं त्यास धरोनी । जाय तो तडफडोनि मरोनी** ( निजसुरे )

७. **भुजंगप्रयात** ( अक्षरें १२; य० ६, १२ )

**गण—य, य, य, य**

**म्हणे तोंड दे हें, मला गोड खाया । म्हणे नाक दे चां,गला वास घ्याया**
**मऊ चांगलें व,स्त्र हें अंग मागे । स्वतांच्या हिता मं,डळी नित्य जागे**(ओक)

८. **द्रुतविलम्बित** ( अक्षरें १२; य० पा० )

**गण—न, भ, भ, र**

**असुनि काय जिणें जगतीवरी । मनुज जो नच देशहिता करी**
**फुकट अन्नाचि खाउनि वाढतो । फुकट भार धरेवर घालतो** ( ओक )

९. **वंशस्थ** ( अक्षरें १२; य० पा० )

**गण—ज, त, ज, र**

**लतेतळीं रुंद-निरुंद कालवे । गळोनि तेथें मकरंद कालवे**
**परागही सांद्र तयांत रंगती । फुलांसवें भृंग-तती तरंगती** ( र० पं० )

१०. **इंद्रवंशा** ( अक्षरें १२; य० पा० )

**गण—त, त, ज, र**

**जेव्हांहि भाग्यक्षय-दुर्दशा नरा । येते अशी काळकृता सुदुर्धरा**
**घेतात मित्रींहि अमित्रता तदा । कंटाळती लोकहि रक्त जे सदा** (प०गो०)

११. **वसंततिलका** ( अक्षरें १४; य० ८, १४ )

**गण—त, भ, ज, ज** व शेवटीं दोन **गुरु.**

**ज्यांच्या गुणीं मुदित पंडित सर्व झाले**
**गर्वोद्धतांसहि जिहीं मदहीन केलें**
**सर्वत्र ज्यांस. जयपत्र मिळेच जाण**
**ऐसे अतां लिहिल निःस्पृह लेख कोण ?** ( लेंभे )

**१२. मालिनी** ( अक्षरें १५; य० ८, १५ )

**गण—न, न, म, य, य**

तरुवर सुफलांच्या, आगमीं नम्र होती
जलदहि जल-भारें, खालतीं फार येती
सुपुरुष विनयातें, भाग्यशाली धरीती
उपकृति करित्यांची, जाणिजे हीच रीती (पर० गो० )

**१३. चामर** ( अक्षरें १५; य० पा० )

**गण—र, ज र, ज, र**

अश्व देखतांचि बाळकासि चोज वाटलें
रुक्म-रत्न-भूषणीं म्हणे कसें सुशोभलें !
ते क्षणींच देखिली शिरीं सुवर्ण-पत्रिका
पाहि बाळ वाचुनी बहूत अर्थ नेटका (आनंदतनय)

**१४. पंचचामर** ( अक्षरें १६; य० पा० )

**गण—ज, र, ज, र, ज** व शेवटी एक **गुरु.**

असें ऋषी वदे मुखें अचिंत तूं बसें सुखें
कुमार पैल पातला दुरूनि कूश कौतुकें
कुशास देखुनी सिता रडोनि आळवी शुरा
कुमार होय घाबरा पुसे नमूनि सुंदरा ( आनंदतनय )

**१५. शिखरिणी** ( अक्षरें १७; य० ६, १७ )

**गण—य, म, न, स, भ** व शेवटीं **लघु, गुरु.**

कदा नेणों ओढी, शरधिंतुनि काढी शर कदा
कदा धन्वी जोडी, वरिवरिहि सोडी तरि कदा
विपक्षाच्या वक्षा,-वरि विवर-लक्षास्तव रणीं
कळे राजेंद्राची, त्वरित शरसंधान-करणी ( रघु० पं० )

**१६. पृथ्वी** ( अक्षरें १७; य० ८, १७ )

**गण—ज, स, ज, स, य** व शेवटीं **लघु, गुरु.**

तुझ्या बहुत शोधिले, अघनिधी पदाच्या रजें
न तें अनृत वर्णिती, बुध-जनीं सदाचार जे
असे सतत ऐकते, सतत बोलते मीच तें
प्रमाण न म्हणों जरी, उचित माझिया नीचतें (मोरो०)

१७. हरिणी (अक्षरें १७; य० ६, १०, १७)

गण — न, स, म, र, स व शेवटीं लघु, गुरु

गृहकलह हा, राज्यें लावी, लयास अनेक तीं
अहित घडवी, मोठें देशा, असें बुध सांगती
कलह बुडवी, राज्या भाग्या, असा परिणाम हा
म्हणुनि कथितों, त्यातें टाका, यशा मिळवा महा (ओक)

१८. मन्दाक्रान्ता (अक्षरें १७; य० ४, १०, १७)

गण — म, भ, न, त, त व शेवटीं गुरु, गुरु

मोठ्या खोठ्या, छलक कुमती, बोलती दुष्ट वाचा
बोभाटा हा, अजवरि जगीं, गाजतो सासवांचा
ऐशा खोठ्या, विपरित मिषें, तूं न चित्ता विटाळीं
एक्या हातें, कधिं तरि मुली, वाजते काय टाळी? (आठल्ये)

१९. शार्दूलविक्रीडित (अक्षरें १९; य० १२, १९)

गण — म, स, ज, स, त, त व शेवटीं गुरु

आकाशांत फुलें, धरेवर फुलें, वाऱ्यावरीही फुलें
माझ्या गेहिं फुलें, मनांतहि फुलें, भूगर्भि सारीं फुलें
माझें चित्त भुले, सुगंधित भलें, हें विश्व हो जाहलें
कोणाला कळलें? किती पसरलें? उद्यान हें शोभलें! (टिळक)

२०. स्रग्धरा (अक्षरें २१; य० ७, १४, २१)

गण — म, र, भ, न, य, य, य

मी भक्ताधीन भक्त, प्रिय मज न तसें, आवडे अन्य काय?
श्री जेथें सान वाटे, तदधिक मजला, आपुला धन्य काय
माझी सेवाचि मोक्षा, -हुनिहि बहु मला, त्यासि जे अंतराय
ज्यांनीं होऊं न देती, क्षणहि बहु मला, मान्य ते सन्त-राय (मोरो०)

२१. अमृतध्वनि (अक्षरें २२; य० ४, ११, १८, २२)

गण — त, भ, य, ज, स, र, न व शेवटीं गुरु

झाला सकोप पर जाला मुठा;ळुनि भुजांलागिं था,पटि करें
घाला द्विजा,वरिच घालावया, यम निघाला स-वे,ग निकरें
पाला सम,र्पित कृपाला म्हणू,नि तव पालाणुनी, निज-हला
आला मुनी,जवळि आलापितां,चि जळिं आलाबुसा, उसळला (आ०त०)

**२२. मन्दारमाला** ( अक्षरें २२; य० ४, १०, १६, २२ )
**गण**—सात **त**-गण व शेवटीं **गुरु**

**सृष्टी तुला, वाहुनी धन्य मा,तें अशी रूपसं,पन्न तूं निस्तुला**
**तूं कामधे,नू खरी कल्पव,ल्ली सदा लोभला,लोक सारा तुला**
**त्या वैभवा,ला तुझ्या पाहुनी,यां मला स्फूर्ति नृ,त्यार्थ होते जरी**
**सामर्थ्य ना,मीं तुझ्या आर्यभू,मी तसें पाहिलें,मीं न कोठें तरी !** (टिळक)

**२३. सु-मन्दारमाला** ( अक्षरें २३; य० ५, ११, १७, २३ )
[ मंदारमालेंतच आरंभीं एक लघु अक्षर वाढवून, २३ अक्षरांचें "**सु-मंदारमाला**" वृत्त तयार करण्यांत आलें आहे ].

**मराठी असे आमची मायबोली जरीं आज ती राजभाषा नसे**
**नसे बाह्य ऐश्वर्य या माउलीला यशाची पुढें थोर आशा असे**
**न मातब्बरी पञ्चखण्डान्तरीं ती जरी मान्यता पावली इङ्ग्रजी**
**भिकारीण आई जहाली म्हणूनी कुशींचा तिच्या तीस कैंवी त्यजी ?**
( मा० त्र्यं० पटवर्धन )

**२४. मदिरा** *[ हेमकला ] ( अक्षरें २३; य० ६, १२, १८, २३ )
**गण**—सात **भ**-गण व शेवटीं **गुरु**

**नम्रपणेंच स,भेंत महोन्नत, जे गुण वर्णुनि,यां परक्याचे**
**सांगितल्याविण, दाविति कौशल, सर्वजनांप्रति, जे स्वगुणांचें**
**स्वार्थपरार्थांहि, साधिति जिंकिति, शान्तिबळें सुख,रत्न खलांचें**
**संत महागुण,-भाजन यापरि, सेवन कोण क,री न तयांचें ?** (वामन)

**टीप**—मदिरेलाच कोणी **सवाई** असेंही म्हणतात व एकाद्या अक्षराच्या लघु-गुरु-भेदानें तिचे प्रकारही पडतात.

[ समान अक्षरांच्या वृत्तांच्या चरणांचें मिश्रण करून, केव्हां केव्हां रचना करितात, त्या वृत्तास **उपजाति** असें म्हणतात. इंद्रवज्रा व उपेंद्रवज्रा, वंशस्थ व इंद्रवंशा, स्वागता व रथोद्धता, यांच्या मिश्रणानें अशीं वृत्तें होतात ].

## अर्धसम वृत्तें

**१. वियोगिनी** ( अक्षरें १० व ११ )

विषमचरणीं —१०. **गण**—**स, स, ज** व शेवटीं **गुरु.**
समचरणीं —११. **गण**—**स, भ, र** व शेवटीं **लघु, गुरु.**

**प्रभु राम सखा निकेतनीं । मजला त्यागुनि जातसे वनीं**
**गमतें जग शून्य मन्मनीं । धरुं मी प्राण कसे वियोगिनी** (प०गो०)

२. **मालभारा** ( अक्षरें ११ व १२ )

विषमचरणीं — अक्षरें ११. **गण — स, स, ज** व **गुरु, गुरु.**

समचरणीं — अक्षरें १२. **गण — स, भ, र, य.**

**नळराज-कथा सुधाचि साजे । दमयंती वरवर्णिनी विराजे**
**मिळणी उभयांशि होय जेथें । अधिकारी अधिकारानुराग तेथें** (र०पं०)

३. **पुष्पिताग्रा** ( अक्षरें १२ व १३ )

विषमचरणीं — अक्षरें १२. **गण — न, न, र, य.**

समचरणीं — अक्षरें १३. **गण — न, ज, ज, र** व **गुरु.**

**मुरडुनि नरडी करें दुजानें । धरुनि असें धरिलेंच पुच्छ ज्यानें**
**रगडुनि फणि-कंठ कैटभारी । उपरि चढे करि नाट्यनीट भारी** (वामन)

## [ मराठी वृत्तें ]

## छंद

मराठींत संस्कृत वृत्तापेक्षां वेगळी अशी कांहीं विशिष्ट प्रकारची रचना आरंभापासून होत होती असें दिसतें. साधारणतः लांब सुरावर म्हणावयाचीं **लोकगीतें** व स्त्रियांनीं म्हणावयाच्या **ओव्या** हा वाङ्मयांत अन्तर्भूत न झालेला पण परंपरेनें चालत आलेला एक प्रकार; आणि वाङ्मयामध्यें स्थान मिळून रचनेला सोपा व परस्परांशीं सदृश असा **ओवी** व **अभंग** यांचा दुसरा प्रकार. याच धर्तीच्या कांहीं **आरत्या** ( आर्त=पीडलेला; त्यानें केलेला ईश्वराचा धावा, स्तुति, वर्णन, ती आरती ) ही झाल्या. हीं आरंभींचीं निव्वळ मराठी वृत्तें होत; त्यांत संस्कृताची वगैरे उसनवारी नाहीं.

त्याचप्रमाणें **दिंडी** व **साकी** हींही निव्वळ मराठी वृत्तें आहेत. **आर्या** जरी संस्कृतांतून मराठींत आली असली, तरी ती संस्कृतापेक्षां विशेषतः मराठींतच अधिक प्रसृत व मान्यता पावलेली आहे.

ह्या निव्वळ मराठी वृत्तांपैकीं **ओवी** व **अभंग** ह्यांना सामान्यतः अक्षरांचें नियमन आहे; आणि **आर्या, दिंडी, साकी,** यांना मात्रांचें नियमन आहे. या आर्या, दिंडी, साकी, ह्या वृत्तांना पुढें मात्रा-वृत्तांत योग्य त्या ठिकाणीं समाविष्ट केलें आहे.

वाङ्मयानिविष्ट नसलेलीं आरंभींचीं लोकगीतें, स्त्रियांच्या ओव्या आणि वाङ्मयनिविष्ट असलेल्या ज्ञानेश्वर–तुकारामादिकांच्या **ओव्या व अभंग** ह्यांना अक्षरगण–वृत्तांत गणावें तर कमालीच्या शिथिल रचनेमुळें व अक्षरें आणि गण यांचा कशास कांहीं मेळ जमत नसल्यामुळें, त्यांस अक्षर-वृत्तांत समाविष्ट करणें सर्वस्वीं योग्य नाहीं; ह्यामुळें आणि ह्यांपैकीं बहुतेकांचें गान अक्षरांच्या लांबट उच्चारात्मक होतें असें वाटत असल्यामुळें, आधुनिक छन्दःशास्त्र-कारांनीं या वृत्तांचा निराळाच प्रकार कल्पून त्यांस '**छन्द**' अशी नवीन संज्ञा दिली आहे. ( ही संज्ञा कितपत योग्य आहे, आणि सर्वच वेळीं ओवी व अभंग ह्यांचें गुरु अक्षरात्मकच गान होतें कीं काय, हें अद्यापि निश्चित ठरावयाचें आहे ).

आतां मौजेचे कांहीं छन्दःप्रकार देतों. असे प्रकार मराठीच्या जन्मापासून उत्पन्न झालेले असावेत, यांत शंका नाहीं; परंतु ते सर्व आस्थेनें कोणीं जतन करून ठेविले नसल्यानें लुप्त आहेत. त्यांत १ ते १५ अक्षरांच्या चरणांपर्यंत गीतें सांपडतात. आधुनिक स्वरूपांत तशीं कांहीं गीतें पहा—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| एकाक्षरी | | **गा– । –ई** | | |
| | | **ये । ग** | **१.** | |
| | | **दू– । –दू** | | |
| | | **दे । ग** | **२.** | |
| द्व्यक्षरी | | **आला । बोका** | | |
| | | **दूधा । धोका** | **१.** | |
| | | **बुधा । मोका** | | |
| | | **आणी । ठोका** | **२.** | (माधदेव) |
| त्र्यक्षरी | | **मंजुले, । कोकिळे,** | | |
| | | **पी पाणी । गा गाणीं** | **१.** | |
| चतुरक्षरी | | **काळा काळा । मट्ट्या आला** | | |
| | | **नीज बाळा । लाव डोळा** | **१.** | (भ० पण्डित) |
| पंचाक्षरी | अ | **आई येईल । बाळा घेईल** | | |
| | | **दूदू देईल । भूर नेईल** | **१.** | (मायदेव) |
| | आ | **ताई गुणाची । माझी छकुली** | | |
| | | **झोंका दे दादा । म्हणूं लागली** | **१.** | (दत्त) |

षडक्षरी अ नदीच्या शेजारीं । गडाच्या खिंडारीं
झाडांच्या ओळींत । वेळूंच्या जाळींत १. (तांबे)
आ वाघाची मावशी । आहे का माहीत
चला या दावीतें । आमुच्या घरांत (मायदेव)
इ नदीच्या पैलारू । दामाजी सोनारू (जुने पद्य)

## १. ओवी

हा पद्यप्रकार अगदीं जुना महानुभावांच्या वेळेपासूनचा आहे. अगदीं आरंभींची मराठी पद्यरचना ओवी-वृत्तांतच झाली. ज्ञानेश्वरानें तिला अलंकारादिकांनीं नटवून व अर्थानें गौरवून पूर्णतेस आणिलें; म्हणून '**ओवी ज्ञानेशाची**' असें म्हणण्याचा प्रघात पडला आहे.

छंदःशास्त्राकडे दुर्लक्ष असल्यामुळें ओवीच्या अक्षरांची संख्या मोरोपंताशिवाय दुसऱ्या कोणत्याही प्राचीन संत–कवींनीं कडक रीतीनें पाळलेली आढळून येत नाहीं. बाबूराव नाइकांच्या मुलीं–बाळींना झोपाळ्यावर बसून म्हणण्यासाठीं मोरोपंतानें मात्र रुक्मिणीगीत, सावित्रीगीत, सीतागीत, ह्या **ओव्या** करून दिल्या; षडक्षरी अभंगांप्रमाणें वाटल्या तरी त्या ओव्याच आहेत. स्त्रीगीतात्मक ओव्या आणि वाङ्मयीन ओव्या असे ओवीचे मुख्य दोन प्रकार आहेत. **वाङ्मयीन ओवी**च्या पहिल्या तीन चरणांत ६ ते १८ अक्षरें व चौथ्या चरणांत ४ ते १२ अक्षरेंही येतात.

ह्या ओवीचे **ज्ञानेश्वरी ओवी** व **एकनाथी ओवी** असे प्रकार पडतील. आणि परंपरेनें आलेल्या स्त्रीगीतांतील ओवीचे **झोपाळ्यावरील ओवी** व **अंगाईगीत ओवी** असे प्रकार पडतील.

### ज्ञानेश्वरी ओवी

ह्या ओवींत पहिल्या तीन चरणांत सामान्यतः आठ अक्षरें व शेवटच्या चरणांत चार अक्षरें असतात; (परंतु हा नियम पाळला जात मात्र नाहीं ). पहिल्या तीन चरणांच्या अंतीं यमक असतें. एकनाथी ओवीपेक्षां ही आखूड असते. उदा० —

(१) जो सर्वां भूतांचे ठायीं । द्वेषातें नेणेचि कांहीं
आप पर जया नाहीं । चैतन्या जैसें (ज्ञानेश्वर)
(२) आतां वंदूं कवीश्वर । जे शब्दसृष्टीचे ईश्वर
नातरी हे परमेश्वर । वंदावे ते (रामदास)

## एकनाथी ओवी

ही ओवी चरणाक्षरसंख्येनें ज्ञानेश्वरी ओवीपेक्षां लांबट असते; आणि पहिले तीन चरण व चौथ्या चरणाचें अर्ध यांचे शेवटीं यमक असतें. उदा० —

(१) पडतां वानरांचें अनुमोदन । स्वयें पुसे रघुनंदन
शिष्ट पाठवावा कोण । तें निवडोन, सांगा मज (एकनाथ)
(२) करीं वीणा घेवोनी ब्रह्मसुत । शिवाजवळी आला अकस्मात
म्हणे हे विश्वंभर विश्वनाथ । तुझे भक्त, देखिले (श्रीधर)

## झोपाळ्यावरील ओवी

(१) पहिले तीन चरण षडक्षरी व शेवटचा चतुरक्षरी; चरण २ व ३ यांचे शेवटीं यमक असतें.

(अ) यज्ञासाठीं भूमी । नांगरीतां धन्या
सांपडली कन्या । सीतादेवी (मोरोपंत, सीतागीत)
(आ) संतांपासूनीयां । संतां भय झालें
ऐसें कानां आलें । नाहीं कधीं (मोरो०, सावित्रीगीत)

(२) पहिले तीन चरण सप्ताक्षरी व शेवटचा चतुरक्षरी

पहीली माझी ओवी । पहीला माझा नेम
तुळशीखालीं राम । पोथी वाची (जुनें स्त्रीगीत)

(३) पहिले तीन अष्टाक्षरी व शेवटचा चतुरक्षरी

फूल फूल घोसाळिये । फूल गेलें ग घोसांत
तुझें सासर देशांत । अंबूबाई (जुनें स्त्रीगीत)

(४) सर्व चरण अष्टाक्षरी; दुसऱ्या व चौथ्या चरणान्तीं यमक

माझ्या छकुलीचे डोळे । दुध्या कवडीचे डाव
बाई कमळ कमळ । गोड चिडीचं ग नांव (कोल्हटे)

## ‘अंगाईगीत’ ओवी

**त्रिचरणी.** वरच्या ओळींतील शेवटचा चौथा चरण गाळून टाकिला म्हणजे ह्या प्रकारची ओवी होते. मात्र तीन चरण झाल्याबरोबर अपूर्ण वाटूं

नये म्हणून म्हणण्याची चाल निराळी असते. ती मधुर असल्यामुळें आतां त्या ओवीचा प्रचार आधुनिक कवींच्या काव्यांत बराच होऊं लागला आहे. 'अनिलां'च्या **अंगाई** ह्या पद्यावरून हें नांव दिलें आहे.

( १ ) बहीण आपल्या भावास निजवितांना म्हणते—

**आकाशींच्या अंतराळीं । तारकांना तेज चढे**
**— तुझी माझी प्रीति जडे** १
**परसांतल्या फुलांचा । वास कोनाकोनीं खुले**
**— तुझा माझा श्वास मिळे** २
**रातकिडे गीत गाती । 'अंगाई' फुलांना लागे**
**— आतां तूं मी, नको जागे.** ३

( २ ) 'बाळ जातो दूरदेशा । मन गेलें वेडावून
—आज सकाळपासून ' ( गोपीनाथ )

## २. अभंग

ओवी व अभंग ह्यांचें सामान्य स्वरूप साधारणतः बरेंच सदृश असें आढळतें. पुष्कळांनीं अभंग रचना केली आहे, पण त्या सर्वांत तुकारामाचे अभंग सरस असल्यामुळें '**अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची**' असें म्हणण्याची चाल पडली आहे. अभंगांत द्विचरणी व चतुश्चरणी असे मुख्य दोन प्रकार असून, अक्षर-भेद व यमक-भेद यांमुळे आणखी पुष्कळ उपप्रकार पडले आहेत.

### द्विचरणी अभंग

( १ ) यांत प्रथमचरणीं ६ व द्वितीयचरणीं ८ अशीं अक्षरें असतात; व चरणांतीं यमक असतें.

**महारासी सिवे । कोपे ब्राह्मण तो नव्हे** १
**नातळे चांडाळ । त्याचा अंतरीं विटाळ** २
**ज्याचा संग चित्तीं । तुका म्हणे तो त्या याती** ३

( २ ) यांत प्रत्येक चरणांत ८ अक्षरें असतात व यमक चरणान्तींच असतें.

**कईं वहावें जीवन । कईं पलंगीं शयन** १
**जैशी जैशी वेळ पडे । तैसें तैसें होणें घडे** २ (तुकाराम)
**जन्मवरी शीण केला । अंतकाळीं व्यर्थ गेला** १
**काया स्मशानीं घातली । कन्या–पुत्र मुरडलीं** २ (रामदास)

( ३ ) यांत प्रथम चरणांत ८ व द्वितीय चरणांत सामान्यतः ७ अक्षरें असतात, परंतु यमक मात्र प्रथम व द्वितिय चरणाच्या मध्यें असें असतें.

**ब्रह्मरस घेई काढा । तेणें पीडा, वारेल १**
**पथ्य नाम विठोबाचें । आणिक वाचे, न सेवीं २**
**तेथें पांक्तिभेद नाहीं । मोठें कांहीं, लहान ३** (तुकाराम)

## चतुश्चरणी अभंग

( १ ) यांत पहिल्या तीन चरणांत सहा अक्षरें व चौथ्या चरणांत चार अक्षरें असतात. यमक दुसऱ्या व तिसऱ्या चरणांच्या अंतीं असतें. ( हे षडक्षरी ओंवीशीं पूर्ण सदृश आहेत ).

[ अ ] **नाहीं संतपण । मिळत तें हाटीं**
**हिंडतां कपाटीं । रानीं वनीं** १.
**न ये मोलें देतां । धनाचिया राशी**
**नाहीं तें आकाशीं । पाताळीं तें** २. (तुकाराम)

[ आ ] **उठीं गोपालजी । जाय धेनूंकडे**
**पाहती सौंगडे । वाट तूझी** ( भूपाळी, कृष्णकेशव )

याप्रमाणें कांहीं भूपाळ्याही अशाच प्रकारच्या असतात.

( २ ) यांत प्रत्येक चरणांत आठ अक्षरें असून साडेतीन चरणांतीं यमक असतें. ( एकनाथी ओंवीशीं याचें बरेंच साम्य आहे ).

**मन करा रे प्रसन्न । सर्व सिद्धींचें कारण**
**मोक्ष अथवा बंधन । सुख-समाधान, इच्छा ते १**
**मनें प्रतिमा स्थापिली । मनें मना पूजा केली**
**मनें इच्छा पुरविली । मन माउली, सकळांची २** (तुका०)

( ३ ) यांत चारही चरण अष्टाक्षरी असतात व १।२, ३।४ ह्या चरणांतीं यमक असतें. ( केव्हां पहिलीं १।२ अक्षरें गाळतात ).

**रूप पाहतां लोचनीं । सुख झालें वो साजणी**
**सर्व सुखाचें आगर । बाप रखमादेवी-वर १** (ज्ञानेश्वर)
**सर्वां भूतीं द्यावें अन्न । वस्त्र पात्र विचारून**
**उपतिष्ठे कारण । तेथें बीज पेरिजे २** (तुकाराम)

## ओवी व अभंग यांतील विशेष

**ओवी व अभंग** ह्यांचें सामान्य स्वरूप एकच आहे. म्हणजे बहुतेक चतुश्चरणी ओव्या व अभंग ह्यांतील पहिल्या तीन चरणांत ६ किंवा ८ अक्षरें

असावयार्ची आणि चवथ्या चरणांत सामान्यतः चार अक्षरें असावयाचीं; परंतु ओवीचे बाबतींत हा निर्बंध बहुतेक झुगारून दिल्यासारखाच आढळून येतो. एकनाथांनीं तर ओवीला अक्षरांचे बाबतींत खूपच ऐसपैस केली आहे. अभंगांत मात्र अक्षरांचें नियमन ओवीपेक्षां ज्यास्त पाळलेलें आढळतें; तरी शैथिल्यही कमी नाहीं; हें अक्षरांसंबंधीं झालें.

सहा किंवा आठ अक्षरी चतुश्चरणी ओव्या व अभंग यांत यमकदृष्टयाही साम्य आढळतें; परंतु अभंग व ओवी ह्यांच्या म्हणण्याच्या चालींत मात्र फरक आहे. तसेंच अभंग विशेषतः पुरुषांच्या तोंडीं किंवा भजनाच्या वेळीं म्हटले जातात; व मोरोपंती 'सीतागीता'सारख्या ओव्या विशेषतः बायकाच्या तोंडीं व पुष्कळदां झोंपाळ्यावर बसून म्हटल्या जातात. अभंगाचा विषय बहुधा धार्मिक, सामाजिक, नैतिक, गंभीर, अशा प्रकारचा असतो; ज्ञानेश्वर-एकनाथ-श्रीधर-महीपति इ०च्या वाङ्मयनिविष्ट ओव्यांशिवाय, विशेषतः स्त्रियांच्या गाण्यांतील ओव्याचे विषय मुलांना रंजविण्याचे, लौकिक, आप्त माणसाच्या प्रौढीचे, असे असतात. अर्थाच्या दृष्टीनें ओवी एक प्रकारें स्वतंत्र असते, तर पांच-सहा अभंगांचा मिळून एक गट असतो, व त्यात एकादें तत्त्व सांगितलेलें असतें; हा मोठा फरक आहे. शिवाय वाङ्मयीन ओव्या सबंध प्रकरण संपेपर्यंत त्यात हव्या तेवढ्या येऊं शकतात व त्यांचा मागल्याचा पुढल्याशीं संबंध अव्याहत साखळीप्रमाणें जुळलेला असतो. अभंगांत प्रत्येक वेळीं भिन्न तत्त्वप्रतिपादन असल्यानें, त्यामध्यें एकाचा दुसऱ्याशीं अर्थदृष्टया फारसा संबंध नसतो; व म्हणून अभंगांचा एक गट व दुसरा गट ह्यांत विराम घ्यावा लागतो.

## ३. घनाक्षरी

ओवी व घनाक्षरी ह्यांत वस्तुतः फरक नाहीं. चार ओव्यांचा एकत्र समुच्चय म्हणजे घनाक्षरी. एक ओवी म्हणजे घनाक्षरीचा एक चरण आणि तसल्या चाऱ्ही चरणांच्या अंतीं मात्र एकच यमक पाहिजे.

**अहो कैकेयी हें काय। केलें तुवां हाय हाय !**
**न म्हणवे तुज माय। जन्मोजन्मीं वैरिणी** १.
**सर्व—जगदभिराम। वना धाडिला तो राम**
**केले विख्यात कुनाम। कीं हे पति-मारिणी** २.

**तुझ्या वधें न अधर्म । तुज मारावें हा धर्म**
**परी निंदील हें कर्म । राम, पाप-कारिणी ३.**
**नाहीं तरी प्राण आज्य । तुझें घालोनियां प्राज्य**
**जाळोनियां सामराज्य । दाखवितों करणी** ४. (वामन)

**४. समाक्षरचरणी** * [ दीनवत्सल ] ( अक्षरें ७।७ )

यांत काहीं धावे, आरत्या, अशा प्रकारची रचना येते.

( १ ) **धाव रे रामराया । किती अंत पहासी ?**
**प्राणान्त मांडियेला । न ये करुणा कैशी ?** (रामदास)
( २ ) **आरती ज्ञानराजा । महा कैवल्य-तेजा**
**सेविती साधु-संत । मनु वेधला माझा**

**५. द्वादशाक्षरचरणी** ( अक्षरे १२ )

यात काहीं आरत्या येतात: परंतु त्यांची रचना अत्यन्त शिथिल असते.
**युगीं अठ्ठाविसीं, विटेवरी उभा । वामांगीं रखुमाई, दिसे दिव्य शोभा**
**पुंडलिका-भेटी, परब्रह्म आलें गा । चरणीं वाहे भीमा. उद्धरी जगा** (नाम०)

## **मात्रा-वृत्तें** ( जाति )

मराठींत सामान्यतः ज्याना आपण ‘ **पदें** ’ असें म्हणतो, त्यांचा मात्रा-वृत्तांत किंवा जाति-वृत्तांमध्ये समावेश होतो. गाण्याच्या हरतऱ्हेच्या चालींवर व तालावर त्यांची रचना असल्यामुळें, पदे असंख्य प्रकारचीं होऊं शकतील. एकनाथाच्या वेळेपासून ही पद-रचना झालेली आढळते: परंतु त्याचे वर्गीकरण करून त्यांना शास्त्रांत स्थल देण्याचें कार्य आतापर्यंत होऊं शकलें नाहीं; ती वेळ आतां आलेली आहे. कीर्तनांतून, नाटकातून, प्रख्यात गवयांच्या तोंडून किंवा सुप्रसिद्ध आधुनिक कवि-गायकाच्या मुखांतून, हजारों लोक प्रत्यहीं जीं पदें ऐकून तल्लीन होऊन जातात, त्या पदांसंबंधीं ग्रंथांत कांहीं शास्त्रशुद्ध योजना हवीच; किंबहुना मराठी वाङ्मय अनेक अंगानीं संपन्न होत असतां त्याच बाबतींत वैगुण्य राहणें इष्ट नाहीं; **प्रो० माधवराव पटवर्धन** ह्यांनीं ‘ **छन्दोरचनें** ’त ह्यासंबंधाचा शास्त्रशुद्ध विचार केला आहे, त्यास अनुसरून येथें सोप्या भाषेंत आवश्यक तेवढें विवेचन केलें आहे. ( *ह्या खुणेनें दर्शविलेल्या संज्ञा त्यांनीं नवीन दिलेल्या आहेत ).

**मात्रा-वृत्तांत** किंवा **जाति-वृत्तांत** फक्त ‘**पदां**’चाच समावेश होतो असें नाहीं; तर निरनिराळ्या रसांकरितां व प्रसंगांकरितां जी पद्य-रचना

केलेली असते, तिचाही त्यांत समावेश होतो. म्हणजे वर्णनात्मक गोष्टींकरितां **कटावांचा** व उपदेशात्मक गोष्टींकरितां **फटके** यांचा विशेष उपयोग होतो; वीररसात्मक गोष्टींकरितां **पोवाडे** रचिले जातात; **लावण्या** विशेषतः शृंगाररसपोषक असतात, तरी त्यांच्या आकर्षक चालींमुळें भक्तिरसप्रधानही सुन्दर लावण्या झालेल्या आहेत; **भूपाळ्या** ह्या वस्तुतः 'भूपाळी' ह्या रागात म्हणण्याचें पद्य होय; **अंगाई-गीतें, पाळणें,** इ० स्त्रियांनी म्हणावयाचीं गीतें आहेत; **आरत्या** विशिष्ट उत्सवप्रसंगीं म्हणण्यात येतात; निरनिराळ्या जातींच्या लोकांचीं निरानिराळ्या प्रकारचीं व निरनिराळ्या ढंगांचीं द्योतक अशीं पद्यें आहेत; ह्यांपैकीं फक्त नागर-जनाच्याच नित्य गायनांत येणाऱ्या व विशेषतः क्रमिक वाचन पुस्तकात आलेल्या प्रमुख काव्य-प्रकारांसंबंधीं येथे दिग्दर्शन केले आहे.

अक्षर-वृत्तांमध्यें ज्याप्रमाणें सम-वृत्तें, अर्धसम-वृत्ते व विषम-वृत्तें असे प्रकार आहेत, त्याचप्रमाणे जाति-वृत्तामध्येंही चरणांचीं एकाच मात्रावलींचीं युग्मकें; एक भाग एका मात्रावलीचा व दुसरा भाग निराळ्या मात्रावलींचा अशीं चरण-युग्मकें; व भिन्न भिन्न मात्रावलींचे चरण; असे प्रकार आहेत. तसेंच ह्यांपैकीं कांहींत ध्रुवपद व अंतरा असतो, कांहींत ह्या गोष्टी नसतात. त्यांचा अनुक्रम खालीलप्रमाणें असतो.

प्रथम एक किंवा दोन चरणांचें ध्रुवपद, नंतर त्याच मात्रावलींचीं कांहीं युग्मकें, नंतर चाल बदलून म्हणावयाचे दोन, तीन, चार, किंवा त्यापेक्षां अधिक ओळींचे अंतरे, आणि ध्रुवपदाशीं जुळणाऱ्या एक किंवा दोन चरणांनीं कडव्याचा शेवट असतो.

**कडव्याच्या ओळी हा जाति-वृत्ताचा गाभा होय.** ध्रुवपद हें मुख्य खरें, आणि त्याशीं जुळणारा मेळ हाही आवश्यक भाग खरा, परंतु त्यांवरून जाति-वृत्त ठरवीत नाहींत. कवि सामान्यतः पूर्वीच्या एकाद्या प्रसिद्ध पद्याचा आरंभींचा चरण देऊन, आपल्या पद्यावर ती चाल असें लिहितो; परंतु प्रत्येक वेळीं तें दिल्यानें जातिवृत्त बरोबर असेलच असें नाहीं. **कडव्याच्या चरणाच्या मात्रा, गट, यति, इ० मोजून, जाति ठरवावयाची असते;** हें ध्यानांत ठेवावयास हवें.

**अंतरे** खालील प्रकारचे आढळतात. पुढील विषयाच्या समजुतीसाठीं ते येथें स्वतंत्रपणें देतों.

१. **पद्म**—मात्रा ८. टिळकांच्या ‘ कवीची विनवणी ’ यांतल्या खालील ओळींप्रमाणें.

**हीं निःश्वसितें**
**कोण सोडितें ?**
**मम हृदयीं तें**

२. **प्रविसूर्यकान्त**—मात्रा १३. माधवानुजांच्या कृष्णा–कोयना–संगम यांतल्या खालील ओळींप्रमाणे—

**किति विशाल तट हा अहा**
**प्रिय सखे, उभी तूं रहा**
**क्षण येथिल शोभा पहा**

३. **शारदा**—मात्रा ५, व ८, ८, ८, असे तीन चरण. ‘शारदे, दास कामदे ’ या पद्यांतल्या ओळींप्रमाणें—

**मावळे,**
**जयांनीं दिले,**
**आपले गळे,**
**देश–रक्षणीं**

४. **बालानन्द**—मात्रा (८+६) = १४, ह० ना० आपटे यांच्या ‘ असारजीवित केवळ माया० ’ यांतल्या खालील ओळींप्रमाणें—

**मुकीं बिचारीं, कुणी हका**
**अशीं मेंढरें, बनूं नका**
**गत–काळाचा, शोक फुका**

५. **उद्धव**—मात्रा (२ + ८ + ४) = १४. गडकऱ्यांच्या ‘ राजहंस माझा निजला० ’ यांतल्या अंतऱ्याप्रमाणें—

**नयनांच्या शिंपांमधुनी**
**अश्रूंचे मौक्तिक—सुमणी**
**मीं दिले तया काढोनी**

**६. पादाकुलक**—मात्रा ( ८+८ ) =१६. अज्ञातवासींच्या ' सरदार धन्य एवढा० ' यांतील खालील ओळींप्रमाणें—

**अवघड गड, अस्मानीं डोले**
**वरतीं बघतां, फिरतिल डोळे**
**खालीं पातां,—ळांतिल झुमले**

**७. भूपातिवैभव** * [ मालिबाला ] — मात्रा ( १४ + ५ ) = १९. मृच्छकटिकांतलि ' भूपती खरे ते० ' यांतील अंतऱ्याप्रमाणें—

**म्हणुनि कां त्यांसि सेवावें ?—सांग तूं**
**धनाचि कां अधिक मानावें ?—सांग तूं**
**गुण त्यांचे कां न बघावे ?—सांग तूं**

**८. मंजरी** * [ लीलारति ]—मात्रा ( १४+७ ) = २१. तांब्यांच्या ' पावा ' या कवितेंतलि खालील अंतऱ्याप्रमाणें—

**मोत्यांचे दाणे भरले कणसांत या**
**लवलीं हीं खालीं कितितरि, भारें तया**
**आनंदें डुलतिल पावा, परिसोनियां**

**टीप**—यांतील प्रत्येक चरणापुढें ' रे सख्या, ' ह्याप्रमाणें पंचमात्रिक अक्षरें येतात; केव्हां केव्हां अशा प्रकारचीं अक्षरें अगोदरही येतात.

तालाच्या दृष्टीनें **अष्टमात्रिक** तालीय म्हणजे आठ आठ मात्रांच्या एकेक गटानंतर टाळी येणारीं व **षण्मात्रिक** तालीय म्हणजे सहा सहा मात्रांच्या एका गटानंतर टाळी येणारीं अशीं जाति-वृत्तें असतात. त्यांतल्यात्यांत क्रम साधून प्रथम सम-जातिवृत्तें, नंतर अर्धसम-जातिवृत्तें व नंतर विषम-जातिवृत्तें, यांचा विचार करूं.

## सम जातिवृत्तें

### ( अष्टमात्रिक )

यांत आठ आठ मात्रांचा एक एक गट अशीं अनेक आवर्तनें असतात; कमी पडलेल्या मात्रा जरूर तेथें आलापांनीं भरून काढितात.

**१. बालानंद** * [ अचलगति ] ( मात्रा १४ )

यांत एकेका चरणांत ८ व ६ असे मात्रांचे दोन गट असतात. अंतरा पद्याचा केव्हां असतो केव्हां नसतो. बालकवींच्या खालील पद्यावरून हें नांव देण्यांत आलें आहे.

[ १ ] आनंदी आ,नंद गडे । इकडे तिकडे, चोहिंकडे
वरतीं खालीं, मोद भरे । वायूसंगें, मोद-भरें
नभांत भरला
दिशांत फिरला
जगांत उरला
मोद विहरतो, चोहिंकडे । आनंदी आ,नंद गडे

[ २ ] ' ये ये ताई, पहा पहा । गंमत नामी, किती अहा ' ( गोखले )

[ ३ ] ' या चिमण्यांनो, या ग या । अंगणि माझ्या, नाचाया ' ( मायदेव )

## २. उद्धव ( मात्रा १४ )

बालानंदांत ८ व ६ असे मात्रांचे दोन गट असतात, त्याऐवजीं उद्धवांत ( २+८+४ )=१४ असे मात्रांचे गट एकेका चरणांत असतात. अशा दोन चरणांमिळून ध्रुवपद होतें. अंतराही उद्धवाचाच असतो. शेवटीं ध्रुवपदाशीं जुळणारा १४ मात्रांचा एकच चरण घालून मेळ जुळविला जातो. ' मध्वमुनी 'च्या खालील सुप्रसिद्ध पद्यावरून हें नांव पडलें आहे.

[ १ ] उ,द्धवा शांतवन, कर जा । त्या, गोकुलवासि ज,नांचें ॥ ध्रु० ॥
बा, नंद-यशोदा, माता । मज,साठीं त्यजितिल, प्राण
त्या,गुनी प्रपंचा, फिरती । मनिं, उदास रानो,रान
अ,न्न-पाणि त्यजिलें, रडती । अति, दुःखित झाले, दीन
ज,न्मले तैं हुनी, झटले
मज,लागीं तिळातिळ, तुटले
कटिं,-खांदे वाहतां, घटले
आ,टलें रक्त दे,हाचें ॥ उद्धवा० ॥ १.

[ २ ] 'हा कोण इथें पडलेला । कादरखा काबुलवाला' ( अत्रे )

[ ३ ] 'नाकेला अन् गुल्जार. । सावळा नि सुंदर भासे' ( साधुदास )

[ ४ ] 'न्यारिचा वकुत होइल । मैतरणी बिगिबिगि चाल' ( यशवंत )

[ ५ ] 'हें कोण बोललें बोला । राजहंस माझा निजला!' (गोविंदाग्रज)

## ३. पादाकुलक ( मात्रा १६ )

यांत प्रत्येक चरणांत ८।८ मात्रांचे दोन गट अशीं चरण-युग्मकें येतात.

[ १ ] हिरवे हिरवे । गार गालिचे
हरित तृणांच्या । मखमालीचे
त्या सुंदर मख- । -मालीवरतीं
फुलराणी ही । खेळत होती ( बालकवि )

[ २ ] ‘अशी तुतारी, द्या मज आणुनि०’ ( केशवसुत )
[ ३ ] ‘हौद चिमुकला, होता सुंदर०’ ( म० का० कारखानीस )

**टीप**—पादाकुलकाचे तीन चरण व चौथा चरण तुटका १० मात्रांचा असें असल्यास, ‘अंजनीगीत’ होतें.

**[ १ ] जेथें हिरवळ, फार विलसते । लता-द्रुमांची शोभा दिसते**
**तेथें फुलपांखरूं पहा हें । सुंदर बागडतें** ( केशवसुत )

### ४. कटिबंध ‘कटाव’ ( मात्रा १६ )

पादाकुलकाचे सोळा सोळा मात्राचे अनेक चरण म्हणजे कटिबंध होतो; त्यांच्या शेवटीं एक यमक साधलेलें असतें. असे १६ मात्रांचे किती तुकडे असावे याचा नियम नाहीं. अशाच पुढच्या कांहीं तुकड्यांत दुसरें यमक साधलेलें असतें. हाच प्रकार शेवटपर्यंत असतो. ही जाति शीघ्रकवित्वास फार सोयस्कर आहे. कांहीं कटिबंधात उद्धवजातीचें ध्रुवपद आरंभीं असतें.

‘**अमृतराया**’चे कटाव फार प्रसिद्ध आहेत.

**सुरलोकाहुनि, गंगा आली । भूमीवर ये,ण्यास निघाली**
**शर्व-जटीं ती, उडीच घाली । देव-मंडळी, पाहूं आली**
**फिरति विमानें, दाटी झाली । मुनि-जन-संतति, सर्व मिळाली**
**जयोस्तु म्हणुनी, स्तवनें करिती । सुरांगना ओ,वाळिति आरति**
**किन्नर टाकिति, पुष्पें वरतीं । हा हा हू हू, तुंबरु गाती १**

### ५. मंजरी * [ ललिरति ] ( मात्रा २१ )

यांत ( २ + ८ + ८ + ३ ) = २१ याप्रमाणें मात्रांचे गट असतात. केव्हां केव्हां ध्रुवपदांतील दुसरी पंक्ति भिन्न प्रकारची १६ मात्रांची असते.

**[ १ ] ही, मोट भरे भर, भरा चढे कर,करा**
**विहि,रींत बघा वा,कुनी जरा घा,कुनी**
**पा,ण्यांत लई भों,वरे फेस गर,गरे**
**हें, काम राहिलें, करा; कसा कं,बरा** ( ना० घ० देशपांडे )

[ २ ] ‘वा,जते फटाफट, गोफण माच्या,वरी’ ( मायदेव )
[ ३ ] ‘जा,ईन कधीं मी, आतां माझ्या, घरीं०’ ( ठोकळ )

**टीप**—याच जातीच्या पांच चरणांचा मिळून ‘**कणिका**’ हा प्रकार गोपीनाथ तळवलकर यांनीं मराठींत आणिला आहे.

### ६. गुणी * [ स्वैरगति ] ( मात्रा २० )

यांत प्रथम भाग ६ मात्रांचा व दुसरा भाग १४ मात्रांचा बालानंद जातीचा असतो. अंतरा केव्हां केव्हां पद्माच्या जातीचा ८ मात्रांच्या तीन ओळींचा असतो.

**बाळ कुणी — संध्याकाळीं रमे गुणी**
**खेळतसे — बाळ अंगणीं हवेंतसें**
**बागेंत — मोजेनें झोंके घेत**
**तों दिसली — सुंदरशी त्याला वेली**
**देठ कोवळे,**
**हिरवे पिवळे,**
**नाजुक सगळे,**
**ती वेली — हिरवा शालू पांघरली** ( गडकरी )

### ७. भूपतिवैभव ( मात्रा २२ )

यांतील प्रत्येक चरणांत ( २ + ८ + ८ + ४ ) = २२ असे मात्रांचे गट असतात; आणि ( १४ + ५ )=१९ मात्रांचा अंतरा असतो. त्यास भूपतिवैभवाचाच अंतरा असें म्हणतात. खालील पद्यावरून हें नांव पडलें आहे.

[ १ ] **भू,पती खरे ते, वैभव-सुख से,वीती**
**बहु, दास,सेवनीं, दक्ष सदा रा,हाती ॥ ध्रु० ॥**
**म्हणुनि कां त्यांसि सेवावे ? सांग तूं**
**धनाचि कां अधिक मानावें ? सांग तूं**
**गुण त्यांचे कां न बघावे ? सांग तूं**
**सं,पत्ति-बळाच्या, मदें धुंद ते, होती** १
**स्व,च्छन्द वागती, नाहिं तयां नय,-रीती** ( देवल )

[ २ ] ' कर,करत खालतीं, मोट हळूहळु, जाई० ' ( इंदुभूषण )

### ८. पद्मा * [ रेवती ] ( मात्रा २४ )

यांत ( ६ + ७ + ६ + ५ ) =२४ याप्रमाणें मात्रांचे गट येतात.

[ १ ] **देशाची, भक्ति पूर्वी, जरि नव्हती, भारतीं**
**उत्कर्षें, स्वामि-निष्ठा, होती सा,चार ती**
**रक्षाया, स्वामिवंशा, पुत्राची, आहुती**
**पद्मा दे, कथा तीची, राहो दी,र्घायु ती** ( विनायक )

[ २ ] ' श्रीहरिच्या, वेणुनादें, मन माझें, मोहिलें० ' ( जुनें पद )

## ९. मोहिनी, * [ महाराष्ट्रलक्ष्मी ] ( मात्रा २४ )

यांत ( ६ + ८ + ६ + ४ ) = २४ याप्रमाणें मात्रांचे गट असतात.

[ १ ] **महाराष्ट्र,– लक्ष्मी मातें, जगीं धन्य, वाटे**
**यशोगीत, तीचें गातां, मनीं हर्ष, दाटे ॥ ध्रु० ॥**
**पुनःपुन्हां, परचक्रानें, ताडिली बि,चारी**
**दीर्घकाल, खचली होती, पारतंत्र्य,–भारीं**
**द्वादशाब्द, दुष्काळानें, जाहली भि,कारी**
**संकटांत, तीच म्हणोनी, करी उंच, माथें** ( विनायक )

[ २ ] ' सोड सोड, आतां अपुल्या, गोड मोहि,नीला० ' ( गिरीश )

## १०. चंद्रकान्त * [ पतितपावन ] ( मात्रा २६ )

यांत (८ + ८+ ८ + २)=२६ असे मात्रांचे गट असतात. अंतरा केव्हां केव्हां मंजरी-लीलारति–( २१+५ ) मात्रांचा असतो. ( देवलांच्या झुंजारराव नाटकांतलि ' चंद्रकान्त राजाची कन्या० ' ह्या सुप्रसिद्ध पद्यावरून पाहिलें नांव पडलें.

[ १ ] **घुमव घुमव ए,कदां फिरुनि तो, गोड तुझा पा,वा**
**सोनें झालें, शेत पिकुनि हें, गातें मी धा,वा**
**मोत्यांचे दाणे भरले कणसांत या — रे सख्या,**
**लवलीं हीं खालीं कितितरि भारें तया — रे सख्या,**
**आनंदें डुलतिल पावा परिसोनियां — रे सख्या,**
**होति विलक्षण, वृत्ति मनाच्या, भुलाति दुष्ट भा,वा**
**फुंकाऱ्यासह, जाति उडोनी, क्रोध लोभ हे,वा** ( तांबे )

[ २ ] ' लहान सुंदर, गोजिरवाणी, दिसे कशी ही, खार० ( म० का० कारखानीस )
[ ३ ] ' पिवळें तांबुस, ऊन कोवळें, पसरे चौफेर० ' ( तांबे )

## ११. सूर्यकान्त * [ समुदितमदना ] ( मात्रा २७ )

यांत ८ मात्रांचे तीन गट व शेवटीं गुरुपूर्व लघु अशा तीन मात्रा असतात. चंद्रकान्ताचें एक उपान्त्य लघु अक्षर वाढविल्यानें ही जाति सिद्ध होते.

[ १ ] **सृष्टीचा लडि,वाळ बाळ वे,ल्हाळ कवी धा,कटा**
**अफाट जग-ह्या,टांत पाहिला, हिरमुसला ए,कटा**

**कळवळली कन,वाळु मनीं अस,माय माय-मा,वळी**
**बाजारांतुनि, काढुन माया,-पाखर वर घा,तली'**
**चंद्र-सूर्य खे,ळणीं दिली खे,ळाया तेजा,गळीं**
**कुरवाळी, हळु,वारपणें पण, न फुले कवि-मन,कळी** (Bee)

[ २ ] 'असतिल तेथें, जिकडे तिकडे, विखरुन पडलीं, फुलें०' ( ठोकळ )

**१२. साकी** * [ लवंगलता ] ( मात्रा २८ )

चंद्रकांताच्या शेवटीं आणखी एक गुरु अक्षर वाढविल्यानें ( ८ + ८ + ८ + ४ ) = २८ ही जाति सिद्ध होते.

**जेथें नित्य फुलूनी तरू, त्यांवरि गुंगति भृंगे**
**नित्य डोलती विकसुनि नलिनी, कलहंसांच्या संगें** १.
**नित्य नाचती मोर उभारुनि, सुंदर थोर पिसारे**
**प्रकाशूनियां नित्य चंद्रही, उजळी प्रदेश सारे** २.

**१३. भवानी**, ( मात्रा ३० )

साकीच्या आरंभींच दोन मात्रा वाढविल्यानें ( २ + ८ + ८ + ८ + ४ ) = ३० ही जाति होते. तांब्यांचें ह्या जातींतील खालील पद्य प्रसिद्ध आहे. त्यांत ध्रुवपद उद्धवाचें १४ मात्रांचें आहे.

**कुस्करूं नका हीं सुमनें ॥ ध्रु० ॥**
**जरि, वास नसे तिळ, यांस तरी तु,म्हांस अर्पिलीं,सु-मनें** १.
**मधु, जरी नसे तिळ,भरी अंतरीं, तरी करीं हीं, धरणें** २.

**१४. स्वर्गंगा** * [ हरिभागिनी ] ( फटका, मात्रा ३० )

भवानीच्या आरंभींच्या दोन मात्रा कमी करून शेवटच्या अक्षरापूर्वी आणखी दोन मात्रा वाढविल्यानें ( ८ + ८ + ८ + ६ ) = ३० ही जाति होते. केव्हां केव्हां बालानंद जातीचा १४ मात्रांचा अंतरा असतो.

[ १ ] **बिकट वाट वहि,वाट नसावी, धोपट मार्गा, सोडुं नको**
**संसारामधिं, ऐस आपला, उगाच भटकत, फिरूं नको ॥ ध्रु० ॥**
**मायबापांवर रुसूं नको**
**दूर एकला बसूं नको**
**व्यवहारामधिं फसूं नको**
**परां उलाढा,ली भलभलत्या, पोटासाठीं, करूं नको** ( अनंतफंदी )

[ २ ] 'सूर्य किती हा वरतीं आला, शाळा भरली, मघांच ती ' ( कारखानीस)

[ ३ ] 'फेरीवाला, दारीं आला, लोटित अपुल्या, गाडीला०' ( पुराणिक )

[ ४ ] 'आनंदाचा, कंद हरि हा, देवकिनंदन, पाहिला०' (जुनें पद )

### १५ सुंदरा* [ मदनतल्वार ] ( मात्रा ३८ )

भवानींत ८ मात्रांचे तीन गट असतात, त्यांऐवजीं चार गट केले म्हणजे ही जाति ( २+८+८+८+८+४ ) होते. रामजोशी यांच्या ' सुंदरा मनामाधि भरलि० ' ह्या उत्कृष्ट लावणींतील पहिल्या शब्दावरून हें नांव दिलें गेलें आहे.

**श्री,मंत प्रतापि बल, वंत कीर्ति आ,नंत बाळाजी, पंत पेशवे, नाना**
**भू, पती वाकती, किती चरण ल, क्षिती शब्द क्षे, लिती तयांचा, जोर ॥ध्रु०॥**
**चा,लले अश्व फे,किले गजहि· दों,डिले वीर खों,ळले जातिचे, शूर**
**म,र्दना रिपू-कं,दना देश-ता,रणा कराया, रणा डोळ्यांवर, धूर १.**

### ( षण्मात्रिक )

यांत ६।६ मात्रांचा एकेक गट अशीं आवर्तनें असतात. कमी पडलेल्या मात्रा आलापानीं भरून काढितात.

### १. दिंडी ( मात्रा १९ )

हिला चार चरण असून, तिचे ( ३+६ )=९ व ( ६+४ )=१० ह्याप्रमाणें मात्रांचे गट पडतात: यति ९ व्या मात्रेनंतर व शेवटीं असतो. १।२ व ३।४ ह्या चरणात किंवा चार्‍ही चरणांत यमक असतें.

**कथा बोलूं हे, मधुर सुधाधारा । होय श्रृंगारा, करुण-रसा थारा**
**निषधराजा नळ, नामधेय होता । वीरसेनाचा, तनय महा होता ( र० पं० )**

### २. धवलचंद्रिका ( मात्रा २० )

यात ( ६+६+६+२ )=२० असे मात्रांचे गट असतात. ( देवलांच्या ' धवलचंद्रिकाच काय पूर्ण साचली ' या पद्यावरून हें नांव पडलें आहे )

**बहु असोत, सुंदर सं,पन्नही म,हा**
**प्रिय अमुचा, एक महा,राष्ट्र-देश, हा ॥ ध्रु०॥**
**विक्रम—वै,राग्य एक, जागिं नांद,ती**
**जरिपटका, भगवा झें,डाहि डोल,ती**
**धर्म-राज,कारण सम,वेत चाल,ती**
**शक्ति-युक्ति एकवटुनि, कार्य साधि,ती**
**पसरे यत्,-कीर्ति अशी, विस्मयाव, हा ॥ ( श्री० कृष्णाजीहटकर )**




### ३. दासी ( मात्रा २४ )

यांत ६।६ मात्रांचे चार गट असतात. यति चरणांतीं असल्यानें तें अक्षर गुरु हवें.

दासि ऐसें, मानुनियां, कार्य मला, सांगतसे
सुदिन काय, उगवलाऽ, आज मनीं, वाटतसे ॥ध्रु०॥
मधुर जाति, सुमनांचा, वास यास, येत असे
उत्सवभर, म्हणुनि याचा, खास अजुनि, पूर्ण असे १.

यांतील १ ल्या व ४ थ्या चरणांत एकेक मात्रा वाढत होती, त्यांचे उच्चार कवीनें ऱ्हस्व करून ६ मात्रांचा गट केला. तसेंच २ ऱ्या चरणांत एक मात्रा कमी पडत होती, ती कवीनें एका मात्रेच्या आलापानें भरून काढिली आहे.

[ २ ] ' डोळे हे, जुल्मि गडे, रोखुनि मज, पाहुं नका० ' ( तांबे )

३. आर्या ( मात्रा १२ व १८, १५ )

मोरोपंतांनें 'गीति' ह्या वृत्ताचा मराठींत फारच प्रचार केला, तिलाच ' आर्या ' म्हणण्याचा प्रघात पडला आहे; परंतु मुळात दोहोंत फरक आहे. खऱ्या आर्येंत १२, १८ व १२, १५ याप्रमाणें क्रमानें चरणांतील मात्रा असतात.

ती तातास म्हणे कच, गुरुभक्त साधु कुलीन कार्यकर
परि त्यासि सोडिलें जळ, जळ सोडूं मजाहि आर्यकर ( मोरो० )

४. गीति ( मात्रा स० च० १२; वि० च १८।)

शल्य म्हणे राधेया, जेव्हां तुझिया स्मरोनि कर्मांतें
अर्जुन तवि शरांनीं, समरीं भेदील सर्व मर्मांतें ( मोरो० )

## अर्धसम जातिवृत्तें

### ( अष्टमात्रिक )

१. शशिकान्ति ( मात्रा १२ व १८ )

यांत साकींतील ( ८+४ )=१२ मात्रांचा प्रथम भाग असून, दुसऱ्या भागांत ( २+८+८ )=१८ याप्रमाणें मात्रा असतात. देवलांच्या मृच्छकटिकांतील खालील पद्यावरून हें नांव पडलें आहे.

[ १ ] अवचित या मे,घांनीं—शशिकान्ति चोरिली, संधि साधुनी ॥ध्रु०॥
मालक निर्बल, पाहुनि—ऱ्यावें तयाचें, धन बहुतांनीं
तैसें या मे,घांनीं—शशिकान्ति चोरिली, संधि साधुनी १.

[ २ ] ' अरसिक किति हा, शेला० ' ( किर्लोस्कर )

२. नृपममता ( १४ व १९ )

यांत उद्धवाच्या ( २+८+४ )=१४ मात्रांचा प्रथम चरण व भूपतिवैभवाच्या अंतऱ्याप्रमाणें ( १४+५ )=१९ मात्रांचा द्वितीय चरण असतो.

कधीं कधीं (५+८+८)=२१ असा शारदा जातीचा अंतरा असतो रामराज्यवियोगांतील खालील पद्यावरून हें नांव पडलें आहे.

[१] नृप,ममतां रामा,वरतीं—प्राणाहुनि बहु आहे तीं; कसें करूं ?
सिं,हासन ज्येष्ठा, हातीं—ऐशीं तीं शास्त्रें रडती; कसें करूं ?
निर्दया
नव्हे कैकया
राघवीं दया
अमित ती करिती —ताशि नाहीं अपुल्या भरतीं; कसें करूं ?

### ३ अक्रूर ( मात्रा २० व १४ )

भूपतिवैभवाच्या प्रथम विभागांतील शेवटच्यां २ मात्रा गाळून (८+८+४) =२० मात्रांचा प्रथमार्ध व उद्धवाच्या दुसऱ्या भागांतील (१०+४)=१४ मात्रांचा उत्तरार्ध ह्या जातीत असतो. अंतराही उद्धवाचाच असतो. 'अजि अक्रुर हा नेतो श्रीकृष्णाला०' ह्या जुन्या पद्यावरून हें नांव पडलें आहे.

[१] बा नीज गडे, नजि गडे लडि,वाळा—
निज नीज माझ्या, बाळा ॥ ध्रु० ॥
रवि गेला रे, सोडुनि आका,शाला—
धन जैसें दुर्भा,ग्याला
खडबड हे उंदिर करिती
कण शोधायातें फिरती
परि अंतरि निराश होती
लवकरि हेही, सोडितलि सद,नाला—
निज नीज माझ्या बाळा १. ( घांटे )

### ४. अभिमन्यु ( मात्रा १९ व १५ )

यांत (९+१० व ९+६) मात्रांचे गट असतात; पण ही रचना शिथिल आढळते. बायकांच्या गाण्यांतील खालील पद्यावरून हें नांव पडलें असावें.

[१] पडला अभिमन्यू । मन्यू वीर रणीं,
शोक केला फार । पांडवांनीं १.

[२] 'चौघडा झडतो, झडतो दुमदुमुनी०' ( तांबे )

[३] 'हिमालय अमुचा, अमुचा उंच जगीं०' ( गोखले )

### ५. माधवकरणी * [ प्राणसखी ] ( २६ व १५ )

यांत प्रथम चरण चंद्रकांत (८+८+८+२)=२६ मात्रांचा असून, द्वितीय चरण आंखूड १५ मात्रांचा असतो. केव्हां केव्हां उद्धवाचा अंतरा असतो.

लोटी प्रल्हा,दास तत्पिता, अग्निकटाहां,तें—
अद्भुत, परि माधवकर,णी ।
अदाह्य भगव,द्भक्त तारता, देवाचा हा,तें—
वाटिका, तिथ हो माधव,नीं ।
देवाचा ला,डका मी न सखि, अणू अणू जळ,तो—
त्यांतही, समाधान वा,टे ।
एकतानता, परी भंगतां, जिव हा कळवळ,तो—
फुलांचे, मग बनती कां,टे ।
म्हणून न माझी फिर्याद
न घेई वा देई दाद
फिरेन मी जड,मुक्त होउनी, नभीं अमर्या,दें—
घेउनी नित्य तुझा नादें १. ( मा० जू० )

### ६. माळीण * [ नवतरुणी ] ( मात्रा २४ व २८ )

यात चंद्रकांतापेक्षा आरंभींच दोन मात्रांनीं कमी म्हणजे (१०+१४)=२४ मात्रांचा प्रथम चरण असून, दुसरा चरण चंद्रकांतापेक्षां प्रारंभींच दोन मात्रांनीं अधिक ( १८+१० )=२८ मात्रांचा असतो. केव्हां केव्हां मंजरीचा (१६+५ )=२१ मात्रांचा अंतरा असतो.

[ १ ] प्रियकर हिंदिस्तान्—अमुचा प्रियकर हिंदिस्तान्
हा अलंकार हो भूगोलाचा, यास नसे उपमान् ॥ ध्रु० ॥
हे जन्मभूमि हें, तन-मन-धन घे तुला
तव उपकारांना, न मिळे कोठें तुला
हें फिटणें साध्य न, आम्हां अति-दुर्बलां
सुखकर तव गे ध्यान्—निरंतर सुखकर तव गे ध्यान्
जो जननीचा जो जनकाचा गे, तोच तुझाही मान् १. ( टिळक )

[ २ ] ' तरुण कुलिन गोरा, हंसतमुख० ' ( देवल )

### ७. केशवकरणी ( मात्रा २७ व १६ )

यांत माधवकरणीपेक्षां उपान्त्य अक्षर एका मात्रेनें अधिक (८+८+८+३ ) असा प्रथम चरण व दुसराही चरण माधवकरणीपेक्षां उपान्त्य अक्षर एकाच मात्रेनें अधिक ( ५+८+३) असा असतो. केव्हां केव्हां मंजरी ( लीलारति ) चा अंतरा असतो. रामजोशांच्या खालील पद्यावरून हें नांव पडलें आहे.

(१) केशवकरणी, अद्भुतलीला, नारायण तो, कसा —
तयाचा, सकल जनांवर, ठसा ॥ ध्रु० ॥
माधवमहिमा, अगाध गोडी, गोविंदाच्या रसा —
पीत जा, जिव होइल थं,डसा १.
विष्णू म्हणतां, विकल्प जाती, मधुसुदनानें, कसा —
काढिला, मंथनसमर्थी जसा २.

(२) 'खबरदार जर, टांच मारुनी, जाल पुढें चिं,धड्या०' (वा०भा०पाठक)

(३) 'तुझी पांखरा, गोजिरवाणी, मनोहरा आ,कृती०' (विनायक)

### ८. मुद्रिका (मात्रा २१ आणि १४ व १३)

यांत मंजरी (लीलारति) चा २१ मात्रांचा प्रथम चरण आणि नंतर उद्धवाच्या १४ मात्राना जोडूनच पुढें १३ मात्रांचा एक भाग असतो. 'मुद्रिके, राम टाकुन आलिस तूं कशी?' ह्या गाण्यावरून हें नांव पडलें आहे.

(१) भंगिलं शिवधनुष्य रामें वरिलें मला
वनिं आलों उभयतां बाई—कांचनीं मृग देखिला (स्त्री-गति)

(२) 'मी उठुन सकाळीं कामाला लागतें०' (मायदेव)

### ९. श्रीरंग (मात्रा ३० व २२)

यांत प्रथम चरणांत आरंभींच साकीपेक्षां दोन मात्रा अधिक असतात; आणि दुसरा चरण भूपतिवैभवाप्रमाणे असतो. अंतरा असल्यास भूपतिवैभवाचाच असतो. राम-जोशांच्या 'श्रीरंग गोपिकोत्संग०' या पद्यावरून हें नांव पडलें आहे.

यमपाश, गळ्याशीं ज्यास, लागला त्यास, मला कां देतां ?
कां मांस विकुन ध,र्मास वांकडे होतां ? ॥ ध्रु० ॥
पाळिलें घातलें खाया —अजवरी
बकरीस मोल बहु याया —ज्यापरी
ही तुमचि मुलीवर माया— का खरी ?
जगतांत, सदय सकलांत, माउली-तात, मुलीला असतां
मग तुम्हीच इतके, कठोर कां गे होतां ? (देवल)

## विषम जाति

### १. गोविंद * [विवशा] (मात्रा २५ व २६)

यांत ध्रुवपद (१० + १५) मात्रांचें असून, कडवें चंद्रकांत जातीचें (८ + ८ + ८ + २) = २६ मात्रांचें असतें.

१३ म० सा० व व्या०

( १ ) क्षुधित वनीं गोविंद् — बाइगे, क्षुधित वनीं गोविंद् ॥ ध्रु० ॥
रवितनयातटिं शिशुंसह हा व्रज चारित गोधन-वृंद् ॥ ( एकनाथ
( २ ) 'आली दिपवाळी — गड्यांनो, आली दिपवाळी०' ( माधवानुज )
( ३ ) 'कृष्ण गडी अपुला — राजा मथुरेचा झाला०' ( जुनें पद )

## २. महती ( मात्रा २० व २८ )

यांत ( ८+८+४ ) भूपतिवैभवाच्या प्रारंभींच्या २ मात्रा कमी अशा मात्रांचे कांहीं चरण व शेवटीं ( ८ + ४ व ४+१२ ) मात्रांचा मेळाचा चरण असतो.

महत्त्व भारी, आहे या पृ,थ्वीचें
त्याहुन अतिशय, या सगळ्या वि,श्वाचें
परि तुजमध्यें, महतीचें जें, बीज
त्याहुन कांहीं, मोठी नाहीं, चीज
ठसव मनीं हें, साचें; बापा, हें वच बहु मो,लाचें (केशवसुत)

## ३. श्यामाराणी ( मात्रा १६ व ३० )

यांत पादाकुलकाच्या कांहीं पंक्ति असून, शेवटची ओळ स्वर्गंगेची ( ८ + ८ + ८ + ६ ) = ३० मात्रांची असते; केव्हां केव्हां ध्रुवपद बालानंदाचें १४ मात्रांचें असतें. केशवसुतांच्या 'श्यामाराणी गभीर रजनी०' ह्या पद्यावरून हें नांव पडलें आहे.

( १ ) गरिब बिचारा माधुकरी। दुःख तयाला जन्मवरी ॥ ध्रु० ॥
कडक उन्हानें, जिव घाबरे
कपोल सुकले, घर्में भिजले
पायीं चटके, तापे डोकें। धापा टाकित, पळे जरी (रानडे)
( २ ) 'नवलाख दिवे हे तुझ्या घरीं०' ( तांबे )

## ४. मनी * [ सृष्टिलता ] ( १६ व २७ )

यांत ध्रुवपद व मेळ यांच्या सूर्यकांत-जातीप्रमाणें ( ८ + ८ + ८ + ३ ) = २७ मात्रा असतात; व पादाकुलकाच्या कांहीं पंक्ति असतात.

( १ ) गुणी आणि अवगुणी — अशी ही द्वाड आमुची मनी ॥ ध्रु० ॥
जशी काय ही बाई कोणी
आली बर्फाच्या देशांतुनि
अंगाला कापूस डकवुनी
मऊ रेशमाहुनी — अशी ही द्वाड आमुची मनी ( अ० वा० )

( २ ) ' सोडुनियां जेजुरी, आला रे वाघ्या ओटीवरी०' ( भ० पंडित )
( ३ ) ' निजल्या तान्ह्यावरी, माउली दृष्टि सारखी धरी०' ( तांबे )

### ५. नववधू ( मात्रा १६ व १६ )

हें वृत्त हल्लीं ज्यास्त प्रचारांत येऊं लागलें आहे. त्यांत ध्रुवपद व मेळ यांत पादाकुलकाच्या ( २ + ८ + ६ ) अशा मात्रा असतात; व अंतऱ्यांत (८ + ८) अशा पादाकुलकाच्याच मात्रा असतात; केव्हां केव्हां शेवटची ओळ बालानंदाची १४ मात्रांची असते. तांब्यांच्या खालील पद्यावरून हें नांव पडलें आहे.

( १ ) **नव,वधू प्रिया मी, बावरतें**
**ला,जतें पुढें सर,तें फिरतें ॥ ध्रु० ॥**
**कळे मला तूं, प्राणसखा जरि**
**कळे तूंच आ,धार सुखा जरि**
**तुज वांचुनि सं,सार फुका जरि**
**—मन, जवळ यावया, गांगरतें.** १.

( २ ) 'किति मौज दिसे ही पहा तरी, हें विमान फिरतें अधांतरीं०' (गोपी०)

### ६. फुलवेल * [ वधूवल्ली ] ( मात्रा १६ व २४ )

यांत ध्रुवपद व मेळ हीं ( ९ + १४ ) मात्रांच्या गटांचीं असतात; आणि अंतरा पादाकुलकाच्या पंक्तींचा असतो.

( १ ) **तुझि ग फुलवेलें -- त्या आंब्यावरतिं फुलेलें ॥ ध्रु० ॥**
**भोंवतालची, खणुनी माती**
**निर्मल पाणी, शिंपुन हातीं**
**वेल चढविशी, ही तरुवरतीं**
**रमुनि किति वेळें — त्या आंब्यावरतिं फुलेलें** ( उषा )

( २ ) ' सरकसवाला मी मौज दावितों सकलां०' ( ना० गं० लिमये )
( ३ ) ' आईऽ आई, बोलतो कसा हा ताई०' ( भ० पंडित )

### ७. अभिसारिका * [ पञ्चकल्याणी ] ( मात्रा १६ व २२ )

यांत साकींतील प्रथमार्धाच्या ( ४+८+४ ) मात्रांचे दोन चरण व त्यानंतर भूपतिवैभवाच्या ( २+८+८+४ ) मात्रांचे दोन चरण असतात.

सुटला पितृदिशेचा वारा
झांकी मेघ नभःपथ सारा
घन गर्जति तोफेपरी वर्षती गारा
कडकडाट करिती विजा येति जल–धारा १. ( किर्लोस्कर )

**८. मनमोहन** ( मात्रा १४ व २८ )

यांत ध्रुवपद व मेळ ही चंद्रकान्त जातीच्या आरंभींच ( २ + २६ ) दोन मात्रा वाढवून बनलेलीं असतात; आणि ७।७ मात्रांच्या गटांचा एकेक असे कांहीं चरण असतात. गिरीशाच्या खालील पद्यावरून हे नांव पडलें आहे.

( १ ) मनमोहन वाजवुनी सारंगी, काढी मंजुळ सूर् ॥ ध्रु० ॥
विश्व निजलें । शांत झालें
एक धरणी । मात्र डोले
गंभीरपणानें अंधारांतुन, छेडित जाई सूर् १.

( २ ) ' हे चिमण्या चंद्रा पाहुनि तुजला, खचतो माझा धीर्०' ( मायदेव )

**९. वैशाख** *[ कामना ] ( मात्रा २२ व २० )

अगदीं आरंभींच दोन मात्रा येतील अशी अक्षरें घालून, पुढें धवल-चंद्रिकेच्या ओळी जोडल्या कीं हें वृत्त होतें. खालील पद्याची रचना शिथिल आहे.

वैशाखमासिं, वासंतिक, समय शोभ,ला
× आम्रासव, पिउनि गान, करिति कोकि,ला
या, जाइजुई, मोगरिला, बहर जो आ,ला
गुं,जारव कर,ण्यांत गुंग, मधुप जाइ,ला २.

**१०. अरुण** ( मात्रा १२ व २३ )

यांत ध्रुवपदाच्या प्रथमार्धात ६।६ मात्रांचे तीन गट व उत्तरार्धांत (६+५) मात्रांचा एक गट येतो. (६+६) अशा १२ मात्रांच्या कांहीं ओळी अंतऱ्यांत येतात. शेवटीं मेळ ध्रुवपदाच्या उत्तरार्धाशीं जुळणारा असतो. किर्लोस्करांच्या सौभद्रांतील खालील पद्यावरून हें नांव पडलें आहे.

( १ ) प्रिये पहा, रात्रीचा, समय सरुनि,
येत उषःकाल हा ॥ ध्रु० ॥

थंड गार । वात सुटत
दीप-तेज । मन्द होत
दिग्वदनें । स्वच्छ करित
अरुण पसरि, निज महा १.

( २ ) ‘ विलासिनी रमणीसह सुमनांच्या०’ ( विनायक )

## ११. अवनी * [ शुभवदना ] ( १२ व २२ )

‘ अरुण ’ जातींतील ध्रुवपद व मेळ यांचें फक्त उपान्त्य लघु अक्षर काढून टाकिल्यानें ही जाति होते.

( १ ) उघडिं नयन रम्य उषा हंसत हंसत आली
अरुण किरणमय वसना अवनी ही ल्याली ॥ ध्रु० ॥
खग कूजित । अलि रुञ्जित
लतिका तरु- । -गण सिञ्चित
सुदति विफल । सकल गमत
—तुजविण या काळीं १. ( रेदाळकर )

( २ ) ‘ हरिभजनावीण काळ घालवूं नको रे०’ ( सोहिरोबा )

( ३ ) ‘ भज भज भव-जलधिमाजि मनुजा शिवाला०’ ( रामजोशी )

## १२. बुल्बुल ( मात्रा १२ व २० )

अवनींतील ध्रुवपद व मेळ यांतील शेवटचें एक अक्षर कमी केल्यानें मेळांत फक्त ( ६+२ ) एवढ्याच मात्रा ठेविल्यानें ही जाति होते. तांब्यांच्या खालील पद्यावरून हें नांव पडलें आहे.

उगिच काय, बुल्बुला, शिणविसी ग, ळा ॥ ध्रु० ॥
उगिच कण्ठ । फाडिशीऽ
हृदय मात्र । फाडिशीऽ
रमणिवाणि । आणिशीऽ
—स्मराणि मञ्जुळा १.

## १३. झंपा * [ वीरभद्र ] ( मात्रा २० + १७ )

यांत चरणाच्या प्रथमार्धांत ५।५ मात्रांचे चार गट आणि उत्तरार्धांत ५।५ मात्रांचे तीन गट व शेवटीं गुरु अक्षर असतें. अशा प्रकारचीं चरणयुग्मकें असतात.

डुमूडुमत, डमरु ये । खणूखणत, शृंग ये
शंख फुं,कीत ये । येइ रु,द्रा १. ( तांबे )

कवि आपल्या इच्छेप्रमाणें अनेक तऱ्हांचीं चरण-युग्मकें, अंतरे, ध्रुवपदें, वगैरे जुळवून कविता करितात; त्यामुळें जाति-वृत्तांचे प्रकार व उपप्रकार किती तरी होऊं शकतील. येथें फक्त प्रचलित व अत्यन्त प्रसिद्ध काव्यांचेंच स्थूलमानानें वर्गीकरण करून, त्यांचीं जाति-वृत्तें सांगितलीं आहेत. सध्यांचा काल कविता म्हणून दाखविण्याचा असल्यामुळें व सुंदर रीतीनें गाइलेल्या कवितांचा स्वर-माधुर्य व शब्द-मार्दव यांच्या योगानें घरोघरीं फैलाव होत असल्यामुळें, ह्यः जाति-वृत्तांसंबंधीं वरच्याइतपत तरी ढोबळ माहिती असणें जरूर आहे; म्हणून ती येथें दिली आहे. कवि आणखी जे सुंदर प्रकार निर्माण करितील, त्यांची शास्त्रशुद्ध छाननी उत्तरोत्तर होत राहीलच.

## परकीय वाङ्मयांतून आलेलीं वृत्तें

ह्यांशिवाय मराठींत **गज्जल** व **सुनीत** हे दोन प्रकार आणखी जोरानें हल्लीं प्रसृत होऊं लागले आहेत; त्यांची ढोबळ माहिती खालीलप्रमाणें—

### १. गज्जल किंवा रसना

हें मूळचें अरबी वृत्त असून, त्याचा 'घझल' असा उच्चार आहे. यांतील चरणांच्या जोड्या पांचांहून कमी व सातांहून ज्यास्त नसाव्यात. तसेंच सर्व जोड्यांतील समचरण एक-यमकीच असावेत. आरंभींचें चरणयुग्म ध्रुवपदा-दाखल उपयोगी पडतें. आरंभीं हें वृत्त मराठींत मोरोपंतानें प्रचारांत आणिलें; त्या पद्यावरून ह्यास '**रसना**' हें नांव पडलें आहे. 'गज्जलांजलींत' गजलांचे पुष्कळच भेदोपभेद दिले आहेत. त्यांपैकीं २ ते ८ चे प्रथमचे चरण खालीं दिले आहेत; मराठींत या वृत्ताची अत्यन्त शिथिल रचना आढळते.

(१) **रसने न राघवाच्या । थोडी यशांत गोडी ॥ ध्रु० ॥**
**निंदा स्तुती जनांच्या । वार्ता वधू-धनाच्या ॥**
**खोटया व्यथा मनाच्या । कांहीं न यांत जोडी ॥ १ ॥**
**साधूचिया सदातें । सुख देतसे सदा ते ॥**
**श्रवणीं सुधा, मदातें । सोडोनि, हात जोडी ॥ २ ॥** (मोरो०)

(२) 'आनंद-कंद ऐसा । हा हिंददेश माझा०' [आनंदकंद] (टेकाडे)
(३) 'आहे हुशार भारी । माझी मनी गुणाची०' [ ,, ] (श्रीकान्त)
(४) 'झालों जरी स्वतंत्र । सोडून ताळतंत्र०' [ ,, ] (बेहेरे)

(५) 'हिंदपुत्रांनो स्वतांला लेखितां कां बापडे-भ्रांत तुम्हां कां पडे ?' (मा० जू०)
(६) 'कोठें तरि जाऊं बसुनी शीघ्र विमानीं-तेथें चल राणी ' (मा० जू०)
(७) 'भवानी आमुची आई । शिवाजी आमुचा राणा ।
मराठी आमुची बोली । गनीमी आमुचा बाणा ॥ ' (मा० जू०)
(८) 'मी श्यामले, बंदी तुझा, वंदी तुला अभ्यन्तरीं
तूं दक्षिणा दे, वा न दे, निःशब्द मी सेवा करीं ' (मा० जू०)

## २. सुनीत

इंग्रजींतील ( Sonnet ) '**सॉनेट**' च्या धर्तीवर मराठींत आलेला हा पद्य-प्रकार आहे. यांत शार्दूलविक्रीडिताप्रमाणें दीर्घ वृत्त असावें. ओळी १४ च पाहिजेत. विचारप्रधान भावगीतें साधारणतः या वृत्तांत रचिलेलीं आढळतात. यांतील यमकादिकांच्या माधुर्यामुळें याचा वीणा-काव्यांत समावेश करितात. याचे प्रकार दोन. **इटालियन** व **इंग्लिश**. इटालियन सुनीतांत ८ व ६ अशा ओळींचे आणि इंग्लिश सुनीतांत १२ व २ अशा ओळींचे भाग असतात. आणि १, ४, ५, ८; २, ३, ६, ७; व बाकीच्या चार ओळींत इच्छेप्रमाणें असें यमक असतें. इंग्रजी सुनीतांत १३, १४; १, ३; २, ४; ५; ७; ६, ८; ९, ११; १०, १२; याप्रमाणें यमकें असतात. इटालियन सुनीतांत पहिल्या ८ ओळींत एक भावना व पुढल्या ६ ओळींत पहिल्या भावनेला कलाटणी देऊन निर्माण केलेली दुसरी भावना असते. इंग्रजी सुनीतांत पहिल्या १२ ओळींत एक भावना व बाकीच्या दोन ओळींत एकादें तत्त्व-प्रतिपादन असतें. कोणत्याही प्रकारच्या सुनीतांत विचारांची उदात्तता व गांभीर्य हीं कायम टिकून राहणें अवश्य असतें. या दोन प्रकारांस अनुक्रमें **पद्म** व **गोपाल** असें म्हणतात.

**" आम्ही कोण म्हणून काय पुससी ? आम्ही असूं लाडके—**
**देवाचे, दिधलें असे जग तयें आम्हांस खेळावया;**
**विश्वीं या प्रतिभा-बलें विचरतों चोहींकडे लीलया,**
**दिक्कालांतुनि आरपार अमुची दृष्टी पहाया शके ! "**
**सारेही बडिवार येथिल पहा आम्हांपुढें ते फिके**
**पाणिस्पर्शच आमुचा शकतसे वस्तूंप्रती द्यावया**
**सौंदर्यातिशया, अशी वसतसे जादू करांमाजि या**
**फोलें पाखडितां तुम्ही, निवडितों तें सत्त्व आम्ही निकें**
**शून्यामाजि वसाहती वसविल्या कोणीं सुरांच्या बरें ?**
**पृथ्वीला सुरलोकसाम्य झटती घालावया कोण ते ?**
**ते आम्हीच सुधा कृतीमधुनियां ज्यांच्या सदा पाझरे**
**ते आम्हीच शरण्य, मंगल तुम्हां ज्यांपासुनी लाभतें**

**आम्हांला वगळा गतप्रभ झणीं होतील तारांगणें !**
**आम्हांला वगळा विकेल कवडीमोलावरी हें जिणें !"** ( केशवसुत )

### ३. दोहा ( मात्रा १३ व ११ )

यांत पाहिला व तिसरा चरण १३।१३ मात्रांचा असून, दुसरा व चौथा चरण ११।११ मात्रांचा असतो. दुसऱ्या व चवथ्या चरणाचें उपान्त्याक्षर ऱ्हस्व हवें, एवढाच नियम . हिंदी साहित्यिक जगन्नाथ प्रसाद भानु ह्यांच्या 'छन्दप्रभाकर' ग्रंथांत दोह्यांचे अनेक प्रकार दिले आहेत, पैकीं एक मुख्य प्रकार व त्याचें खालील बिनचूक उदाहरण प्रो० ग० ब० खापर्डे यांनीं सुचविलेलें येथें घेतलें आहे. मराठींतील खालीं तीन उदाहरणें दिलीं आहेत; पण त्यांची रचना निर्दोष नाहीं.

(१) **कनक कनक तैं सौगुनी । मादकता अधि काय ॥**
**वह खाये बौरात है । यह पाये बौराय ॥ १ ॥**
(२) श्रीरामाच्या । भक्त-जनींऽऽ । हंसच जणुं बग- । ळ्यांत् ॥
त्याच्या तुलसी- । दाऽस तोंऽऽ । नांदो हार ग-ळ्यांत् ॥ ( मा० जू० )
(३) जो गति ग्राह गजेंद्र की । सो गति भै है आज ॥
बाजी जात बुंदेल की । राखो बाजी लाज ॥ ( छत्रसालाचें पत्र )
(४) 'जोर मनगटांतला पुरा, । घाल घाल खर्चा० ' ( केशवसुत )
(५) 'उंच उंच डोंगर भंवतीं, । चढले नील नभांत० ' ( गोपीनाथ )

### ४. रुबाई

हें फारसी वृत्त असून, तें मराठींत रूढ होऊं पहात आहे. त्यांत बरेच वेळां तीन चरण एकयमकी, क्वचित् चारही चरण एकयमकी असतात. तसेंच एकच कल्पना किंवा एकच विचार त्यांत गोविलेला असतो.

*** म्हणति ' हुरींसह उद्यां महोत्सव गोड '**
**मी म्हणतों 'अजि हा द्राक्षासव गोड**
**घे ही रोकड, उधार ती सोडुन दे**
**गमे दुरूनीच कीं दुंदुभि-रव गोड '** ( मा० पटवर्धन )

**अर्थ**—" लोक मला सांगतात कीं, मृत्यूनंतर स्वर्गांत अप्सरांबरोबर ( हुरींसह ) क्रीडा करणें हें अत्यन्त सुखकर आहे; पण मी म्हणतों, मृत्यूनंतर

* हें वृत्त कमिक पुस्तकांत आलें असल्यामुळें येथें घेतलें आहे.

कशाला? आतांच हा द्राक्षासव (दारू) प्राशन करशील तर तें आधिक सुखावह आहे. यासाठीं आतां ही येथें रोख मिळणारी वस्तु (रोकड) घे; व हात आंखडून मृत्यूनंतर स्वर्गांत मिळणाऱ्या सुखाच्या नादीं लागूं नको; कारण ढोलाचा आवाज दुरूनच ऐकल्यास तो गोड वाटतो."

---

## एवढें पुरे

१. खालीं **वृत्त-लक्षणें** दिलीं आहेत, त्यांवरून **अक्षरें, गण, यति,** कळतील-वाटल्यास पाठ करा.

१. **अनुष्टुभ्** नेम ना गणी
२. **मा मा गा गीं विद्युन्माला**
३. **ज रा ल गीं प्रमाणिका**
४. **भा म स गा-नीं चंपकमाला**
५. **स स सा** गण **मेघवितानीं**
६. **रा य जा ग** हे, येति **कामदीं**
७. **न र र ला ग** त्या, **शुद्धकामदीं**
८. **त ता ज गा गा** गणिं **इंद्रवज्रा**
९. **ज ता ज गा गीं**च **उपेंद्रवज्रा**
१०. **मा ता ता गा,** आणि **गा शालिनीतें**
११. **दोधक** तीनि **'भ,' गा** गिंच होतें
१२. **रा न रा ल** गिं च हो **रथोद्धता**
१३. **स्वागता र न भ** आणिक **गा गीं**
१४. **मौक्तिकमाला, भ त न ग गा-नीं**
१५. **भुजंगप्रयातीं, य** चारिहि येति
१६. **द्रुतविलम्बित** वृत्त **न भा भ रीं**
१७. असेंहि **वंशस्थ ज ता ज रा** गणीं
१८. ती **इंद्रवंशा त त जा र** या गणीं
१९. बघ **'चार स'** या गणिं **तोटक तें**
२०. मानावें **म न ज र गीं प्रहर्षिणी तें**
२१. होई **वसंततिलका त भ जा ज गा गीं**
२२. **न न म य य** गणांनी **मालिनी** वृत्त होते.
२३. जेथ येति **रा ज रा ज रा** तदा च **चामर**
२४. यदा **ज रा ज रा ज गा** तदा हि **पंचचामर**
२५. जयामध्ये येती, **य म न स भ ला गा शिखरिणी**
२६. अर्धीं **ज स ज** त्यांपुढें, **स य ल गीं** च **पृथ्वी** वसे
२७. **न स म र स** त्यां, पुढतीं ये,ती **ल गा हरिणी**च ती
२८. **मंदाक्रांता, म भ न त त गा, गीं**च तें वृत्त जाणा
२९. **मा सा जा स त ता ग** येति गण हे, **शार्दूलविक्रीडितीं**
३०. ज्याच्या प्रत्येक पादीं, **म र भ न य य या,** हे गण **स्रग्धरा** ती
३१. सातां **त-का,**रींच **मंदारमा,ला गुरू एक** त्या,च्याहि अंतीं वसे
३२. **सु-मन्दारमाला** नि मन्दारमाला असे एक जैं आदि लघ्वक्षर
३३. 'सात **भ**' शेवटिं, **दोन गुरू**हि, जरी असती **मदि,रा**च म्हणा ती

२. ऱ्हस्व असून **गुरु** व दीर्घ असून **लघु** अक्षर केव्हां होतें ? (पा० १६५)

३. **यति** म्हणजे काय ? **यतिभंग** म्हणजे काय ? (पा० १६६।१६७)

४, **अक्षरवृत्त** व **मात्रावृत्त** यांत फरक काय ? (पा० १६७).

५. निव्वळ 'मराठी वृत्ते' कोणतीं ? **ओवी** व **अभंग** यांतील साम्य व भेद स्पष्ट करा. (पा० १७३ व १७९).

६. **वाङ्मयीन ओव्या** व **स्त्रीगीतात्मक** ओव्या यांत फरक काय ? (१७५)

७. **आर्या** व **गीति** यांत फरक काय ? (पा० १९०).

८. **दिंडी** व **साकी** यांची रचना कशी असते ? (पा० १८८ व १८९).

९. "ओवी-अभङ्गाञ्जली-श्लोक-आर्या-मुखांनीं तुला आळवीलें कुणीं ?" (ज्ञानेश्वर-तुकाराम-वामन-मोरोपंतादि).

**१०. फटका, चंद्रकांत, लावणी, बालानंद, पादाकुलक, अक्रूर, उद्धव,** यांविषयीं माहिती द्या. (१८३, १८४, १८७, १८८, १९१).

**११.** परकीय वाङमयांतून मराठीत आलेली **वृत्तें** कोणती ? **सुनीत** व **गज़ल** यांविषयीं खुलासा करा. (पा० १९०।१९१).

**१२.** खालील पद्यांतले ऱ्हस्व-दीर्घ, यतिभंग, वृत्तभेद, अप्रयुक्त शब्द, विसंधि, उलट शब्दानुक्रम, इ० दोष ओळखा.

१. शत योजनें लांब विस्तीर्ण जाला । दश योजनें भव्य रुंदी जयाला

२. सुकुमार आकर्ण-पद्म-नेत्र । ठाणमाण रेखिलें दिव्य चित्र

३. धराधीश बोलती ज्यास प्रजा

४. काळि पिवळी ले गाय आहे तानेली

५. वरिष्ठेसी जा-हला एक पुत्र
भक्तराज वै-कुंठ पाळ मित्र

६. कोण बोले बै,सला **राज-अंकीं**

७. आयकोनी तो,घला **देव-ऋषी**

८. किती एक ते बैसले **वृक्ष-अग्रीं**

९. विशाळें बहु लागलीं **झाड-खंडें**

१०. जे पाहती **प्रति** मनोहर **रूप** देवा

११. रूपवंती **पैं** त्यासि दोन जाया

१२. प्रजा येउनी राजसभे । **जोहार** करूनि राहिले उभे

१३. घरांत पाहे विलोकून। तों न पडत **पिलीं** दृष्टीसी

१४. घेईन मी तुजनिमित्त सहस्र **जन्में**

१५. असो रुधिर वाहुनी नच भिजो सुशय्या तरी

१६. { हेजीब हे जीभची जाण माझी
येथें नसो, किमपि विप्रतिपत्ति तूझी

# व्युत्पत्ति

## शब्द-घटना

मराठीमध्यें विशेषेंकरून **संस्कृत, देशी, अरबी, फारसी,** ह्या भाषांचे शब्द आढळतात; आणि **हिंदी, गुजराती, तेलगू, कानडी** व **इंग्रजी** ह्या भाषांचे शब्दही बरेच आलेले आहेत. मराठी भाषा संस्कृतोत्पन्न असल्यामुळें व संस्कृतांत नवीन शब्द बनविण्याला उपसर्ग, प्रत्यय, धातु व समास यांमुळें फारच मदत होत असल्यामुळें, त्यांयोगें संस्कृत शब्द बनतात. अशा प्रकारें बनलेले पुष्कळच संस्कृत शब्द मराठींत जसेच्या तसे कांहीं फरक न होतां टिकून राहिल आहेत; आणि तसे शब्द ठेवण्याची मराठीची प्रवृत्तीही अजून जोरांत आहे. अशा संस्कृतांतून मराठींत येऊन जसेच्या तसे भाषेंत टिकून राहिलेल्या संस्कृत शब्दांना "**तत्सम**" शब्द असें म्हणतात. उदा०—देव, माता, पिता, कवि, गुरु, शत्रु, मित्र, इ०.

जे शब्द संस्कृत शब्दांच्या मूळ रूपांत फरक होऊन मराठींत आलेले आहेत, त्यांस "**तद्भव**" शब्द असें म्हणतात. उदा०—घर (गृह), हात (हस्तः), पाय (पाद), कान (कर्ण), पान (पर्ण), कांटा (कंटक), इ०.

मराठींत असे कांहीं शब्द आहेत कीं, ते तत्सम, तद्भव, यवनी, वगैरे नसून कोठून उत्पन्न झाले असावे, हें कांहींच सांगतां येत नाहीं; ते मूळचेच येथल्या पूर्वींच्या महाराष्ट्रांत वसती करून राहिलेल्या लोकांचे असावे आणि ते आपल्या मराठींत दृढमूल झाले असावे, असें दिसतें; अशा शब्दांना "**देशी**" शब्द असें म्हणतात. उदा०—झाड, धाकटा, लेकरूं, इ०.

[ **टीप**—मराठी, गुजराती, हिंदी, बंगाली, इ० देशांत सध्यां चालू असलेल्या भाषांनाही **देशी भाषा** किंवा **देशभाषा** असें म्हणतात; पण त्या अर्थानें येथें देशी हा शब्द वापरला नसून, महाराष्ट्रांत मूळ राहणाऱ्या लोकांचे जे शब्द मराठींत जसेच्या तसे शिल्लक उरले आहेत, ते 'देशी' शब्द, ह्या अर्थानेंच **हेमचंद्र** वगैरे पूर्व-व्याकरणकार तो शब्द वापरितात, तसा येथें वापरिला आहे।].

जे शब्द मराठींत येतात--ते तत्सम असोत, तद्भव असोत, देशी असोत, यवनी असोत, किंवा दुसऱ्या कांहीं सहचर भाषांतील असोत,--त्या शब्दांची साधनिका काय, त्यांचें पूर्वस्वरूप व सध्यांचें स्वरूप ह्यांत फरक कोणत्या प्रकारें व कोणत्या कारणानें झाला, त्यांचें कांहीं अर्थान्तर झालें कीं काय, तें कां झालें, इ० गोष्टींविषयीं आपल्या भाषेसंबंधों स्थूल अभ्यास करणारांसही थोडी-फार माहिती असणें अवश्य आहे. तिच्या योगानें चिकित्सक-बुद्धि वाढते; पूर्वीचे समाज, त्यांच्या चालीरीति, इत्यादिकांवर प्रकाश पडतो; मानवी संस्कृतीचें पाऊल कसकसें पुढें पडत गेलें, त्याची कल्पना येते; आणि एकंदरींत ह्या गोष्टी पाहत असतां, कांहीं चमत्कारिक माहिती मिळून मनाला आनंदही होतो.

येथें प्रथम संस्कृत साधित शब्द, नंतर मराठी साधित शब्द आणि शेवटीं यवनी म्हणजे अरबी व फारसी भाषांतील व हिंदी, गुजराथी, कानडी इतर मराठीच्या सहचर भाषांतील मराठींत आलेले शब्द, यांचा क्रमानें विचार करूं.

मराठींत येणारे बरेचसे संस्कृत शब्द जसेच्या तसे येतात; ते शब्द मूळ संस्कृत धातूंना केव्हां मागें **उपसर्ग** व केव्हां पुढें **प्रत्यय** लागून बनतात; व केव्हां दोन्ही लागून बनतात.

जीं अव्ययरूप अक्षरें धातूच्या मागें लागून, बरेच वेळां त्या धातूचा मूळचा अर्थ फिरवितात, त्यांस "**उपसर्ग**" असें म्हणतात. उदा०--'**हृ**' धातूचा मूळ अर्थ हरण करणें; परंतु आ-हार=खाणें, वि-हार=खेळणें, सं-हार ठार मारणें, प्र-हार=तडाखा देणे. याप्रमाणें मागें लागलेल्या अक्षरांमुळें त्या धातूच्या अर्थांत बदल झाला आहे. असेंच इतर धातूंविषयीं समजावें. उपसर्ग हे स्वतंत्रपणें केव्हांच येऊं शकत नाहींत. कोणत्या उपसर्गामुळें कोणते अर्थ उत्पन्न होतात, ह्याच्या समजुतीसाठीं ते उपसर्ग व त्यांनीं युक्त असे शब्द देतों.

## संस्कृत उपसर्ग

**अति**--( आधिक्य ) अतिशय, अतिरेक. ( पलीकडे ) अतिक्रम, अत्यन्त.

**अधि**--( मुख्य ) अधिपति, अध्यक्ष. ( वर ) अध्ययन, अध्यापन.

**अनु**--( मागून ) अनुक्रम, अनुताप, अनुज. ( प्रमाण ) अनुकरण, अनुमोदन

**अप**--( खालीं येणें ) अपकर्ष, अपमान. ( विरुद्ध होणें) अपकार, अपजय.

**अपि**—( आवरण ) अपिधान= आच्छादन.

**अभि**—( अधिक ) अभिनंदन, अभिलाष. ( जवळ ) अभिमुख, अभिनय. ( पुढें ) अभ्युत्थान, अभ्युदय.

**अव**—( खालीं ) अवगणना, अवतरण. ( अभाव ) अवकृपा, अवगुण.

**आ**—( पासून, पर्यंत ) आकंठ, आजन्म. ( किंचित् ) आरक्त. ( उलट ) आगमन, आदान. ( पलीकडे ) आक्रमण, आकलन.

**उत**--(वर) उत्कर्ष, उत्तीर्ण, उद्भिज्ज.

**उप**—( जवळ ) उपाध्यक्ष, उपदिशा. ( गौणत्व ) उपग्रह, उपवेद, उपनेत्र.

**दुर्, दुस्**—(वाईट) दुराशा, दुरुक्ति, दुश्चिन्ह, दुष्कर.

**नि**—( अत्यन्त ) निमग्न, निबन्ध. म०-( हीनत्व ) निकामी, निजोर.

**निर्, निस्**—(अभाव ) निरंजन, निराश, निष्फळ, निःशेष, निश्चल.

**परा**—( उलट ) पराजय, पराभव,

**परि**—( पूर्ण ) परिपाक, परिपूर्ण. (व्याप्त) परिमित, परिश्रम, परिवार.

**प्र**—( आधिक्य ) प्रकोप, प्रबल, प्रपिता.

**प्रति**—( उलट ) प्रतिकूल, प्रतिच्छाया. ( एकेक ) प्रतिदिन, प्रतिवर्ष, प्रत्येक.

**वि**--( विशेष ) विख्यात, विनंति, विवाद. (अभाव) विकल, विधवा, विसंगति,

**सम्**--( चांगलें ) संस्कृत, संस्कार, संगीत. ( बरोबर ) संगम, संयोग, संकीर्ण.

**सु**—( चांगलें ) सुभाषित, सुकृत, सुग्रास. ( सोपें ) सुगम, सुकर, स्वल्प. ( अधिक ) सुशोभित, सुशिक्षित.

**टीप**--एकाच शब्दांत केव्हां दोन-दोन, तीन- तीन, उपसर्गही आढळतात. उदा०---(प्रति+अप+वाद)=प्रत्यपवाद, (सम्+आ+लोचन)= समालोचन, ( वि+आ+करण )=व्याकरण; अत्युत्कृष्ट, निर्विकार, सुसंगति, इ०.

## मराठी उपसर्ग

संस्कृतांत उपसर्ग धातूंच्या व शब्दांच्या मागें लागतात. त्याचप्रमाणें मराठींत अशा प्रकारें उपयोगांत आलेले कांहीं विशेषणरूप व अव्ययरूप शब्द धातूंशिवाय इतर शब्दांच्याही मागें येतात. दुसऱ्या शब्दांच्या मागें लागल्याशिवाय स्वतंत्रपणें न येणें ह्या दृष्टीनेंही खालीलपैकीं कांहीं शब्द मूळ संस्कृतापासून आले असले, तरी त्यांस **मराठी उपसर्ग** असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**अ**—असोला, अबोला, अनोळखी, अमोल, असडीक.

**अड**—अडसर, अडमुठ्या, अडसंधि.

**आड**—आडवाट, आडनांव, आडकाठी.

**अद**–अद्पाव, अदशेर, अदमुरें, अदमण.
**अव**—अवजड, अवघड, अवलक्षण.
**दु**—दुकाळ दुवेत.
**नि**—निकामी, निजोरी, निढळ, निकोप, निधड्या, निलाजरा.
**निर्, निस्**—निर्फळ निर्गोठ, निर्धोक, निर्धास्त, निष्काळजी.
**पड**—पडजीभ, पडसाद, पडछाया, पडचाकर, पडताळा.

## यवनी उपसर्ग

**ऐन**–ऐनखर्च, ऐनजिन्नस, ऐनहंगाम.
**गैर**–गैरहजर, गैरसमज, गैरवाजवी.
**ना**—नाउमेद, नापसंत, नादार, नाहक, नालायक, नामंजूर.
**ब**—बजिन्नस, बस्तुर, बइस्म [ बेशर्मी ]
**बिन**—बिनदिक्कत, बिनतकरार, बिनधोक, बिनहरकत.
**बिला, बेला**—बिलाकसूर, बेलाशक.
**कम**–कमजोर, कमकुवत, कमबख्त.
**दर**–दररोज, दरमहा, दरकूच, दरसाल, दरमजल.
**बद**–बदलौकिक (म०-बद्दू) बदफैली.
**बर**—बरहुक्म, बरहक्क, बरतर्फ, बरदास्त.
**बे**–बेअब्रू, बेअदबी, बेइमान, बेदम.
**हर**–हररोज, हरवख्त, हरघडी.

[ **टीप**–इंग्रजींतूनही सब-जज, सब-इनस्पेक्टर, सब-पोस्ट, अशा प्रकारें 'सब' हे शब्द उपसर्गाप्रमाणें इंग्रजी शब्दांच्या मागें येऊन मराठींत शब्द आले आहेत ].

## संस्कृत प्रत्ययघटित शब्द

### धातुसाधित नामें

विविधार्थक

पुल्लिंगी

**अ**—त्याग (त्यज्+अ), भाग (भज्+अ), पाक (पच्+अ), काम, भाव (भू+अ), सार, स्तव, वर, भव, मद, लक्ष, इ०. आहार (आ+हृ+अ), संचय, (सम्+चि+अ), विश्राम (वि+श्रम+अ).

स्त्रीलिंगी

**आ**—इच्छा (इष्+आ), कथा (कथ्+आ), जरा (जॄ+आ). चिंता, शिक्षा, पूजा, गुहा, पीडा.

**अना**—प्रार्थना (प्र+अर्थ्+अना), वेदना, कल्पना, वंदना, तुलना.

**ति**—कृति (कृ+ति), स्मृति, नीति, शक्ति, भीति, युक्ति (युज्+ति), दृष्टि, इ०.

[ कांहीं 'म्'कारान्त व 'न'कारान्त धातूंस हा प्रत्यय लागतांना अन्त्य म् व न् यांचा लोप होतो. उदा०—मति (मन्+ति), रति (रम्+ति), गति (गम्+ति), बुद्धि (बुध्+ति), शुद्धि (शुध्+ति), यांत ध् बद्दल द् होतो व ति-बद्दल धि असें होतें ].

**या**—विद्या, चर्या, क्रिया, शय्या, (शी+या), इ०.

### नपुंसकलिंगी

**अन**—स्थान, दान, मान, पान, उत्थान ( उत् + स्था + अन ), संपादन.

**अस्**—सरस् ( सृ+अस् ), वचस्, तमस्, वयस्, ( वय्-जाणें ).

**उस्**—चक्षुस्, (चक्ष्+उस्), यजुस्, आयुस् ( आ+इ+उस् ), धनुस्.

[ यांतील विसर्गाचा लोप होऊन मराठींत वच, तम. वय, चक्षु, तेज, ऊर, यश, अशीं रूपें होतात ].

**मन्**—नामन्, धामन्, चर्मन्, ब्रह्मन्, इ०. [ मराठींत याचीं नाम, धाम, चर्म, ब्रह्म, अशा रूपें होतात ].

### कर्त्रर्थक

**अ**—चोर ( चुर् + अ, चोरणारा ), सर्प ( सृप् + अ, सरपटणारा ), देव ( दिव् + अ, प्रकाशणारा ).

[ ग्रंथकार, चर्मकार, सुवर्णकार, हींही अशा प्रकारचींच कर्तृवाचक नामें आहेत. तसेंच प्रियंवदा ( प्रिय + वद् + आ ), वसुंधरा, हेही आकारान्त स्त्रीलिंगी कर्तृवाचक शब्द अशाच प्रकारें साधले आहेत. यांतील शेवटचे शब्द कार, वद व धर हे कर्तृवाचक धातुसाधितें असून ते मागील शब्दांना जोडले आहेत ].

**अक**—पावक ( पू + अक, पवित्र करणारा अग्नि ), लेखक, नर्तक, रजक, जनक, इ०.

**अन**—नंदन ( नंद + अन, आनंद देणारा, पुत्र ), मदन, रमण, रावण.

**इ**—हरि ( हृ+इ, हरण करणारा ).

**तृ**—भर्ता ( भृ+तृ ), वक्ता, स्रष्टा ( सृज् + ता ), योद्धा, [ यांतील 'तृ' चें प्रथमेचें एकवचनी **ता** असें रूप होतें ].

[ जन्, गम्, इ० कांहीं धातूंमधील अन्त्य व्यंजनाचा लोप होऊनही, कांहीं कर्तृवाचक नामें साधतात. उदा०—द्विज ( द्वि + जन्, दोनदां जन्मणारा, ब्राह्मण, पक्षी ), पंकज, अनुज, नग, उरग, विहंगम, दुर्ग, इ० ].

### साधनार्थक

**अन**—नयन ( नी + अन, नेण्याचें साधन, डोळे ), चरण, वदन.

**त्र**—नेत्र ( नी + त्र, नेण्याचें साधन, डोळा ), पात्र, श्रोत्र, शस्त्र ( शस्-मारणें ).

## संस्कृत धातुसाधित विशेषणें

### कर्तृवाचक

**अ**—भयंकर, ( भय + कृ + अ, भय करणारें), यशस्कर, प्रियकर, पापघ्न.

**अक**—पाचक, दायक, तारक, मारक, हारक, घातक, नायक ( नी + अक ), निंदक, इ०.

**इक**—रासिक, (रस घेणारा), पथिक, ( पथ चालणारा ), इ०.

**तृ**—दाता, भोक्ता, श्रोता, भेत्ता, ( भिद् + तृ ), द्वेष्टा ( द्विष् + तृ ), नियंता.

**इतृ**—शासिता ( शास्–शिकविणें ), भविता ( भू–होणें ), क्रमिता, सहिता, इ०.

**इन्**—त्यागी ( त्यज्+इन् ), दोषी, द्वेषी, विभागी ( विभज्+इन् ), योगी, ( युज्+इन् ), इ०.

**इष्णु**—सहिष्णु ( सह्+इष्णु, सहन करणारा ), जिष्णु ( जिंकणारा ), वर्धिष्णु ( वाढणारा ), इ०.

**नु**—विष्णु (विश्–शिरणें, शिरणारा), स्थाणु ( राहणारा ), इ०.

भूतकालवाचक

**त**—भूत ( झालेलें ), कृत, मृत, नीत, च्युत ( पडलेलें ), ख्यात, त्यक्त ( टाकलेलें ).

[ कांहीं 'म्'कारान्त व 'न्'कारान्त धातूंमधील अन्त्य व्यंजनांचा लोप होतो. उदा०—मत (मन् + त ), जात ( जन्+त ) हत, नत, गत, रत, इ० ].

[ 'ह' पुढें त आल्यास केव्हां केव्हां त्या दोहोंमिळून **ढ** होतो. उदा०—मूढ ( मुह्+त ), गूढ ( गुह् + त), विचाराहे, रूढ, इ०. ]

[ कांहीं ठिकाणीं 'त' बद्दल **न** किंवा **ण**, येतात. उदा०—कीर्ण ( कॄ + ण ), जीर्ण ( जॄ + ण ), विदीर्ण ( दॄ + ण ); हीन ( हा+न ), लीन, क, व, ल, ही अक्षरेंही 'त'—बद्दल अनुक्रमें शुष्क, पक्व, फुल्ल, ह्या शब्दांतच येतात ].

**इत**—मोदित ( मुद् + इत ), उदित ( वद्–बोलणें ), कथित, विदित, पूरित, इ०.

योग्यार्थक

**य**-कार्य (करण्यास योग्य), त्याज्य, पेय, देय, भोज्य, भोग्य, इ०.

**तव्य**-कर्तव्य, भेत्तव्य, नेतव्य, श्रोतव्य, दातव्य, गंतव्य.

**इतव्य**-भवितव्य ( भू + इतव्य ), कथितव्य.

**अनीय**-वंदनीय, करणीय, श्रवणीय, चिंतनीय, मननीय, पूजनीय, रमणीय, इ०.

## आणखी कांहीं संस्कृत धातुसाधितें

**उ**-वायु, स्वादु ( स्वद् ), साधु, वाहु, ( वह्–नेणें ), मरु ( मृ–मरणें ), तरु ( तॄ–तरणें ), इ०.

**उर**-चतुर, अंकुर, भंगुर.

**इर**-मंदिर, रुधिर, रुचिर.

**इल**-सलिल, अनिल, कुटिल, महिला ( मह्–वाढणें ).

**म**-क्षेम, पद्म, धर्म, होम, युग्म.

**र**-वक्र, शक्र, शूद्र, चंद्र, छिद्र, शुभ्र, आर्द्र, रुद्र, शूद्र, मुद्रा.

## संस्कृत-शब्दसाधितें

अपत्यार्थक

**अ**-पार्थ, सौभद्र, पांडव, यादव, भार्गव, वासिष्ठ, सौमित्र.

**इ**-दाशरथि, मारुति, वैराटि, कार्ष्णि.

**एय**-गांगेय, कार्ष्णेय, राधेय, वैनतेय.

**य**-पाराशर्य, गार्ग्य, दैत्य, याज्ञवल्क्य.

### संबंधार्थक

**अ**-सारस ( सरस् म्ह० तळें यासंबंधीं ), चांद्र, सौर, नाक्षत्र, शारीर, शैव, वैष्णव.

**इक**-कायिक, वाचिक, मानसिक.

**इय**-यज्ञिय, राष्ट्रिय, श्रोत्रिय, ( श्रुतीसंबंधीं ).

**ईय**-त्वदीय, मदीय, अस्मदीय, युष्मदीय, तदीय, यदीय.

**कीय**-स्वकीय, परकीय, राजकीय.

**य**- तालव्य, दन्त्य, वायव्य, सौम्य.

### भावार्थक

**अ**-गौरव ( गुरु + अ, गुरुपणा ), लाघव, यौवन, मौन (मुनिपणा).

**इमन्**-गरिमा (गुरु+इमन्), लघिमा, कालिमा, महिमा, रक्तिमा.

**ता**-मृदुता, कठोरता, शालीनता.

**त्व**-शत्रुत्व, मित्रत्व, आप्तत्व.

**य**-सौंदर्य, माधुर्य, चातुर्य, कार्य.

### युक्तार्थक

**मत्**-श्रीमान् ( श्री ज्यापाशीं आहे तो ), बुद्धिमान्, धीमान्; स्त्री०-श्रीमती, बुद्धिमती.

**वत्**-गुणवान्, धनवान्, विद्यावान्, ज्ञानवान्; स्त्री०-गुणवती, रूपवती.

**इन्**-दन्तिन् ( दांत आहेत ज्याला तो, हत्ती ), हस्तिन्, करिन्, धनिन्, अर्थिन्; स्त्री०-कमलिनी, कुमुदिनी.

**विन्**-तेजस्विन् मनस्विन्, मायाविन्, यशस्विन्; स्त्री०-पयस्विनी.

### आधिक्यार्थक

**तर**-लघुतर, गुरुतर, महत्तर, श्रेष्ठतर.

**तम**-लघुतम ( सर्वांत लहान ), उत्तम ( सर्वांत चांगला ), महत्तम ( सर्वांत मोठा ).

### पूर्णत्वार्थक

**मय**-आनंदमय, जलमय, सुवर्णमय, काष्ठमय, मृण्मय, मांसमय.

### स्वार्थक

**क**-बालक, (बाल), दीपक ( दीप ).

## आणखी कांहीं संस्कृत शब्दसाधितें

### उपसर्गसदृशांनीं होणारीं

**अ**-( अभाव ) अन्याय, अधर्म, अनीति, असंख्यात, अगणित, अवर्णनीय.

**कु-का**-कुकर्म, कुवासना, कापुरुष.

**न**-नक्षत्र, नास्तिक, नपुंसक, नग.

**स**-(सहित) सजीव, सकाम, सशास्त्र.

**सह**-(बरोबर) सहवास, सहगमन, सहचर, सहानुभूति.

### प्रत्ययसदृशांनीं होणारीं

**अन्तर**-देशान्तर, ग्रामान्तर, रूपान्तर, भाषान्तर, अर्थान्तर.

**अर्ह**-(योग्य) पूजार्ह, मानार्ह, दानार्ह, दण्डार्ह, विचारार्ह, स्वीकारार्ह.

**आढ्य**-बलाढ्य, गुणाढ्य, धनाढ्य, गर्वाढ्य, विद्याढ्य.

**कर**-प्रभाकर, दिवाकर, दिनकर, सुखकर, दुःखकर, श्रेयस्कर.

**पर**-तत्पर, भक्तिपर, धर्मपर, नीतिपर.

# मराठी साधित शब्द
## धातुसाधित नामें

### क्रियावाचक

**अ**-कर, डर, लूट, फूट, मेळ, फेर, झोक, खोट

**आ**-वेढा, झगडा, ठेवा, ठेचा, भरडा

**आट**-चकचकाट, लखलखाट

**आंडी**-झुकांडी, चिळकांडी

**आळी**-डरकाळी, चिरकाळी

**आव**-चढाव, रिघाव, फैलाव, टिकाव

**ई**-उडी, बुडी, बोली, चोरी, उलटी

**ऊ**-हसूं, रडूं, गळूं

**एं**-हसें, रडें

**डा**-हंबरडा

**ण**-दळण, कांडण, वळण, लोळण

**णी**-लावणी, कापणी, मळणी, पेरणी

**णें**-बोलणें, करणें, जाणे, येणें

**त**-उगवत, मावळत

**ती**-गणती, फिरती, गळती, भरती

**तें**-दुभतें, भरतें

**प**-वाढप, कांडप, वाटप

**रा**-विकरा, विकरी ( स्त्री० )

**व**-देव, घेव

**वा**-थकवा, बोलवा, रुसवा.

### कर्तृवाचक

**आ**-ओढा ( ओढणारा ), झरा, झोला, झोका

**आरी**-पुजारी, पिंजारी

**ऊ**-भिडू ( भिडणारा ), झाडू, उतारू.

**कर**-विणकर ( विणणारा )

**णा**-पाळणा ( पाळणारा ), अडणा, ( अडणारा, अडविणारा )

**पी**-कांडपी, वाढपी

**वय्या**-गवय्या ( गा+वय्या ), बजवय्या ( बाज+वय्या ), लढवय्या ( लढ+वय्या ).

### भाववाचक

**आई**-खोदाई, उजळाई, चराई, घडाई

**की**-फुशारकी, उनाडकी.

### साधनार्थक

**ई**-हातरी, थापी, खुरपी, कढई

**एं**-खुरपें, वल्हें, ढापें ( झांकण्याचें साधन )

**ण**-चाळण, झाकण

**णी**-झांकणी, चाळणी

**णें**-लाटणें, कातणें, गाळणें

### स्थानार्थक

**ओसा**-आडोसा, पडोसा

**ण**-दडण, लवण, वाकण, वळण, चढण

**णी**-न्हाणी ( नाह+णी )

### पूर्णक्रियादर्शक

**आ**-पसारा ( पसरलेला ), चोंदा, तोटा, उमाळा

**आणूं**-उठाणूं ( उठलेलें ), जिवाणूं ( जीव असलेलें )

**टा**-कपटा ( कापलेला ), चिरटा ( चिरलेला )

**का**-फाळका ( फाळलेला ).

## धातुसाधित विशेषण

### कर्तृवाचक

**आ**–लंगडा, लुळा ( लोळणारा )
**आऊ**–लढाऊ, शिकाऊ, दिखाऊ
**आडू**–खेळाडू
**आळू**–सोसाळू, विसराळू
**ईक**–खर्चीक, सोशीक, पढीक
**एल**–रंगेल ( रंगणारा ), अडेल
**क, का**–मारक, शोधक; मारका, बोलका
**कट**–मारकट ( मारणारें )
**कर**–खेळकर, रुचकर
**खोर**–भांडखोर, चिडखोर
**गा**–भांडगा, दांडगा
**टा**–चोरटा, भामटा ( भ्रमविणारा )
**डा**–वाकडा ( वाक असणारा )
**णा**–देखणा ( दिसणारा ), राखणा
**णार, णारा**–जेवणार, खाणार; जेवणारा, खाणारा
**ता, ती, तें**–देता, घेता; दुमती, खाती, पिती; रांगतें, बसतें
**या**–बऱ्या, उधळ्या, उचल्या
**रा**–चावरा, धावरा, हसरा, कापरा, दुखरा
**वा**–नटवा, रडवा

### पूर्णक्रियादर्शक

**आ**–उघडा ( उघडलेला ), सुटा, सुका
**आवट**–बनावट, धुवट
**ई**–छापी, लेखी, मोडी ( मोडलेलें )
**ईक**–सडीक, पडीक, पढीक
**ईत**–लखलखीत, चकचकीत
**ईर**–फुगीर, फुटीर
**ईव**–सोलीव, भरीव, कोरीव
**ईल**–छापील, डागीळ
**एं**–आदमुरें ( अर्ध मुरलेलें ).
**क, का**–वेचक, निवडक; मोडका, फुटका
**ट, कट**–सुकट, कुजट; कुजकट, मळकट
**ला, ली, लें**–' गेला ' माणूस, ' आली ' वेळ, ' पिकलें ' पान
**लेला**–' वाचलेला ' ग्रंथ; ' लिहिलेली ' पोथी; ' मेलेलें ' वासरूं

### योग्यार्थक

**आऊ**–जळाऊ ( जळण्यायोग्य ), विकाऊ, टिकाऊ
**सर**–आटपसर, आवळसर
**एं**–पळीवाढें (पळीनें वाढण्यास योग्य), बोटचेपें

## धातुसाधित अव्ययें

**ऊन**–खाऊन, पिऊन, देऊन, घेऊन
( अ ) पूर्वकालवाचक–मी **जेवून** शाळेंत जातों, तो **पाहून** उदाहरणें लिहितो.
(आ) वर्तमानक्रियावाचक–तो **बसून** असतो, तो **निजून** असतो.
( इ ) कारणवाचक– तो **खाऊन** (खाण्यामुळें) माजला, तो **गिळून** मस्त झाला.
( ई ) रीतिवाचक—**फिरून** यत्न करून पहा; **खरचून**, **दाटून**, **रगडून**, इ०.

**आं**-करकरां, ढळढळां, चरचरां, गरगरां (यांना अनुकरणवाचक क्रि० वि० अव्ययें म्हणतात.)

**ऊं**-खाऊं, पिऊं, देऊं

**तां, तांना**-येतां, जातां; येतांना, जातांना

**ल्या**-उठल्या, बसल्या, पडल्या

याप्रमाणें मराठींत धातुसाधित नामें, विशेषणें व अव्ययें साधतात. स्थलाभावामुळें एकून एक शब्द येथें देतां येणें शक्य नाहीं. ढोबळ कल्पना येण्यापुरती माहिती दिली आहे.

## मराठी शब्दसाधितें

### नामें

#### कर्तृवाचक

[ येथें नी ती क्रिया करणारा एवढ्याच अर्थानें कर्तृवाचक हा शब्द न वापरितां मागील शब्दातील गोष्टी करणारा ह्या अर्थानें हा शब्द वापरला आहे ].

**आर**-कुंभार, लोहार, सोनार.

**ई**-तांबोळी (तांबूल कर०), माळी (माला क०), वाढपी, स्वयंपाकी.

**का, क्या**-पाणक्या (पाणी भरणारा)

**आरी**-चितारी, भुसारी, पानाडी (पाणी शोधणारा).

**करू**-यात्रेकरू, होतकरू, पोटभरू.

**करी**-भाडेकरी, वारकरी (वार करणारा), धारकरी, (धार मारणारा), शेतकरी.

**ड्या**-नावाड्या (नाव चालविणारा), वाटाड्या (वाट दाखविणारा), सोंगाड्या.

#### भाववाचक

**आ**-ताठा (ताठपणा), चिकटा, सफेता, गरमा, खराबा.

**ई**-कलाली, दलाली, अंधारी

**पण, पणा**-मनुष्यपण, देवपणा

**आळी**-वंडाळी

**एली**-दंडेली

**की**-माणुसकी, पाटिलकी, गावकी, शेतकी.

**गिरी**-शिपाईगिरी, लुच्चेगिरी, भामटेगिरी.

#### महत्त्वदर्शक

**आ**-विळा (विळीपेक्षां मोठा), पोळा, पानगा, भाकरा, डबा.

**गा**-सोडगा, जुडगा, वाडगा, रोडगा.

**आड**-पाठाड, छाताड, भिंताड.

**आरा**-पिसारा (पुष्कळ पिसें), पेटारा, भपकारा, बुंधारा.

**दाड**-भगदाड (मोठें भोंक).

#### लघुत्वार्थक

**आसें**-मुंडासें (डोक्यास गुंडाळण्याचें लहान वस्त्र).

**ई**-डोंगरी, खडी, आरशी, दांडी, लोटी.

**ऊक**-कारूक, थोटूक, चिंधूक.

**ऊल**–कणगूल, परडूल, करंडूल; पडघुली, करंडुली.
**ओटी**–धांदोटी, चिंधोटी, रेघोटी.
**ओरा-रें**–चिटोरा, चिटोरें.
**कली**–भातुकली, चांदुकली, धनुकली.
**की**–चांदकी, मेढकी, ओंडकी.
**कूल**–घरकूल, मडकूल.
**टा**–घरटा, चोरटा, पोरटा, बाहुटा.
**डा, डी, डें**-बापडा, गधडी, अंगडें.
**ली**–टिकली, डावली, शिंपली, ताटली.
**लें**-खाटलें, बाजलें, बिंदले, तांबुले.

### स्थानार्थक

**आण**–हबसाण, फिरंगाण.
**आळ**–घंघाळ, घड्याळ, चुनाळ.
**ई**–पेशवाई, मोंगलाई.
**ओळ**–आजोळ, पंजोळ.
**ठा, वठा**–उंबरठा, दारवठा, पाणवठा.
**ण**–तैलंगण, ( तेलंग+ण ).

**वट, वटा, वटी**-मसणवट, मसणवटा, मसणवटी.

### साधनार्थक अधिकरणार्थक

**डा**–हातोडा (हातांत धरून ठोकण्याचें साधन ).
**णी**–दुधाणी ( दूध ठेवण्याचें भांडें ).
**डें**–धुराडें ( धूर जाण्याचें साधन ).
**वण**–दांतवण, (दांत घासण्याचें साधन ).

### स्वार्थक

**का**–पुंजका, (पुंज), घोळका, चुळका, सुळका, माळका, मेंढका, ओंडका.
**कूट**–हिरकूट ( हीर ).
**खा**–बुडखा ( बूड ).
**टा**–सराटा ( सर ).
**डी**–नासाडी ( नाश ), राखाडी.
**ता**–गोणता ( गोण )
**पट**–सालपट ( साल ).

## विशेषणें

### कर्तृवाचक

**आळ**–तोंडाळ, वाचाळ, खोड्याळ.
**आळू**–कष्टाळू, झोपाळू, निद्राळू.
**क**–जाचक ( जाच करणारें ).
**कर**–खोडकर, खेळकर, होळकर.
**खोर**-चहाडखोर, थट्टेखोर, बंडखोर, तंटेखोर.
**ट**--हेकट.
**दार**–झोकदार, ऐटदार, नोकदार.
**या**-मस्कऱ्या (मस्करी कर०), हुम्या, ( न बोलणारा ), हुप्या ('हुप' करणारा ).
**रा**–शिवरा, लाथरा, डावरा (डाव्या हातानें काम करणारा ).

### युक्तार्थक

**आड**–रेताड.
**आर**–फुलार, गर्भार.
**आळ**–चिकाळ, दुधाळ, फेसाळ.
**आळू**-दयाळू, मायाळू, लोभाळू, कृपाळू.
**ईट**–रागीट ( रागानें युक्त ).
**ईळ**–गोडीळ ( गोडीनें युक्त ).
**इष्ट**–चविष्ट, नादिष्ट, भ्रमिष्ट, गर्विष्ट, छांदिष्ट.

**एला**–तान्हेला, भुकेला, नाकेला, हटेला.

**अंत**–बाळंत ( बाळानें युक्त ), जिवंत.

**कट**–धुरकट, तेलकट.

**ट**–रेतट, मातट, रोगट, आंबट, तिखट.

**तें**–रायतें ( राई म्ह० मोहरी तिनें ( युक्त ).

**मंत**, **वंत**–बुद्धिमंत, बुद्धिवंत.

**वान**, **वाला**–गाडीवान, गाडीवाला, ओझेंवाला.

### संबंधार्थक

**ई**–मापी, वजनी, लोखंडी, पितळी, नागपुरी, सोलापुरी.

**ईल**–इकडील, तिकडील, पुढील, मागील.

**कर**–पाटणकर, नगरकर, वाईकर.

**चा**–खालचा, वरचा, येथचा, तेथचा.

**ला**–आंतला, बाहेरला, वरला, कोठला.

### सादृश्यार्थक

**एला**–उंचेला, काळगेला, गोरेला.

**कट**–पोरकट ( पोरासारखा ).

**कुला**–सोनकुला, चिमुकला, काटकुळा.

**गा**–लहानगा ( लहान सारखा ).

**डा**, ( **ळा** )–लांबोडा,ळा ( लांब सारखा.

**वट**–काळवट, लालवट, कडवट.

**वाणा**--वापुडवाणा, लाजिरवाणा.

**सट**–भोळसट, तिरसट.

**सर**–काळसर, पिवळसर, भोळसर.

**सा**–लहानसा, नीटसा, इवलासा, पुष्कळसा.

### स्वार्थक

**इक**–इत्यादिक ( इत्यादि तेंच ).

**का**–रिकामका ( रिकामा तोच ), धडका, नेटका.

## क्रियापदें

### नामसाधित

**मराठी**–कानसणें, फुलणें, आंबणें, खारणें, सुरकुतणें, पिसारणें, पान्हवणें, डोकावणें, माणसाळणें, खुणावणें, आसावणें ( आशा यापासून ), हाताळणें, फेसाळणें, भुकेजणें, रागेजणें, लाथाडणें, ओरखाडणें.

**यवनी**–दगावणें दमणें, नकलणें, खर्चणें, सरदणें, जमणें.

### विशेषणसाधित

**मराठी**–आखुडणें, लांबणें, गढूळणें, दुखणें, चिकटणें, पिसाटणें, ओलवणें, लुचाडणें ( लुच्चा यापासून ), एकारणें, वेडावणें, खुळावणें, स्थिरावणें, पिसाळणें, रोडावणें, काळवटणें.

**यवनी**–जोरावणें, नरमणें, सुस्तावणें.

### अव्ययसाधित

खालावणें, मागासणें, पुढारणें, उभारणें.

# अव्ययें

## नामसाधित

द्वारें, मुळें, कडून, मध्यें, ठायीं, विषयीं, पाशीं, समयीं, संबंधीं, अंतरीं, कडे, वाटे, कारणें.

## विशेषणसाधित

एकदां, दोनदां, पांचदां, दहादां, बहुशः, अनेकशः, एकवार, दोनवार, अनेकबार.

## अव्ययसाधित

इकडून, तिकडून, मागून, पुढून, येथून, तेथून, कोठून, अलीकडून, पलीकडून, दुरून, समोरून, उंचून, लांबून, पुढतीं, मागतीं, खालतीं, वरतीं, झटकन, पटकन्, पटपटां, गटगटां, रटरटां.

# यवनी शब्द

## फारसी

### कर्तृवाचक नामें

**गर**–सौदागर, जरगर (सोनार), कारीगर, जिनगर.

**वान, बान**–बागवान, सारवान (उंट राखणारा), मिहरबान, मेजवान (पाहुणचार करून घेणारा).

**गार**–गुनाहगार, खिदमदगार, मददगार, रोजगार, कामगार, शिकलगार (शस्त्रें साफ करणारा).

### स्थानार्थक नामें

**जार**–गुलजार (गुल=फूल, गुलाब) पुष्पवाटिका.

**स्तान**–हिंदुस्तान (हिंदु=काळा), अरबस्तांन, तुर्कस्तान, अफघाणिस्तान.

**दान**–कलमदान, शमअदान (शमअ =दिवा, शामदान म्ह० दिव्याचें भांडें), गुलदान (फुलपात्र), जुजदान (जुगदान=फणेरें).

[म०–अत्तरदाणी, गुलाबदाणी, चहादाणी].

### अल्पस्वार्थक नामें

**चा, ईचा**–बगीचा (लहान बाग), घालीचा (घाली=सतरंजी, लहान सतरंजी.)

### भाववाचक नामें

**ई**–नेकी (खरेपणा), खूशी, खूबी, (खूब=सुंदर, सुंदरपणा), सियाही (सियाह=काळें, काळेपणा), दुरुस्ती (नीटपणा), फकिरी, हमाली, मजूरी.

**गी**–बंदगी (बंदह्=दास, सेवा), रवानगी, जिंदगी, बिदागी.

**आ**–गरमा, पन्हा.

**ती**–कमती, ज्यास्ती-(जादह+ती).

**गिरी, शाई**–गुलामगिरी सोदेगिरी, बेबंदशाई, मुत्सद्दीगिरी, मुलूखगिरी.

### कर्तृवाचक विशेषणें

**आ**–दान ( ज्ञान ), दाना ( मराठींत दाणा, ज्ञानी ).

**वार**–उमीदवार ( आशा बाळगणारा ).

**मंद**–अकलमंद ( ज्ञानी ), दौलतमंद ( श्रीमंत ).

**वर**–जान ( प्राण ), जानवर ( प्राणी ), जोरवर ( जोरावर=बळकट ), नामवर ( प्रसिद्ध ).

### संबंधार्थक विशेषणें

**ई**–ईरानी, जंगली, शहरी, हिंदी.

### कांहीं क्रियाविशेषणें

**आना**–रोजाना ( रोजचा, रोजमुरा ), सालियाना, माहियाना, नजराना ( नजर=डोळे, देणगी ).

**वार**–तफ्सीलवार ( वेगळें वेगळें ), सादिलवार ( किरकोळ ), असामीवार.

### अनुकरणवाचक अव्ययें

**आ**–बराबर ( बर=छाती, छातीपर्यंत, बेताचें, तंतोतंत ), सरासर (सर=मस्तक, टोंक, टोंकापासून, टोंकापर्यंत, एकंदर ), गरमागरम.

### धातुसाधितें जोडून होणारे शब्द

**कार**–कुनकार ( कारकून=कार्यकर्ता )

**अंदाज**–बरक + अंदाज ( बंदूक सोडणारा ), गोलंदाज

**दार**–(राखणारा, बाळगणारा), चोबदार ( चोब=काठी, काठी बाळगणारा ), पोतदार (पोतद्=पिशवी, पैसा राखणारा )

**बंद**–( बांधणारा ). नालबंद, छपरबंद

**आवेज**–( लोंबणारा ), दस्त आवेज, ( दस्तैवज=हातचा कागद )

**बाज**–( खेळणारा ). इष्कबाज (स्त्रैण), दारूबाज, अफूबाज, कावेबाज

**खोर**–खोर ( खाणारा ). खूनखोर ( रक्त काढणारा ), हलालखोर, ( न्यायानें वागणारा ), हरामखोर [ **म०**–चहाडखोर, भांडखोर. ]

**नवीस**–लेखक, चिठ्ठीनवीस ( चिटणीस=चिठी लिहिणारा ), पोतहनवीस ( पोतनीस = जमाखर्च लिहिणारा ), फडनवीस

### आणखी कांहीं शब्द

**आबाद**–( स्थान ). औरंगाबाद ( सिंहासनस्थान ), हैदराबाद ( हैदर=सिंह ), अहमदाबाद ( अहमद=थोर ).

**नामा**–( पत्र, ग्रंथ, इतिहास ). हुक्मनामा ( हुकूम-पत्र ), रोजनामा ( रोजचा इतिहास ), जाहिरनामा, करारनामा, शाहनामा

**गीर**–( आफ्ताब=सूर्य ). आबदागीर ( छत्री ). ( जहान = जग ), जहांगीर ( जग जिंकणारा ).

**माल**–रूमाल ( रू=तोंड, तोंड पुसण्याचें वस्त्र )

**जादा**–(उत्पन्न झालेला, पुत्र ). शाहजादा ( राजपुत्र ), शाहजादी ( राजकन्या )

**खाना**–( स्थान ). कारखाना, दौलतखाना, सिह्‌हतखाना ( शेतखाना ), फिराशखाना ( बंदीखाना ), तोफखाना.

**पेश**–( पुढें ). पेशवा ( पुढारी )

**सर**–( मुख्य ). सरकार, सरनोबत, सरपोस.

**आब**–( पाणी ). गुलाब ( पुष्परस ). आब्रू ( मुखावरील पाणी, कीर्ति ).

# अरबी

## धातुसाधित शब्द

ह्या ठिकाणीं अरबी शब्द कसे साधतात, त्याच्या मूळाच्या भानगडींत न पडतां, फक्त कल्पना येण्यापुरते मराठींत आलेले कांहीं शब्द देतों.

नाझर–पाहणारा ( नजर=पाहणें )
जाहीर–प्रसिद्ध ( जहर=दिसणें )
मालक–धनी ( मलक=बाळगणे )
मंजूर–पसंत केलेलें ( मजर=पाहणें )
शाहिर–कवि ( शहर=प्रसिद्ध करणें )
जालिम–त्रासदायक ( जलम=पीडणें )
गाफील–हयगय करणें ( गफल )
मगरूर–उन्मत्त ( घरर=माजणें )
महंमूद-स्तुति केलेला(हमद=स्तुति क० )
मकदूर–शक्ति (कदर=सामर्थ्य असणें).
मजबूत–बळकट ( जबत=स्थिर अ० ).
साहेब–धनी ( साहब=बरोबर राहणें ).

याशिवाय मुकादम, मुराबा ( मुरब्बा ), मुनसब, तमाशा ( देखावा ), फरक, गर्क, अर्ज, अद्दल ( न्याय ), नकाशा, हुकूम, उरूस ( यात्रा ). कुलूप, हुद्दा, मुद्दा, सल्ला, मुत्सद्दी, मार्फा, अक्कल, खर्च, नक्कल, हलवा ( मिटाई ), खबर, इलाखा, हिशेब, इ० शेकडों अरबी शब्द मराठींत अगदीं मिसळून गेलेले आहेत, त्यांची यादी देण्यास येथें जागा नाहीं.

## अरबी–शब्दसाधितें

**ई**–मिसरी, अरबी, ( विशेषणें ); हलवाई, मुजराई ( भाववाचक नामें ).

**ची**–मशअलची ( मशालजी ), पखालची ( पखालजी ), बबरची ( बबर्जी, आचारी ).

**अम**–बेग ( गृहस्थ), बेगम ( बाई )

**खान**–राजकुमार, खानम (राजकन्या)

सिराज्+उल्+दौलह्—सिराजउद्दौला ( संपत्तीचा प्रकाश )
अबद्+उल्+करीम—अबदुलकरीम ( ईश्वराचा भक्त )
निजाम+उल्+मुल्क—निजामउल्मुल्क ( देशाचा अधिकारी )
अला+उल्+दीन—अल्लाउद्दीन ( धर्माचें द्वार )
इब्न्–बीन=पुत्र. ( धोंडू बिन रामा वडके=रामा वडक्याचा पुत्र धोंडू ).
वल्द=पुत्र. हिरा वल्द गोमा कोळी=गोमा कोळ्याचा पुत्र हिरा ).

कौम-कोम=स्त्री. ( गंगाबाई कौम श्रीपतराव=श्रीपतरावाची स्त्री गंगाबाई ). ह्याप्रमाणें अरबी शब्दांबद्दल येथें अगदीं जुजबी अशी माहिती दिली आहे.

## मराठींत आलेले कांहीं कानडी शब्द

**नात्यासंबंधीं—**

अण्णा, अक्का, अप्पा, अव्वा, ( आऊताई ), मरीआई, ( मअव्वा ), इत्यादि.

**खाद्यपदार्थांचे वाचक—**

कडबोळें, कडबू, पापड, तूप, ( तुप्प ), पुरणपोळी ( हुरणहळगि ), कायरस, शेवया, सांडगा, रोडगा, ( रोडि ), इ०.

**वस्त्रप्रावरणाचे वाचक—**

चोळणा, कुंची, खण, खिसा, गुंडी, गोंडा, पिशवी, धडी, ( धोतर ), इ०.

**भांड्यांचे वाचक—**

गाडगे ( गडिगे ), मडकें ( मडिगे ), इ०.

**क्रियापदें—**

हुडकणें ( हुडकोण ), ढकलणें, ( धाक्कि ), खाऊन टाक, जेवून घे, इत्यादि संयुक्त क्रियापदें.

**झाडें, फळें, यांसंबंधीं —**

जाई ( जाज मल्लगि ), जुई ( जूज मल्लगि ), पडवळ, गाजर, भेंडा, खोबरें, शिकेकाई, इ०.

**घरगुती व्यवहारांतील—**

तागडी, गिड्डा, विळी, कुऱ्हाड, कोयता, कुदळ, दाभण, अडकित्ता, नथ, बांगडी, बाळी, खिडकी, खोली, गच्ची, एळकोट, गुद्दा, चोख, ओटी, ( होट्टि ), चप्पल, चेंडू, पुंड, फटिंग, बगल, बडगा, हुच्चा, होळी, इ०.

[ याप्रमाणें पुष्कळच कानडी शब्दांचा मराठींत भरणा झालेला आहे ].

## हिंदी शब्द

**हांजी हांजी**
**बात** ( गोष्ट )
**बारभाई**
**बढाई**
**बस्तान**
**बगलबच्चा**
**धरमधक्का**
**तेरी मेरी**
**पिच्छा**
**आगापिच्छा**
**हमरी तुमरी**
**हवेलंडी**
**नगा नाच**
**चंग** बांधणें
**हजीर** तो **वजीर**
**दस** गेले पांच राहिले
**बडे बाप के बेटे**
**दिल्ली तो बहुत दूर है**
**लकडीवांचून मकडी** वळत नाहीं.
**दस की लकडी एक का बोजा**
**दिलमें चंगा तो काथवटमें गंगा**

[ इत्यादि शब्द, म्हणी व वाक्प्रचार हिंदींतून मराठींत आलेले आहेत ].

## गुजराथी शब्द

**बे** ( दोन )
**इजा, बिजा, तिजा**
**दादर** ( जिना )
**घी** ( तूप )

**घेलाशेट**
**'जेनुं काम तेनुं थाय**
**बिजा करे सो गोता खाय'**

[ इत्यादि शब्द व म्हणी हीं गुजरातींतून मराठींत आलेली आहेत ].

## पोर्तुगीज शब्द

पगार, चावी, बुतांव, फाणस, हापूस, पायरी, फर्नांडीज, बटाटा, तंबाखू, कंपू, काडतूस, काजे, फालतू, फीत, घमेलें, पाव, पिकाव, अननस, बिजागर, अलमारी, रत्तल, बिस्कूट, बंब, चावी, कोबी, खमीस, इस्त्री, वरांडा, कर्नल, जुगार, लिलाव, मेज, मेस्त्री, पोपयी, इ०.

## इंग्रजी शब्द

मराठींत इंग्रजी शब्द पुष्कळच घुसले आहेत व घुसत आहेत; त्यांपैकीं कांहीं येथें दिले आहेत.

शिक्षणखात्यांतील —

डायरेक्टर, इन्स्पेक्टर, डेप्युटी, ऑफीस, प्रिन्सिपल, सुपरिंटेंडेंट, हेडमास्तर, मास्तर, असिस्टंट, सर्व्हंट, सुपरवायझर, टीचर रूम, बुक, टेबल, डेस्क, बोर्ड, ब्लॉटिंगपेपर, कार्डबोर्ड, डस्टर, एक्झरसाईज, पेन्सिल, मार्जिन, सर्टिफिकेट, नंबर, मार्क, फी, इ०.

सरकारी व्यवहारांतील —

व्हॉइसराय, गव्हर्नर जनरल, गव्हर्नर, कलेक्टर, हेडक्लार्क, क्लार्क, बॉडीगार्ड, जज, सबजज, बॅरिस्टर, डिस्ट्रिक्ट-बोर्ड, लोकल-बोर्ड, स्कूल-बोर्ड, म्युनिसिपालिटी, असेंब्ली, मेंबर, व्होट, कार्पोरेशन, पार्लमेंट, सेक्रेटरी, गव्हर्नमेंट, पेन्शन, लीव्ह, अर्जंट, डिस्मिस्, रिपोर्ट, पे (पगार), इ०.

न्यायखात्यांतील —

कोर्ट, फी, स्टँप, जज, समन्स, वॉरंट, असेसर, इ०.

पोस्टासंबंधीं —

कार्ड, पाकीट, तिकीट, रजिस्टर, पार्सल, मनिऑर्डर, टेलिफोन, टेलिग्राफ, रनर, पोस्टमन, इ०.

रेल्वेसंबंधीं —

रेलवे, स्टेशन, प्लॅटफॉर्म, गार्ड, वेटिंगरूम, स्टेशनमास्तर, मेल ट्रेन, गुड्स् ट्रेन, पॅसेंजर, वॅगन, सिग्नल, फायरमन, टाइमटेबल, इ०.

**दवाखान्यासंबंधीं —**

डॉक्टर, नर्स, कंपौंडर, सिव्हिल सर्जन, डिस्पेन्सरी, हॉस्पिटल, डोस, ड्रेस, ड्रेसिंग, ग्लास, इनॉक्युलेशन, इंजक्शन, इ०.

**इतर व्यवहारांतील —**

लाइफ मेंबर, ट्रस्ट, ट्रस्टी, मेमोरिअल, ज्युबिली, मास्टर, मिस, शेम, हिअर, मॅच, कोट, हार्मोनिअम, फोटो, शर्ट, बटन, सायकल, इ०.

---

## शब्द-व्युत्पत्ति.

शब्दांच्या घटनेचा आतांपर्यंत विचार झाला. आतां बनलेले शब्द मूळ कोणत्या स्वरूपात व कोणत्या अर्थानें होते आणि आतां त्यांचें स्वरूप व अर्थ हीं काय आढळून येतात, त्यांपैकीं कांहीं शब्दांचा येथें विचार करूं.

संस्कृतांतून किंवा अन्य भाषांतून मराठींत शब्द येतांना त्याच्या स्वरूपांत किंवा अर्थांत किंवा त्या दोहोंतही केव्हा केव्हां फरक होत असतो. खालील चार प्रकारें रूपांत फरक आढळतो.

(१) **वर्णलोप** — अरण्य–रान, बदर–बोर, अलवाल–अळें, इयत्ता–यत्ता, उपवास–उपास, अनन्तर–नंतर, अपि–हि, उपरि–वर, उपाध्याय–उपाध्या, **यवनी०** – किताब–कित्ता, कानून्–कानू ( नियम ), अफवाह–अफवा, वाहवाह–वाहवा, इ०.

(२) **वर्णभेद** — कार्य–काज, स्तंभ–खांब, बल–बळ, रात्रि–रात्र, वन–बन, योगी–जोगी, प्रारब्ध–प्रालब्ध, यंत्र–जातें, युक्ति–जुक्ति, भवानी–बोहणी, मिथुन–मेहुण, क्लेश–किळस, इ०.

(३) **वर्णवृद्धि** — आम्ल–आंबट, तिक्त–तिखट, पीत–पिवळा, चरित–चरित्र, निद्रित–निद्रिस्त, विनति–विनंति, ताम्र–तांबडा, मार्जार–मांजर कुक्कुट–कोंबडा, **यवनी०** — कमर–कंबर, यांतील शेवटच्या तीन शब्दांत अनुस्वाराची वाढ झाली आहे, इ०.

(४) **वर्णविपर्यय**—तिलक–टिकला, वाचाट–चावट, लघु-हलू, गोक्षीर-गोखरूं, कटुकी–कुटकी, कोटि–टोंक, क्षेप–फेक, उडूप–पडाव, भगिनी–बहीण, **य०**–अमानत–अनामत, कोशिश–कसोशी, मशहूर–महशूर, इ०.

शब्दांचे अर्थाच्या दृष्टीनें तीन भाग पाडितात. **यौगिक रूढ** व **योगरूढ**.

( १ ) **यौगिक**—शब्दांचा धातु–प्रत्ययादिकांनीं होणारा मूळचाच अर्थ व्यक्त करणारे शब्द. उदा०—राम ( आनंद देणारा ), युक्ति ( योजना ), नमन ( नमस्कार ), राजन् ( राजा ).

( २ ) **रूढ**—मूळच्या अर्थाऐवजीं रूढ अर्थच जास्त बलवत्तर असणारे शब्द. उदा०—आर्जव ( सरळ हा मूळार्थ, पण खुशामत हा रूढार्थ ), दारू ( औषध हा मूळार्थ, पण मद्य हा रूढार्थ ), इ०.

( ३ ) **योगरूढ**—मूळचा अर्थ व रूढार्थ हे दोन्हीं लागू पडणारे शब्द. उदा०—अंडज ( अंड्यापासून जन्मलेले, पक्षी ), पंकज ( चिखलांत उत्पन्न झालेलें, कमळ ), मृग ( शोधणें हरीण ).

मूळचा अर्थ याकरितां **वाच्यार्थ** व त्याहून निराळा अर्थ याकरितां **लक्ष्यार्थ** किंवा **रूढार्थ** असेही शब्द योजितात. उदा०—दगड–एक पदार्थ ( वाच्यार्थ ); तो मनुष्य **दगड** आहे ( लक्ष्यार्थ ); गाढव–एक प्राणी ( वाच्यार्थ ); गाढव–मूर्ख मनुष्य ( लक्ष्यार्थ ); कणीक–गव्हाचें पीठ, त्यानें त्याची **कणीक** तिंबली–त्याला चांगलें चोपलें; बृहस्पति–देवगुरु; तो **बृहस्पति** ( महा बुद्धिवान् ) आहे; कळी उमलणें–फूल फुलणें, आनंदोत्पादक गोष्टीमुळें मुख **प्रफुल्लित** होणें; त्याचप्रमाणें ' दुधाकडे पहा ' येथें ' दुधाचें रक्षण कर ' हा **लक्ष्यार्थ** अभिप्रेत आहे; ' गंगेवर गौळवाडा आहे ' येथें गंगेवर=गंगेच्या **कांठावर**; ' शूर महाराष्ट्र ' येथें महाराष्ट्र=मराठे लोक; हे **लक्ष्यार्थ** अपेक्षित आहेत.

वाच्यार्थ किंवा लक्ष्यार्थ यांपेक्षांही निराळाच अर्थ केव्हां केव्हां उत्पन्न होतो; त्यास **व्यंग्यार्थ** म्हणतात. उदा०—' अकरा वाजले ', ' घंटा झाली ', या दोन शब्द-संहतींवरून शाळेची वेळ झाली वगैरे बोलणाराचा अभिप्रेत अर्थ कळतो; तसेंच ' बुक्का लावा ', ' विडा द्या ', या शब्द-संहतींवरून अनुक्रमें कथेंतील पूर्वरंग संपला, निरोप देण्याची वेळ झाली, हे अर्थ सूचित होतात; हे **व्यंग्यार्थ** होत.

आतां निरनिराळ्या कारणांनीं अर्थभेद झालेले मराठींतील कांहीं विशिष्ट शब्द निवडून काढून, त्यांची अर्थ-व्युत्पत्ति येथें देतों.

## अर्थान्तरित कांहीं शब्द

### (१) मूळ रूप कायम राहून

**शाला**-स्थान; परंतु रूढार्थ शिकविण्याची जागा. (नाटकशाळा येथें फारच अर्थान्तर आहे. वाईट चालीची स्त्री हा अर्थ).

**प्रपंच**-पसारा; संसारांत पसारा फार वाढतो, म्हणून प्रपंच=संसार.

**अरिष्ट**-निर्भयस्थान; परंतु रूढार्थ संकट.

**बडा**-(सं० वृद्ध), बुड्ढा; वयानें मोठा, पण अन्य प्रकारेंही मोठा असल्यास त्यास 'बडा' म्हणतात. (हा शब्द हिंदींतून आला आहे).

**हिय्या**-(सं० हृदय); कोणतेंही महत्त्वाचें कृत्य करण्यास हृदय म्हणजे अंतःकरण जोरदार हवें, म्हणून हिय्या याचाच धैर्य असा अर्थ झाला.

**उपाधि**-गुण; परंतु रूढार्थ लचांड, त्रास.

**अधिकार**-योग्यता; परंतु रूढार्थ सत्ता.

**राव, राय**-(सं० राजा); सन्मानार्थक; उ०-गणपतराव, चंपतराय.

**खुजा**-( सं० कुब्ज=कुबडा ); मूलार्थ वांकडा, रूढार्थ ठेंगू.

### (२) किंचित् वर्णभेद

**अंगोर**-निखारा; यापासून 'अंगारा' म्ह० मंत्रित राख, असा रूढार्थ झाला. (क्षीर-खीर, पत्र-पत्ता, शून्य-सुना, मुहूर्त-म्होतूर, इ० आणखी शब्द ).

**फास**-(सं०पाश) गळ्याला लांवतात तो, **फासा** (सोंगट्यांमधील). [**दोर** व **दोरा**, **पाट** व **पाटा**, **कोपर** व **कोपरा**, **पाय** व **पाया**, **नाक** व **नाकें**, **कान** व **काना**, **क्षत** व **खट्**, हे शब्द किंचित् फरकामुळें अर्थान्तरित झाले आहेत.

### (३) प्रासंगिक भिन्नार्थ

**रक्षा**—राखणारी; उ०—रामरक्षा. **राख**=राखाडी, **भस्म**=मंत्रासिद्ध राख, **अंगारी**=पीडानिवारक राख; येथें बोधित वस्तु एकच, पण प्रसंगानुसार रूढार्थ भिन्न झाले आहेत. (कार्य-काम, माता-माय-माई,स्नान-न्हाण, मार्ग-माग, इ० ).

### (४) शब्दांचें आखूड रूप

**मुंज**-(मौंजीबंधन); मुंज नांवाच्या गवताची दोरी ह्या संस्कारांत बांधतात, त्यावरून शब्दाचें आखूड रूपच प्रचारांत राहिलें. (विश्वनाथ-विशा, जगन्नाथ-जगू, गणपति-गणू, याप्रमाणें ).

**अजागळ**-अजागलस्तन यापासून. अजा=शेळी, तिच्या गळ्याला असलेल्या स्तनाप्रमाणें निरुपयोगी.

हा मूळचा अर्थ; पण बावळट, अव्यवस्थित, हे मागून अर्थ झाले.

**तत्त्व**—( तत्त्वमसि—तत् + त्वम् + असि ) यापासून. वेदान्तांत 'तें तूं आहेस' याची जाणीव होणें ही महत्त्वाची गोष्ट समजतात; म्हणून तत्त्व=सारभूत गोष्ट. [ किंवा तत् + त्व असें भाव० नामही होईल ].

**अजीबात**—अज्जी ( सर्व )

## (५) मूळ शब्दांची वाढ

**सदोदित**–( सदा+उदित ) सदा व सदोदित याचे अर्थ एकच; येथें निष्कारण उदित शब्द आला आहे.

**सर्वत्र**—येथेंही वरचाच प्रकार. सर्वत्र=सर्व (सर्वत्रांना = सर्वांना ).

## (६) एकार्थक शब्दांचें एकीकरण

**बेणबाजा**—( इं० Band=बेण, सं० वाद्य=बाजा ); दोन्ही वस्तुतः एकच, पण येथें दोन एकार्थक शब्दाचा समास होऊन हा विचित्र शब्द बनला !

## (७) मूळार्थच कायम

**वांदर**–(वानर), **तांबडा** ( ताम्र ). येथें अर्थभेद झाला नाहीं.

## (८) वर्णसाम्यामुळें भिन्नार्थ

**लज्जाहोम**–( लाज– होम, लाज= लाह्या ); लग्नांत लाह्यांचा होम करितेवेळीं नवरी नवीन असल्यामुळें लाजते, त्या लाज व लज्जा ह्या शब्दांच्या साम्यामुळें 'लाजहोम'चें 'लज्जाहोम' झालें.

**उत्साह**–वर्णसाम्यामुळें उत्सव ह्या शब्दाबद्दल उत्साह ( गणपतीचा वगैरे ) हा शब्द कोणी वापरितात. उत्साह = उल्लास, तो उत्सवाचे वेळीं असतो; म्हणून उत्सव म्हणजेच उत्साह.

## (९) एका वर्णाची वाढ

**श्राप**–शाप; यात एक वर्ण बोलण्यांत ज्यास्त आला आहे. विद्रूप (विरूप), निद्रिस्त (निद्रित), द्रुष्ट, (दुष्ट), यात हाच प्रकार आहे.

## (१०) अशुद्ध रूपाचा प्रचार

**शरणांगत** –( शरण + आगत ); परंतु येथें निष्कारण अनुस्वार येऊन अशुद्ध रूप प्रचारांत आलें आहे.

**विन्मुख**–( वि+मुख ) वरीलप्रमाणेंच अशुद्ध रूप प्रचारात आलें. ( सत् + मुख = सन्मुख, उत् + मुख = उन्मुख, याच्या साम्यामुळे ),

## (११) बादरायणसंबंधानें अर्थ

**भूयसी**–दक्षिणा देण्याच्या वेळच्या मंत्रांत हा शब्द आल्यानें 'भूयसी' म्हणजेच दक्षिणा हा त्याचा अर्थ झाला.

**त्रेधा**–वेदऋचेंत वामनानें तीन पावलें जमीन बळीजवळ मागितली अशा अर्थाचें 'त्रेधा निदधे पदम्' हें वाक्य आहे. त्यांत हा शब्द आला आहे व त्यावेळीं लोकांची धांदल उडाली म्हणून त्रेधा = धांदल.

**तारांबळ**–वरीलप्रमाणेंच येथेंही बादरायणसंबंधानें अर्थ झाला

आहे. लग्नाचे मंगलाष्टकांत ' ताराबलं चंद्रबलं तदेव ' असें एका श्लोकांत येतें; त्यावेळीं खूप धांदल उडते, म्हणून तारांबळ=धांदल.

**त्वंपुरा**–पूजेंत शंखाची पूजा करिताना ' त्वं पुरा सागरोत्पन्नः ' हा मंत्र म्हणतात, त्या वेळीं शंख मोठ्यानें वाजवीत असावेत; त्यावरून त्वंपुरा करणें म्ह० बोंब मारणें हा बादरायणसंबंधानें अर्थ झाला. [ वाष्कळ छांदिष्ट. मनस्वी, हे या प्रकारचे शब्द आहेत ].

### (१२) एखादा विशिष्ट शब्द सामान्यार्थक होणें

**कादंबरी**–बाणाच्या एका काव्यातील नायिकेचें नांव कादंबरी· म्हणून तिच्याप्रमाणें असणाऱ्या सर्व नवलकथा म्ह० कादंबऱ्या.

### [१३) सामान्यदर्शक शब्द विशिष्टार्थक होणें

**पीतांबर**–( पीत + अंबर ) पिवळें वस्त्र हा अर्थ असून, पुरुषाचे सोवळ्याचें रेशमी वस्त्र हा अर्थ झाला. पिवळा पितांबर, तांबडा पितांबर, असेंही अज्ञानानें म्हणूं लागले. ( सह्याद्रि पर्वत, विंध्याद्रि पर्वत, हीं याच प्रकारचीं उदा० ).

### (१४) मूळापेक्षां चांगला अर्थ येणें

**धूर्त**–मूळार्थ फसविणारा; परंतु चतुर, धोरणी, हा त्यास चांगला अर्थ प्राप्त झाला.

### (१५) अमंगलत्वाचा अर्थ येणें

**मेला**–कांहीं शब्दांच्या अर्थास, निष्कारण अमंगलत्वार्थ येतो; तसें ' मेला ' ह्या शब्दाबद्दल होऊन वारला, कैलासवासी झाला, परलोकवासी झाला, स्वर्गवासी झाला, अशा शब्दसंहति अशुभता घालविण्यासाठीं उत्पन्न झाल्या.

**हगणें**–वरीलप्रमाणेंच हा शब्द अवाच्य वाटून. त्याबद्दल परसाकडे जाणें, मलशुद्धीस जाणें, बहिर्दिशेस जाणें, शौचास जाणें, ह्या संहति आल्या. ( बांगड्या फुटणें, कुंकू नसणें, ह्याबद्दलही बांगड्या वाढवणें, कुंकूं वाढणें, ह्या संहति उत्पन्न झाल्या).

### (१६) विपरीत अर्थ येणें

**सुतक**–जननाशौच हा मूळार्थ, पण मृत्यूच्या वेळचें आशौच, असा विपरीत अर्थ झाला.

**अद्दल**–( फारसी ). मूळ अर्थ न्याय; परंतु ठेंच लागणें, नुकसानीमुळें धडा मिळणें, हा विरुद्ध अर्थ आला आहे.

**परोक्ष**, **अपरोक्ष**–ह्या शब्दांचे अप्रत्यक्ष व प्रत्यक्ष असे अनुक्रमें अर्थ आहेत: पण आपण दोन्ही अर्थीं हे शब्द वापरतों. उदा०— " माझ्यापरोक्ष ( पाठीमागें ) ही गोष्ट तूं त्यास कां सांगितलीस ? " किंवा "माझ्याअपरोक्ष ( पाठीमागें ) त्यास कां सांगितलेंस ? " असेंही म्हणतात.

**फराळ**–( फलाहार ) फळें खाणें, हा मूळ अर्थ; पण रूढींत भुईमूग, साबुदाणे, इ० मिश्रित पदार्थांचें यथेच्छ सेवन हा अर्थ झाला.

**उपवास**–( उप + वास ) शुचिर्भूतपणें देवासन्निध राहणें हा मूळार्थ, पण वरच्यासारखे पदार्थ यथेच्छ खाण्यांत येतात.

## (१७) हीनत्वार्थ

**आचार्य, महाराज** – विद्वत्तेमुळें ज्यांना पूर्वी आचार्य, किंवा महाराज म्हणत, ते उच्च वर्णांतील कांहीं लोक आतां खरोखरच आपलें नांव व्यर्थ करणारीं कामें करूं लागले; म्हणून त्यांच्या अर्थालाही हीनत्व प्राप्त झालें. ( आचार्य = आचारी; तसेंच महाराज=स्वयंपाकी, पाणक्ये ).

## (१८) गौणत्वसूचक अर्थ

**मिस्किल**–( फारसी ). गरीब हा मूळ अर्थ असून, 'लुच्चा' असा अर्थ त्यास प्राप्त झाला आहे.

**कलावंतीण**–( कला+वती ) कलायुक्त हा मूळ अर्थ असून, गायनवादनादि कला समाजांतील हीनदर्जाच्या स्त्रियांनीं उचलल्यामुळें, त्याला गौणार्थकत्व प्राप्त झालें आहे.

**हांजीहांजी**–ह्या हिंदी शब्दाचा खुशामत हा गौणत्वसूचक अर्थ झाला आहे. ( हां, जी; हां, जी ).

## (१९) संकुचित अर्थ

**रुमाल**–( रू+माल ) तोंड पुसण्याचें वस्त्र हा मूळ अर्थ असतां डोक्यावरील रुमाल, कागदांचा रुमाल, असा संकुचित अर्थ त्यास आला. [ पक्षी ( मोठा ), पांखरूं (लहान); कुटुंब ( नवरा, बायको, मुलें मिळून ), कुटुंब (स्वतःची बायको); जनावर ( कोणताही मनुष्येतर प्राणी ), जनावर ( चार पायांचा किंवा सरपटणारा प्राणी ); वेदना ( ज्ञान ), वेदना–दुःखाचें ज्ञान; ह्यांतील दुसरे शब्द संकुचित अर्थाचे आहेत ].

## (२०) पूर्वेतिहासदर्शक शब्द

**अंकित**–( अंक्–खुणा करणें,+इत ) खुणा केलेला हा मूळार्थ; चाकर हा रूढार्थ. यावरून चाकराच्या अंगावर पूर्वी कांहीं खूण करीत असावेत, असा इतिहास कळतो.

**वर्ण, लिपि, अक्षर, लेख**–वर्ण म्ह० रंग, लिपी = लिंपलेली, अक्षर म्ह०न जाणारें,व लेख = लिहिलेला; या शब्दांवरूनही आपल्या लेखनप्रगतीचा इतिहास कळतो.

**घटका**–( घटियंत्र ). याच्या योगानें पूर्वी कालमान दाखविलें जात होतें, हा इतिहास कळतो.

**सैंपाकी**–( स्वयं+पाक ). यावरून पूर्वी स्वतःच पाक करीत, हा इतिहास कळतो.

**पहारा**–(प्रहर=तीन तास). यावरून पूर्वी दर तीन–तीन तासांनीं पहारा बदलीत असावेत, हा इतिहास कळतो.

**कोस**–( क्रोश = ओरडणें ). यावरून मोठ्यानें ओरडल्यास तें दोन मैलांवर ऐकूं जात असावें; असें तत्कालीन लोकांचें सामर्थ्य ध्यानांत येतें.

**शतकृत्य**–( शत+क्रतु ) पूर्वी शंभर यज्ञ करणें हें मोठें कृत्य समजलें जात असे; त्याप्रमाणें कोणीं फार धाडसाचें, पराक्रमाचें कृत्य केल्यास त्यास 'शतकृत्य' असें म्हणतात.

**चैत्र**–( चित्रा+अ ) पौर्णिमेला चंद्र कोणत्या नक्षत्रांत असतो, त्यावरून मराठी सर्व महिन्यांचीं नांवें पडलीं आहेत; हें या व ( विशाखा–वैशाख, ज्यैष्ठा–ज्येष्ठ ) इ० शब्दांवरून कळतें.

**विवाह**–( वि + वह–नेणें ) यावरून पूर्वी वधूला कांहीं लोक पित्याकडून पळवून नेत असत असें दिसतें.

**लग्न**–( लग्–जुळणें+त ) योग्य लग्नीं चंद्र व इतर ग्रह असले पाहिजेत; यावरून हा शब्द प्रचारांत आला.

**उपनयन**–( उप+नी+अन ) अध्ययनासाठीं गुरूच्या घरीं पूर्वी जावें लागत असे; म्हणून मुंजीच्या संस्कारास हें नांव पडलें.

**व्याही**–( विवाही ) विवाहानें नातें जुळलेला तो; वधू–वरांचे वडील. ( विहीण हा असाच शब्द आहे ).

**परिणय**–( परि+नी+अय् ) बरोबर नेणें; अग्नीला प्रदक्षिणा घालतेवेळीं वर हा वधूला बरोबर नेतो त्यावरून हा शब्द झाला.

**पाणिग्रहण**–लग्न. लग्नांत वधूचा हात धरून एका मंत्रानें तिचा स्वीकार करावयाचा असतो; यावरून लग्न ह्या अर्थी हा शब्द प्रचारांत आला.

**वऱ्हाड**–( वर + हाटक, हाट = बाजार ). वर व त्याबरोबर इतर बाजार म्हणजे जो घोळका असतो तें वऱ्हाड.

**वसा**–( व्रत ) वर्षाकाळांतील व्रत तो. ( चातुर्मास्यांत बायका नेम करितात, त्याला वसा घेणें म्हणतात ).

**भाऊजी**–नवऱ्याचा भाऊ तो आपलाही भाऊ अशी कल्पना येथें आहे.

**वहिनी**–( भगिनी ) भावाच्या बायकोस आपल्या बहिणीप्रमाणें मानावें, ही कल्पना या शब्दाच्या मुळाशीं आहे.

**वन्सं**–( भगिनी + सम ) वहिनीनें नवऱ्याच्या बहिणीस आपल्या बहिणीप्रमाणें मानावें, ही कल्पना यावरून व्यक्त होते.

[ **फाकडा**–(इष्टुर फाकडा, मानाजी शिंदे फांकडे ); बोहणी ( भवानीला नमस्कार करून झालेली प्रथमची ( विक्री ); घाशीरामी, ( घाशीराम कोतवालाप्रमाणें छळणुकीचा कारभार ); फरशी ( परशुरामाच्या परशूप्रमाणें असणारें हत्यार ); ढालगज (निशाणापुढचा हत्ती ); घटस्फोट ( मृत्यूनंतर दहन–क्रियेच्या प्रसंगीं घट फोडतात, व त्या मनुष्याचा संबंध तुटतो, तसा

संबंध अजबात तुटणें ); इ० या प्रकारचे पूर्वेतिहासनिदर्शक शब्द आहेत ].

## (२१) साम्यतादर्शक अर्थ

**हबेलंडी**–( हां बे लंडी, हिंदी शब्द ). अरे बायक्या, असा याचा मूळ अर्थ असून, सामान्य धैर्यही नसणाऱ्या बायकांप्रमाणें ज्याची घाबरगुंडी उडते तो; म्हणून हबेलंडी=घाबरगुंडी.

**माधुकरी**–( मधु+कर ) भुंगा मध जमा करितो त्याप्रमाणें अन्न जमा करणारा.

## (२२) लक्ष्यार्थ

**उपनेत्र**–चाळिशी. चाळीस वर्षांच्या सुमारास कमी दिसूं लागतें म्हणून उपनेत्र=चाळिशी किंवा चष्मा.

## (२३) विशेषनामावरून विशिष्टार्थ

**मल्लिनाथी**-संस्कृत महाकाव्यांवर मल्लिनाथ यानें टीका केली आहे. टिका=स्पष्टीकरण; परंतु टीकाकार बहुधा मूळाला धरून न लिहितां दोष काढण्याच्या बलवत्तर प्रवृत्तीमुळें, तिखटमीठ लावून लिहितो; म्हणून मल्लिनाथी म्ह० लांबलचक, विस्तृत टीका किंवा विकृतार्थक टीका, हा अर्थ जाऊन विरुद्ध टीका हा विशिष्ट अर्थ त्यास आला.

**कोडगा**–काम्यक वनांत जयद्रथानें 'कोटिक' नांवाच्या सेवकास द्रौपदीकडे तिचें मन वळविण्यासाठीं वारंवार पाठविलें; त्यासारखा म्हणजे कोटिकासारखा लोचट तो कोटिगा किंवा कोडगा; ("स्वयेंहि कथितों नसे तिळहि लाज मी **कोटिगा** ". येथें मोरोपंतानें हा शब्द सुंदर रीतीनें वापरिला आहे ).

[ कर्ण=उदार. यादवी=भांडण, कुरुक्षेत्र=मोठें तुंबळ युद्ध, जन्मसावित्री=निरंतरचें, इ० शब्द विशेषनामावरून विशेषार्थक बनले आहेत ].

## (२४) कृतीवरून नामवाचक अर्थ

**करवंद**–( करमर्दन ) करवंदें काढल्यावर धुण्यासाठीं हाताचें मर्दन करावें लागतें, त्यावरून. [ म्यांव, भूभू, हम्मा, इ० शब्द त्या त्या कृतींवरून आले आहेत ].

## (२५) सादृश्यार्थक

**भाकरी**–( भास्करी ); **चांदकी**–चंद्राप्रमाणें लहानशी, वाटोळी, त्यासारखी म्हणून.

## (२६) सवर्णाक्षरांतील एका अक्षराचा लोप

**सुकेळें**–( सुकें+केळें ). एकच वर्ण जवळजवळ आल्यास त्यांपैकीं एकाचा लोप होतो, तसें येथें आहे. रिकामा ( रिक्त–काम ), नकटा ( नाक–काटा ), सतार ( सप्ततार ), साष्टी ( षट्–षष्टी= सासष्टी ), नवरा ( नववर ),

गुराखी ( गुरें+राखी ), इ०
य०–जमादार ( जमातदार ) याप्रमाणें.

**(२७) समाजेतिहासदर्शक**

**ब्याज**–लबाडी. यावरून मूळ उसन्या दिलेल्या पैशापेक्षां जास्त पैसा घेणें पूर्वी पाप समजत; हा सामाजिक इतिहास कळतो.

**श्रीमंतपूजन**–( सीमा+अंत+पूजन ) वराचें वधूच्या मंडळींनीं आपल्या गांवच्या सीमेवर स्वागत करण्याची पूर्वी चाल होती. आतां वराचे महत्त्व वाढल्यामुळें किंवा सीमान्त–पूजन हा शब्द बोलण्यास जड वाटूं लागल्यामुळें, त्याचें ' श्रीमंतपूजन ' झालें.

**(२८) वर्णविपर्यय**

**उडाणटप्पू**–उनाडतट्टू, हलू–( लघु ), बनारस ( वाराणशी ), जनावर ( जानवर–फा० ), हे याच प्रकारचे शब्द आहेत.

ह्याप्रमाणें मराठींत असलेल्या कांहीं महत्त्वाच्या शब्दांची साधनिका, त्यांचा अर्थभेद, त्यांचा ऐतिहासिक, धार्मिक, पौराणिक, वगैरे गोष्टींशीं संबंध व त्यावरून कळून येणारा पूर्वेतिहास, इ० गोष्टी येथें दिल्या आहेत. कोशाचें काम करण्याचा हेतु नसल्यामुळें, कल्पना होण्यापुरती मराठी शब्दांची येथें व्युत्पत्ति दिली आहे; तेवढ्यावरून भाषेंतील शब्दांची रूपदृष्ट्या कशी परिणति होते, व कांहीं ठिकाणीं अर्थभेद कसा होतो, ह्याची सामान्य कल्पना येईल.



(१)





कै० दा० पां० तर्खडकर

(२)



कै० मोरो केशव दामले

(३)





प्रि० गोपाळ गणेश आगरकर

( ४ ) ( ५ )







**कै० वि० का० राजवाडे**　　**कै० डॉ० मा० त्रिं० पटवर्धन**

( १ ) **दादोबा पांडुरंग तर्खडकर** यांनी '**महाराष्ट्र भाषेचें मोठें व्याकरण**' छापिले; यांस **महाराष्ट्र भाषेचे पाणिनि** असे म्हणतात. याच्या व्याकरणामुळें मराठीला कांहीं अंशी स्थैर्य आले. त्याचे व्याकरण हा मराठीमधील पहिला नाव घेण्यासारखा व्याकरण-ग्रंथ होय. ( ज० १८१४, मृ० १८८२ ).

( २ ) **मोरो केशव दामले** यांनी '**शास्त्रीय मराठी व्याकरण**' हा सुमारे हजार पृष्ठाचा उत्कृष्ट व सांगोपांग चर्चात्मक असा व्याकरण-ग्रंथ लिहिला. यानंतर याला मागे सारील असा व्याकरण-ग्रंथ अजून झाला नाहीं. ( ज० १८६८, मृ० १९१३ ).

( ३ ) **गोपाळ गणेश आगरकर** यांचा वाक्यपृथक्करणावर '**वाक्य-मीमांसा**' हा सुन्दर ग्रंथ आहे. महनीय समाजसुधारक ( ज० १८५६, मृ० १८९५ ).

( ४ ) **विश्वनाथ काशीनाथ राजवाडे** यांनीं दामले यांच्या व्याकरणावर टीकात्मक प्रबन्ध लिहिले. **ज्ञानेश्वरी मराठीचें व्याकरण** लिहिले. इतिहास-संशोधक, अनेकभाषाभिज्ञ व व्युत्पन्न म्हणून यांची प्रसिद्धि आहे. ( ज० १८६४, मृ० १९२६ ).

( ५ ) प्रो० **माधव त्रिंबक पटवर्धन** यांनीं '**छन्दोरचना**' नांवाचा जुन्या व विशेषत: आधुनिक कवींच्या नवीन चालींवरील पद्याच्या '**छन्दां**'संबंधी शास्त्रशुद्ध विवेचन करणारा असा सांगोपांग व मोठा ग्रंथ लिहिला आहे (ज०१८९४, मृ० १९३९).

# अनुक्रमणिका

## विभाग दुसरा

मराठी साहित्य व व्याकरण

# विभाग दुसरा

# मराठी व्याकरण

## प्रास्ताविक

जगांत ज्ञानाची वृद्धि विशेषेकरून ग्रंथ-समृद्धीमुळें झालेली आहे. हे ग्रंथ विद्वान् लोक व्यवस्थित भाषेंत लिहून ठेवितात, त्यामुळे ते सर्वांस वाचावयास सांपडतात आणि त्यांचें मनन करिता येते. हे ग्रंथ दीर्घ कालपर्यंत राहत असल्यानें त्यांत सांठविलेलें ज्ञान पुढील पिढ्यास उपयोगी पडतें व त्यांत अधिकाधिक भर पडत जाते. आज जगांत निरनिराळ्या शास्त्रांची जी एवढी वाढ झालेली दिसून येत आहे, ती केवळ मननामुळें नव्हे, तर ग्रंथ लिहून अनेक लोकांनीं पूर्वीच्या ज्ञानामध्यें आपापल्या परीनें भर घातल्यामुळेंच होय.

विविध प्रकारच्या लेखनामध्यें—ग्रंथरूपानें—हें जें ज्ञान ग्रथित होऊन राहिलें, त्याचें कारण त्या लेखांची सुसंस्कृत व सुसंबद्ध भाषा हें होय. भाषेच्या व्यवस्थितपणामुळें व नियमबद्धतेमुळेंच ती आपल्याला अधिक उपयोगी पडते व ज्ञानवृद्धीच्या द्वारानें आपल्याला अधिक भराभराटीस आणून पोंचविते. अशा भाषेच्या अभावीं रानटी व कंगाल भाषेंत व्यवहार करणाऱ्या लोकांच्याप्रमाणें आपली प्रगति कुंठित झाली असती.

व्यवहार काहीं भाषेच्या नियमबद्धतेवर अडून रहात नाहीं असें कांहींचें म्हणणें आहे, तें कांहीं अंशीं सत्य आहे; परंतु सामान्य व्यवहार जरी अडत नसला, तरी ज्यांचें ज्ञान अधिक व संस्कृति श्रेष्ठ अशांशीं गांठ पडली असतां, सामान्य भाषेनें कसा तरी तुटपुंजा व्यवहार करणारे लोक त्यापुढें अगदीं कमकुवत ठरतात; अर्थात् जगाच्या जिवन-कलहामध्यें जर टिकाव धरावयाचा असेल, तर केवळ व्यवहाराला पुरेल अशा भाषेवरच संतुष्ट न राहतां, हरतऱ्हेची ग्रंथनिष्पत्ति केली पाहिजे; आणि अशा तऱ्हेच्या ग्रंथनिष्पत्तीला सुसंघटित, सुसंस्कृत व विद्वानांस मान्य अशी भाषा अवश्य आहे.

अशा प्रकारच्या भाषेच्या नियमांसंबंधीं म्हणजेच व्याकरणासंबंधीं विचार करणें सुशिक्षित म्हणवून घेणाऱ्यांस तरी आवश्यक आहे. ' शुद्ध कसें बोलावें व शुद्ध कसें लिहावें, तसेंच हें शुद्ध कां व हें अशुद्ध कां हें व्याकरण शिकल्यानें समजतें ' असें मराठीचे आद्य व्याकरणकार ' दादोबा ' यांनीं आपल्या व्याकरणांत लिहिलें आहे; परंतु एवढेंच कांहीं व्याकरणशास्त्राचें ध्येय होऊं शकत नाहीं. शुद्धतेशिवाय भाषेमध्यें दुसरेही गुण असतात. उदाहरणार्थ, छन्दःशास्त्र व अलंकारशास्त्र यांच्या ज्ञानाच्या योगानें भाषेमध्यें माधुर्यादि गुण येऊं शकतात; व्युत्पत्तिशास्त्र, तुलनात्मक भाषा-शास्त्र, हीं भाषेची घडण, भाषेची ठेवण व भाषेचे वाक्प्रचार, इत्यादिकांचें यथार्थ ज्ञान होण्यास सहायभूत होतात; समास, वाक्यपृथक्करण, ह्यांविषयींचे नियम समजल्यानें नवीन शब्दरचना करणें व सोपी पण परिणामकारक भाषा वापरणें सुलभ होतें; यास्तव शुद्धाशुद्धतेबरोबरच भाषेचा इतिहास, भाषेचा स्वभाव, भाषेची परिणति, अलंकारशास्त्र, छन्दःशास्त्र, व्युत्पत्तिशास्त्र, इ० गोष्टींचा विचार करणें हेंही व्याकरण-शास्त्राच्या कक्षेंतच येऊं शकतें. त्यांपैकीं व्याकरणाशिवाय बाकीच्या गोष्टींचा पहिल्या ' **साहित्य-विभागां**'त विचार केलेलाच आहे, आता प्रत्यक्ष व्याकरणशास्त्राकडे वळूं.

## भाषा व व्याकरण

आपल्या मनांतील विचार दुसऱ्यास कळविण्याचें जें साधन त्यास " **भाषा** " असें म्हणतात.

हीं साधनें अनेक प्रकारचीं असूं शकतात. हसणें, रडणें, इ० कृति; नेत्र, हात, इत्यादि इन्द्रियांचे ठराविक संकेत; व शब्दोच्चार; हीं सर्व त्या साधनांतच येतात. तथापि इतर साधनांपेक्षां सहज रीतीनें सर्व व्यवहार कळविणें हें शब्दोच्चारांनीं म्हणजेच बोलण्याच्या भाषेनें अधिक सुलभ होतें; आणि तेंच लेखनांत बरोबर उतरवितां येतें; म्हणून भाषेच्या नियमांसंबंधीं जो विचार केला जातो, तो ह्या बोलण्याच्याच भाषेच्या नियमांसंबंधीं होय.

आपण महाराष्ट्रीय लोक मराठी भाषा बोलतों; त्याचप्रमाणें गुजरातेंत गुजराती, उत्तर हिंदुस्थानांत हिंदी, कर्नाटकांत कानडी, इंग्लंडांत इंग्रजी, फ्रान्सांत फ्रेंच, इ० भाषा त्या त्या ठिकाणचे लोक बोलतात; ह्या सर्व भाषा परस्पर भिन्न आहेत व त्यांचे त्यांचे स्वतंत्र नियमही आहेत; तथापि आपणांस येथें फक्त आपली मातृभाषा जी **मराठी** तिचाच प्रथम विचार करणें अवश्य आहे.

भाषेचा व्यवहार कोणत्या नियमांस अनुसरून होतो, त्याचा विचार ज्या शास्त्रांत केलेला असतो, त्याला " **व्याकरण** " असें म्हणतात.

मनुष्य बोलतांना एकेक विचार प्रकट करीत असतो. प्रत्येक विचार एकेका संपूर्ण वाक्यानें प्रकट होतो. अर्थात् भाषेचा विचार म्हणजे वाक्याचाच विचार होय. पण वाक्य म्हटलें कीं, त्यांत शब्द असतात. तेव्हां शब्दांचें योग्य स्वरूप कळल्याशिवाय वाक्याचा खरा अर्थ कळणार नाहीं; म्हणून वाक्याचा विचार करण्यापूर्वी त्याचे घटक जे शब्द त्यांचा विचार करावयास पाहिजे. पुनः, शब्द हे वर्णांचे बनलेले असतात; म्हणून शब्दाचे पूर्वी वर्णांचाही विचार करणं प्राप्त आहे. सारांश, आपणास भाषेचा जो विचार करावयाचा तो ( १ ) **वर्ण-विचार**, ( २ ) **शब्द-विचार** व ( ३ ) **वाक्य-विचार**, अशा क्रमानें केला पाहिजे, हें उघड आहे.

## वर्णविचार

आपल्या तोंडांतून जे मूळचे ध्वनि निघतात, त्यांस ' **वर्ण** ' म्हणतात.

मराठींत एकंदर वर्ण ४९ आहेत, ते खालीलप्रमाणें—

अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ, ऌ, ए, ऐ, ओ, औ, अं, अः;
क्, ख्, ग्, घ्, ङ्, च्, छ्, ज्, झ्, ञ्, ट्, ठ्, ड्, ढ्, ण्;
त्, थ्, द्, ध्, न्, प्, फ्, ब्, भ्, म्, य्, व्, र्, ल्, श्,
ष्, स्, ह्, ळ्,

या वर्णांमध्यें एकंदर तीन प्रकार आहेत—

( १ ) ज्या वर्णांचा उच्चार स्वतंत्रपणें म्हणजे दुसऱ्या वर्णांच्या साह्यावांचून होतो, त्यांस ' **स्वर** ' असें म्हणतात. हे **तेरा** आहेत. अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ, ऌ, ए, ऐ, ओ, औ.

( २ ) ज्या वर्णांचा उच्चार अगोदर स्वरांचें साह्य घेऊन होतो, त्यांस ' **स्वरादि** ' असें म्हणतात. हे उच्चार **दोन** आहेत. अनुस्वार व विसर्ग. उदा०–( अ+ ं ) = अं; ( अ+ः ) = अः. [ येथे अनुस्वार व विसर्ग हे ' अ ' या स्वरास जोडून दाखविले आहेत. इतर स्वरही पूर्वी येऊन त्यांचा उच्चार होतो ].

( ३ ) ज्या वर्णांचा उच्चार स्वरांचें मागून साह्य घेऊन होतो, त्यांस '**व्यंजनें**' म्हणतात. हीं **चौतीस** आहेत. क्-पासून ळ्-पर्यंत. ह्यांचा उच्चार स्वरांचे साह्यावांचून लंगडा पडत असल्यामुळें, तीं क्, ख्, ग्, घ्, ङ्, अशीं लिहून दाखवितात. (उदा--कदाचित्, विद्वान्, यांतल्या त्, न्, याप्रमाणें ).

[ इ, उ, ऋ, हे स्वर जसे ऱ्हस्व व दीर्घ आहेत, तसाच ऌ हाही असेल, असें समजून पूर्वी ( दीर्घ ) 'ॡ' ही शिकवीत असत; परंतु मराठींत त्याचा कोठेंच उपयोग दिसून येत नाहीं. तसेंच क्ष व ज्ञ हींदेखील जोडाक्षरें आहेत. ( क्+ष=क्ष् आणि द्+न्+य्=ज्ञ् ) म्हणून हे वर्ण, मराठी वर्ण-मालेंतून गाळणेंच इष्ट आहे ].

व्यंजनांत स्वर मिळविल्यानें अक्षर तयार होतें. एकंदर १३ स्वरांपैकीं ऋ,ॠ व ऌ हे स्वर उच्चारास कठीण असल्यामुळे ते सोडले; आणि अनुस्वार व विसर्ग जोडलेले अं, अः, हे वर्ण त्यांच्या जोडीस ज्यास्त घातले; म्हणजे अ, आ, इ, ई, उ, ऊ, ए, ऐ, ओ, औ, व अं, अः, हे व्यंजनांत मिळवून बारा अक्षरांची एक ओळ तयार होते, तिला '**बाराक्षरी**' किंवा रूढीप्रमाणें '**बाराखडी**' असें म्हणतात. उदा०—

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| क्+अ | आ | इ | ई | उ | ऊ | ए | ऐ | ओ | औ | अं | अः |
| क | का | कि | की | कु | कू | के | कै | को | कौ | कं | कः |

याप्रमाणें सर्व व्यंजनांच्या व जोडाक्षरांच्याही बाराखड्या होतात.

## वर्णांचे भेद

[ अ ] स्वतंत्र उच्चार आणि परतंत्र उच्चार ह्या दृष्टीनें वर्णांचे **स्वर** व **स्वरेतर** असे दोन भेद आहेत. स्वरेतर वर्णांत पुनः **स्वरादि** व **स्वरान्त** किंवा **व्यंजनें** असे दोन भेद आहेत. म्हणजे सामान्यतः वर्णांचे ( १ ) **स्वर**, ( २ ) **स्वरादि** व ( ३ ) **व्यंजनें** असे तीन भेद मानण्यास हरकत नाहीं.

[ **आ** ] वर्ण मुखाच्या ज्या भागांपासून विशेषतः उच्चारिले जातात, त्या भागांस त्या वर्णांचीं **स्थानें** म्हणतात. स्थानांच्या दृष्टीनें वर्णांचे खालील-प्रमाणें भेद पडतात--

**कण्ठ्य**—अ, आ; क-वर्ग; ह् आणि विसर्ग.

**तालव्य**--इ, ई; च-वर्ग; आणि य्, श्.

**मूर्द्धन्य**—ऋ, ॠ; ट-वर्ग; आणि र्, ष्, ळ्.
**दन्त्य**— ऌ; त-वर्ग; आणि ल्, स्.
**ओष्ठ्य**— उ, ऊ; प-वर्ग;

कांहीं वर्णांचे उच्चार अनेक स्थानांपासून होतात. उदा०—**ङ्**, **ञ्**, **ण्**, **न्**, **म्**, यांचे उच्चार वर दिलेल्या स्थानांपासून होत असून, शिवाय नाकांतूनही होतात; म्हणून त्यांचें वर्गीय स्थानाशिवाय आणखी **नासिकास्थान**हीं मानितात.

'**व्**' ह्याचा उच्चार दांत व ओंठ ह्यांच्या साह्यानें होतो म्हणून त्याचें **दन्तौष्ठस्थान** आहे.

मराठींत च्, ज्, झ्, ह्यांचे उच्चार दोन प्रकारचे असतात. एक संस्कृतमधील विचार, चरित्र, वांछा, छत्र, जन, झंझावात, यांतील उच्चाराप्रमाणें नुसता तालव्य; उदा०—चपळ, चंबू, चिमटा, चेटूक, जितका, जेवणें, झेलणें, झिपरीं, इ०. आणि दुसरा चमचा, चोर, चारा, जड, जाणें, जावई, झाड, झगडा, यांतील उच्चाराप्रमाणें दांत व तालु ह्यांच्या साह्यानें; म्हणून ह्या दुसऱ्या प्रकारच्या उच्चाराच्या च्, ज्, झ्, ह्यांस **दन्ततालव्य** असें म्हणतात.

**ए**, **ऐ**, यांचें **कंठतालुस्थान** व **ओ**, **औ**, यांचें **कंठौष्ठस्थान** आहे; कारण ते वर्ण त्या त्या दोन स्थानांपासून निघतात.

[ **इ** ] संस्कृतांत **अघोष-वर्ण** व **घोष-वर्ण** असेही दोन भेद मानिले आहेत. पहिल्यांच्या उच्चारांत श्वासाचा उपयोग होतो; व दुसऱ्यांच्या उच्चारांत नादाचा उपयोग होतो. ( यांनाच अनुक्रमें **कठोर वर्ण** व **मृदु वर्ण** असें म्हणतात.

सगळे स्वर व प्रत्येक वर्गांतील शेवटचीं तीन व्यंजनें, य्, व् र्, ल् आणि ह् व ळ् हे **मृदु-वर्ण** होत.

प्रत्येक वर्गांतील पहिलीं दोन व्यंजनें, आणि श्, ष्, स्, हे **कठोर वर्ण** होत.

[ **ई** ] वर्ण उच्चारितांना मुखाचें द्वार साफ उघडें राहणें, तें साफ बंद राहणें, अर्धवट उघडें राहणें किंवा अर्धवट बंद राहणें, ह्यावरून वर्णांचे अनुक्रमें **विवृत**, **स्पर्श**, **अन्तस्थ** व **ऊष्म** असेही भेद मानिले आहेत. त्यांस अनुसरून क्रमानें पुढीलप्रमाणें वर्गीकरण होतें—

(१) **विवृत वर्ण**—अ, आ, इ० सर्व स्वर
(२) **स्पर्श वर्ण**—क्-पासून म्-पर्यंतचीं व्यंजनें
(३) **अन्तस्थ वर्ण**—य्, व्, र्, ल्, (यांस अर्धस्वर असेही म्हणतात)
(४) **ऊष्म वर्ण**—श्, ष्, स्, ह्

[ 'ळ्' चा अंतर्भाव स्पर्श वर्णांत करितात. याच भेदांस अनुसरून आपल्या वर्ण-मालेचा क्रम ठरविलेला असावा ].

[ **उ** ] ज्या वर्णांच्या उच्चारांत ह्-काराचें प्राबल्य ज्यास्त असतें, त्यांस **महाप्राण** व बाकीच्यांस **अल्पप्राण** वर्ण असें म्हणतात. उदा०—

| **अल्पप्राण** | **महाप्राण** |
| --- | --- |
| क् ग् च् ज् ट् ड् त् द् प् ब् | ख् घ् छ् झ् ठ् ढ् थ् ध् फ् भ् |
| य् व् र् ल् ळ् | श् ष् स् ह् |

## स्वरांचे पोटभेद

[ १ ] स्वरांमध्यें कांहींचे उच्चार इतरांचे मानानें लांबट होतात; यावरून स्वरांचे **ऱ्हस्व व दीर्घ** असे दोन भेद पडतात.

अ, इ, उ, ऋ, ऌ हे **ऱ्हस्व** स्वर   आ, ई, ऊ, ॠ / ए, ऐ, ओ, औ } हे **दीर्घ** स्वर

यांपैकीं ए ऐ आणि ओ औ हे निरनिराळ्या स्थानच्या स्वरांपासून झाले असल्यामुळें त्यांना **संयुक्त स्वर** म्हणतात. [ अ + अ = आ; इ+इ=ई; उ + उ = ऊ; आणि ऋ + ऋ = ॠ. याप्रमाणें दोन ऱ्हस्व स्वरांच्या मिश्रणानें जरी आ, ई, ऊ, ॠ, हे दीर्घ स्वर बनतात, तरी ते एकाच स्थानचे असल्यामुळें त्यांस संयुक्त स्वर म्हणत नाहींत ].

[ २ ] एकाच स्थानचे जे स्वर त्यांस **सजातीय** स्वर म्हणतात. उदा० – अ व आ; इ व ई; उ व ऊ, आणि ऋ व ॠ.

भिन्न स्थानचे जे स्वर त्यांस **विजातीय** स्वर म्हणतात. उदा०–अ व इ; ई व आ; उ व अ; इ०.

## व्यंजनांचे पोटभेद

निरनिराळ्या स्थानच्या पहिल्या पंचवीस व्यंजनांचे पांच गट अथवा **वर्ग** केले आहेत. उदा०—क् ख् ग् घ् ङ् यांचा एक गट; च् छ् ज् झ् ञ् यांचा एक गट; ट् ठ् ड् ढ् ण् यांचा एक गट; त् थ् द् ध् न् यांचा एक गट; प् फ् ब् भ् म् यांचा एक गट. प्रत्येक गटांतील पहिल्या अक्षरावरून त्या त्या गटास

अनुक्रमें **क-वर्ग, च-वर्ग, ट-वर्ग, त-वर्ग** आणि **प-वर्ग** असें म्हणतात. ह्या पंचवीस व्यंजनांसच वर्गीय किंवा स्पर्श व्यंजनें म्हणतात. बाकीच्यांस स्थानपरत्वें जरी वरील गटांत सामील करतां येण्यासारखें आहे, तथापि तशी पद्धति नाहीं. त्यांचीं स्थानें वर दिलींच आहेत.

## उच्चार

मराठींत सामान्यतः प्रत्येक वर्णाचा ठराविक एक उच्चार असतो. कांहीं ठिकाणीं जो फरक आहे तो थोडक्यांत येथें दाखविला आहे.

अनुस्वाराचे उच्चार मराठींत निरनिराळ्या प्रकारचे होतात.

[ १ ] केव्हां, असें, मध्यें, जें, तें, यांच्याप्रमाणें नाकांतून;

[ २ ] घंटा, तंटा, भित, चिंच, यांच्याप्रमाणें खणखणीत.

या खणखणीत उच्चारामध्येंही कांहीं ठराविकपणा आहे. तो असाः—

( **अ** ) अनुस्वाराच्या पुढें जर पांच वर्गांतील कोणतेंही व्यंजन आलें, तर त्या व्यंजनाच्या वर्गांतील शेवटच्या अनुनासिकाचा अनुस्वाराबद्दल उच्चार होतो. उदा०—ङ्-शंकर, पंखा; ञ्-चंची, अंजन; ण्-घंटा, पंडित; न्-पंत, मंद; म्-गुंफणें, शुंभ; इ०.

( **आ** ) अनुस्वारापुढें य्, ल्, हे वर्ण आले असतां अनुस्वाराचा उच्चारही यँ, लँ, याप्रमाणें होतो, उदा०—संयोग, संलग्न, इ०.

( **इ** ) अनुस्वारापुढें बाकीचीं म्हणजे र्, व्, श्, ष्, स्, ह्, हीं व्यंजनें आलीं असतां अनुस्वाराचा उच्चार वँ सारखा होतो. उदा०—संरक्षण, संवाद, संशय, दंष्ट्रा, संसार, संहार, इ०.

केव्हां केव्हां अनुस्वाराचा उच्चार नाकांतून हवा असतां खणखणीत किंवा खणखणीत हवा असतां नाकांतून असा केल्यानें अर्थांत देखील फरक पडतो. उदा०—**वेदांत** म्हणजे वेद-ग्रंथांत, आणि **वेदान्त** म्हणजे एका शास्त्राचें नांव; **दांत** म्हणजे अन्न चावण्याचें साधन; आणि **दान्त** म्हणजे इंद्रियांचें दमन करणारा. अशा प्रकारे पडणारा फरक स्पष्ट व्हावा म्हणून अनुस्वाराचा खणखणीत उच्चार होत असेल तेथें संस्कृत शब्दांच्या बाबतींत अनुनासिक व्यंजनच लिहिणें अधिक सोयीचें होईल ].

विसर्गाचा उच्चार 'ह्' कारासारखा होतो. उदा०—दुःख, अंतःकरण, प्रायः, छीः, थूः, इत्यादि.

[ **"पुढें अनुस्वार विसर्ग येतो, संयोग ऱ्हस्वास गुरुत्व देतो"** हा नियम संस्कृतामध्यें जसा पूर्णत्वानें पाळला जातो, तसा तो मराठींत पाळला जात नाहीं. कित्येक वेळां तो पाळलेला आढळतो व कित्येक वेळां आढळत नाहीं. उदा०—सुंठ, चिंधी, दुःख, दुःशासन, सत्य, विश्व, इत्यादि मराठी व मराठींत आलेल्या संस्कृत शब्दांत तो पाळलेला आहे; परंतु जंव, तंव, नद्या, उचल्या, पुन्हां, ज्ञानप्रकाश, इ० शब्दांत तो पाळलेला आढळत नाहीं. तथापि गद्यापेक्षां पद्यांत मात्र हा नियम बहुश: पाळलेला आढळतो ].

## संधि

एकापुढें एक येणारे जवळजवळचे वर्ण एकत्र होण्याच्या प्रकारास **संधि** असें म्हणतात.

मनुष्याच्या जलद बोलण्याच्या सहज प्रवृत्तीनें सांधण्यास योग्य असे जवळ-जवळचे दोन वर्ण एकमेकांत मिसळले जातात; आणि तसें होतांना कांहीं वर्ण गळून किंवा निराळे होऊन शब्द बनतो. ( उ०—Can+not याचा उच्चार 'कान्ट्', Do+not याचा उच्चार 'डोंट्', असा होतो. नववर–नवरा, सुकें केळें–सुकेळें, इ० इंग्रजी मराठी शब्द ). ह्या मिश्रणाच्या कांहीं ठराविक रीतीवरूनच संधींसंबंधीं कांहीं निश्चित नियम ठरविण्यांत आले असावे. संस्कृतांत भिन्न शब्द असले तरी संधिनियम अबाधितपणें पाळले जातात. मराठींत भिन्न शब्दांचा संधि करण्याची पद्धति नाहीं. उदा०—'राम आई-जवळ पेरू मागतो' ह्यांत राम व आई ह्यांचा रामाई असा संधि मराठींत करीत नाहींत; तथापि मराठींत संस्कृत संधियुक्त शब्दांचा भरणा पुष्कळ असल्यामुळें संधींच्या नियमांसंबंधीं मराठीच्या अभ्यासकांस अवश्य माहिती पाहिजे ].

संधि तीन प्रकारचे आढळून येतात. ( १ ) **स्वर-संधि**, ( २ ) **व्यंजन-संधि** आणि ( ३ ) **विसर्ग-संधि**.

ज्या संधीमध्यें जवळ-जवळचे दोन स्वर एकत्र मिळतात, त्यास **स्वर-संधि** म्हणतात.

जेव्हां संधि होणाऱ्या वर्णांतील पहिला वर्ण व्यंजन असतो व दुसरा वर्ण व्यंजन किंवा स्वर असतो, तेव्हां त्या दोहोंमिळून होणाऱ्या संधीस **व्यंजन-संधि** म्हणतात.

जेव्हां संधि होणाऱ्या वर्णांतील पहिला वर्ण विसर्ग असतो व दुसरा व्यंजन किंवा स्वर असतो, तेव्हां त्या दोहोंमिळून होणाऱ्या संधीस **विसर्ग-संधि** म्हणतात.

दोन वर्णांचा संधि होतांना ( १ ) केव्हां दोहोंबद्दल पहिला वर्णच कायम राहतो, उ०-खिडकींत; ( २ ) केव्हां त्या दोहोंबद्दल दुसरा वर्ण कायम राहतो, उ०-घरांत; ( ३ ) किंवा त्या दोहोंबद्दल निराळाच वर्ण येतो, उ०-गणेश; ( ४ ) केव्हां दोहोंचाही बदल होतो, उ०-सच्छिष्य; ( ५ ) केव्हां दोन्ही शिल्लक राहतात, उ०-सत्कविः आणि ( ६ ) केव्हां एखाद्याचाच लोप होतो, उदा०--अतः + एव = अतएव; असे सहा प्रकार आढळतात.

संधीसंबंधीचा विचार करितांना खालील गोष्टींची माहिती असणें जरूर आहे.

( १ ) इ किंवा ई ह्यांचेबद्दल **ए**; उ किंवा ऊ ह्यांचेबद्दल **ओ**; ऋ किंवा ॠ ह्यांचेबद्दल **अर्** आणि ऌ बद्दल **अल्** येतो, तेव्हां त्यास '**गुण**' असें म्हणतात. ( उ०--भिद्-भेद, मुद्-मोद, तॄ-तर् ).

( २ ) **अ** बद्दल **आ**; इ किंवा ई बद्दल **ऐ**; उ किंवा ऊ बद्दल **औ**; ऋ किंवा ॠ बद्दल **आर्** आणि ऌ बद्दल **आल्** येतो, तेव्हां त्यास '**वृद्धि**' असें म्हणतात. ( उ०-रम्-राम, ईश्वर-ऐश्वर्य, उदार-औदार्य, कृ-कार्य ).

( ३ ) एका वर्णाचे जागीं दुसरा वर्ण येतो, तेव्हां त्यास '**आदेश**' असें म्हणतात. ( गुण व वृद्धि हे आदेशच आहेत. उ०--अत्यन्त, मन्वन्तर ).

( ४ ) मध्येंच एखाद्या ज्यास्त वर्णाची किंवा अक्षराची भर पडते, त्यास '**आगम**' असें म्हणतात. ( कर + तो = करितो, येथें 'इ' हा आगम ).

( ५ ) ऱ्हस्व किंवा दीर्घ इ, उ, ऋ, ऌ, ह्यांबद्दल अनुक्रमें य्, व्, र्, ल्, असे आदेश होतात, त्यांस '**यणादेश**' असें म्हणतात. ( अत्यन्त, मन्वन्तर ).

( ६ ) कधीं कधीं य्, व्, र्, ल्, ह्यांच्याबद्दल अनुक्रमें इ, उ, ऋ, ऌ, येतात, तेव्हां त्यांस '**संप्रसारण**' असे म्हणतात ( यज् + ति = यष्टि वच् + ति = उक्ति ).

खालील कोष्टकावरून **दीर्घादेश**, **गुणादेश**, **वृद्ध्यादेश**, व **यणादेश**, ह्यांचा नीट उलगडा होईल.

| स्वर | दीर्घादेश | गुणादेश | वृद्ध्यादेश | यणादेश |
|---|---|---|---|---|
| इ ई | ई | ए | ऐ | य् |
| उ ऊ | ऊ | ओ | औ | व् |
| ऋ ॠ | ॠ | अर् | आर् | र् |
| ऌ | | अल् | आल् | ल् |

अ ह्याची आ ही वृद्धि होय. उदा०--दशरथ याचें दाशरथि, भगीरथ याचें भागीरथी, रम् याचें राम, यांत प्रथमाक्षरांतील अची आ ही वृद्धि झालेली आहे.

## स्वरसंधि

[ १ ] दोन सजातीय स्वर एकापुढें एक आले असतां त्या दोहोंबद्दल त्यांचाच दीर्घ स्वर होतो. ( त्यास **दीर्घादेश** संधि म्हणतात ).

( **क** ) अ किंवा आ + अ किंवा आ = **आ.** सुर + असुर = सुरासुर; देव + आलय = देवालय: विद्या + अर्थी=विद्यार्थी; महिला + आश्रम = महिलाश्रम.

( **ख** ) इ किंवा ई + इ किंवा ई = **ई**, कवि + इच्छा = कवीच्छा; ऋषि + ईश्वर = ऋषीश्वर; देवी + इच्छा = देवीच्छा; पार्वती + ईश = पार्वतीश.

( **ग** ) उ किंवा ऊ + उ किंवा ऊ = **ऊ.** गुरु + उपदेश = गुरूपदेश; लघु + ऊर्मि = लघूर्मि; भू + उद्धार = भूद्धार; भू + उर्जित = भूर्जित.

[ **घ** ] ऋ किंवा ॠ + ऋ किंवा ॠ = **ॠ.** मातृ + ऋण = मातॄण; पितृ = ऋण = पितॄण.

[ २ ] अ किंवा आ ह्यांचे पुढें इ, उ, ऋ, ऌ, ऱ्हस्व किंवा दीर्घ आले असतां त्या दोहोंच्याबद्दल दुसऱ्या स्वराचा **गुण** होतो. उदा०—

( **क** ) अ किंवा आ+इ किंवा ई=**ए.** ईश्वर+इच्छा=ईश्वरेच्छा; गण+ईश=गणेश; यथा+इष्ट=यथेष्ट; लंका+ईश्वर=लंकेश्वर.

( **ख** ) अ किंवा आ + उ किंवा ऊ = **ओ.** सूर्य + उदय = सूर्योदय; एक + ऊन = एकोन; धारा + उष्ण = धारोष्ण; गंगा+ऊर्मि=गंगोर्मि.

( **ग** ) अ किंवा आ + ऋ किंवा ॠ = **अर्**. देव+ऋषि = देवर्षि; महा+ऋषि = महर्षि. [ ‘ ॠ ’ शब्दाचे आरंभीं येत नसल्यानें तो पुढें आल्याचें उदाहरण नाहीं ].

( **घ** ) ऌचा अल् झाल्याचेंही मराठींत उदाहरण नाहीं,

[ अपवाद-स्व ईर = स्वैर; अक्ष + ऊहिनी = अक्षौहिणी; प्र + ऊढ= प्रौढ; दश + ऋण = दशार्ण; सुख + ऋत = सुखार्त. हे संधि वरील नियमांस अनुसरून होत नाहींत. मराठींत हे शब्द येतात म्हणून ते दिले आहेत ].

[ ३ ] अ किंवा आ ह्यांच्या पुढें ए किंवा ऐ आल्यास त्या दोहोंबद्दल **ऐ** व ओ किंवा औ आल्यास त्या दोहोंबद्दल **औ** असे आदेश होतात. उदा०—

( **क** ) एक+एक=एकैक; देव+ऐश्वर्य=देवैश्वर्य; सदा+एव=सदैव; प्रजा+ऐक्य=प्रजैक्य.

( **ख** ) भव+ओषाधि=भवौषाधि; बाल+औत्सुक्य=बालौत्सुक्य; गंगा+ओघ=गंगौघ; रमा+औदार्य=रमौदार्य.

[ अपवाद—अ किंवा आ यांचे पुढें ओष्ठ शब्द आला असतां विकल्पानें ओ किंवा औ होतो. उदा०—अधर+ओष्ठ=अधरोष्ठ किंवा अधरौष्ठ, बिंबोष्ठ किंवा बिंबौष्ठ, इ०. मराठींत ओ होण्याकडे ज्यास्त प्रवृत्ति आढळते ].

[ ४ ] इ, उ, ऋ, ऌ, ऱ्हस्व किंवा दीर्घ यांच्या पुढें विजातीय स्वर आला असतां त्यांच्या जागीं अनुक्रमें **य्**, **व्**, **र्**, **ल्**, होतात. उदा०—

( **क** ) प्रीति+अर्थ=प्रीत्यर्थ; अति+आनंद=अत्यानंद; याचप्रमाणें अत्युत्तम, प्रत्येक, देव्यैश्वर्य, मत्योघ, देव्यौदार्य, अत्यन्त, इ०.

( **ख** ) मनु+अंतर=मन्वंतर; याचप्रमाणें हेत्वाभास, गुर्विच्छा, गुर्वीश, अन्वेषण, मन्वैश्वर्य, मन्वोघ, गुर्वौत्सुक्य, इ०.

( **ग** ) पितृ+अर्थ=पित्रर्थ; याचप्रमाणें मात्रानंद, मात्रिच्छा, मात्रुत्सव, इ०.

( **घ** ) ऌ चा ल् झाल्याचें मराठींत उदाहरण नाहीं.

( ५ ) ए, ऐ, ओ, औ, ह्यांच्यापुढें कोणताही स्वर आला असतां त्याचे जागीं अनुक्रमें **अय्**, **आय्**, **अव्**, **आव्**, असे आदेश होऊन पुढील स्वर त्यांत मिळतो. उदा०—

| | |
|---|---|
| ने+अन=नयन | गो+ऐश्वर्य=गवैश्वर्य |
| गै+अन=गायन | गो+ईश्वर=गवीश्वर |
| | नौ+इक =नाविक |

[ ६ ] निव्वळ मराठी शब्दांत केव्हां केव्हां संधियुक्त अक्षरांपैकीं पहिलें अक्षर कायम राहून दुसऱ्याचा लोप होतो; त्यास **पूर्वरूप संधि** म्हणतात. उदा०—खिडकी+आंत=खिडकींत, केलें+असें=केलेंसें, इ०.

[ ७ ] निव्वळ मराठी शब्दांत केव्हां केव्हां संधियुक्त अक्षरांपैकीं दुसरें अक्षर कायम राहून पहिल्याचा लोप होतो; त्यास **पररूप संधि** म्हणतात. उदा०—हात+ऊन=हातून; घर+ई=घरीं; इ०.

ह्याप्रमाणें मराठींत एकंदर **सात** मुख्य स्वरसंधि आहेत.

[ केव्हां केव्हां संधि होणें योग्य असून होत नाहीं; किंवा संधि करणें अयोग्य असून केला जातो; ह्या गोष्टी दोषयुक्त होत. 'कांहीं काव्य-दोष'

या प्रकरणांत त्यांचीं उदाहरणें दिलीं आहेत. ( एकेक उदा०—**स्व-अनुरूप** परस्पर दंपती, सौदागरांनीं **धरिलाऽधमासी** ).

## व्यंजनसंधि

[ १ ] पहिल्या पांच वर्गांतील, अनुनासिकाशिवाय कोणत्याही व्यंजनापुढें, **कठोर** व्यंजन आलें असतां, पहिल्याबद्दल त्याच्याच वर्गांतील **पहिलें कठोर** व्यंजन होतें. उदा०—शरद् + काल = शरत्काल; ककुभ् + प्रांत = ककुप्प्रांत, इ०.

[ २ ] पहिल्या पांच वर्गांतील, अनुनासिकाशिवाय कोणत्याही व्यंजनापुढें **मृदुवर्ण** आला असतां पहिल्याबद्दल त्याच्याच वर्गांतील तिसरें म्हणजे **पहिलें मृदु** व्यंजन होतें. उदा०—वाक्+विहार=वाग्विहार, अच्+आदि = अजादि: षट्+आनन = षडानन; सत् + आचार = सदाचार; अप् + ज = अब्ज, इ०.

**टीप**—हे नियम लावितांना च्, ज् व श् यांबद्दल क् होतो. उदा०—वाच् ( क् ) + ईश = वागीश; स्रज् ( क् ) + विन् = स्रग्विन्; दृश् ( क् ) + गोचर=दृग्गोचर, इ०.

[ ३ ] पांच वर्गांतील कोणत्याही व्यंजनापुढें अनुनासिक आल्यास, पहिल्याबद्दल त्याच्याच वर्गांतील **अनुनासिक** होतें ( किंवा मागील नियम २ प्रमाणें **तिसरें व्यंजन** होतें; परंतु पहिला प्रकारच ज्यास्त रूढ आहे. ) उदा०—षट्+मास = षण्मास अगर षड्मास; वाक् + मन = वाङ्मन अगर वाग्मन; जगत् + नाथ = जगन्नाथ अगर जगद्नाथ, इ०.

या सामान्य नियमांशिवाय कांहीं विशेष नियम आहेत, ते पुढें दिले आहेतः—

[ ४ ] ( क ) **त्** या व्यंजनापुढें च्, छ्, आल्यास त् बद्दल **च्** होतो; व ज्, झ्, आल्यास **ज्** होतो. उदा०—सत् + चरित्र = सच्चरित्र; उत् + छेद = उच्छेद; उत् + ज्वल = उज्ज्वल; शरत् + झंझावात् = शरज्झंझावात; इ०.

( ख ) **त्** या व्यंजनापुढें ट आल्यास त् बद्दल **ट्**, आणि ड् आल्यास त् बद्दल **ड्** हें व्यंजन येतें. उदा०—तत् + टीका = तट्टीका; भगवत् + डमरू = भगवड्डमरू, इ०.

( ग ) **त्** च्यापुढें ल् आल्यास त् बद्दल ल्च होतो. उदा०—तत् + लीन = तल्लीन; उत् + लंघन = उल्लंघन, विद्युल्लता, भूभृल्ललाम, इ०.

( घ ) त् पुढें श् आल्यास त् चा च् व श्चा छ् होतो. उदा०—सत् +शिष्य=सच्छिष्य, उत्+शिष्ट=उच्छिष्ट, सच्छात्र, मृच्छकटिक, इ०.

[ ५ ] संधि होतांना पहिलें व्यंजन ग् ज् ड् द् ब् यांपैकीं एक असून, त्यापुढें 'ह्' हें व्यंजन आलें असेल तर 'ह्' बद्दल विकल्पानें मागील व्यंजनाच्या वर्गांतील चौथें व्यंजन होतें. उदा०—वाच्+हरि=वाग्हरि किंवा वाग्घरि; उत्+हरण=उद्हरण किंवा उद्धरण, इ०.

[ ६ ] न्-कारान्त शब्दापुढें दुसरा शब्द येऊन, सामासिक शब्द होत असेल, तर न्-कारान्त शब्दांतील न् चा लोप होतो. उदा०—राजन्+आज्ञा= राजाज्ञा, हास्तिन्+दन्त=हस्तिदन्त, फणींद्र, राजगृह, प्राणिमात्र, इ०.

[ ७ ] एकाच शब्दांत न् चे मागें ऋ, र् किंवा ष् असल्यास न् चा ण् होतो. ( मात्र न् आणि ऋ, र् किंवा ष्, या दोहोंच्या मध्यें क व प या वर्गांतील व्यंजन; य, व, र, ह, विसर्ग; किंवा स्वर; ह्यांशिवाय अन्य कोणताही वर्ण येतां कामा नये ). उदा०—भाष्+अन=भाषण; राम+अयन=रामायण; रक्ष्+अनीय=रक्षणीय; इ०. परंतु सम्+आराधना=समाराधना, रचना, ( यांत र व न यांच्यामध्यें अनुक्रमें 'ध' व 'च' हे वरीलशिवाय अन्य वर्ण आले आहेत म्हणून न् चा ण् झाला नाहीं ).

[ ८ ] म्-कारापुढें पांच वर्गांतील व्यंजनें आल्यास म्-बद्दल पुढच्या व्यंजनाच्या वर्गांतील अनुनासिक होतें किंवा मागील अक्षरावर अनुस्वार देतात. उदा०-सम्+गति=सङ्गति किंवा संगति; सम्+ताप=सन्ताप किंवा संताप, इ०. ( स्वर आल्यास बाराखडींतल्याप्रमाणें तो त्यांत मिळून जातो. सम्+आश्रय=समाश्रय, समाप्ति, इ०. )

[ ९ ] प्रति, अधि, अनु, नि, वि, ह्या उपसर्गांपुढें स् आल्यास स् बद्दल ष् होतो उदा०—प्रति+संग=प्रतिषंग, नि+सिद्ध=निषिद्ध, वि+सम=विषम, अधि+स्थान=अधिष्ठान, अनुष्ठान, इ०.

**टीप**—संस्कृत स्तृ, स्मृ, सृ, ह्या धातूंपासून निघालेले शब्द वरील उपसर्गांपुढें आल्यास स् चा ष् होत नाहीं. उदा०—वि+स्मरण=विस्मरण, अनु+सरण=अनुसरण, वि+स्तीर्ण=विस्तीर्ण, इ०.

[ १० ] ऱ्हस्व स्वरापुढें छ आल्यास तो छ द्वित्त होतो; परंतु दोन महाप्राण वर्ण एकत्र होत नसल्यामुळें पहिल्या छचा च् होतो. उदा०—वृक्ष+छाया= वृक्षच्छाया, समच्छेद, इ०.

**टीप**—क्वचित् दीर्घ अक्षरापुढें छ आल्यासही त्याबद्दल च्छ होतो. उदा०— आ+छादन=आच्छादन, लक्ष्मी+छाया=लक्ष्मीच्छाया. इ०.

[ ११ ] अहन् या शब्दापुढें मृदु व्यंजन आल्यास न्‌चा र् होतो. उदा०— अहन्+गण=अहर्गण, अहन्+निशा=अहर्निश.

**टीप**— अहन् यापुढें रूप, रात्रि, हे शब्द आले असतां न् बद्दल उ होतो, व तो मागील अ-मध्यें मिळून, त्यांचा ओ होतो. उदा०—अहन्+रूप= अहोरूप, अहन्+रात्रि=अहोरात्र.

## विसर्गसंधि

[ १ ] विसर्गाच्या मागें अ व पुढें मृदुवर्ण आल्यास विसर्गाचा उ होतो व तो मागील अ-मध्यें मिळून **ओ** होतो. उदा०—अधः+वदन=अध+उ+ वदन=अधोवदन, मनः +राज्य=मनोराज्य, तपः+बल=तपोबल, इ०.

[ २ ] विसर्गाच्या मागें अ आ याशिवाय स्वर व पुढें मृदुवर्ण आल्यास, विसर्गाचा र् होतो. उदा०—निः +विकार=निर्विकार, दुः+आत्मा=दुरात्मा, बहिः+द्वार=बहिर्द्वार, निर्लोभ, निरंतर, इ०.

१. **टीप**—'र्' च्या पुढें र आल्यास पहिल्या 'र्' चा लोप होऊन मागें ऱ्हस्व स्वर असल्यास तो दीर्घ होतो. उदा०—निर+रस=नीरस, निर्+ रदन=नीरदन, इ०.

२. **टीप**—विसर्ग र्-पासून झालेला असून त्याच्या मागें 'अ' व पुढें मृदु वर्ण आल्यास, विसर्गातील र् तसाच राहतो. उदा०—पुनर्+जन्म=पुनर्जन्म, अन्तर्+आत्मा=अन्तरात्मा, अन्तर्+गत=अन्तर्गत, इ०.

[ ३ ] विसर्गापुढें क ख प फ हे कठोर वर्ण आल्यास, विसर्ग कायम राहतो. उदा०—रजः+कण=रजःकण, अधः +पतन=अधःपतन, इ०.

**टीप**—विसर्गाच्या मागें इ-कार किंवा उ-कार असून, पुढें क ख प फ हे वर्ण आल्यास, विसर्गाचा ष् होतो. उदा०—निः +कारण=निष्कारण, निः + पाप=निष्पाप, दुः + परिणाम=दुष्परिणाम, इ०.

[ ४ ] विसर्गापुढें च छ आल्यास विसर्गाचा **श्**, ट ठ आल्यास विसर्गाचा **ष्**, व त थ आल्यास विसर्गाचा **स्** होतो. उदा०—शनैः + चर=शनैश्चर, रामः + टीकते=रामष्टीकते, चक्षुः+तेज=चक्षुस्तेज, निस्तेज. इ०.

[ ५ ] विसर्गापुढे श, ष, स. हे आल्यास, विसर्ग कायमच राहतो किंवा त्याबद्दलही अनुक्रमें श्, ष्, स्, होतात. उदा०— दुः + शासन = दुःशासन किंवा दुश्शासन. निः + संदेह = निःसंदेह किंवा निस्संदेह, इ०.

**टीप**—विसर्गाच्या पुढें 'कृ' धातूंचीं रूपें आल्यास, विसर्गाचा **स्** होतो. उदा०—तिरः + कार = तिरस्कार, यशः + कर = यशस्कर, नमस्कार, इ०.

[ ६ ] विसर्गाच्या मागें अ व पुढें अ शिवाय दुसरा स्वर आल्यास विसर्गाचा लोप होतो. उदा०—अतः + एव = अतएव, इ०.

संधींची प्रवृत्ति संस्कृत भाषेंत फार; ह्यामुळें मराठींत ज्या प्रकारचे संस्कृत शब्द सामान्यतः येतात, तेवढ्याचपुरती माहिती येथें दिली आहे. कांहीं उदाहरणें निव्वळ संस्कृतांतील आहेत.

---

# शब्द-विचार

एक किंवा अनेक वर्णांच्या समुच्चयापासून कांहीं अर्थ कळत असेल तर त्याला **शब्द** असें म्हणतात. उदा०—हा, तो, आ, ऊ, घोडा, कुत्रा, आरसा, चांगला, वाईट, जातो, करील, आणि, हळू, मध्यें, इ०.

[ एका वर्णाचा देखील शब्द असतो. 'आ' ह्या वर्णानें उघडें तोंड हा अर्थ समजतो; 'ऊ' ह्या वर्णानें डोक्यावरील केसांतील एक प्राणी हा अर्थ आपल्या ध्यानांत येतो; म्हणून 'आ,' 'ऊ,' हे ह्या ठिकाणीं शब्द आहेत ].

शब्द-विचारांत ( १ ) शब्दांचे प्रकार म्हणजे जाति व त्यांचे पोटभेद, ( २ ) शब्दांचे विकार, आणि ( ३ ) शब्दांची साधनिका, ह्या गोष्टींचा प्रामुख्यानें समावेश होतो. ह्यांपैकीं शब्दांची साधनिका व्युत्पत्ति-प्रकरणांत मागील पहिल्या विभागांत येऊन गेलीच आहे. त्यांशिवाय बाकीच्या उरलेल्या गोष्टींचा आतां क्रमानें विचार करू.

[ येथें एक गोष्ट ध्यानांत ठेवावयास पाहिजे; ती अशी कीं, मराठींत 'घोडा,' 'गाडी,' ह्या मूळ शब्दांना आणि 'घोड्यांस,' 'गाडींत,' ह्या प्रत्यय-युक्त रूपांना **शब्द** असेंच म्हणतात; तसेंच 'खा' हा शब्द व त्याला प्रत्यय लागून झालेलीं खातो, खाईन, खाऊन, खातांना, हीं रूपेंही शब्दच; इतक्या विस्तृत अर्थानें ह्या शब्दाची येथें योजना आहे ].

## शब्दांचे भेद

आपल्या भाषेंत कांहीं शब्द निरनिराळ्या रीतींनीं बदललेले आढळतात; व कांहीं शब्द कधींच बदलत नाहींत; ते कोठेंही जसेच्या तसेच उपयोगांत आलेले आढळतात; यावरून शब्दांचे मुख्यतः दोन भेद पडतात. ( १ ) **विकारी** व ( २ ) **अविकारी.**

( १ ) जे शब्द वाक्यांत उपयोगांत येतांना त्यांच्या रूपांत बहुधा कोणत्या तरी प्रकारचा बदल होतो, त्यांस **विकारी** शब्द असें म्हणतात. उदा०—मनुष्य, तो, चांगला, जा, इ०.

( २ ) ज्या शब्दांचा वाक्यांत केव्हांही कोणत्याही प्रकारचा बदल न होतां नेहमीं उपयोग केला जातो, त्यांस **अविकारी** शब्द असें म्हणतात. उदा०—हळू, जर, तर, आणि, छेः, परंतु, इ०.

विकारी शब्दांमध्यें चार पोट-भेद आढळतात. **नाम, सर्वनाम, विशेषण** व **क्रियापद**; आणि अविकारी शब्दांमध्येंही चार पोट-भेद आढळतात. **क्रियाविशेषण, उभयान्वयी, शब्दयोगी** व **केवल-प्रयोगी**; अविकारी शब्दांत व्यय म्हणजे बदल होत नाहीं, म्हणून त्यांस **अव्ययें** असेंही म्हणतात.

## नामें

खऱ्या अथवा काल्पित सृष्टींतील कोणत्याही वस्तूचें नांव दर्शविणारा जो विकारी शब्द त्यास **नाम** असें म्हणतात. उदा०—रामा, गोविंदा, मनी, पुस्तक, अक्षर, देव, औदार्य, चांगुलपणा, इ०.

[ वरील ठिकाणीं ‘ वस्तु ’ शब्दाचा उपयोग पदार्थ या एकाच अर्थानें केला नसून, प्राणी, पदार्थ किंवा त्यांच्या ठिकाणचा धर्म, या सर्वांस येथें ‘ वस्तु ’ असेंच व्यापक अर्थानें म्हटलें आहे. ]

कांहीं नामें पदार्थ किंवा प्राणी यांचीं वाचक असतात; आणि कांहीं त्यांच्या अंगच्या गुणांचीं किंवा धर्मांचीं वाचक असतात; यामुळें नामांचे अशा दृष्टीनें **धर्मिवाचक** व **धर्मवाचक** असे दोन भेद पडतात.

धर्मिवाचक नामांचे पुनः दोन प्रकार आढळतातः **विशेषनामें** आणि **सामान्यनामें.**

ज्या नामानें एकाच धर्मीचा म्हणजे प्राण्याचा, पदार्थाचा, संस्थेचा किंवा स्थलाचा बोध होतो, त्यास **विशेषनाम** म्हणतात. उदा०—गोपाळ, नर्मदा, हिंदुस्थान, निर्णयसागर, अनाथबालिकाश्रम, इ०.

ज्या नामानें अनेक धर्मींचा अथवा धर्मिसमुदायांचा म्हणजे त्यांच्या जातीचा किंवा वर्गाचा बोध होतो, त्यास **सामान्यनाम** म्हणतात. उदा०—मनुष्य, दांत, पेटी, अरण्य, ग्रंथसंग्रह, इ०.

[ विशेषनामें हीं **एक-व्यक्तिवाचक** असतात; परंतु सामान्यनामें हीं **अनेक-व्यक्तिवाचक** म्हणजेच त्या त्या सबंध जातीचा बोध करणारीं असतात. उदा०—'गोपाळ' म्हटलें म्हणजे ज्यास अनुलक्षून आपण हाक मारतों ती **एकच व्यक्ति** होय. 'नर्मदा' म्हटलें तर ज्या नदीला, मुलीला किंवा गाईला अनुलक्षून आपण तें नांव उच्चारतों ती **एकच व्यक्ति** होय; त्या ठराविक व्यक्तीशिवाय दुसऱ्याला तो शब्द लागू पडत नाहीं. पण 'मनुष्य' म्हटल्यानें तो तशा प्रकारच्या प्राण्यांच्या सर्व जातीला लागू पडणारा शब्द आहे; केवळ एकाच व्यक्तीला लागू पडणारा नाहीं ].

ज्या नामानें प्राणी अथवा पदार्थ ह्यांच्यामधील धर्माचा, गुणाचा किंवा भावाचा बोध होतो, त्याला **धर्मवाचक** किंवा **भाववाचक** नाम असें म्हणतात. उदा०—चांगलेपणा, शौर्य, वक्तृत्व, विद्वत्ता, गुलामागिरी, पाटिलकी, इ०.

[ विशेषनामें किंवा सामान्यनामें ह्यांच्या योगानें साक्षात् प्राणी किंवा वस्तु ह्यांचा बोध होतो. भाववाचक नामानें प्राणी किंवा वस्तु ह्यांचा बोध होत नसून, त्यांच्या अंगच्या धर्माचा किंवा गुणांचा तेवढा बोध होतो ].

ह्यांप्रमाणें **विशेषनाम, सामान्यनाम** व **भाववाचकनाम** असे नामांचे एकंदर तीन प्रकार आहेत.

कांहीं विशेषनामांचा केव्हां केव्हां सामान्यनामाप्रमाणें उपयोग होतो. उदा०—यंदांच्या श्रावणांत पांच **मंगळवार** आले आहेत; त्या **कैकेयीच्या** नादीं कोणीं लागावें ? विठ्ठलदास ठाकरसी हे **कर्ण**च होऊन गेले, इ०.

कांहीं सामान्यनामांचा विशेषनामांप्रमाणें उपयोग होतो. उदा०—पुरी ( जगन्नाथपुरी ), नगर ( अहंमदनगर ), लष्कर ( ग्वाल्हेर ), इ०. [ हिमालय, पंचवटी, मध्यप्रान्त, पंजाब, हे अशा प्रकारचे शब्द आहेत, पण त्यांचा आतां सामान्यनामाप्रमाणें उपयोग होत नसून, ते फक्त विशेषनामें म्हणूनच वापरण्यांत येतात ].

पुष्कळ वेळ विशेषणांचा नामाप्रमाणें उपयोग होतो उदा०—**शहाण्यास** मार शब्दांचा **आंधळ्यासी** जन सारेचि आंधळे **खोट्याच्या** कपाळीं कुऱ्हाडीचा घाव, इ०. अशा वेळीं त्यापुढें पुन: नाम येत नाहीं.

क्वचित् कांहीं अव्ययांचाही नामाप्रमाणें उपयोग होतो. उ०—त्याची **वाहवा** झाली, त्या मूर्खाची **छीथू** झाली, इ०.

केव्हां केव्हां एकादे अक्षर अगर शब्द नामाप्रमाणें वापरतात. उदा०—तुझ्या '**श्री**'ची वेलांटी नीट काढ; मोरोपंतांनीं 'परन्तु-रामायणांत' दरेक आर्येत '**परन्तु**'चा उपयोग केला आहे.

[ 'नाम म्हणजे नांव,' 'प्रत्येक पदार्थाच्या नांवाला नाम म्हणतात;' अशाप्रकारें कांहीं व्याकरणांतून केवळ शब्दार्थदर्शक अशा व्याख्या दिलेल्या असतात; पण त्या योग्य नव्हेत. व्याकरणांत पदार्थाचा कांहीं संबंध नसतो; **शब्दांच्या** जाति ठरवावयाच्या असतात; म्हणून ह्या पुस्तकांत दिल्याप्रमाणें यथार्थच व्याख्या असल्या पाहिजेत, इकडे लक्ष हवें. ]

**टीप**—य, त्व, ता, या संस्कृत प्रत्ययांनीं; पण, पणा, ई, की, ह्या मराठी प्रत्ययांनीं; आणि गिरी, शाई, ह्या फारसी प्रत्ययांनीं भाववाचक नामें साधतात. उदा०—( सं. ) सौंदर्य, माधुर्य, प्राचुर्य; शत्रुत्व, मित्रत्व, क्रूरत्व; मधुरता, क्रूरता, आढ्यता; ( म० ) मनुष्यपण, देवपणा; भलाई, नवलाई; पाटिलकी, आपुलकी; ( यवनी ) लुच्चेगिरी, भामटेगिरी, बेबंदशाई; इ०.

## सर्वनामें

स्वतःचा असा कांहीं विशेष अर्थ नसून, सर्व नामांच्याबद्दल उपयोगांत येणारा जो विकारी शब्द त्यास **सर्वनाम** असें म्हणतात. उदा०—मी, तूं, तो, हा, जो कोण, काय, आपण, स्वतः.इ०.

[ सर्वनाम हें नामाबद्दल उपयोगांत येतें; तें नामाचें प्रातीनिधि होऊन सर्व प्रकारें नामाचें कार्य करूं शकतें; तें वाटेल त्या नामाबद्दल म्हणजे सर्व नामांबद्दल उपयोगांत येतें; म्हणून तें एक प्रकारचें नामच होय असें समजतात; तथापि घोडा, गाडी, इ० नामांप्रमाणें त्यास स्वतःचा विशिष्ट अर्थ नाहीं, तें ज्या नामाबद्दल येतें त्याचा अर्थ तें धारण करतें. ]

संस्कृतांत **सर्व** शब्दाप्रमाणें जे शब्द अनियमित रीतीनें चालतात, त्यांस **सर्वनाम** असें म्हणतात.

मराठींत एकंदर सर्वनामें **नऊच** आहेत. **मी**, **तूं**, **तो**, **हा**, **जो**, **कोण**, **काय**, **आपण** व **स्वतः**.

[ **अ** ] ( १ ) बोलणारा किंवा लिहिणारा आपल्याबद्दल '**मी**' ह्या सर्वनामाचा उपयोग करितो. ( २ ) बोलणारा ज्याच्याशीं बोलतो त्याच्याबद्दल तो '**तूं**' ह्या सर्वनामाचा उपयोग करितो. ( ३ ) बोलणारा ह्या दोहोंशिवाय ज्या निराळ्या गोष्टीविषयीं किंवा प्राण्याविषयी बोलत असतो, त्याच्याबद्दल **हा**, **तो**, **जो**, **कोण**, **काय**, ह्या सर्वनामाचा उपयोग करितो.

बोलणारा तो **प्रथमपुरुष**, ज्याच्याशीं बोलावयाचें तो **द्वितीयपुरुष**, आणि ज्याबद्दल बोलावयाचें तो **तृतीयपुरुष** असे व्याकरणांत समजतात; आणि त्यांबद्दल जीं सर्वनामें येतात, त्यांस अनुक्रमें **प्रथमपुरुषवाचक**, **द्वितीयपुरुषवाचक** व **तृतीयपुरुषवाचक** सर्वनामें म्हणतात. तीं येणेंप्रमाणें:—

**प्रथमपुरुषवाचक**—मी. [ केव्हां केव्हां आपण, स्वतः ]

**द्वितीयपुरुषवाचक**—तूं. [ केव्हां केव्हां आपण, स्वतः ]

**तृतीयपुरुषवाचक**—तो, हा, जो, कोण, काय. [ केव्हां केव्हां आपण, स्वतः ]

आपण व स्वतः ह्या सर्वनामांचा तिन्ही पुरुषीं उपयोग होऊं शकतो, म्हणून तीं जेव्हां ज्याचेबद्दल वापरलीं जातील तेव्हां त्यांचा तो पुरुष होऊं शकेल.

याप्रमाणें **पुरुषदृष्ट्या** सर्वनामाचे तीन भेद मानितात. ( वरील सर्व ठिकाणीं फक्त पुल्लिंगी एकवचनीच रूपे दिलीं आहेत. )

[ **आ** ] बोलणारा व ज्याच्याजवळ बोलावयाचें तो, ह्यांबद्दल येणाऱ्या मी-आम्ही व तूं तुम्ही, या सर्वनामांना अनुक्रमें प्रथमपुरुषवाचक व द्वितीय-पुरुषवाचक; आणि तो-ती-तें ह्यानाच तेवढे तृतीयपुरुषवाचक असें म्हणण्याची चाल पडली आहे. तृतीय पुरुषवाचकांपैकीं बाकीच्या सर्वनामांचे त्यांच्या अर्थाच्या दृष्टीनें पांच भाग केले आहेत: आणि मी-आम्ही, तूं-तुम्ही, तो-ती-तें यांचा तेवढाच पुरुषवाचक हाही एक अर्थच समजून एकंदरींत **अर्थदृष्ट्या** सर्वनामांचे खालीलप्रमाणें सहा भाग मानितात—

| **१. पुरुषवाचक** | ए० व० | अ० व० | |
|---|---|---|---|
| प्रथमपुरुषवाचक | मी | आम्ही | [ आपण, स्वतः ] |
| द्वितीयपुरुषवाचक | तूं | तुम्ही | [ आपण, स्वतः ] |
| तृतीयपुरुषवाचक | तो, ती, तें | ते, त्या, तीं | [ आपण, स्वतः ] |

| | | |
|---|---|---|
| २. **दर्शक** | हा, ही, हें | हे, ह्या, हीं |
| ३. **संबंधी** | जो, जी, जें | जे, ज्या, जीं |
| ४. **प्रश्नार्थक** | कोण, काय | कोण, काय |
| ५. **अनिश्चित** | कोण, काय | कोण, काय |
| ६. **आत्मवाचक** | आपण, स्वतः | आपण, स्वतः |

आतां ह्या प्रत्येक प्रकारच्या सर्वनामाचा वाक्यांत उपयोग कसा होतो, त्यासंबंधानें विचार करूं.

**मी**—(प्र० पु०, ए० व० ). बोलणारा आपल्या एकट्याच्याच संबंधानें ज्या वेळीं विधान करितो, त्या वेळीं तो **मी** ह्या सर्वनामाचा उपयोग करितो. उदा०—**मी** येथून हालणार नाहीं, **मी** पास झालों, इ०.

**आम्ही**—( प्र० पु०, अ० व० ). बोलणारा आपल्याबरोबर इतरांच्या वतीनेंही बोलत असल्यास तो **आम्ही** ह्या शब्दाचा उपयोग करितो. उदा०—**आम्ही** सिंहगडास जाणार आहों; देवा, **आम्ही** बाळ आहों; इ०.

[ बोलणारा एकटा असूनही केव्हां केव्हां स्वतःचा किंवा आपल्या कुळाचा वगैरे मोठेपणा दर्शविण्याकरितां '**आम्ही**' ह्या अनेकवचनी शब्दाचा उपयोग करतो. उदा०—तुमचा बेत **आम्ही** ( मी ) समजलों; रविवारीं **आमच्या** ( माझ्या ) मुलाची मुंज आहे; इ०.

वर्तमानपत्रकर्ते, ग्रंथकार, वरिष्ठ अधिकारी, राजेमहाराजे, हे एकटे असले तरी स्वतःबद्दल '**आम्ही**' असें अनेकवचनी रूप वापरतात. उदा०—लोकजागृतीकरितां **आम्हांस** असें लिहिणें प्राप्त आहे; **आम्हीं** हा ग्रंथ सन १९१४ सालीं प्रसिद्ध केला; महाराज म्हणाले, '**आम्हीं** हुकूम केला तो अमलांत आलाच पाहिजे;' इ०. ]

**तूं**—( द्वि० पु०, ए० व० ). एकाच व्यक्तीशीं बोलावयाचें असल्यास, बोलणारा ह्या सर्वनामाचा उपयोग करितो. ( अशा वेळीं ती व्यक्ति सामान्यतः आपल्यापेक्षां कमी वयाची, कमी दर्ज्याची किंवा अतिशय परिचित अगर प्रेमाची असते). उदा०—रामा, **तूं** हें ओझें डोक्यावर घे; आई, थोर **तुझे** उपकार; इ०.

ईश्वराशीं प्रेमानें अगर भक्तीनें बोलतांना अगर त्यास आळवितांना 'तूं'चाच उपयोग करितात. उदा०—देवा, **तूं** आमचें रक्षण कर.

**तुम्ही**—( द्वि० पु०, अ० व० ). अनेकांशीं बोलावयाचें असतां ह्या सर्वनामाचा उपयोग होतो. उदा०—**तुम्हीं** किती मुलें आहां ? **तुम्ही** सर्वजण पास झालां, इ०.

ज्याच्याशीं बोलावयाचें ती व्यक्ति **एकच** असतांही तिला मोठेपणा देण्याकरितां किंवा तशी रूढि पडली आहे म्हणून ' **तुम्ही** ' हें सर्वनाम वापरतात. उदा०–गोविंदराव, **तुम्ही** आज आमच्याकडे भोजनास या; इ०.

**तो ती तें**–( तृ० पु०, ए० व० ). } जवळ नसलेल्या पण पूर्वी
**ते त्या तीं**–( तृ० पु०, अ० व० ). } ज्याचा उल्लेख येऊन गेला आहे अशा प्राण्याबद्दल किंवा पदार्थाबद्दल ह्या सर्वनामांचा उपयोग करितात. उदा०–काल सभेंत ज्या राजाबद्दल उल्लेख केला गेला, **तो** अत्यन्त उदार आहे; तुम्हीं जी मुलगी पाहिलीत, **ती** स्वरूपानें सुंदर आहे; तुम्हांला जें कुत्रें दिसलें, **तें** राडकें आहे; ज्या लोकांशीं तुम्ही संबंध ठेवूं इच्छितां, **ते** धूर्त आहेत; उजव्या बाजूस ज्या मुली बसल्या आहेत, **त्या** हुषार आहेत; तुमच्या हातांत जीं फुलें आहेत, **तीं** सुकलेलीं आहेत; इ०.

**हा ही हें**—( दर्शक स०, ए० व० ). } ह्या सर्वनामांचा उपयोग
**हे ह्या हीं**—( दर्शक स०, अ० व० ). } विशेषतः जवळचा पदार्थ दाखविण्याकडे होतो. उदा०–**हा** राजा आहे, **ही** त्याची राणी आहे व **हें** त्याचें प्रधानमंडळ आहे; **हे** ( पुरुष ), **ह्या** ( स्त्रिया ) व **हीं** ( मुलें ) येथें काय करीत आहेत ? इ०

[ वस्तुतः **तो**, **ती**, **तें**, व त्यांचीं अनेकवचनें **ते**, **त्या**, **तीं**, हीं दर्शक सर्वनामेंच आहेत; ह्या सर्वनामांनीं पूर्वी माहीत असलेली गोष्ट दर्शविली जाते; आणि **हा**, **ही**, **हें**, व **हे**, **ह्या**, **हीं**, ह्या सर्वनामांनीं प्रत्यक्ष पुढें असलेली जवळची गोष्ट दर्शविली असते; एवढाच फरक. पण पहिल्यांस **तृतीयपुरुषवाचक** आणि दुसऱ्यांस तेवढें **दर्शक** सर्वनामें असें म्हणण्याची रूढि पडली आहे. ]

**जो जी जें**—( संबंधी स०, ए० व० ). } ह्यांचा नेहमीं पुढच्या ' **तो** '
**जे ज्या जीं**—( संबंधी स०, अ० व० ). } ह्या सर्वनामांशीं संबंध असतो; म्हणून ह्यांस संबंधी सर्वनामें म्हणतात. उदा०–**जो** करील तो भरील,

**जी** सुंदर ती हुशार असेंच कांहीं नसतें, **जें** पहावें तें लबाड, **जे** चोरी करितात ते शिक्षा भोगतात, **ज्या** अर्थदायक त्याच विद्या शिकाव्या, **जीं** नकोत तीं पुस्तकें कशाला आणलीस ? इ०.

कधीं कधीं संबंधी सर्वनाम अध्याहृत असतें. उदा०—बोलेल तो करील काय, गर्जेल तो पडेल काय. ( ह्या ठिकाणीं **जो** बोलेल व **जो** गर्जेल असा अर्थ आहे ).

सगळ्यापैकीं विशिष्ट ह्या अर्थीं **जो** ह्या संबंधी सर्वनामाची व त्याचा संबंध असलेल्या तो ह्या सर्वनामाची द्विरुक्ति होते. उदा०—**जो जो** उशीरा येईल त्याला त्याला शिक्षा होईल, इ०.

**कोण, काय**—( प्र० स० ). प्रश्न विचारण्याचे कामीं ह्या सर्वनामांचा उपयोग होतो. ( **कोण** हा शब्द विशेषेंकरून प्राणिवाचक नामांबद्दल व **काय** हा अप्राणिवाचक नामांबद्दल वापरतात. ) उदा०—हें काम **कोण** करील ? हें येथें **काय** पडलें आहे ? इ०.

**कोण, काय**—( अनिश्चित अथवा सामान्य सर्वनाम ). यांचा केव्हां केव्हां सामान्य अर्थानेंही उपयोग होतो. उदा०—**कोणी** निंदा, **कोणी** वंदा; हें काम **कोणालाही** सांग; तो **काय** पडेल ते काम करतो; इ०. ( येथ कोण + ही = कोणी, हा शब्द आला आहे हें ध्यानात येईलच ).

**आपण**—( प्रथम व द्वितीय पु० स० ). ह्या सर्वनामाचा 'आम्ही' ह्या अर्थानें अनेकवचनी उपयोग होतो, तेव्हां तें **प्रथमपुरुषवाचक** असतें; व 'तुम्ही' ह्या अर्थानें अनेकवचनीं उपयोग होतो, तेव्हा तें **द्वितीयपुरुषवाचक** असते. उदा०—**आपण** ( आम्हीं ) उद्योग केला तर श्रीमंत होऊं; **आपण** ( तुम्ही ) फार थोर आहां; इ०.

जेव्हा दुसऱ्याविषयीं अधिक आदर किंवा पूज्यभाव दाखवावयाचा असेल तेव्हां बहुधा 'तुम्ही' याबद्दल **आपण** हाच शब्द वापरतात. उदा०—**आपण** मला साह्य कराल तर **आपले** फार उपकार होतील, इ०.

**आपण**—( आत्मवाचक सर्वनाम, तिन्ही पुरुषीं, दोन्ही वचनीं ). आपण ह्याचा जेव्हां स्वतः असा अर्थ असतो, तेव्हां तें आत्मवाचक सर्वनाम असतें. उदा०—मी **आपणाला** ( स्वतःला ) असें दूषण कां लावून घेईन ? तुम्ही **आपल्या** ( स्वतःच्या ) घरीं जा कसे ? त्यांनीं **आपलें** ( स्वतःचें ) बिऱ्हाड बदललें आहे, इ०.

**स्वतः**—( आत्मवाचक, तिन्ही पुरुषीं, दोन्ही वचनीं ). उदा०—मी **स्वतः** तुझें काम करीन; तुम्हीं **स्वतः** चहा घेत नाहींना ? त्यानीं **स्वतः** गोविंदाला बोलाविलें; इ०.

[ **आपण** ह्या सर्वनामाचा प्रथमपुरुषवाचक व द्वितीयपुरुषवाचक यांप्रमाणे उपयोग व आत्मवाचक याप्रमाणे उपयोग ह्यांत फरक आहे. जेव्हां तें ' आम्ही ' किंवा ' तुम्ही ' ह्या अर्थानें येतें, तेव्हां अनुक्रमें प्रथम व द्वितिय **पुरुषवाचक** असतें व स्वतः ह्या अर्थी येतें, तेव्हा तें **आत्मवाचक** असतें. पुरुषवाचक व आत्मवाचक आपण या सर्वनामांमधील फरक खालीलप्रमाणें—

| [ पुरुषवाचक **आपण** ] | [ आत्मवाचक **आपण** ] |
|---|---|
| (१) प्रथम व द्वितीयपुरुषींच येतें. | (१) सर्व पुरुषीं येतें. |
| (२) आदरार्थी अनेकवचनी येते. | (२) दोन्ही वचनीं येतें. |
| (३) तुम्ही व आम्ही याच अर्थी येते. | (३) ' स्वतः ' याच अर्थी येतें. |
| (४) कर्ता, कर्म, होऊं शकते. | (४) कर्ता, कर्म, कधीं होऊं शकत नाहीं. ] |

**टीप**—भलता, सर्व, अवघा, असा, तसा, इ० शब्दांस सर्वनामें म्हणावें असें कांहींचें मत आहे; पण त्यांच्या योगानें नामाचा गुण दाखविला जात असल्यामुळें, त्यांस सर्वनामें म्हणतां येणार नाहीं. ( याचे अधिक विवेचन पुढें विशेषण-विचारांत केलें आहे ).

## विशेषणें

नामाची व्याप्ति मर्यादित करणारा म्हणजे नामाचा कोणत्या तरी प्रकारचा गुण किंवा वैशिष्टय दाखविणारा जो विकारी शब्द त्याला **विशेषण** असें म्हणतात. उदा०—पांढरा, काळा, बरा, वाईट, एक , दोन, पुष्कळ, इ०.

विशेषणाच्या योगानें नामाची व्याप्ति मर्यादित होते, म्हणजे नुसत्या नामानें जितक्या व्यक्तींचा निर्देश केला आहे असें कळतें, त्यापेक्षा कमी व्यक्तींचा निर्देश **विशेषणयुक्त** नामानें होतो; 'गाई' ह्या शब्दापेक्षां ' काळ्या गाई ' असें म्हटल्यानें इतर गाईंपासून त्यांचा निराळेपणा दिसून येतो; आणि ' गाई ' ह्या शब्दानें गाईंची जी संख्या सूचित होते, तिच्यापेक्षां ' काळ्या गाई ' यांनीं ठरणारी संख्या कमी असते. याचप्रमाणें नुसतें ' माणसें ' व ' आंधळीं माणसें '

यांतील फरकही लक्षात येईल. अशा रीतीनें विशेषणाच्या योगानें नामांची व्याप्ति मर्यादित होते. म्हणजे तें नाम पूर्वापेक्षां कमी व्यक्तींना लागू पडणारें होतें. मात्र जितकीं विशेषणें अधिक तितकी अर्थाच्या दृष्टीनें त्या नामाच्या गुणांची स्पष्टता ज्यास्त होते.

[ नामें हीं कशाचीं तरी नांवें असतात, विशेषणें हीं कशाचींही नांवें नसतात; नामें एकाकी असूं शकतात, विशेषणें एकाकी कधींच येऊं शकत नाहींत; नामच नसेल तर विशेषण कोणाचें असणार ? विशेषण एकाकी आलें तर तेंच नाम होतें; त्याचें विशेषणत्व उरतच नाहीं. उदा०—‘ **गरीब** मनुष्यास श्रीमंतीचे चोचले कशास पाहिजेत ? ’ येथें **गरीब** हें मनुष्य ह्या नामाचें विशेषण आहे; परंतु ‘ **गरीबास** श्रीमंतीचे चोचले कशास पाहिजेत ? ’ येथें गरीब हा शब्द नामाप्रमाणें उपयोगांत आलेला असल्यामुळें तें विशेषण नसून नाम आहे ].

विशेषण ज्या नामाची व्याप्ति मर्यादित करतें, त्या नामाला त्याचें **विशेष्य** असें म्हणतात. उदा०—‘ गरीब मनुष्य ’ ह्या ठिकाणीं गरीब हें विशेषण व **मनुष्य** हें त्याचें **विशेष्य** होय. ‘ काळी गाय ’ यांत काळी हें विशेषण व **गाय** हें त्याचे **विशेष्य** आहे.

मराठींत वाक्यामध्यें पुष्कळ वेळां विशेषण नामाच्या पूर्वीं येतें; ह्या पूर्वीं येणाऱ्या विशेषणास नुसतें विशेषण म्हणतात; पण नामाचे नंतर विधेयाची पूर्णता करण्यासाठीं येणाऱ्या विशेषणास **विधि-विशेषण** असें म्हणतात. उदा०—‘ **चांगला** मुलगा अभ्यासाकडे दुर्लक्ष करीत नाहीं. ’ येथें ‘ चांगला ’ हें विशेषण आहे; पण ‘ हा मुलगा **चांगला** आहे ’ येथें चांगला हें **विधि विशेषण** आहे. गोंदूनाना **जरीकांठी** उपरणें वापरतात, गोंदूनानांचें उपरणें **जरीकांठी** आहे; **सुंदर** स्त्रियांना कांहींही शोभतें, शुभ्र वस्त्रानें स्त्रिया **सुंदर** दिसतात; इ० आणखी उदाहरणें.

मराठींत स्वभावतःच नामाचें विशेषण त्याच्या अगोदर येतें; परंतु विशेषणावर विशेष जोर द्यावयाची आवश्यकता असल्यास विशेषणें केव्हां केव्हां नामांच्या नंतर येतात. उदा०—‘ राजेलोकीं सभ्य मनुष्यें **प्रामाणिक, भिडेचीं, विचारसूक्ष्मज्ञ अशीं** पदरीं बाळगावीं ’ इ०. ( अशीं उदाहरणें जुन्या पेशवेकालीन मराठींत आढळतात ).

[ विधि-विशेषण हें नामाचेंच विशेषण असतें हें खरें; परंतु तें नामाची नेहमींच व्याप्ति मर्यादित करितें असें नाहीं; तर तें केव्हां केव्हां फक्त त्याचा गुण दाखवितें. उदा०—‘ सोनें पिवळें असतें ’ या वाक्यात ‘ पिवळें ’ या शब्दानें कांहीं सोन्याला मर्यादा घातली नाहीं, फक्त त्याचा गुण सांगितला आहे. याशिवाय विधि-विशेषण हें विधेयाचाच एक भाग आहे; एकंदर विधान पूर्ण होण्यास त्याची आवश्यकता असते; तशी विशेषणाची नसते. ‘ हा मुलगा **चांगला** आहे ’ ह्या वरील उदाहरणात चांगला हा शब्द मुलाचाच गुण दाखवीत असल्यानें तो त्याचें विशेषण आहे यांत शंका नाहीं; पण तो नामाच्या पूर्वी न येतां नामाच्यानंतर विधेयाची पूर्णता करण्यासाठीं आला असल्यामुळें त्यास **विधिविशेषण** म्हणतात. नाहींतर ‘ हा मुलगा आहे ’ असें म्हटल्यानें ‘ हा मुलगा **चांगला** आहे ’ ह्यानें उत्पन्न होणारा व ह्या वाक्यांतला आपल्यास हवा असलेला अर्थ उत्पन्न होत नाहीं. विधिविशेषण व नुसतें विशेषण ह्यांतील हे फरक ध्यानांत ठेवावे ].

विशेषणांचे ( १ ) **गुण-विशेषणें** व ( २ ) **संख्या-विशेषणें** असे दोन प्रकार मानतात.

ज्या विशेषणांच्या योगानें नामाचा कोणत्या तरी प्रकारचा गुण दाखविला जाऊन त्याची व्याप्ति मर्यादित होतें, त्यांना **गुण-विशेषणें** असें म्हणतात. उदा०—चांगला, वाईट, काळा, गोरा, शहाणा, मूर्ख, इ०.

ज्या विशेषणांच्या योगानें नामाची संख्या दाखविली जाते, त्यांस **संख्या-विशेषणें** असें म्हणतात. उदा०—पांच, दहा, शंभर, हजार, पाव, दीड, इ०.

**संख्या-विशेषणें** खालील प्रकारचीं आढळून येतात.—

[ १ ] **गणनावाचक**—ह्यांच्या योगानें ( संख्येचा क्रम, आवृत्ति, वगैरे दाखविलीं जात नसून ) केवळ संख्याच दाखविली जाते.

( १ ) यांतील कांहीं पूर्णसंख्या दाखवितात. उदा०—दोन, चार शंभर,इ०.

( २ ) कांहीं अपूर्ण संख्या दाखवितात. उदा०—पाव, अर्धा, दीड, दशांश, तीन-सप्तमांश, शतांश, इ०.

( ३ ) कांहींच्या योगानें त्या संख्येनें निर्दिष्ट केलेल्या सर्वांचा बोध होतो. उदा०—दोघे, चारी, साती, इ०.

( ४ ) संख्याविशेषणांची द्विरुक्ति झाली असतां केव्हां केव्हां पृथक्त्वाचा बोध होतो. उदा०— **दोन-दोन** मुलाची रांग करा: **चार-चार** आंबे घ्या; इ०.

[ २ ] **क्रमवाचक**—ह्यांच्या योगानें वस्तूंच्या क्रमाचा बोध होतो. उदा०—पहिला, दुसरा, पांचवा, प्रथमा, द्वितीया, एकादशी इ०.

[ ३ ] **आवृत्तिवाचक**—यांच्या योगानें संख्येची किती वेळां आवृत्ति झाली तें कळतें. उदा०-दुप्पट, तिप्पट, दुहेरी, तिहेरी, दशगुणित, शतगुणित, इ०.

[ ४ ] **अनिश्चित संख्यावाचक**—यांच्या योगानें कोणत्याच निश्चित संख्येचा बोध होत नाहीं. उदा०—थोडीं मुलें, फार माणसें, कांहीं स्त्रिया, इ०. ( यांपैकीं कांहीं अनिश्चित परिणामवाचकही होऊं शकतात. उदा०-थोडा भात, सगळा गूळ, सर्व जमीन, इ० ).

[ सर्व, अमका, अवघा, भलता, इ० यांस **दादोबांनीं** सामान्य सर्वनामें असें म्हटलें आहे; परंतु एक मुलगा, पुष्कळ मुलगे आणि सर्व मुलगे, यांतील एक, पुष्कळ व सर्व ह्या शब्दांमध्यें वस्तुतः नामाचा गुण दाखविणें या दृष्टीनें कांहीं फरक नाहीं. एक याच्या योगानें जशी नक्की संख्या कळते तशी पुष्कळ व सर्व ह्या शब्दांनीं जरी कळत नसली तरी संख्याबाहुल्य कळतें. एक व पुष्कळ ह्यांना दादोबाही विशेषणें म्हणतात; मग सर्व ह्याला तेवढें विशेषण न म्हणतां सर्वनाम कां म्हणावयाचें? ह्याप्रमाणेंच अमका, अवघा, भलता, हे शब्दही नामाचा गुण दाखवितात, नाम कसें आहे तें सांगतात, नामाचें वैशिष्ट्य दाखवितात, म्हणून ते सर्वनामें नसून विशेषणेंच होत. शिवाय मी, तूं, तो, ह्यांना स्वतःचा विशिष्ट अर्थ नाहीं; पण सर्व, अमका, अवघा, भलता, ह्यांना स्वतंत्र असे अर्थ आहेत; आणि नामाची व्याप्ति मर्यादित करणें हें जें विशेषणाचें मुख्य कार्य तेंच वरील शब्दांनीं होतें; म्हणून त्या शब्दांना **विशेषणेंच** म्हणणें प्राप्त आहे ].

## सार्वनामिक विशेषणें

सर्वनामांचाही उपयोग केव्हां केव्हां विशेषणांप्रमाणें होतो, त्याचा आतां विचार करूं.

" एक होता उंदीर, **तो** वई वई धांवे, **त्याला** सांपडलें फडकें, **तो** गेला धोब्याकडे.' ह्या वाक्यांतील तो, त्याला, व तो, हे शब्द उंदीर ह्या नामाबद्दल आले असल्यामुळें ते सर्वनामें आहेत, हें उघड आहे. त्याचप्रमाणें 'आमची मातृ-

भूमि, **जी** आम्हांला प्रिय आहे, **जिला** आम्ही चाहतों, **जिच्या** मांडीवर आम्ही खेळतों, इ०. ह्या वाक्यांत जी, जिला, जिच्या, हे शब्द मातृभूमी-बद्दल आले असल्यामुळें तेही सर्वनामें आहेत.

आतां पुढील वाक्यें पहा—" एक उंदीर होता, **तो** उंदीर वई वई धावत असे, **त्या** उंदराला एक फडकें सांपडलें." त्याचप्रमाणें " **जी** मातृभूमि आम्हांला प्रिय आहे, **ज्या** मातृभूमीवर आम्ही प्रेम करतों, **ज्या** मातृभूमीच्या मांडीवर आम्ही खेळतों, **त्या** मातृभूमीस आम्हीं कसें बरें विसरावें ? "

ह्या वाक्यांत आणि वरच्या परिच्छेदांतील वाक्यांत काय फरक आहे ह्याचा विचार केल्यास असें दिसून येईल कीं, पहिल्या वाक्यांत तो, जी, ह्या सर्वनामांपुढें त्यांचें नाम नाहीं; आणि दुसऱ्या वाक्यांत तो, जी, ह्यांच्यापुढें त्यांचें नाम आले आहे, तेव्हां ह्या शब्दांचें कार्य एकच आहे कीं काय ?

**काळी** गाय, **उंच** मनुष्य, **हिरवें** निशाण, **पांच** रुपये, यातील विशेषणें नामाच्या अगोदर आलीं आहेत. चालू मराठी भाषेंत विशेषणें हीं नेहमीं नामाच्या अगोदरच येतात; आणि जेव्हा जेव्हां विशेषण वाक्यांत येतें, तेव्हां त्याचें नाम लगेच त्याच्या पुढे आल्यावांचून राहत नाहीं; इतकेंच नव्हे, तर विशेषणापुढें त्याचें नाम नसल्यास विशेषण हेंच नाम होतें, असा सामान्य नियम आहे. पण सर्वनाम मात्र नामाच्या बद्दल येत असल्यामुळें, एकदां नाम येऊन गेल्यानंतर तें त्याचें सर्व काम बजावतें. त्याच्या पुढें वाक्यांत नाम असण्याची कांहीं जरूर लागत नाहीं, हें पहिल्या परिच्छेदातील उदाहरणांवरून ध्यानांत येईल. परंतु दुसऱ्या उदाहरणांत, जेथें सर्वनामांपुढे त्यांचें नाम आलें आहे, तेथें त्या सर्व नामांचा उपयोग विशेषणाप्रमाणें नामांचें वैशिष्टय दाखविण्याकरितां अगर त्याची व्याप्ति मर्यादित करण्याकरितां झालेला आहे, असें कळून येईल. ज्याप्रमाणें ' **काळा** उंदीर ' असें म्हटल्यानें तो उंदीर इतर उंदरांपासून वेगळा दर्शविला जातो, ' **संपन्न** मातृभूमि ' म्हटल्यानें जसें इतर रूक्ष, दरिद्री वगैरे प्रकारच्या मातृभूमींहून तिचें पृथक्त्व आपल्या ध्यानांत येतें, त्याचप्रमाणें ' **तो** उंदीर ' म्हटल्यानें, आपल्यास माहीत असलेला, असें त्याचें वैशिष्टय समजतें; ' **जी** मातृभूमि ' म्हटल्यानें, इतर मातृभूमींहून, पृथक् अशी विशिष्ट कल्पना होते; म्हणून ज्यांच्यापुढें त्यांचीं नामें लगेच आलेलीं असतात; अशीं हीं सर्वनामें **विशेषणेंच** होत, असें ठरतें.

( अ ) **तो**, **हा**, इ० दर्शक शब्दांपुढें त्यांचीं नामें आल्यास, त्यांस **दर्शक विशेषणें** असें म्हणतात. उदा०—**तो** बैल चपळ आहे, **हा** बैल मठ्ठ आहे; **ह्या** मुली हुतुतू खेळतात, **त्या** मुली खेळत नाहींत; इ०

( **आ** ) **जो** ह्या संबंधी शब्दापुढें त्याचें नाम आल्यास, त्यास **संबंधी विशेषण** म्हणतात. उदा०—**जीं** मनुष्यें उद्योगी असतात, तीं मनुष्येंच नशीब काढितात; **जें** चित्र फुटलें, तें माझेंच कशावरून ? इ०.

( **इ** ) **कोण**, **काय**, ह्या प्रश्नार्थक शब्दांपुढें त्यांचीं नामें आल्यास त्यांस **प्रश्नार्थक विशेषणें** म्हणतात. उदा०—काल तुला **कोण** मनुष्य भेटला ? त्यानें **काय** वस्तु आणिली ? इ०.

१. **टीप**—'मला गरीबाला कोण विचारतो ?' 'तुला कैदाशिणीला अशीच शिक्षा पाहिजे.' ह्या दोन वाक्यांत 'गरीबाला मला,' कैदाशिणीला तुला' असे अर्थ आहेत; येथें मला व तुला ह्यांना प्राधान्य आहे; म्हणून ते शब्द प्रचलित बोलभाषेंत जरी नामांच्या अगोदर आले आहेत, तरी ते सर्वनामें आहेत.

२. **टीप**—'**आम्हां** गरीबांना कोण विचारतो ?' '**तुम्हां** संतांवरी आमुचें हें ओझें,' '**त्या** चांडाळाची सावली नको' ह्या ठिकाणचे **आम्हां**, **तुम्हां** आणि **त्या**, हे शब्द विशेषणें आहेत; कारण त्या ठिकाणीं 'गरीबांना कोण विचारतो,' 'संतांवर आमचें ओझें आहे,' 'चांडाळाची सावली नको,' अशींच वस्तुतः वाक्यें असून गरीब, संत, चांडाळ, ह्यांचें वैशिष्ट्य दाखविण्याकरितां **आम्हां**, **तुम्हां** व **त्या**, हे शब्द आले असल्यामुळें ते ह्या ठिकाणीं विशेषणें आहेत.

[ एवंच, ( १ ) जेव्हां सर्वनामापुढें त्याचें नाम येतें तेव्हां बहुतेक वेळां त्या सर्वनामास विशेषणत्व प्राप्त होतें; ( २ ) जेव्हां सर्वनामाचें सामान्यरूप होऊन त्या शब्दानें पुढील नामाचें वैशिष्ट्य दाखविलें जातें, तेव्हांही त्याला विशेषणत्व प्राप्त होतें; परंतु ( ३ ) जेव्हां सर्वनामापुढें नाम आलें तरी सर्वनामालाच प्राधान्य देऊन बोलण्याचा हेतु असतो, तेव्हां मात्र सर्वनाम हें सर्वनामच राहतें; त्यास विशेषणत्व येत नाहीं; हा वरील विवेचनावरून निष्कर्ष निघतो ].

असा, इतका, एवढा, कसला, कोणता, इ० शब्दांना **दादोबा** सर्वनामें म्हणतात; परंतु त्यांच्या योगानें नामांचें ( परिणाम, प्रकार, इ० ) वैशिष्ट्य

**कळत** असल्यामुळें त्यांस सर्वनामें न म्हणतां विशेषणेंच म्हणणें वाजवी होईल; हें वर आलेंच आहे ( पृ० २५४ ).

आतां विशेषणासंबंधीं एकच गोष्ट सांगावयाची राहिली. प्रचलित मराठी भाषेंत सामान्यतः विशेषणांस ( विशेषण या नात्यानें ) विभक्तिप्रत्यय लावण्याची पद्धति नाहीं; क्वचित् संस्कृत वळणाच्या कवितेंत मात्र विशेष्याचे विभक्तिप्रत्यय विशेषणाला लागतात. उदा०—

| [ कवितेंत येतें ] | [ प्रचलित गद्यात येत नाहीं ] |
|---|---|
| लोकाभिरा**में** रा**में** | लोकांना आनंद देणाऱ्या**नें** रामाने |
| भूमिगलिता**सी** रिपु**सी** | भूमीवर पडलेल्या**ला** शत्रूला |
| सुंद**रीं** कनकपंज**रीं** | सुंद**रांत** सोन्याच्या पिंजऱ्यांत |

गद्यामध्यें **शहाण्यास** शब्दांचा मार, **वाइटाची** संगत धरूं नये, **खोट्याच्या** कपाळीं कुऱ्हाडीचा घाव, **आंधळयास** सारेच आंधळे वाटतात. याप्रमाणें विशेषणास विभक्तिप्रत्यय लागतात; परंतु अशा वेळीं त्यांचा उपयोग नामांप्रमाणें होतो, हें मागें ( पृ० २४५ मध्यें ) नामांच्या प्रकरणांत आलेंच आहे. ' भाच्याचा वध इच्छिला **कुमतिनें** कंसें प्रयासें महा ' ह्या पद्यांतील उदाहरणांत ' कुमतिनें ' हा शब्द पुढलि शब्दाचें विशेषणच आहे.

---

# क्रियापदें

वाक्यांतील ज्या क्रियावाचक शब्दानें वाक्यार्थास पूर्णता येते आणि वक्त्याचे दृष्टीनें अपेक्षित असणारा त्या क्रियेचा काळ अथवा कांहीं विशेष अर्थ ह्यांचा पूर्ण बोध होतो, त्या विकारी शब्दास **क्रियापद** असें म्हणतात. उदा०—रामा पुस्तक **वाचतो**, तूं पाणी **आण**, ह्यांत ' वाचतो ' ह्या शब्दानें बोलण्याच्या वेळेचा बोध होतो व ' आण ' ह्या शब्दानें आज्ञेचा विशेष अर्थ कळतो. तसेंच ह्या क्रियावाचक शब्दांच्या योगानें वाक्यें पुरीं होतात; म्हणून ह्यांस **क्रियापदें** म्हणतात.

ज्या क्रियावाचक मूळ शब्दास कांहीं प्रत्यय लागून क्रियापद बनतें, त्यास **धातु** म्हणतात. वाचतो ह्यांत धातु **वाच**, बसला ह्यांत धातु **बस**, खाईन ह्यांत धातु **खा**. इ० ( तूं **वाच**, तूं **बस**, तूं **खा**, तूं **बसव**, याप्रमाणें

आज्ञार्थी, द्वितीय पुरुषीं, एकवचनीं, जें रूप असतें, तें रूप क्रियापदांतला धातु असतो; ही गोष्टही मूळ धातु ओळखण्यास उपयोगी पडणारी आहे ).

[ **क्रियापद** हा शब्द जरा घोटाळ्याचा आहे. क्रियेनें युक्त असें जें जें पद त्यास ' क्रियापद ' असें म्हणावयास पाहिजे. उदा०—' जातो ' ह्यांत जाण्याची क्रिया आहे व ' जाऊन ' ह्यांतही जाण्याची क्रिया आहे: ' खाईन ' ह्यांत खाण्याची क्रिया आहे व ' खातांना ' ह्यांतही खाण्याची क्रिया आहे. पण जातो, खाईन, ह्या शब्दांसच क्रियापदें म्हणतात: जाऊन व खातांना ह्यांस क्रियापदें म्हणत नाहींत. म्हणजे ज्या क्रिया-शब्दांवरून वाक्य पूर्ण होतें, त्यांस क्रियापदें म्हणावयाचें: इतर क्रिया-वाचक शब्दांस क्रियापदें म्हणावयाचें नाहीं; असा रूढ संकेत दिसतो. ( त्यांस धातुसाधितें म्हणतात हें पुढें आलेंच आहे ).

याचप्रमाणें ' क्रियापद ' यांतील ' **क्रिया** ' ह्या शब्दानेंही घोटाळा उत्पन्न होण्याचा संभव आहे. मारितो, खातो, देतो, येथें कर्त्यास कांहींतरी करावें लागतें म्हणून मारणें, खाणें, देणें, ह्या क्रिया आहेत; तसेंच आला, गेला, बसला, इ० क्रियापदांमध्येंही येणें, जाणें, बसणें, इ० ह्या क्रिया आहेत; पण नासला, कुजला, वाढला, गोठला, ह्यांत कर्त्यास प्रत्यक्ष कांहीं करावें लागत नाहीं: ह्या गोष्टी आपोआपच होतात. त्याप्रमाणेंच आहे, नाहीं, होता, ह्यांमध्येंही कर्त्यास प्रत्यक्ष कांहीं करावें लागत नसून त्यांच्या योगानें वस्तूंची स्थिति कळते. तरी पण नासणें, कुजणें, वाढणें, गोठणें, असणें, नसणें, होणें, इ० ह्या सर्व गोष्टींस व्याकरणांत क्रियाच म्हणतात; आणि त्यांच्या योगानें बनलेल्या वाक्याचा अर्थ पूर्ण करणाऱ्या शब्दांस **क्रियापदें** म्हणतात ].

क्रियापदें मुख्यतः दोन प्रकारचीं असतात. ( १ ) **सकर्मक** आणि ( २ ) **अकर्मक**.

ज्या क्रियापदांस कर्म असतें, तीं **सकर्मक क्रियापदें**. उदा०—रामा काम **करितो**, गाय दूध **देते**, कृष्णानें कंसास **मारिलें**, इ० यांतलि करितो, देतो, मारिलें, हीं **सकर्मक क्रियापदें** आहेत.

ज्या क्रियापदांस कर्म नसतें तीं **अकर्मक क्रियापदें**. उदा०—रामा **जातो**, झाड **पडलें**, वारा **वाहतो**, इ०. यांत जातो, पडलें, वाहतो, हीं **अकर्मक क्रियापदें** आहेत.

येथें **कर्ता** व **कर्म** यांबद्दल विचार करणें अवश्य आहे. क्रिया करणारा तो **कर्ता**. ' **रामा** जातो ' ह्यांत जाणारा म्हणजे जाण्याची क्रिया करणारा **रामा** आहे, म्हणून तो त्या क्रियापदाचा **कर्ता** आहे. ' **झाड** पडलें ' यांत पडणारें झाड आहे, म्हणून **झाड** हा शब्द पडलें ह्या क्रियापदाचा **कर्ता** आहे.

क्रिया ज्याच्यावर म्हणजे ज्या प्राण्यावर किंवा वस्तूवर घडते, तें दाखविणाऱ्या शब्दास **कर्म** असें म्हणतात. उदा०—' गोविंदा **फळें** खातो ' येथें खाण्याची क्रिया फळांवर घडत आहे; ' राम **रावणास** मारितो ' येथें मारण्याची क्रिया रावणावर घडत आहे; म्हणून येथें **फळें व रावणास** हे शब्द त्या त्या क्रियापदाचीं **कर्मे** आहेत.

क्रियापद **सकर्मक** किंवा **अकर्मक** आहे हें ओळखतां येण्यास, कर्ता व कर्म हीं निर्भ्रांतपणें ओळखता आलीं पाहिजेत. हीं ओळखणें फारसें कठीण नाहीं. क्रियापदावरून आपणास त्यांतील क्रिया समजते. ती क्रिया **करणारा कोण** हें पाहिलें कीं लगेंच **कर्ता** सापडतो. उदा०—' मी काम करतों ' येथें करणारा ' मी ' म्हणून **मी** हा कर्ता होय. ' माझ्यानें जाववतें, ' ' माझ्यानें काम करवतें,' ह्या वाक्यांत देखील जाण्याची किंवा करण्याची क्रिया करणारा मीच असल्यानें **माझ्यानें** हाच दोन्ही वाक्यांतील क्रियापदांचा कर्ता आहे. याप्रमाणेंच ' मारितो ' यांत मारणारा कोण ? ' बसावें ' यांत बसणारा कोण ? ' येत नाहीं ' यात येणारा कोण ? ' हीं झाडें उंच आहेत ' ह्यांत असणारीं कोण ? अशा साध्या प्रश्नानें मराठींत **कर्ता** अचूकपणें करूं शकतो; ही गोष्ट ह्यावरून ध्यानांत येईल.

तसेंच वाक्यांतील **कर्म** ओळखण्यासाठीं क्रिया **कोणावर घडली** हें पहावें लागतें. उदा०—गोविंदा द्राक्षें खातो, गोविंदा उड्या मारितो, गोविंदा मुलांस शिकावितो, गोविंदा चोरास पकडतो, इ०. ह्या वाक्यांत क्रिया अनुक्रमें **द्राक्षें, उड्या, मुलांस**, आणि **चोरास**, ह्या शब्दावर घडतें म्हणून हे शब्द त्या त्या वाक्यांतील क्रियापदांचीं **कर्मे** होत. ( केव्हां केव्हां प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष अशीं दोन कर्मेंही कांहीं वाक्यांत असतात, त्याबद्दल विभक्त्यर्थ ह्या प्रकरणांत विवेचन केलें आहे ).

सामान्यत: प्राणिवाचक कर्म प्रथमान्त किंवा द्वितीयान्त असतें व अप्राणिवाचक कर्म प्रथमान्त असतें. उदा०—गवळी **गाय** बांधितो किंवा **गाईस**

बांधितो; पण गवळी **दूध** विकतो. ( येथें दुधास विकतो असें चालू भाषेंत होत नाहीं ).

१. **टीप**—कवितेंत कधीं कधीं अप्राणिवाचक कर्माचीही द्वितीया असूं शकते. उदा०—' **सत्यातें** जोडावें सुजें **धर्मासि** पळ न सोडावें ' इ०.

२. **टीप**—दामाजी 'भिकाऱ्यांस' धान्य वाटितो, गोविंदा 'गाईस' **चाबूक** मारितो, वेडा ' लोकांस ' **दगड** मारितो, या उदाहरणांतल्या दोन कर्मांच्या व्यवस्थेसंबंधानें पुढें विभक्त्यर्थ व प्रयोग या प्रकरणांत विवेचन आलें आहे. वरील उदाहरणांत धान्य, चाबूक, दगड, हीं मुख्य कर्में असून भिकाऱ्यांस, गाईस, लोकांस, हीं गौण कर्में आहेत.

[ मला तुझें करणें रुचत नाहीं, देवाला भक्ति आवडते, ईश्वरास सर्व दिसतें, मला असें वाटतें, त्याला इंग्रजी येतें, बाबांना पगडी शोभते, इ० वाक्यांतील चतुर्थ्यंत शब्द कर्ते आहेत असें कांहीं लोक इंग्रजी वाक्य-रचनेच्या अनुकरणानें मानतात; परंतु वरील लक्षण लागू केलें तर हें त्याचें मत बरोबर नाहीं असें आढळून येईल. उदा०—' मला तुझें करणें रुचत नाहीं ' यांत रुचणारें कोण ? मी नव्हे तर **करणें**. याचप्रमाणे इतर वाक्यांत अनुक्रमें **भक्ति**, **सर्व**, **असें**, **इंग्रजी**, **पगडी**, हे शब्दच **कर्ते** आहेत; असें दिसून येईल ].

कांहीं धातु सकर्मकही असतात, व अकर्मकही असतात, त्यांस **उभयविध** धातु म्हणतात. तथापि कोणत्याही एका वाक्यांत अशा धातूचा सकर्मक किंवा अकर्मक असा एकाच प्रकारें उपयोग केलेला असतो; व त्या वाक्यापुरतें त्यास सकर्मक अगर अकर्मक ( जसा उपयोग असेल तसें ) क्रियापद म्हणावें. उदा०—त्याचें घर **मोडलें** ( अकर्मक ); त्यानें आपलें घर **मोडलें** ( सकर्मक ); माझी अंगठी **हरवली** ( अकर्मक ); सदूनें माझी अंगठी **हरवली** ( सकर्मक ); इ०.

केव्हां केव्हां एकाद्या गोष्टीसंबंधानें जें सांगावयाचें तें नुसत्या क्रियापदानें सांगून पूर्ण होत नाहीं. त्याच्या पूर्ततेकरितां आणखी कांहीं शब्दांची आवश्यकता असते. त्यावांचून बोलण्याचा अर्थ किंवा विधान पूर्ण होऊंच शकत नाहीं. अशा शब्दांस **विधानपूरकें** म्हणतात. उदा०—तो **राजा** झाला; हरीभाऊंची बायको **वेडी** आहे; साहेब **रागावलेले** दिसतात; इ०. ह्या ठिकाणीं

ठळक अक्षरांतलि शब्द असल्याशिवाय बोलण्याचा अर्थ पूर्ण होत नाहीं; म्हणून हे शब्द येथें **विधानपूरकें** आहेत.

सकर्मक वाक्यांत कर्म सांगितल्यावांचून गत्यंतर नाहीं, म्हणजे त्याच्या शिवाय विधान पूर्ण होत नाहीं, म्हणून **कर्म** हेंही ह्या दृष्टीनें **विधानपूरकच** आहे. उदा०–'गोवाऱ्यानें **गाईस** बांधलें' ह्यांत 'गाईस' ह्या शब्दाच्या उल्लेखाशिवाय विधान पूर्ण होत नाहीं, हें उघडच आहे.

म्हणजे वाक्यांत **कर्ता**, **क्रियापद**, सकर्मक क्रियापद असेल तर **कर्म**, आणि जेथें विधान पूर्ण होत नसेल तेथें **विधानपूरक**, हे शब्द अवश्य असले पाहिजेत; हें येथपर्यंतच्या विवेचनावरून दिसून येईल.

केव्हां केव्हां वाक्यांत स्वतंत्र कर्ता नसतोच. तो क्रियापदांतच गुरफटून कर्ता व क्रियापद मिळून एकच क्रियापद बनतें; अशीं कांहीं क्रियापदें आपल्या मराठी भाषेंत आढळतात. अशा क्रियापदांना **अकर्तृक क्रियापदें** म्हणतात; (यांना दादोबांनीं **भावकर्तृक** क्रियापदें म्हटलें आहे). हीं नेहमीं तृतीय पुरुषीं, नपुंसकलिंगीं, एकवचनीं असतात. उदा०–**कळमळतें** (कळमळ+होतें), **सांजावलें** (सांज+झाली), **उजाडलें** (उजेड+झाला), इ०. यांत **मूळ** कर्ता व क्रियापद मिळून एक शब्द होऊन **क्रियापद** बनलें आहे.

केव्हां मुख्य क्रियेच्या अर्थाची पूर्णता करण्यासाठीं तिला जोडून दुसरें क्रियापद येतें, त्यास **सहाय क्रियापद** असें म्हणतात. उदा०–– मी लिहीत **आहें**, त्यानें पुस्तक दिलें **नाहीं**, तो बसला **होता**, इ०. यांतील ठळक शब्द त्यांच्या मागील मुख्य धातूंस साह्य करणारे असल्यामुळें तीं **सहाय क्रियापदें** आहेत; दोन्ही मिळून होणाऱ्या क्रियापदास **संयुक्त-क्रियापद** म्हणतात.

मुख्य धातूचें रूप अपूर्ण–क्रियादर्शक म्हणजे धातुसाधित असून सहाय धातूचें रूप मात्र पूर्ण–क्रियादर्शक म्हणजे क्रियापद असतें; व ह्या दोहोंमिळून **संयुक्त-क्रियापद** होतें. उदा०––मारितो हें एकेरी क्रियापद; **मारीत आहे** हें **संयुक्त–क्रियापद**. ह्या दुसऱ्या ठिकाणीं मारणें ह्या धातूचा काळाच्या दृष्टीनें अर्थ पूर्ण करण्यासाठीं मदत करण्याकरितां आलेलें, म्हणून 'आहे' हें **सहाय** क्रियापद आहे.

कांहीं क्रियापदांमधील मूळ धातु वगैरे कांहीं सांपडत नाहीं; पण त्याचा उपयोग मात्र क्रियापदाप्रमाणें होऊन वाक्याचा अर्थ पूर्ण होतो; अशा क्रियापदांस **गौण** अथवा **सिद्ध** क्रियापदें म्हणतात. उदा०--मला पुस्तक **पाहिजे**, तूं येऊं **नको**, त्यांना विचारणें **नलगे**, खोटें बोलूं **नये**.

कांहीं धातूंवरून क्रिया स्वाभाविकपणें होत आहे असें कळतें; पण कांहीं-वरून क्रिया दुसऱ्याकडून होत आहे, असें कळतें. ह्या दुसऱ्याकडून क्रिया घडत आहे असें कळणाऱ्या धातूंस **प्रयोजक** धातु म्हणतात; व त्या क्रियापदांस **प्रयोजक क्रियापदें** म्हणतात. उदा०— 'झाड पडलें,' ह्यांत पडण्याची क्रिया स्वाभाविकपणें घडली; पण 'झाड **पाडलें**,' ह्यांत क्रिया दुसऱ्याकडून झाली; म्हणून '**पाडलें**' हें **प्रयोजक क्रियापद**. त्याचप्रमाणें करितो, देतो, हीं मूळ क्रियापदें आहेत; पण **करवितो**, **देवावितो**, हीं **प्रयोजक** क्रियापदें आहेत.

कांहीं क्रियापदांवरून शक्यता, सामर्थ्य, यांचा बोध होतो; त्यांस **शक्य क्रियापदें** म्हणतात. उदा०--'मला **जाववतें**' यांत जाण्याची शक्ति किंवा सामर्थ्य कळून येतें, म्हणून हें **शक्य क्रियापद**. तसेंच **बसवतें**, **खाववतें**, **देववतें**, इ०. हीं **शक्य क्रियापदें** होत.

याप्रमाणें क्रियापदांचे (१) सकर्मक, (२) अकर्मक, (३) उभयविध, (४) भावकर्तृक, (५) सहाय, आणि (६) शक्य, (७) प्रयोजक व (८) गौण अथवा सिद्ध; असे एकंदर आठ प्रकार दादोबांनीं मानले आहेत. तथापि कोणतेंही क्रियापद वाक्यांत सकर्मक अगर अकर्मक ह्यांपैकीं एकांत मोडतेंच; म्हणून व्याकरण चालवितांना **सकर्मक** किंवा **अकर्मक** ह्याच मुख्य प्रकारांचा उपयोग करितात.

[ करितो, करवितो व करवतें ह्या मूळ, प्रयोजक व शक्य रूपांत धातु कोणता मानावा हा थोडा विचाराचा प्रश्न आहे. ह्यांपैकीं 'करितो' ह्यांत कर हा धातु आहे यांत शंका नाहींच. आतां रामा काम करवितो व रामाला काम करवतें ह्या क्रियापदांविषयीं विचार केल्यास पहिल्यांत क्रिया **करवणारा** म्ह० दुसऱ्या-कडून क्रिया करवणारा कोण ? तर रामा; हें उत्तर निघतें. दुसऱ्यांत क्रिया **करवणारा** कोण ? येथें रामा हें उत्तर येत नाहीं. कारण, पहिल्या वाक्यांतल्या-प्रमाणें येथें क्रिया दुसऱ्याकडून करवावयाची नाहीं. येथें क्रियेवरून शक्यतेचा

किंवा समर्थतेचा अर्थ कळत असल्यामुळें क्रिया '**करवणारा** कोण ? असें विचारण्याची अपेक्षा नसून क्रिया करणारा म्हणजे क्रिया **करण्याची शक्ति असणारा** कोण'? ह्या अर्थाच्या प्रश्नानेच अपेक्षित व योग्य उत्तर निघतें. याचप्रमाणें 'तो मुलीला बसवितो' व 'त्याला बसवतें' ह्यापैकीं पहिल्या वाक्यांत **बसवणारा** कोण ? तो; पण तो दुसऱ्या वाक्यात **बसवणारा**–म्हणजे **बसण्याची शक्ति असणारा**–कोण ? ह्या अर्थानें प्रश्न विचारला पाहिजे; व त्याचें उत्तर 'तो' हे बरोबर आहे; म्हणून त्या वाक्यात **त्याला** हा बसवतें ह्या क्रियापदाचा कर्ता. अर्थात् प्रयोजक क्रियापदांमध्यें कर व मार यांपासून साधलेले **करव**, **मारव**, हेच मूळ धातु आहेत: आणि शक्य क्रियापदांमध्येंही तेच धातु आहेत; मात्र भिन्नार्थानें त्याचा त्या त्या वाक्यांत उपयोग आहे, हें ध्यानात ठेवावें. (प्रत्ययापूर्वीचें जें रूप तो धातु असतो).

मूळ धातूंपुढें बहुधा 'व' बद्दल '**वि**' हें अक्षर लागून प्रयोजक धातु होतात आणि '**व**' हें अक्षर लागून शक्य धातु होतात, हें सामान्यतः खरें; तथापि काहीं प्रयोजक धातु अन्य प्रकारेंही साधतात, त्यांचीं कांहीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत.

(१) '**वि**' हें अक्षर मध्ये येऊन झालेला—

करवितो, बोलवितो, बसवितो, निजवितो, चालवितो, इ०.

(२) **वृद्धि** व **गुण** होऊन झालेलीं—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| गळणें | — | गाळणें | तुटणें | — | तोडणें |
| पडणें | — | पाडणें | फुटणें | — | फोडणें |
| तरणें | — | तारणें | सुटणें | — | सोडणें |

**टीप**—एकाक्षरी प्रयोजक धातूस 'वि' बद्दल '**ववि**' हीं अक्षरें लागतात. उदा०—देवाविणें, खावविणे, पिवाविणें, इ०: आणि एकाक्षरी शक्य धातूंस '**वव**' हीं अक्षरें लागतात. उदा०—जाववतें, खाववतें, येववतें, इ०

केव्हां केव्हां 'वि' या अक्षरापूर्वी विकल्पानें अकाराबद्दल आकार येतो उदा०—फितविणें–फिताविणें, समजाविणे–समजाविणें, सरकाविणें–सरकाविणें, इ०.

याप्रमाणें प्रयोजक धातूंचीं अनेक प्रकारचीं रूपें होतात. येथें कांहीं फक्त नमुन्याकरितां दिलीं आहेत.

प्रयोजक क्रियापदें नेहमीं सकर्मक असतात; तीं अकर्मक असूंच शकत नाहींत.

फूल–फुलणें, माणूस–माणसाळणें; वेडा–वेडावतो, पिसा–पिसाळला; खालीं–खालावणें, दूर–दुरावणें; इ॰. नामसाधित, विशेषणसाधित, व अव्ययसाधित **साधित धातूं**बद्दल व्युत्पत्ति–प्रकरणांत विवेचन केलेंच आहे. करव, मारव, इ॰ प्रयोजक व शक्य धातु हेही **धातुसाधित धातुच** होत.

— — ——

# क्रियाविशेषण अव्ययें

क्रियेचें स्थल, काल, रीति, संख्या, इ॰ कोणत्याही प्रकारचें वैशिष्टय दाखविणारा जो अविकारी शब्द त्याला **क्रियाविशेषण अव्यय** असें म्हणतात.

क्रियाविशेषण अव्ययें अर्थदृष्टया सामान्यतः चार प्रकारचीं आढळतात. (१) **स्थलवाचक**, (२) **कालवाचक**, (३) **परिमाणवाचक** आणि (४) **रीतिवाचक**.

**[ १ ] स्थलवाचक** —

स्थितिदर्शक–येथें, तेथें, इकडे, तिकडे, सभोंवतीं, आसपास, चोहोंकडे, अन्यत्र, जवळ, दूर, लांब, मागें, पुढें (हीं कालवाचकही आहेत).

गतिदर्शक–इकडून, तिकडून, दुरून, लांबून, कोठून, पुढून, समोरून, इ॰.

**[ २ ] कालवाचक** —

कालदर्शक–आज, उद्या, गुदस्तां. यंदां, जेव्हां, केव्हां, अगोदर, नंतर, इ॰.

सातत्यदर्शक–नित्य, सदा, सतत, नेहमीं, हमेश, आजकाल, इ॰.

आवृत्तिदर्शक–वारंवार, पुनः पुनः, अनेकदां, वेळोवेळीं, क्षणोक्षणीं, इ॰.

**[ ३ ] परिमाणवाचक**—

प्रकर्षदर्शक –– अत्यन्त, अगदीं, बिलकुल, मुळींच, सर्वथा, इ॰.

अल्पत्वदर्शक– किंचित्, जरा, कांहीं, क्वचित्, इ॰.

आधिक्यदर्शक–फार, अतिशय, बहुत, पुष्कळ, इ॰.

मितपरिमाणदर्शक–पुरे, पूर्ण, यथास्थित, बेतवार, वाजवी, इ॰.

**[ ४ ] रीतिवाचक**—

प्रकारदर्शक–असें, तसें, उगीच, व्यर्थ, फुकट, एवीं, तेवीं, केवळ, इ॰.

अनुकरणदर्शक-पटकन, चटकर, झटदिशीं, झपादिशीं, गटगट, पटापट, कडकडा, बदाबद, इ०.

निश्चयार्थक-खचित, खरोखर, बेशक, निर्भ्रान्त, इ०.

अनुक्रमदर्शक-हळूहळू, थेंबेंथेंबें, क्रमशः, यथाशास्त्र, इ०.

## साधित क्रियाविशेषण अव्ययें

कांहीं मूळचींच क्रियाविशेषण अव्ययें असतात. उदा०-हळू, लौकर, पुनः, उगीच, खरोखर, इ०. परंतु कांहीं क्रि० वि० अव्ययें दुसऱ्या शब्दांपासून साधलेलीं असतात; त्यांस साधित क्रियाविशेषण अव्ययें असें म्हणतात. तीं खालीलप्रमाणें —

नामसाधित—सकाळला, दिवसास, रात्रीचा, वस्तुतः व्यक्तिशः, अर्थात्, इ०.

विशेषणसाधित— इतक्यांत, मोठ्यानें, दोनदां, सर्वत्र, द्विधा, इ०.

अव्ययसाधित—आतांपर्यंत, एव्हांपासून, येथपर्यंत, वरतीं, खालतीं, इ०,

धातुसाधित—(यांचा विशेष विचार साधित-शब्द या प्रकरणांत केला आहे).

त, तां, तांना—हसत, खेळत; जातां, येतां; करतांना, बोलतांना; इ०.

ऊ, ऊं, ऊन—चालू, लागू; करूं, देऊं; फिरून, मारून; इ०.

ल्या, ल्यां—उठल्यां, बसल्यां; इ०.

## सामासिक क्रियाविशेषण अव्ययें
### संस्कृत

दृष्ट्या—शास्त्रदृष्ट्या, लोकदृष्ट्या, अर्थदृष्ट्या, इ०.

पूर्वक—प्रीतिपूर्वक, भक्तिपूर्वक, आदरपूर्वक, इ०.

पुरःसर—बुद्धिपुरःसर, हेतुपुरःसर, इ०.

वशात्—दैववशात्, प्रसंगवशात्, इ०.

प्रति—प्रतिक्षण, प्रतिदिन, प्रत्यक्ष, इ०.

यथा—यथावकाश, यथाक्रम, यथास्थित, इ०.

निः—निःसंशय, निर्धास्त, निर्भ्रान्त, इ०.

यावत्—यावज्जीव, यावत्काल, यावच्छक्य, इ०.

पर—परोक्ष, अपरोक्ष.

आ—आमरण, आजन्म, आजीव, इ०.

## निवळ मराठी

गांवोगांव, दारोदार, रानोमाळ, दिवसेंदिवस, इ०. (रस्तोरस्तीं, गल्लोगल्लीं, हे मूळचे यवनी पण आतां मराठीच बनलेले शब्द याच प्रकारचे आहेत).

## परकीय भाषेंतील

दरमजली, हरघडी, बिनहरकत, बेशक, बरहुकूम, गैरकायदा, गैरहजर, इ०.

## क्रियाविशेषण-चर्चा

(१) जेव्हां, तेव्हां, आज, उद्यां, ह्यांप्रमाणेंच दिवसास, रात्रीचा, आरंभीं, सायंकाळीं, इ० शब्दही कालवाचक आहेत खरे; तथापि त्यांस क्रियाविशेषण अव्ययें म्हणणें योग्य होईल कीं काय हा विचाराचा प्रश्न आहे. तसेंच इतक्यांत, तितक्यांत, मोठ्यानें, हीं देखील क्रियेचा वेळ, प्रकार, इ० वैशिष्ट्य दाखवितात म्हणून त्यांसही क्रियाविशेषण अव्ययें म्हणावें असा दादोबा वगैरेंचा अभिप्राय आहे, त्याचाही विचार करणें जरूर आहे.

वरीलपैकीं **दिवसास, रात्रीचा, सायंकाळीं**, ह्या शब्दांचा उपयोग क्रियेची वेळ दाखविण्याकरितां होत असतो हें खरें; तथापि 'स्वरूपांत बदल न होणें' हें जें अव्ययाचें मुख्य लक्षण तें त्यांस लागू पडत नाहीं. विचारपूर्वक पाहिलें असतां दिवसास, रात्रीचा, सायंकाळीं, इ० शब्दांचा उपयोग येथें विकारी शब्दांप्रमाणेंच केलेला आहे; त्यांतील मूळ शब्दांचें सामान्यरूप होऊन त्यांस विभक्तिप्रत्ययही लागलेले आहेत; म्हणून त्यांस क्रियाविशेषण अव्ययें म्हणणें योग्य होणार नाहीं. केवळ क्रियेची वेळ दाखवितात एवढ्यावरूनच जर तीं क्रियाविशेषण अव्ययें म्हणावयाचीं तर वर्ष, दिवस, तास, मिनिट, इ० शेंकडों वेळ दाखविणाऱ्या शब्दांसही क्रियाविशेषण अव्ययें म्हणावें लागेल; परंतु तें कोणासही मान्य होणार नाहीं. यामुळें वरील शब्दांस—म्हणजे विशेषतः **कालवाचक नाम-शब्दांस**—विभक्ति लागली असतां त्यांस क्रियाविशेषण अव्ययें म्हणूं नये, हेंच अखेरीस व्यवस्थेस सोयस्कर होय.

(२) परंतु **इतक्यांत, मोठ्यानें**, वगैरे शब्दांचें तसें नाहीं. इतका, मोठा, ह्या विशेषणांना विभक्तिप्रत्यय लागून व त्यांचें सामान्यरूप होऊन हीं रूपें बनलीं आहेत हें जरी खरें; तथापि वरील दिवसास, रात्रीचा, इ० विभक्तियुक्त नाम-शब्दांचा विशेष उपयोग जसा क्रियेचा गुण दाखविण्यापेक्षां विकारी

शब्दांप्रमाणेंच अधिकांशानें होत आहे, तसा यांचा वरील वाक्यांत नामांप्रमाणें बिलकूल उपयोग होत नसून, क्रियेचा गुण, रीत, इ० सांगण्याकडेच अधिकांशानें होत असल्यामुळें, त्यांस क्रियाविशेषण अव्ययें म्हणणें आणि त्यांचा समावेश विधेय-विस्तारांत करणेंच अवश्य आहे; असें दिसून येईल.

( ३ ) मराठी विभक्त्यन्त शब्दांबद्दल वर जो निकाल सांगितला तीच गोष्ट संस्कृत विभक्त्यन्त शब्दांस लागू नाहीं. लोकरीत्या, शास्त्रदृष्ट्या, दैववशात्, प्रसंगवशात्, इ० पैकीं पहिले दोन शब्द तृतीयान्त व दुसरे दोन पंचम्यन्त आहेत; त्यांस मराठींत क्रियाविशेषण अव्ययें म्हणण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं; कारण, आतां मराठींत हीं त्यांचीं विभक्त्यन्त रूपें मानलीं जात नसून, ते स्वतंत्र शब्दच समजले जातात; अर्थात् ते क्रियेचा गुणच दाखवीत असल्यामुळें क्रियाविशेषण अव्ययेंच होत, ह्याविषयीं कोणाचा मतभेद नाहीं.

( ४ ) घरोघर, दारोदार, वर्षानुवर्ष, प्रतिवर्ष, हे शब्द क्रियाविशेषण अव्ययें आहेत; त्यांचा अव्ययीभाव समास आहे. पण त्यांच्याप्रमाणेंच उपयोगांत येणारे **घरोघरीं**, **दारोदारीं**, **प्रतिवर्षीं**, ह्या शब्दांना विभक्ति-प्रत्यय लागल्यामुळें त्यांस क्रियाविशेषण अव्ययें म्हणावें की नाहीं अशी शंका येण्याचा संभव आहे; परंतु ह्या शब्दांचा विशेष उपयोग क्रियेचा गुण दाखविण्याकडेच आहे हें निर्विवाद असल्यामुळें, त्यांस क्रियाविशेषण अव्ययेंच म्हणणें प्राप्त आहे.

( ५ ) वरवर, रोजरोज, बसल्याबसल्या, उभ्याउभ्या, कधींकधीं, जिकडे-तिकडे, येथून-तेथून, इ० पुनरुक्त जोड-शब्दही क्रियाविशेषण अव्ययेंच होत; याबद्दल अधिक लिहिण्यास नकोच.

( ६ ) क्रियाविशेषण अव्ययांचीं विशेषणें हीं क्रियाविशेषण अव्ययेंच होत; कारण, त्यांचा संबंध एकंदरींत मुख्य क्रियाविशेषणाबरोबर क्रियापदाशींच असतो. उदा०-तो **फार** हळू बोलतो, तूं **अति** जलद काम उरकलेंस, इ०.

( ७ ) कांहीं आ-कारान्त क्रियाविशेषणें बदलतात; तेव्हां त्यांस क्रियाविशेषण अव्ययें असें न म्हणतां नुसतें **क्रियाविशेषणें** असें म्हणतात. उदा०— मूल **उभें** राहतें, त्या **आडव्या** चालतात, सुमती **चांगलें** गातें, इ०. ( हे शब्द विधानपूरकें होत ).

( ८ ) विधिविशेषणें व क्रियाविशेषणें यांत फरक असा कीं, विधि-विशेषणें हीं नामाचीं विशेषणें असतात ( विमल **शहाणी** आहे ); आणि

क्रियाविशेषणें नामाचीं विशेषणें नसून क्रियेचीं विशेषणें असतात ( विमल **चांगलें** बोलतें ); इ०. मात्र हे दोन्ही शब्द विधानपूरकेंच होत.

( ९ ) विशेषणांच्या विशेषणांसही क्रियाविशेषणेंच म्हणण्याची चाल पडली आहे. उदा०-तो **अति** शहाणा आहे, आम्हीं **पुष्कळ** क्रूर जनावरें पाहिलीं, कोल्हा **मोठा** धूर्त प्राणी आहे, इ०. परंतु सूक्ष्म विचारान्तीं हें तितकेंसें योग्य दिसत नाहीं. कारण, वरील उदाहरणांतील अति, पुष्कळ, मोठा, ह्या शब्दांचा साक्षात् क्रियापदाशीं कांहींच संबंध दिसून येत नाहीं; तेव्हां त्यांना क्रिया-विशेषणें कसें म्हणावें ? वास्तविक पाहतां विशेषणांचीं विशेषणें हीं खरोखर नामाशींच संबद्ध असतात व नामाचीच व्याप्ति अधिक मर्यादित करीत असतात, त्यामुळें त्यांस नुसतें **विशेषणें** म्हणणेंच अधिक प्रशस्त होय.

म्हणजे क्रियाविशेषणांचीं विशेषणें ह्यांचा संबंध क्रियेशीं पोंचत असल्यामुळें तीं **क्रियाविशेषणें** व विशेषणांचीं विशेषणें ह्यांचा संबंध नामाशीं असल्यामुळें तीं नुसतीं **विशेषणें** होत, ही गोष्ट मराठी वाक्य-रचनेच्या दृष्टीनें ग्राह्य होय, असें आम्हांस वाटतें.

---

# उभयान्वयी अव्ययें

क्रियेचें विशिष्टत्व न दाखवितां, एका वाक्याचा दुसऱ्या वाक्याशीं अन्वय म्हणजे संबंध जोडणारा जो अविकारी शब्द त्यास **उभयान्वयी अव्यय** असें म्हणतात.

कांहीं उभयान्वयी अव्ययांच्या योगानें दोन शब्दांचीही सांगड घातलेली आढळून येते. उदा०—रामा **आणि** गोविंदा हे भाऊभाऊ होते; त्यानें आपल्या निष्काळजी **व** आळशी मुलास बराच दोष दिला; इ०.

उभयान्वयी अव्ययांच्या योगानें दोन शब्दांची सांगड जुळविण्यापेक्षां दोन वाक्यांची सांगड जुळविण्याचेंच कार्य मुख्यतः होतें, असें बारकाईनें पाहिल्यास आढळून येईल. ' वारा आला **आणि** पाऊस गेला ' ह्यांत स्पष्टपणें **आणि** ह्या उभयान्वयी अव्ययानें दोन वाक्यें जोडलीं आहेत. ' रामा **आणि** गोविंदा हे घरीं गेले ' येथेंही जरी दोन शब्दांमध्यें **आणि** हें अव्यय आलेलें

दिसतें, तरी वस्तुतः तें ' रामा घरीं गेला ' **आणि** ' गोविंदा घरीं गेला ' ह्या दोन वाक्यांचाच संबंध जोडतें; अर्थात् दोन वाक्यांचा संबंध जोडणें ह्याच गोष्टीस येथें प्राधान्य आहे, हें उघड आहे.

कांहीं उभयान्वयी अव्ययें वाक्यांचें प्रधानत्व सुचविणारीं असतात व कांहीं गौणत्व सुचविणारीं असतात.

प्रधानत्व सुचविणारीं अव्ययें ( १ ) **समुच्चयबोधक**, ( २ ) **विकल्पबोधक**, ( ३ ) **न्यूनत्वबोधक**, व ( ४ ) **परिणामबोधक**, अशीं चार प्रकारचीं आहेत; आणि गौणत्व सुचविणारीं अव्ययें ( १ ) **कारणदर्शक**, ( २ ) **उद्देशदर्शक**, ( ३ ) **संकेतदर्शक** व ( ४ ) **स्वरूपदर्शक**, अशीं चार प्रकारचीं आहेत.

[ १ ] **समुच्चयबोधक**—आणि, व, आणखी. ह्या अव्ययांनीं दोन अथवा अधिक प्रधान वाक्याचा एकत्र समुच्चय किंवा संग्रह केला जातो. उदा०–( १ ) राम वनवासास जावयास निघाला **आणि** त्याबरोबर सीताही निघाली; ( २ ) द्राक्षें, अंजीर **व** मोसंबीं हीं फळें होत; ( ३ ) त्यानें एक गोष्ट सांगितली **आणखी** तो निघून गेला; इ०. ( यांतील दुसरें वाक्य द्राक्षें हा फळें आहेत, अंजीर हे फळें आहेत, आणि मोसंबीं हीं फळें आहेत, याप्रमाणें वस्तुतः तीन प्रधान वाक्यांमिळून झालें आहे; हें सहज कळून येईलच ).

न, अन्, नी, हे शब्द ' आणि ' याचीं बोलण्यांतील रूपें आहेत. तीं समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययेंच होत. उदा०—मी **न्** तूं जाऊं; ईश्वराला मनुष्य **नी** जनावर सारखेंच; गोपाळ **अन्** हरी दोघे पास झाले; इ०.

[ २ ] **विकल्पबोधक**—वा, किंवा, अगर, कीं. ह्या अव्ययांनीं दोन किंवा आधिक वस्तूंपैकीं एकाचीच अपेक्षा दर्शविली जाते. उदा०—' रामा येईल **किंवा** गोविंदा येईल ' म्हणजे दोघांपैकीं एक कोणी तरी येईल, असा अर्थ आहे. तसेंच नरो **वा** कुंजरो **वा**, तो येतो **कीं** ( किंवा ) नाहीं कोणास ठाऊक ? ' **कीं** ( किंवा ) माझें दुर्दैव प्रभुच्या मार्गांत आडवें पडलें, ' तुम्ही मोटारनें जा **अगर** आगगाडीनें जा, इ०.

[ ३ ] **न्यूनाधिक्यबोधक**—पण, परंतु, किन्तु, परी. ह्या अव्ययांनीं प्रथमच्या वाक्यांतील गोष्टींचा कांहीं कमीपणा किंवा आधिकपणा दाखविला जातो. उदा०—( १ ) वैद्याचें औषध दिलें, **परंतु** कांहीं उपयोग झाला

नाहीं; माझी पंढरीच्या दर्शनाला जाण्याची इच्छा आहे, **पण** मजजवळ पैसे नाहींत. यांतील **परंतु** व **पण** हे शब्द न्यूनत्वबोधक आहेत. ( २ ) मर **पण** देशाचें काम कर; मेलों करी बेहेत्तर **पण** खरें बोलेन; ' न मिळो खावया न वाढो संतान, **परी** हा भगवान कृपा करो; ' ' मना चंदनाचे परी त्वां झिजावें, **परी** अंतरीं सज्जनां नीववावें; इ०. यांतील **पण, परी**, हे शब्द प्रकर्षदर्शक म्हणजे आधिक्यार्थक आहेत.

[ ४ ] **परिणामबोधक**—म्हणून, अतएव, यास्तव, तेव्हां, तस्मात्, सबब. ह्या अव्ययांनी मागील वाक्यांतील गोष्टीचा पुढील वाक्यांतील गोष्ट हा परिणाम आहे, असें कळतें. उदा०–माशांस फुप्फुसें नाहींत **म्हणून** त्यांस शब्द नाहीं. येथें माशांस फुप्फुसें नाहींत याचा परिणाम त्यांस शब्द नाहीं हा होय. तसेंच तूं अभ्यास करीत नाहींस **म्हणून** नापास होतोस; माझा अपमान होईल **अतएव-यास्तव-तेव्हां-सबब**-मी तेथें जाणें अशक्य आहे; इ०.

[ ५ ] **कारणदर्शक**—कारण, कीं, कांकीं, कारण कीं. ह्या अव्ययांनीं उत्तर-वाक्य हें पूर्व-वाक्याचें कारण आहे असें दर्शविलें जातें. उदा०— तो एकाएकीं मेला, **कारण** त्याच्या पोटांत चुकीनें विष गेलें; आम्हांला हेच तांदूळ आवडतात, **कांकीं-कारण कीं**- ते आमच्या शेतांतील आहेत; इ०.

[ ६ ] **उद्देशदर्शक**—सबब, म्हणून, यास्तव, कारण, कीं, कांकीं. केव्हां केव्हां या अव्ययांनीं हेतु किंवा उद्देश दर्शविला जातो, तेव्हां त्यांस उद्देशदर्शक उभयान्वयी अव्ययें म्हणतात. उदा०—' मी तुमच्याकडे आलों आहें, **कारण कीं-कांकीं**-माझी एवढी अडचण निभावी; केव्हां केव्हां पूर्ववाक्यही उद्देशदर्शक असतें. उदा०—' माझी एवढी अडचण निभावी **म्हणून-सबब-यास्तव**-मी तुझ्याकडे आलों आहें; इ०.

' म्हणून' हें परिणामबोधक असतें तेव्हां परिणामबोधक वाक्याच्या आरंभीं येतें व उद्देशदर्शक असतें तेव्हां उद्देशदर्शक वाक्याच्या शेवटीं येतें, हा दोहोंमध्यें ढोबळ फरक आहे. उदा०—उपाय केला, **म्हणून** ' माझे डोळे बरे झाले ' ( परिणामबोधक ); ' डोळ्यांस उपाय करावा ' **म्हणून** मी मुंबईस गेलों; ( उद्देशदर्शक ).

**कीं**—उद्देशदर्शक. याचा उपयोग केव्हां केव्हां कवितेंत आढळतो. उदाहरण—

शेले, शालू, साड्या, क्षीरोदक, लांब रुंद पाटावे ।
झाला अनंत वस्त्रें **कीं** तीस अनाथसें न वाटावें ॥ ( मोरोपंत )

[ ७ ] **संकेतदर्शक**—जर-तर; जरी-तरी; यद्यपि-तथापि; म्हणजे, कीं. यांतील जर-तर, जरी-तरी, यद्यपि-तथापि, हीं जोडीनें येतात.

**जर-तर**—यांतील पूर्व-वाक्यांत कांहीं अट असते व त्या अटीवर उत्तर-वाक्यांतील गोष्ट अवलंबून असते. उदा०—**जर** अभ्यास करशील, **तर** पास होशील. **जरी-तरी**; **यद्यपि-तथापि**; यांतील पहिल्या व दुसऱ्या वाक्यांच्या अर्थामध्यें कांहीं अंशीं परस्पर-विरोध दर्शविला जातो. उदा०—**जरी** मी ताबडतोब निघालों, **तरी** आईची भेट झाली नाहींच ! **यद्यपि** तूं हुशार आहेस, **तथापि** तुझी तयारी नीट दिसत नाहीं; इ०.

कवितेंत क्वचित् जर-तर बद्दल जरी-तरी असें आलेलें आढळतें—

उदा०—**जरि** ( जर ) विचारुनि गोंविसि वैखरी ।
**तरिच** ( तरच ) होइल जाण अगा खरी ॥ ( वामन )

**म्हणजे**—ह्याचाही उपयोग ' तर ' या अर्थानें केव्हां केव्हां आढळतो. उदा०—तूं खरें बोल **म्हणजे** ( तर ) सुटशील; तूं बरा झालास **म्हणजे** ( तर ) तुला सर्व कांहीं दाखवीन; इ०.

**कीं**—तूं निघालास **कीं** मी निघालोंच; तूं बोल **कीं** तुला फटका लगावतोंच; तो उठला **कीं** मी उठलोंच; तूं जाच **कीं** पहा काय होईल तें; इ०. या ठिकाणीं ह्या शब्दाने संकेत कळतोच; पण शिवाय क्रियेच्या तात्कालिकतेचाही बोध होतो.

[ ८ ] **स्वरूपदर्शक**—म्हणजे, म्हणून, कीं, जे. यांनीं जोडणाऱ्या शब्दांपैकीं मागील शब्दाचें किंवा वाक्याचें पुढील शब्दानें किंवा वाक्यानें स्पष्ट स्वरूप किंवा खुलासा कळतो. उदा०—

**म्हणजे**—अश्व **म्हणजे** घोडा; चार पैसे **म्हणजे** एक आणा.

**म्हणून**—रामा **म्हणून** एक मुलगा होता; ज्ञानेश्वरी **म्हणून** एक ग्रंथ आहे.

**कीं**—तो म्हणाला **कीं**, मी आज येत नाहीं.

**जे**—विनंति ऐसी **जे**, मला क्षमा करावी; अर्ज ऐसा **जे**—

वरील उदाहरणांत एकच उभयान्वयी अव्यय निरनिराळ्या अनेक प्रकारांत आलेलें आढळून येतें. त्यांपैकीं 'म्हणून' या अन्वयासंबंधानें अधिक स्पष्टता करूं.

[ अ ] परिणामबोधक व उद्देशदर्शक '**म्हणून**' या अव्ययासंबंधीं थोडा घोटाळा होण्याचा संभव असतो; म्हणून त्याचें स्पष्टीकरण असें–'अभ्यास केला

नाहींस **म्हणून** तूं नापास झालास ' येथें म्हणून हें उघड उघड परिणामबोधक आहे; अभ्यास केला नाहींस कारण तूं नापास झालास असा अर्थ येथें नाहीं; यामुळें त्यास कारणबोधकांत ढकलणें योग्य नाहीं. ( येथें थोडें असेंही पाहिलें पाहिजे कीं, ' तूं नापास झालास ' हें प्रधान–वाक्य आहे. अर्थात् ' अभ्यास केला नाहींस ' हें जरी नापास होण्याचें कारण असलें तरी प्रस्तुत वाक्यांत **म्हणून** याचा संबंध पूर्व–वाक्याशीं नसून ' म्हणून तूं नापास झालास ' असा परिणाम दाखविणाऱ्या उत्तर–वाक्याशीं आहे; यासाठीं **म्हणून** हें येथें परिणामबोधक उ० अव्ययच म्हटलें पाहिजे. ' वारा आला आणि पाऊस गेला ' ह्या संयुक्त–वाक्यांत दोन्हीं प्रधान वाक्ये असल्यामुळें मधलें आणि हें उभयान्वयी अव्यय स्वतः अलिप्त राहूनही त्या दोन वाक्यांचा संबंध जोडतें; परंतु मिश्र–वाक्यांत मधल्या उभयान्वयी अव्ययाचा ज्या वाक्याशीं संबंध असेल त्या वाक्याच्या पोटांत त्याला विधेय–विस्तारांत जागा मिळते. त्याप्रमाणेंच 'अभ्यास केला नाहींस **म्हणून** तूं नापास झालास ' या मिश्र–वाक्यांत 'म्हणून'चा संबंध ' तूं नापास झालास ' ह्या पुढील प्रधान-वाक्याशीं आहे, व वाक्यपृथक्करणांत तें वाक्य त्याच्याच पोटांत विधेयविस्ताराच्या सदरांत समाविष्ट होत असल्यामुळें व तें वाक्य परिणाम दाखवीत असल्यामुळें, पूर्व-वाक्य कारण दाखविणारें असलें तरी येथील ' म्हणून ' ह्यास कारणदर्शक म्हणतां येणार नाहीं; त्यास परिणामबोधकच म्हटलें पाहिजे.

[ **आ** ] आतां उद्देशदर्शक व कारणदर्शक ' **म्हणून** ' या अव्ययाविषयीं विचार करूं. ' नोकरी पहावी **म्हणून** मी येथें आलों आहें.' येथेंही नोकरी पहावी ह्या कारणामुळें मी येथें आलों आहें असा अर्थ करून **म्हणून** यास कारणदर्शकात ढकलणें बरोबर नाहीं; कारण व उद्देश हीं दोन्हीं एकच नव्हत. अर्थात् वरील वाक्यांतील ' म्हणून ' हें कारणदर्शक नसून उद्देशदर्शकच म्हटलें पाहिजे, हें ध्यानांत ठेवावयास हवें.

**टीप**—परिणामबोधक व उद्देशदर्शक 'म्हणून' ह्यांत महत्त्वाचा फरक असा आहे कीं, परिणामाचा उल्लेख ज्या वाक्यांत येतो, त्याच्या आरंभीं ' म्हणून ' हें उभयान्वयी अव्यय येतें व उद्देशाचा उपयोग ज्या वाक्यांत केलेला असेल त्याचे शेवटीं 'म्हणून' हें उभयान्वयी अव्यय येतें. उदा०—विष प्याला **म्हणून** तो मेला. यांत ' तो मेला ' हें परिणामदर्शक वाक्य असून त्याचे आरंभीं 'म्हणून'

आलें आहे. तसेंच ' नोकरी पहावी म्हणून मी येथें आलों आहें ' यांत 'नोकरी पहावी' हें उद्देशदर्शक वाक्य असल्यामुळे त्याचे शेवटीं ' म्हणून ' हा शब्द आला आहे.

---

# शब्दयोगी अव्ययें

नाम व त्याप्रमाणें योजले जाणारे इतर शब्द ह्यांना जोडून येऊन, त्यांचा वाक्यांतील इतर शब्दांशीं संबंध दाखविणारा जो अविकारी शब्द त्यास **शब्दयोगी अव्यय** म्हणतात. उदा०—विद्यार्थ्यांचें अभ्यासा**कडे** लक्ष असावें; मनुष्याची किंमत पैशा**पेक्षां** त्याच्या गुणां**वर** अवलंबून असते; इ०. येथें **कडे, पेक्षां, वर,** हीं शब्दयोगी अव्ययें आहेत.

कांहीं स्थलवाचक व कालवाचक अव्ययें क्रियाविशेषण अव्ययेंही असतात व शब्दयोगी अव्ययेंही असतात; ज्यावेळीं तीं नामापुढें त्यास जोडून येतात, तेव्हां तीं शब्दयोगी अव्ययें असतात; आणि जेव्हां तीं स्वतंत्र असून कशासही जोडलीं न जातां क्रियेचा गुण दाखवितात, तेव्हां तीं क्रियाविशेषण अव्ययें असतात. उदा०—

| शब्दयोगी अव्ययें | क्रियाविशेषण अव्ययें |
|---|---|
| तो माडी**वर** आहे. | त्यानें हात **वर** केले |
| दिव्या**खालीं** अंधार असतो. | तूं **खालीं** ये. |
| स्नाना**पूर्वी** तोंड धुवावें. | **पूर्वी** वानर फार होते. |
| जेवणा**नंतर** विडा खातात. | त्यानें **नंतर** (मागून) श्लोक म्हटला. |

शब्दयोगी अव्ययांमध्यें मुख्यतः (१) मागील शब्दाचे सामान्यरूप करणारीं व (२) मागील शब्दाचें सामान्यरूप न करणारीं, असे दोन प्रकार आढळतात. पहिल्यांस नुसतेंच **शब्दयोगी अव्ययें** म्हणतात व दुसऱ्यांस **शुद्ध-शब्दयोगी अव्ययें** म्हणतात.

पहिल्या प्रकारांतील कांहीं विभक्तींकरितां उपयोगांत येतात; तीं पुढें दिलीं आहेत.

**टीप**—कांहींना शुद्धशब्दयोगी अव्ययें म्हटल्यानें बाकीचीं अशुद्ध शब्दयोगी अव्ययें असा अर्थ नाहीं; ह्या संज्ञा फक्त सोयीकरितां दिलेल्या आहेत.

विभक्ति-प्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय लागण्यापूर्वी नामाचें एक सर्व-साधारण रूप होत असतें, त्यास **सामान्यरूप** म्हणतात. ह्या सामान्य-रूपापुढें विभक्ति-प्रत्यय अगर शब्दयोगी अव्यय लागतें. उदा०–घोडा याचें सामान्यरूप **घोड्या** असें होऊन नंतर **घोड्या-स, घोड्या-नें, घोड्या-वर, घोड्या-जवळ,** अशीं रूपें होतात. ( विभक्ति-प्रकरणांत याबद्दल विवेचन आलें आहे ).

शब्दयोगी अव्ययांमुळें बहुधा मागील शब्दाचें सामान्यरूप होतें. उदा०— घरावर, गांवामध्यें, तुझ्यासाठीं, इ०.

स्थलवाचक व कालवाचक अ-कारान्त विशेषनामांचें पासून, पर्यंत, पावेतों, ह्या शब्दयोगी अव्ययांमुळे विकल्पानें सामान्यरूप होतें. उदा०—**नागपूर-पासून** किंवा **नागपुरापासून तळेगांवपर्यंत** किंवा **तळेगांवापर्यंत, सोमवारपासून शनिवारापर्यंत,** इ०.

मराठींत पूर्णपणें रूढ झालेल्या परकीय भाषेंतील विशेषनामाचेंही विकल्पानें सामान्यरूप होतें. उदा०—मराठ्यानीं **निजामउल्मुलकवर** किंवा **निजाम-उल्मुलकावर** स्वारी केली; **इंग्लंडमध्यें** किंवा **इंग्लंडामध्यें** इंग्रज लोक राहतात; इ०.

शब्दयोगी अव्यय व शुद्ध शब्दयोगी अव्यय यांत फरक असा कीं, ( १ ) शब्दयोगी अव्ययामुळें मागील शब्दाचें सामान्यरूप होतें; पण शुद्ध-शब्दयोगी अव्ययामुळें मागील शब्दाचें कधींच सामान्यरूप होत नाहीं; तसेंच ( २ ) शब्दयोगी अव्ययें मागील नामास किंवा नामाप्रमाणें योजिलेल्या शब्दासच जोडून येतात, परंतु शुद्धशब्दयोगी अव्ययें वाटेल त्या शब्दास जोडून येतात; उदा०—गोविंदाला**च** गोलाव, गोविंदाला बोलाव**च**, त्याला वर**च** बसण्यास सांग, विष बाधलें म्हणून**च** तो मेला, इ०. ( ३ ) शुद्धशब्द-योगी अव्ययांमुळें मागील शब्दाच्या अर्थास अधिक जोर येतो.

शुद्धशब्दयोगी अव्ययें पुढील होत–च, ही, ना, मात्र, देखील, सुद्धां, पण, इ०.

## विभक्तींकरितां उपयोगांत येणारीं शब्दयोगी अव्ययें.

द्वितीयेकरितां—प्रत, लागीं; उदा०–तुज**प्रत** किंवा तुला वंदन असो.

तृतीयेकरितां—करून, द्वारें, मुळे, कडून; उदा०—**माझ्याद्वारें**, किंवा माझ्या**मुळें** किंवा **माझ्याकडून** किंवा माझ्यानें हें काम झालें, इ०.

चतुर्थीकरितां-कारणें, करितां, साठीं, स्तव; उदा०-मीं हे आंबे देवा-**करितां**-देवा**साठीं**-देवा**स्तव**-देवा**कारणें** किंवा देवाला आणले आहेत.

पंचमीकरितां—पेक्षां, पासून: उदा०—रामा**पेक्षां** किंवा रामाहून हरी मोठा आहे.

षष्ठीकरितां—संबंधीं: उदा०—हरीनें मला तुझ्या**संबंधीं** किंवा तुझी माहिती सांगितली.

सप्तमीकरितां—मध्यें, ठायीं, विषयीं, आंत: उदा०—चिंतोपंत घरा**मध्यें** किंवा घरीं होते; इत्यादि.

क्रियाविशेषण अव्ययांचा क्रियापदाशीं प्रत्यक्ष संबंध असतो, परंतु शब्दयोगी अव्ययांचा क्रियापदाशीं साक्षात् संबंध येत नसून, त्यांच्या योगानें नामाचा क्रियापदाशीं संबंध जोडण्याचें कार्य मात्र होतें. क्रियाविशेषण अव्ययें स्वतंत्रपणें येऊं शकतात: परंतु शब्दयोगी अव्ययें स्वतंत्रपणें केव्हांच येऊं शकत नाहींत.

शब्दयोगी अव्ययें मागील शब्दास जोडून लिहावयाचीं असा मराठी भाषेचा प्रघात आहे. बोलताना तीं जोडून बोललीं जातात, तशींच लिहितांनाही तीं जोडून लिहिणेंच प्राप्त झालें असलें पाहिजे.· हिंदी वगैरे भाषांत शब्दयोगी अव्ययें जोडून न लिहितां स्वतंत्र लिहितात. तसें करण्यामुळें त्या भाषेंतील शब्दांच्या अर्थांत कांहीं न्यूनता आलेली दिसून येत नाहीं; पण मराठींत तीं तशीं लिहिल्यास अर्थामध्यें कमीपणा आल्याचें प्रत्ययास येतें. उदा०—**झाडा वर** आंबे आहेत, **दिव्या खालीं** अंधार असतो, हें म्हणणें कानांला चमत्कारिक लागतें; आणि वर, खालीं, यांचे मराठींत जे प्रचलित सामान्य अर्थ त्यापेक्षा झाडावर, दिव्याखालीं, ह्या जोड-शब्दांमुळें एक विशिष्ट प्रकारचा निराळा अर्थ आपल्यास प्रतीत होतो; म्हणून तो अर्थ व्यक्त करण्यासाठीं आपल्या भाषेच्या बोलण्याच्या पद्धतीस अनुसरून, तीं मागील शब्दास जोडून लिहितात; तें योग्यच आहे.

## साधित शब्दयोगी अव्ययें

कित्येक शब्दयोगी अव्ययें मूळ नामांस अगर इतर प्रकारचे शब्द ह्यांना विभक्तिप्रत्यय लागून बनलेलीं आहेत; परंतु तीं आतां इतकीं रूढ होऊन गेलीं आहेत कीं, त्यांचें मूळ पालटून तीं सर्वच शब्दयोगी अव्ययें म्हणून मानलीं जातात. कांहीं अन्य प्रकारेंही साधतात. उदा०—

**नामसाधित** —पूर्वी, मध्यें, ठायीं, अन्तीं, कारणें, ऐवजीं, प्रमाणें, द्वारें, मुळें, पाशीं, योगें, विषयीं, इ०.

**विशेषणसाधित**—सम, समान. ( जोगता, सारखा, इ० कांहीं आ-कारान्त विशेषणें शब्दांना जोडून येतात; तीं बदलणारीं असल्यामुळें त्यांस शब्दयोगी अव्ययें न म्हणतां शब्दयोगी विशेषणें म्हणतात ).

**धातुसाधित**—देखत, करितां, लागीं, इ०.

**अव्ययसाधित**—वरून, खालून, पुढून, मागून, इ०.

---

# केवलप्रयोगी अव्ययें

मनाला एकाएकीं होणारे हर्ष, शोक, इत्यादि विकार दर्शविण्याकरितां जे शब्द एकदम उच्चारले जातात, अशा अविकारी शब्दांना **केवलप्रयोगी** किंवा **उद्गारवाचक** अव्ययें असें म्हणतात. उदा०—

**अबब !** केवढी ही रास ! **वाहवा** ! फारच मजेदार देखावा ! इ०. यांत **अबब** या शब्दानें एकाएकीं आश्चर्य झालेलें व्यक्त होत आहे व **वाहवा** या शब्दानें एकदम आनंद झालेला व्यक्त होत आहे; म्हणून हे शब्द **केवलप्रयोगी** किंवा **उद्गारवाचक अव्ययें** होत.

**कै० आगरकर** यांनीं वाक्य-मीमांसेच्या उपोद्घातांत केवलप्रयोगी अव्ययांचें स्वरूप पुढील प्रकारें उत्कृष्ट रीतीनें दाखविलें आहे—"या वर्गात, सुख-दुःखादि उद्गार प्रकट करणारे जे विसंगत शब्द बोलण्यांत किंवा लिहिण्यांत घालण्याची चाल पडली आहे, त्यांचा समावेश होतो. या शब्दांस व्याकरणांत फारसें महत्त्व देण्याचा प्रघात नाहीं. कारण एक तर ते क्वचित् प्रसंगीं येतात; दुसरें, कांहीं तरी विधान करणें हें जें वाक्याचें मुख्य काम त्यास ह्यांच्या योगानें म्हणण्यासारखी मदत होत नाहीं. या उद्गारवाची अव्ययांस मुळींच अर्थ नसतो असें नाहीं. त्यांचा बारकाईनें विचार केल्यास त्यांपैकीं प्रत्येकास समग्र वाक्याचा अर्थ असतो, असें दिसून येईल. 'अरेरे !' हा शब्द उच्चारला असतां 'ही गोष्ट ऐकल्यानें मला दुःख होतें' अशा अर्थाचा बोध होतो. वाहवा ! शाबास ! खाशी !' इ० शब्दांनीं आनंदादि वृत्ति व्यक्त होतात; व

त्याचप्रमाणें इतर केवलप्रयोगी अव्ययांचा अर्थ करून दाखवितां येईल. तथापि ज्या अर्थीं त्यांचा उच्चार आकस्मिक होत असतो, म्हणजे ते उच्चारण्यापूर्वी मनाला विचार करण्यास सवड नसते, त्या अर्थीं भय, आश्चर्य, किंवा अशाच प्रकारचा दुसरा एकादा मनोविकार एकाएकीं उत्पन्न करणाऱ्या कारणांनीं शरीरावर जे परिणाम होतात, त्यांसारखेंच ह्या अव्ययांस गणतात. यांच्या योगानें विशेषप्रसंगीं मनाची जी स्थिति झाली असेल, तिचा समजण्यासारखा ध्वनि मात्र होतो; कोणत्याही प्रकारचें स्पष्ट विधान होत नाहीं."

खालील प्रकारचीं केवलप्रयोगी अव्ययें विशेषतः आपल्या बोलण्यांत आढळतात—

**हर्षद्योतक**—वा, वः, वाः, वाहवा, ओहो, आहा, इ०.

**शोकद्योतक**—हाय, हायहाय, हायरे, अहा, आईआई, अगाई, अरेरे, अगग, आईग, हरहर, शिवशिव, रामराम, देवारे, इ०.

**आश्चर्यद्योतक**—ओहो, अबब, बबब, अगबाई, हाँ, अरे बापरे, इ०.

**अनुमोदनद्योतक**—होय, ठीक, अच्छा, हं, इ०.

**प्रशंसाद्योतक**—वाहवा, शाबास, भले, खाशी, मारू, यंव, ठीक, इ०.

**विरोधद्योतक**—हट्, छट्, छेः, छीः, छीछी, ऊंः, अहं, उंहूं, इ०.

**तिरस्कारद्योतक**—धिक्, थूः, इश्श, अहाहा, इ०.

**स्वीकारद्योतक**—जी, ठीक, हां, हां जी, हं, होय, इ०.

ज्यांचा वाक्यार्थाशीं कांहीं संबंध नसतो, तथापि ज्यांच्यामुळें व्यावहारिक भाषेंत चटकदारपणा, सौंदर्य, ऐट, गोडी, इत्यादि उत्पन्न होतात असे कित्येक शब्द आपल्या बोलण्यांत आढळतात; अशा शब्दांस **व्यर्थ उद्गारवाचक** अव्ययें असें 'शास्त्रीय मराठी व्याकरणकार' कै० **मोरो केशव दामले** यांनीं म्हटलें आहे. उदा०—तो **आपला** कांहीं तरी बोलतो; पोर **बेटी** भारी खोल; तूं येईस ना **परता**; आतां **बरीक** कमाल झाली; त्याला अक्षर **म्हणून** येत नाहीं; इ०.

यांतील कांहीं शब्दांचीं रूपें लिंग-वचनादि विकारयुक्त दिसतात खरीं, तथापि त्यांचा त्या दृष्टीनें वाक्यांत उपयोग केलेला नसतो; ते शब्द आगंतुकपणें उद्गारले जातात; त्यांच्यावांचून वाक्यांत कांहीं अडत नाहीं; म्हणून अशा शब्दांना **केवलप्रयोगी अव्ययें** म्हटल्यास सोयीचें होईल असें वाटतें.

केवलप्रयोगी अव्ययांचा वाक्यांत समावेश होऊं शकत नाहीं, त्यांचा वाक्यांतील कोणत्याच शब्दाशीं संबंध नसतो, ते अगदीं स्वतंत्र शब्द असून त्यांचा इतर कोणत्याही जातींत समावेश होत नाहीं, ते अव्यय-शब्द असल्यामुळें व केवळ मनोविकारच प्रकटवीत असल्यामुळें त्यांस **उद्गारवाचक** अथवा **केवलप्रयोगी** अव्ययें म्हणतात.

केव्हां केव्हां सबंध वाक्यानें किंवा वाक्यांशानेंही मनोविकार एकदम प्रकट होतो. ‘ काय मौज ! ’ ‘ त्राहि भगवन् ! ’ ‘ दे माय धरणी ठाय ! ’ इ०. यांसही केवलप्रयोगी अव्ययें म्हणण्याचा कांहींचा कल दिसतो, पण तो तितका ग्राह्य नाहीं. ह्या ठिकाणीं ‘ काय मौज आहे ! ’ ‘ भगवन्, मला त्राहि ! ’ अशा रीतीनें अध्याहृत शब्द घालून व पूर्ण वाक्यें करून त्यांची व्यवस्था लावतां येण्यासारखी आहे. ( तथापि ‘ नमः शिवाय, ’ ‘ विष्णवे नमः ’ इ०. ठिकाणीं त्यांचीं पूर्ण वाक्यें बनविणेंही एक प्रकारें विसंगतच असल्यामुळें अशा केवळ उद्गारवाचक शब्दसमुच्चयास ‘ केवलप्रयोगी अव्ययें ’ असें म्हणण्यास हरकत नाहीं. सारांश, अर्थदृष्ट्या जेथें सयुक्तिक दिसेल तेथें वरील प्रकारच्या शब्दसमुच्चयास स्वतंत्र वाक्य म्हणावें व जेथें तसें वाक्य मानणें विसंगत वाटेल तेथें त्यास केवलप्रयोगी अव्यय म्हणावें, हें एकंदरींत सोयीच्या दृष्टीनें इष्ट वाटतें ).

कांहीं मनुष्यांस बोलण्यांत कांहीं महत्त्वाचा मुद्दा आठवत नसल्यामुळें किंवा त्याची अडखळण्याची प्रवृत्ति असल्यामुळें, पालुपदाप्रमाणें उगीच कांहीं तरी शब्द मध्यें बोलण्याची लकब असते: अशा शब्दास **पादपूरणार्थक केवलप्रयोगी अव्ययें** म्हणतात. उदा०—आतां, आणखीन्, बरें, जेहेत्ते, इ०.

केवलप्रयोगी अव्ययांचा वाक्यांत कोणाशीं कांहींही संबंध नसल्यामुळें तीं गाळलीं असतां वाक्यार्थास कांहीं बाध येत नाहीं; व म्हणून तीं वाक्यपृथक्करणांतही येत नाहींत.

कांहीं नामें व विशेषणें ह्यांचाही केव्हां केव्हां उद्गारवाचकांप्रमाणें उपयोग होतो. उदा०-अगबाई, देवा, रामराम, शिवशिव, भलतेंच, इ०.

उद्गारवाचक शब्दांपुढें नेहमीं उद्गारचिन्ह असणें जरूर आहे. संबोधनार्थक शब्दांपुढें वास्तविक स्वल्पविराम द्यावयास पाहिजे; त्यांपुढें उद्गारचिन्ह देणें योग्य होणार नाहीं. उदा०-(१) रामराम ! काय हा प्रसंग ! (२) रामा, इकडे ये; इ०.

---

# शब्दांचे विकार

## लिंग

नाम, सर्वनाम आणि नामाप्रमाणें उपयोगांत आणिलेलीं विशेषणें, ह्यांना लिंग, वचन व विभक्ति, हे विकार होतात; तसेंच क्रियापदाला लिंग, वचन व आख्यात, हे विकार होतात; ह्यांच्यासंबंधाचा क्रमानें ह्या प्रकरणांत विचार करूं.

मूळ शब्दांपुढें लिंग, वचन, विभक्ति, आख्यात, इत्यादिकांकरितां जीं अक्षरें लागतात, त्यांस **प्रत्यय** असें म्हणतात.

प्रत्यय अनेक कारणांकरितां लागतात; त्या सर्वांचा एकदम विचार करणें शक्य नसल्यानें प्रथम लिंग, वचन, विभक्ति, यांच्यासंबंधाचाच क्रमानें विचार करूं.

मराठींत व इतर भाषांतही शब्दांवरच केव्हां सकारण पण केव्हां अकारण –पुरुषत्व, स्त्रीत्व किंवा तद्भिन्नत्व–यांचा आरोप करण्याचा प्रघात पडला आहे. मराठी भाषेचा तर हा एक विशेषच आहे. घोडा हा पुल्लिंगी शब्द, घोडी हा स्त्रीलिंगी शब्द व घोडें हा नपुंसकलिंगी शब्द, हें साहजिकच आहे; परंतु दरवाजा, आंबा, सोटा, तबला, दगड, हे शब्द पुल्लिंगी कां? चिंच, काठी, सतार, वीट, हे शब्द स्त्रीलिंगी कां? घर, गाव, फूल, हे शब्द नपुंसकलिंगी कां? ह्याची कांहींच उपपत्ति सांगतां येत नाहीं; तरी पण त्यासंबंधानें कांहीं कल्पना येण्यापुरती माहिती येथें देणें अवश्य आहे.

शब्दावरून त्याच्या ठिकाणच्या वास्तविक किंवा काल्पनिक पुरुषत्वाचा, स्त्रीत्वाचा किंवा त्याशिवाय निराळ्या प्रकाराचा जो बोध होतो, त्यास **लिंग** असें म्हणतात. उदा०–**घोडा** ह्या शब्दाचें पुरुषत्व त्याच्या अर्थाच्या दृष्टीनें वास्तविक आहे; **गाय** ह्या शब्दाचें स्त्रीत्वही त्या शब्दाच्या अर्थाच्या दृष्टीनें वास्तविक आहे; पण **दरवाजा** ह्या शब्दाचें पुंस्त्व त्याच्या अर्थाच्या दृष्टीनें वास्तविक नसून काल्पनिक आहे.

ज्या शब्दांवरून त्यांच्या ठिकाणच्या वास्तविक किंवा काल्पनिक पुरुषत्वाचा बोध होतो, त्यांस **पुल्लिंगी** शब्द म्हणतात. उदा०–रामा, गोविंदा, घोडा, बैल, सूर्य, डोळा, रस्ता, खांब, इ०.

ज्या शब्दांवरून त्यांच्या ठिकाणच्या वास्तविक किंवा काल्पनिक स्त्रीत्वाचा बोध होतो, त्यांस **स्त्रीलिंगी** शब्द म्हणतात. उदा०—यमू, मथू, घोडी, गाय, चिमणी, विमल, काठी, नदी, इ०.

ज्या शब्दांवरून त्यांच्या ठिकाणचें वास्तविक किंवा काल्पनिक पुरुषत्व अथवा स्त्रीत्व ह्यांपेक्षां निराळ्या प्रकारचा बोध होतो, त्या शब्दांस **नपुंसक लिंगी** शब्द म्हणतात. उदा०—मूल, घोडें, बकरें, झाड, शहर, फूल, रान, इ०.

मराठींत पुल्लिंगी शब्दांचें स्त्रीलिंगी रूप कसें होतें यासंबंधाचे निरपवादक नियम नाहींतच म्हटल्यास हरकत नाहीं. कोणीं अर्थावरून ह्यासंबंधाचे नियम बसविण्याचा प्रयत्न केला आहे. ( आड व विहीर, रस्ता व सडक, इ० ). पण ह्यांचे साधारणपणें अर्थ एकच् असले तरी त्यांचीं लिंगें एक नाहींत. तसेंच देह–तनु–शरीर, देव–देवता–दैवत, ग्रंथ–पोथी–पुस्तक, ह्यांचेही अर्थ बहुंशानें एकच असले तरी त्यांचीं लिंगें भिन्न आहेत. मोठा पदार्थ तो पुल्लिंगी, लहान तो स्त्रीलिंगी ( लोटा–लोटी, गोटा–गोटी, इ० ) ह्यांप्रमाणें मानिल्यास, दिवा–मशाल, ओढा–नदी, दोरा–दोरी, इ० ठिकाणीं अगदीं विरुद्ध प्रकार दिसून येतो.

त्यांतल्यात्यांत लोकव्यवहाराच्या दृष्टीनें कांहीं नियम सांपडतात, ह्यांपैकीं कांहींचें स्वरूपावलोकन येथें करूं.

( १ ) मराठींत '**आ**'–कारान्त पुल्लिंगी प्राणिवाचक नामांचें स्त्रीलिंगी रूप '**ई**'–कारान्त असतें व नपुंसकलिंगी रूप '**एं**'–कारान्त असतें. उदा०—

| पु० | स्त्री० | न० | पु० | स्त्री० | न० |
|---|---|---|---|---|---|
| घोडा | घोडी | घोडें | कुत्रा | कुत्री | कुत्रें |
| बकरा | बकरी | बकरें | पोरगा | पोरगी | पोरगें |
| मुलगा | मुलगी | मुलगें | कोल्हा | कोल्ही | कोल्हें |

यांतील नपुंसकलिंगी शब्द क्षुद्रत्वदर्शक किंवा पुरुष कीं स्त्री हें नक्की माहीत नसल्यामुळें तद्भिन्नतादर्शक अशा अर्थाचे असतात.

**टीप**–कांहीं **आ**-कारान्त प्राणिवाचक शब्दांचें वरीलप्रमाणें स्त्रीलिंगी रूप होतें, पण नपुंसकलिंगी रूप होतच नाहीं. उदा०—काका–काकी, मामा–मामी, आजा–आजी, चुलता–चुलती, इ०.

( २ ) कांहीं प्राणिवाचक पुल्लिंगी नामांचें स्त्रीलिंगी रूप ‘ **ईण** ’ हा प्रत्यय लागून होतें. उदा०—

| पु० | स्त्री | पु० | स्त्री० | पु० | स्त्री |
|---|---|---|---|---|---|
| वाघ | वाघीण | सिंह | सिंहीण | शिक्षक | शिक्षकीण |
| सुतार | सुतारीण | माळी | माळीण | दातार | दातारीण |
| सोनार | सोनारीण | गवळी | गवळीण | व्याही | विहीण |

( ३ ) कांहीं ‘ **अ** ’-कारान्त संस्कृत व मराठी प्राणिवाचक पुल्लिंगी नामांचें स्त्रीलिंगी रूप ‘ **ई** ’-कारान्त होतें. उदा०—

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| गोप | गोपी | सिंह | सिंही | हरीण | हरिणी | गाढव | गाढवी |
| दास | दासी | हंस | हंसी | उंदीर | उंदरी | बेडूक | बेडकी |
| तरुण | तरुणी | मृग | मृगी | मगर | मगरी | वानर | वानरी |

( ४ ) कांहीं ‘**आ**’-कारान्त पुल्लिंगी पदार्थवाचक शब्दांचें लघुत्वार्थी ‘**ई**’ प्रत्यय लागून स्त्रीलिंगी रूप होतें. उदा०—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| आरसा | आरशी | कुरकुला | कुरकुली | दांडा | दांडी |
| खळगा | खळगी | सुपला | सुपली | लोटा | लोटी |
| खडा | खडी | भाकरा | भाकरी | पळा | पळी |

( ५ ) व्यंजनान्त कांहीं संस्कृत पुल्लिंगी नामांचेंही स्त्रीलिंगी रूप ‘**ई**’ प्रत्यय लागून होतें. उदा०—

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ( भगवान् ) | भगवत् | भगवती | (राजा) | राजन् | राज्ञी | धनिन् | धनिनी |
| ( श्रीमान् ) | श्रीमत् | श्रीमती | (युवा ) | युवन् | युवती | विद्वस् | विदुषी |

( ६ ) संस्कृत ऋ-कारान्त शब्दांचीं पुल्लिंगी व स्त्रीलिंगी रूपें खालीलप्रमाणें होतात—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| कर्तृ— | कर्ता | कर्त्री | ग्रंथकर्ता | ग्रंथकर्त्री |
| दातृ— | दाता | दात्री | जनयिता | जनयित्री |
| धातृ— | धाता | धात्री | कवयिता | कवयित्री |

( ७ ) कांहीं संस्कृत व मराठी पुल्लिंगी शब्दांचें स्त्रीलिंगी रूप स्वतंत्र प्रकारेंच होतें. उदा०—

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| पुरुष | स्त्री | विधुर | विधवा | नवरा | बायको | बैल | गाय |
| वर | वधू | राजा | राणी | बोका | भाटी | रेडा | म्हैस |
| पुत्र | कन्या | बाप | आई | बोकड | शेळी | मोर | लांडोर |
| पिता | माता | दीर | जाऊ | उंट | सांडणी | वाघ्या | मुरळी |

[ होणें=बनणें, उत्पन्न होणें, असणें व अपेक्षा असणें, इतक्या चार अर्थांनीं ह्या धातूचा उपयोग होतो.

१. वरील रूपांपैकीं होणें=बनणें या अर्थानें सर्वच आख्यातीं त्याचा उपयोग होतो. उदा०— या नाटकांत तूं राजा **हो**, मी प्रधान **होतों**, गणू प्रतापराव **झाला**, चितू त्राटिका **होईल**, इ०.

२. होणें=जन्मणें, उत्पन्न होणें या अर्थानेंही हो धातूचीं रूपें उपयोगांत येतात. उदा०—त्याला इकडे मुलगा **होतो** न **होतो** तोंच तिकडे त्याचा बाप गेला; त्याला मुलगा **झाला**; सीताबाईंना मुलगी **होईल**; इ०.

३. होणें=इच्छा असणें ह्या अर्थीं ' व्ह ' किंवा विकल्पानें ' ह ' असें रूप होऊन हो धातूच्या पंचमाख्याती रूपांचा उपयोग होतो. उदा०—त्याला मुलगा **व्हावा** किंवा **हवा** असे वाटतें; मुलगी **व्हावी** किंवा **हवी** असें वाटत नाहीं; इ०.

४. होणें=असणें या अर्थीं हो धातूच्या षष्ठाख्यातीं रूपांचा अस धातूच्या भूतकाळाच्या अर्थाप्रमाणें उपयोग होतो. उदा०—मी गेल्या वर्षीं कारकून **होतों**, आतां हेडक्लार्क आहे; काल तेल महाग **होतें**, आज स्वस्त आहे; इ०.

**अकर्मक ' आहे ' धातु** [ सप्तमाख्यात ]

| | | |
|---|---|---|
| प्र० पु० | मी आहें | आम्ही आहों |
| द्वि० पु० | तूं आहेस | तुम्ही आहां, आहांत |
| तृ० पु० | तो–ती–तें आहे | ते–त्या–तीं आहेत |

**अकर्मक ' नाहीं ' धातु** [ सप्तमाख्यात ]

| | | |
|---|---|---|
| प्र० पु० | मी नाहीं | आम्ही नाहीं |
| द्वि० पु० | तूं नाहींस | तुम्ही नाहीं |
| तृ० पु० | तो–तीं–तें नाहीं | ते–त्या–तीं नाहींत |

**आहे** व **नाहीं** ह्या धातूंचीं इतर आख्यातीं रूपें होत नाहींत. तसेंच **आहे**, **नाहीं**, यांत अनुक्रमें अस, नस, हे धातु मानितां येत नाहींत; कारण अस व नस ह्या धातूंचीं वर्तमानकाळीं प्रथमाख्यातीं असतो, नसतो, अशीं रूपें होतात; तीं रूपें व आहे, नाहीं, हीं रूपें एक नव्हत. मात्र अस व नस या धातूंच्या वर्तमानकाळाकरितां त्यांचा उपयोग होतो; एवढेंच फार तर म्हणतां

येईल. तसेंच येथें आह व नाह हे विचित्र धातु मानण्यापेक्षां ते अनियमित धातु समजून ‘ आहे ’ व ‘ नाहीं ’ हेंच पाहिजे, नको, नलगे, नये, यांप्रमाणें शब्द आहेत, असें समजणेंच सोयीचें दिसते ]

**अकर्मक नहो धातु** [ षष्ठाख्यात ]

| | | |
|---|---|---|
| प्र० पु० | जर मी नव्हतों-तें(त्यें)-तें | जर आम्ही नव्हतों |
| द्वि० पु० | ,, तूं नव्हतास-तीस-तेंस | ,, तुम्ही नव्हतां<br>,, तुम्ही नव्हतेत-त्यात( तींत) |
| तृ० पु० | ,, तो नव्हता,<br>,, ती नव्हती,<br>,, तें नव्हतें | ,, ते नव्हते,<br>,, त्या नव्हत्या,<br>,, तीं नव्हतीं |

**सप्तमाख्यात**

| | | |
|---|---|---|
| प्र० पु० | मी नव्हें | आम्ही नव्हों |
| द्वि० पु० | तूं नव्हेस, नव्हस | तुम्ही नव्हां |
| तृ० पु० | तो-ती-तें नव्हे | ते-त्या- तीं नव्हत, नव्हेत |

**टीप**—कवितेंत नाहीं व नव्हे यांबद्दल केव्हां केव्हां **नोहे** हें रूप आढळतें. उदा०—‘ **नोहे** हा पवन जवन वारु भासतो; नातरी इक्षुदंड गाळी तयासचि गोड, घाणीं गाळी तया कडू, **नोहे**चि जेंवि; इ०.

**अकर्मक पाहिजे** ( इच्छार्थक ) **धातु** [ सप्तमाख्यात ]

| | | |
|---|---|---|
| प्र० पु० | मी पाहिजे | आम्ही पाहिजे |
| द्वि० पु० | तूं पाहिजे, पाहिजेस | तुम्ही पाहिजे, पाहिजेत |
| तृ० पु० | तो-ती-तें पाहिजे | तें-त्या-तीं पाहिजे, पाहिजेत |

**अकर्मक नको धातु** [ सप्तमाख्यात ]

| | | |
|---|---|---|
| प्र० पु० | मी नको | आम्ही नको |
| द्वि० पु० | तूं नको, नकोस | तुम्ही नको, नका |
| तृ० पु० | तो-ती-तें नको | ते-त्या-तीं नकोत |

**अकर्मक नये धातु** [ सप्तमाख्यात ]

| | | |
|---|---|---|
| प्र० पु० | मी नये | आम्ही नये |
| द्वि० पु० | तूं नये, नयेस | तुम्ही नये |
| तृ० पु० | तो-ती-तें नये | ते-त्या-तीं नयेत |

## अकर्मक नलगे धातु [ सप्तमाख्यात ]

ह्या क्रियापदाचें ' **नलगे** ' ह्याशिवाय निराळ्या प्रकारचें इतर कोणत्याच आख्यातांतील रूप आढळत नाहीं. ( नलगों, नलगस, इ० रूपें फारशीं रूढ नाहींत ).

**पाहिजे, नको, नलगे** व **नये** हीं गौण अथवा सिद्ध क्रियापदें आहेत; त्यांत निराळा असा धातु सांपडत नाहीं.

ह्याप्रमाणें धातूंना कोणते प्रत्यय लागून त्यांचीं क्रियापदें बनतात, ह्यासंबंधाचे विवेचन येथें संपलें. धातूचीं प्रयोजक व शक्य रूपें **मारवितों-मारविलें-मारवीन** व **मारवतें-मारवलें-मारवेल**, अशा प्रकारेंच साधतात; आणि तीं सहज कळण्यासारखींच आहेत; म्हणून तीं येथें लिहून दाखवून आणखी जागा अडविली नाहीं.

---

## कांहीं अपवादरूप शब्द

**अव्ययें बदलत नाहींत म्हणूनच तीं अव्ययें**. पण चालू व जिवंत भाषेंत नाना प्रकार आढळतात; तिला कोणीच प्रतिबंध करूं शकत नाहीं; ह्यामुळें कांहीं अपवादक गोष्टी असल्यास त्या नमूद करून ठेवणें भाग आहे.

( १ ) **आ**-कारान्त विशेषणें बदलतात, त्याप्रमाणें **आ**-कारान्त क्रियाविशेषणेंही बदलतात. उदा०—ते **उभे** राहतात, ह्या खणांत त्या पोथ्या **आडव्या** ठेव, तूं **चांगला** बस कसा, ती **उपडी** निजते, ते आपलीं घरें **पांढरीं** रंगवितात, त्यांनीं शिकवितांना तास तास **उभें** रहावें, सरकारनें त्याला **मोकळें** सोडिलें, त्याच्यानें **उताणें** पोहवतें, इ०.

**टीप**—जे शब्द केव्हांही नामविशेषणें नसून, मूळचेच क्रियाविशेषणें आहेत, ते **आ**-कारान्त असले तरी बदलत नाहींत. उदा०—सर्वथा, जरा, पुन्हां, उद्यां, एव्हां, तेव्हां, इ०.

( २ ) सारखा, जोगा, इ० **आ**-कारान्त मूळ विशेषणें दुसऱ्या शब्दास जोडून आलीं असतां, ते शब्द पुढील संबंधी शब्दाप्रमाणें बदलतात. उदा०—त्याला मना**जोगती** नोकरी मिळाली; त्यानें आपल्या इच्छे**जोगतें** घर बांधलें, माझ्या आंगठी**सारखी** अंगठी त्याजवळ आहे, इ०. अशा वेळीं त्यांस शब्दयोगी अव्यय म्हणणें युक्त नाहीं, ह्या संबंध शब्दास पुढील शब्दाचें विशेषण म्हणणेंच युक्त होईल, असें वाटतें.

**माझ्यासारख्यास** देहाचें कोड पुरविणें आवडत नाहीं, **तुझ्यासारख्यानें** ह्या पंचाइतींत पडूं नये, अशा ठिकाणींही ‘ माझ्यासारख्यास ’ म्हणजे माझ्यासारख्या मनुष्यास, ‘ तुझ्यासारख्यानें ’ म्हणजे तुझ्यासारख्या मनुष्यानें, असा अर्थ असल्यानें हे शब्द विशेषणात्मक नामें होत; व त्यांस विभक्तिप्रत्यय लागले आहेत; असें समजणेंच प्राप्त आहे.

( ३ ) मूळचीं अव्ययें असून, त्यांस विशेषणाचे **चा–ची–चें** व **ला–ली–लें** हे प्रत्यय लागून विशेषणें होतात; व तेव्हां त्यांत अर्थातच बदल होणें साहजिक आहे. उदा०—**येथली** खुर्ची, **पुढला** दरवाजा, **उद्यांचा** दिवस, इ०.

( ४ ) अरे, अगे, अहो, ह्या शब्दांपैकीं पहिले दोन अनुक्रमें पुल्लिंगी व स्त्रीलिंगी एकवचनी आहेत: आणि तिसरा शब्द पुल्लिंगी व स्त्रीलिंगी अनेकवचनी आहे. याप्रमाणें हे शब्द विकारक्षम दिसत असले, तरी त्यांचें ह्यांशिवाय निराळें असें विकृत रूप कोणतेंच होत नसल्यामुळें त्यांस संबोधनार्थक केवलप्रयोगी अव्ययें म्हणतात; त्यास कांहीं हरकत दिसत नाहीं.

---

# सामासिक शब्द

शब्द–विचारांत **शब्दांच्या जाति**, **शब्दांचे विकार** व **शब्दांची घटना** ह्या तीन गोष्टींचा समावेश होतो. पैकीं पहिल्या दोन गोष्टींबद्दल येथपर्यंत विचार झाला. शब्द–घटनेचें प्रकरण स्वतंत्र करणेंच सोयीचें असल्यानें, तें पहिल्या **साहित्य–विभागांत** आलेंच आहे. त्यांपैकीं उरलेल्या फक्त **सामासिक शब्दांचाच** येथें विचार केला आहे.

[ मनुष्याच्या भाषेच्या द्वारें विचार प्रकट करण्याच्या अनेक प्रवृत्ति आहेत. ( १ ) पुष्कळ अर्थ थोड्या शब्दांत सांगणें, ( २ ) थोडें ( सूत्रात्मक गोष्ट ) पुष्कळ शब्दांनीं विस्तृत करून सांगणें, ( ३ ) जलद बोलतांना कांहीं वर्णांचें एकीकरण करणें, ( ४ ) त्याच त्याच शब्दाची पुनरुक्ति करून विषयाचें महत्त्व ठसाविणें, ( ५ ) कांहीं शब्द अध्याहृत ठेवणें, ( ६ ) कांहीं उगीच ज्यास्त घालणें, ( ७ ) साक्षात् न बोलतां लक्षणेनें बोलणें, ( ८ ) अलंकारिक रीतीनें बोलणें, ( ९ ) जोडाक्षरें कमी करणें, ( १० ) कांहीं कमी केल्यास त्याबद्दल दुसरीकडे वाढविणें, ( ११ ) कांहीं वाढविल्यास अन्य ठिकाणीं कमी करणें,

( १२ ) वर्णविपर्यय होणें, इ० किती तरी गोष्टी मनुष्याच्या बोलण्यांतील सहजप्रवृत्ति होत. **समास** हे त्यांपैकीं इच्छित अर्थ कायम ठेवून पुष्कळ मजकूर थोडक्यांत आणण्याच्या प्रवृत्तीचें फळ होत. उदाहरणार्थ—' साखर घालून केलेला भात ' एवढें म्हणण्याऐवजीं तोच अर्थ ' **साखर-भात** ' एवढ्यानें व्यक्त करणें मनुष्याला सोयीचें वाटतें; त्यामुळें भाषेंत अनेक शब्द जोडून त्यांमिळून एक शब्द बनविण्याची-**समास** करण्याची-पद्धति रूढ झाली असावी ].

दोन शब्दांचा परस्परसंबंध दाखविणारे शब्द किंवा प्रत्यय लोप पावून, त्या दोन शब्दांचा जो एकत्र संयोग होतो, त्यास **समास** असें म्हणतात.

समासांतील शब्दाचा संबंध स्पष्ट करून सांगण्याच्या पद्धतीस समासाचा **विग्रह** असें म्हणतात. **गणेश** ह्या शब्दाची ' गणांचा जो ईश तो ' अशी फोड करणें हा **विग्रह** होय. **गजानन** ह्या शब्दाची ' गजासारखें आहे आनन ज्याचें तो ' अशी फोड करणें हा **विग्रह** होय.

समासातील दोन शब्दांपैकीं कोणता शब्द अर्थाच्या दृष्टीनें प्रधान आहे किंवा त्यांपैकीं कोणताही प्रधान नसून निराळ्याच एकाद्या शब्दाची प्रधानत्वानें अपेक्षा दिसत आहे, ह्या गोष्टीवरून समासाचे एकंदर **चार** मुख्य भेद करितात.

[ **देवघर** ह्या ठिकाणीं देवासंबंधानें कांहीं सांगावयाचें नसून, घर कोणतें हेंच मुख्यत. सांगावयाचें आहे; तसेंच **राजपुत्र** ह्यांत राजाबद्दल बोलावयाचें नसून, पुत्र कोणता तें मुख्यतः सांगावयाचें आहे; म्हणून हे द्वितीयपदप्रधान ( तत्पुरुष ) समास होत. **कृष्णार्जुन**, **सत्यासत्य**, ह्या शब्दांत एकटा कृष्ण किंवा एकटा अर्जुन, तसेंच नुसतें सत्य किंवा नुसतें असत्य, ह्यांबद्दल बोलावयाचें नसून दोन्हींबद्दल प्रामुख्यानें बोलावयाचें आहे; म्हणून हे उभयपदप्रधान (द्वंद्व) समास होत. **नीलकंठ, मृगनयना**, ह्यांतील पहिल्या शब्दांत निळें किंवा कंठ ह्यांबद्दल कांहीं सांगावयाचें नसून, शंकराबद्दलच मुख्यतः सांगावयाचें आहे; तसेंच दुसऱ्या शब्दांत मृगाबद्दल किंवा नयनांबद्दल कांहीं बोलावयाचें नसून, तशा प्रकारच्या सीता, दमयंती, इ० कोणत्या तरी स्त्रीबद्दल मुख्यतः बोलावयाचें आहे; म्हणून हे अन्यपदप्रधान ( बहुव्रीहि ) समास आहेत. तूं **दररोज** मला त्रास देतोस, अलीकडे **प्रतिवर्षी** दुष्काळ पडतो, ह्यांतील दररोज ह्या शब्दांत, ' **दर** ' व प्रतिवर्षी ह्यांतील ' **प्रति** ' ह्या पहिल्या शब्दांवर जोर आहे; म्हणून ते प्रथमपदप्रधान ( अव्ययीभाव ) समास आहेत ].

## १. प्रथमपदप्रधान किंवा अव्ययीभाव

ज्या समासांत विशेषतः पाहिलें पद मुख्य असतें, किंवा पहिला शब्द अव्यय असतो, आणि सर्व मिळून तो सामासिक शब्द क्रियाविशेषण अव्यय होतो, त्या समासास प्रथमपदप्रधान किंवा **अव्ययीभाव** समास असें म्हणतात. उदा०—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| प्रतिदिन | यथाविधि | यथाशास्त्र | आजन्म | यावज्जीव |
| प्रतिवर्ष | यथाशक्ति | यथाक्रम | आमरण | आसमंतात् |
| प्रतिक्षण | यथान्याय | यथायुक्त | आचंद्रार्क | व्यर्थ |

'भीष्म हे पित्याकरितां **आजन्म** ब्रह्मचारी राहिले' ह्यांतील आजन्म ह्या शब्दांत 'आ' हा उपसर्ग आहे; उपसर्गांस संस्कृतांत अव्ययाप्रमाणेंच मानितात; तेव्हां येथें प्रथम शब्द अव्यय असून, जन्म ह्या शब्दापेक्षां 'आ' ह्या उपसर्गानें होणाऱ्या 'पर्यंत' ह्या अर्थावर येथें अधिक जोर आहे; त्याचप्रमाणें येथें आजन्म हा शब्द क्रियेची वेळ दाखवीत असल्यामुळें तो क्रियाविशेषण अव्ययही आहे; म्हणून ह्या सर्व लक्षणांवरून हा अव्ययीभाव समास आहे. '**प्रतिवर्षी** चांगला पाऊस पडल्यास पीक येतें,' '**प्रतिक्षणीं** त्याचें कोणाशीं तरी भांडण होतेंच,' 'हा राजा **यथान्याय** प्रजेचें पालन करितो,' ह्यांतलि ठळक शब्दांतही प्रथम शब्द अव्यय असून ते प्रधान आहेत, आणि वरील शब्द क्रियाविशेषण अव्ययें आहेत; म्हणून हे सर्व अव्ययीभाव समास होत.

**अक्षि** हा शब्द अव्ययीभाव समासाच्या शेवटीं आल्यास, त्याचें **अक्ष** असें रूप होतें. उदा०—प्रत्यक्ष (डोळ्यांसमोर), समक्ष (डोळ्यांपुढें), परोक्ष (डोळ्यांआड), अपरोक्ष (डोळ्यांसमोर); परंतु मराठींत परोक्ष म्हणजे डोळ्यासमोर व अपरोक्ष म्हणजे डोळ्यांआड ह्या अर्थानें हे शब्द रूढ झाले आहेत.

### मराठी अव्ययीभाव समास

| | | | |
|---|---|---|---|
| घरोघर | गांवोगांव | दारोदार | जागोजाग |
| घडोघडीं | गल्लोगल्लीं | जागोजागीं | रस्तोरस्तीं |
| दिवसेंदिवस | दिवसानदिवस | घरानघर | रात्रंदिवस |

ह्या शब्दांत संस्कृत अव्ययीभाव समासांप्रमाणें पहिला शब्द अव्यय नाहीं; कांहीं शब्दांतील पहिल्या शब्दाचे अंतीं 'ओ'कार आलेला आहे, कांहीं शब्दांना शेवटीं विभक्तिप्रत्यय लागलेले दिसत आहेत, तरी हे सर्व शब्द एकंदरींत क्रिया-

विशेषण अव्ययें होत असल्यामुळें ते मराठींतील **अव्ययीभाव** समासच होत, यांत शंका नाहीं. कारण गल्लोगल्ली, रस्तोरस्तीं, इ० शब्दांत कांहीं गल्लोगल्ल, रस्तोरस्त, असे मूळ शब्द निघूं शकत नाहींत; त्यांस इतर विभक्तींचे प्रत्ययही लागत नाहींत; व त्यांचा क्रियाविशेषण अव्यय ह्या नात्यानेंच उपयोग होत आहे; म्हणून ते **अव्ययीभाव** समास होत.

### परकीय अव्ययभिाव समासाचीं उदाहरणें

दरमजल, दरराज, दरकूच, हरवख्त, हररोज, हरहमेश, बिनधोक, बिनहरकत, बिनतकरार, बिनशर्त, बेलाशक, बेमालूम, बेशक, बेअकल, बेवकूब, बेवार, बरहुकूम, बजिन्नस, गैरकायदा, गैराशिस्त, इ०.

**टीप**—दरदिवस, दरवर्ष, बिनअपराध, बिनतोड, हरदिन, हरघडी, हे शब्द यवनी व मराठी शब्दांच्या जुळणीनें झालेले सामासिक शब्द होत; अशा प्रकारचे समास करणें शिष्टसंमत नाहीं.

## २. **द्वितीयपदप्रधान** किंवा **तत्पुरुष**

ज्या समासांत दुसरें पद मुख्य असतें आणि अर्थदृष्ट्या गाळलेला विभक्ति-प्रत्यय किंवा शब्द विग्रहामध्यें घालावे लागतात, त्या समासास द्वितीयपद-प्रधान किंवा **तत्पुरुष** समास असें म्हणतात. उदा०—गायरान, तोंडपाठ, राजवाडा, देवघर, वनगाय, साखरभात, इ०.

[तत्पुरुष समासांतील दोन्ही शब्द केव्हां केव्हां एकाच विभक्तींत असतात आणि केव्हां केव्हां भिन्न विभक्तींत असतात; त्यावरून त्याचें **समानाधिकरण** तत्पुरुष व **व्यधिकरण** तत्पुरुष असे दोन भाग मानितात. म्हणजे '**कमलमुख**' ह्या शब्दांत कमलाचें मुख किंवा कमलाला मुख असा कांहीं तरी मध्यें विभक्ति-प्रत्यय घालून त्या शब्दाची फोड करावी लागत नाहीं; तेथें कमल व मुख ह्या शब्दांची एकच प्रथमा विभक्ति आहे; परंतु '**राजवाडा**' ह्यांत पहिला शब्द 'राजाचा' असा षष्ठी विभक्तींत व दुसरा 'वाडा' हा शब्द प्रथमा भिभक्तींत, ह्याप्रमाणें हे दोन्ही शब्द भिन्न विभक्तींत आहेत; म्हणून पहिला **कमलमुख** हा शब्द **समानाधिकरण** तत्पुरुषाचें व दुसरा **राजवाडा** हा शब्द **व्यधिकरण** तत्पुरुषाचें उदाहरण होय. त्याचप्रमाणें काळमांजर, तांबडमाती, चरणकमल, ह्या शब्दांतीलही दोन्ही शब्दांची एकच म्हणजे प्रथमा विभक्ति

आहे, म्हणून हे **समानाधिकरण** तत्पुरुष समास होत; आणि तोंडपाठ, गायरान, केळफूल, वनगाय, ह्या शब्दांतील पहिल्या शब्दांच्या अनुक्रमें तृतीया, चतुर्थी, षष्ठी, सप्तमी, ह्या विभक्ति असून, त्यांच्या प्रत्ययांचा लोप झाला आहे व दुसऱ्या शब्दांची मात्र प्रथमा विभक्ति आहे; ह्याप्रमाणें ह्या उदाहरणांत दोन्ही शब्दांची भिन्न विभक्ति असल्यामुळें हे शब्द **व्यधिकरण** तत्पुरुषाचीं उदाहरणें होत ].

रूढीमध्यें समानाधिकरण किंवा प्रथमा तत्पुरुषालाच **कर्मधारय** हें नांव आहे; व व्यधिकरण तत्पुरुषाला मात्र **तत्पुरुष** असें म्हणतात. ( प्रथमा व संबोधन ह्यांशिवाय ) समासांतील प्रथम शब्दाला लागणाऱ्या विभक्तीवरून ह्या **विभक्तितत्पुरुषाचे** खालील भेद मानितात.

**द्वितीया तत्पुरुष**—( सं० )—कृष्णाश्रित ( कृष्णास किंवा कृष्णाप्रत आश्रित ), दुःखप्राप्त ( दुःखाला प्राप्त ), देशगत ( देशास गत ), इ०.

**तृतीया तत्पुरुष**—( सं० ) ईश्वरनिर्मित ( ईश्वरानें निर्मित ), दयार्द्र, भक्तिवश, द्रव्यसाध्य, कष्टसाध्य, ईश्वरदत्त, मनःकल्पित, कृपावलोकन, मातृसदृश, ( मातेशीं सदृश ), तत्सम ( त्याशीं सम ), एकोन, गुणहीन, इ०.

( म० )—तोंडपाठ, गजमोजणी, घोडेमात, प्यादेमात, बुद्धिजड, कपाळकरंटा, तोंडजबानी, दुप्पट ( दोहोंनीं पट ), चौपट ( चोहोंनीं पट ), इ०.

**चतुर्थी तत्पुरुष**—( सं० )—काकबलि, ( काकाकरितां बलि ), पूजाद्रव्य, विद्यागृह, क्रीडाभुवन, ब्राह्मणभोजन, परपीडा, द्विजदंड, इ०.

( म० )—गायरान, बाइलवेडा, पोळपाट, व्याहीजेवण, वाटखर्च, मेंढवाडा, कमरबंद, कंबरपट्टा, गांवसमाराधना, व्यवहारोपयोगी, इ०.

**पंचमी तत्पुरुष**—( सं० )—चोरभय ( चोरापासून भय ), ऋणमुक्त, स्वर्गपतित, स्वर्गभ्रष्ट, जातिभ्रष्ट, रोगमुक्त, पापविमोचन, भवतारण, पदच्युत, इ०.

( म० )—वडिलार्जित, गर्भश्रीमंत, जन्मखोड, लंगोटीमित्र, इ०.

**षष्ठी तत्पुरुष**—( सं० )—देवपूजा ( देवाची पूजा ), भूपति, नृपति, राजमंदिर, सूर्यप्रकाश, विद्याभ्यास, देवभक्ति, मदुद्धरण ( माझें उद्धरण ), त्वल्लीला ( तुझी लीला ), लक्ष्मीकांत, गणपति, राधारमण, पद्मपत्र, भ्रातृजाया, इ०.

( म० )—केळफूल, राजवाडा, घरधनी, पिंपळपान, हातचाळा, राजदरबार, आपमतलब, घोडदौड, समुद्रकांठ, गायमुख, धर्मवेड, वाघनख, आंबराई, इ०.

**सप्तमी तत्पुरुष**—( सं० ) शास्त्रपंडित ( शास्त्रांत पंडित ), कूपमंडूक, कलाकुशल, स्वर्गवास, युद्धचातुर्य, कुलोत्पन्न, दानशूर, पोटशूळ, इ०.

( म० )—रानडुक्कर, घरकोंबडा, घरजावई, अवसानघातकी, गांवदेवी, घरधंदा, गृहकलह, पाणकोंबडा, वनगाय, इ०.

विग्रहास अनुसरून तत्पुरुष समासाचे बाबतींत केव्हां केव्हां भिन्न नांवें दिलीं जाण्याचा संभव आहे; तरी कांहीं बिघडत नाहीं. **हातघाई** ( हातांनीं घाई ) **तृ० त०**; ( हाताची घाई ) **ष० त०**; असें म्हटलें तरी चालेल. तसेंच कृष्णाश्रित ( कृष्णाप्रत आश्रित ) **द्वि० त०**; व ( कृष्णाचा आश्रित ) **ष० त०**; असें अर्थास अनुसरून म्हटल्यास हरकत नाहीं.

केव्हा केव्हां तत्पुरुष समासांतील पहिल्या शब्दांचा विभक्तिप्रत्यय न गळतां कायमच राहतो; त्यास **अलुक् तत्पुरुष** समास असें म्हणतात. उदा०—अग्रेसर, युधिष्ठिर, कर्तरिप्रयोग, कर्मणिप्रयोग, पंकेरुह. येथें पहिल्या शब्दांचीं संस्कृतमधील सप्तमीचीं रूपें कायम राहिलीं आहेत. ( अ + लुक् = लोप नसणें ).

जेव्हा तत्पुरुष समासातील दुसरें पद–ज्याच्या वाक्यात स्वतंत्रपणें उपयोग होत नाहीं, अशा प्रकारचें–कृदन्त म्हणजे धातुसाधित असतें, तेव्हा त्यास **उपपद तत्पुरुष** समास असें म्हणतात. उदा०—कुंभकार ( कुंभ करणारा ), ग्रंथकार ( ग्रंथ करणारा ), गृहस्थ ( गृहात राहणारा ), शेषशायी ( शेषावर निजणारा), द्विज ( दोनदा जन्मणारा ). ह्या उदाहरणात कार, स्थ, शायी, ज, हीं दुसरीं पदें कृ, स्था, शी, जन्, ह्या धातूंपासून झालेलीं असून, त्यांचा असल्या सामासिक शब्दाशिवाय दुसऱ्या कोठेंही स्वतंत्रपणें उपयोग होत नसल्यामुळें हे **उपपद तत्पुरुष** समास आहेत.

आणखी उदा०—( सं० )–चर्मकार, सुवर्णकार, देशस्थ, पातस्थ, कोंकणस्थ, स्वस्थ, पालखीपदस्थ, सुखदायी, मनुज, पंकज, अनुज, खनिज, उद्भिज्ज, द्विप, भूप, नृप, पयोधर, मनोहर, यशोधर, सुखद, दुःखद, पयोद, अंबुद, जलद, खग, अग, नग, उरग, सुज्ञ, प्राज्ञ, कृतघ्न, शत्रुघ्न, इ०.

( म० )—शेतकरी, कामकरी, रिणकरी, आगलाव्या, लाकुडतोड्या, भाजीविक्या, लांचखाऊ, वाघमाऱ्या, नवाशिका, नाकतोड्या, इ०.

केव्हा केव्हां तत्पुरुष समासात प्रथम शब्दाची विभक्ति कायम राहून, दुसरा शब्द अस्वतंत्र धातुसाधित असतो, त्यास **अलुक्–उपपद–तत्पुरुष** समास

म्हणण्यास हरकत नाहीं. उदा०(सं०)-मनसिज, पंकेरुह, सरसिज, खेचर, वनेचर, इ०.

(म०)—मळेकरी, वाटेकरी, पहारेकरी, मारेकरी, पाखरेंविक्या, गळेकापू, खिसेकातरू, कडेलोट, यात्रेकरू, इ०. येथें पहिले शब्द प्रथमान्त अनेकवचनी आहेत. (कथेकरी, यात्रेकरी, सेवेकरी, दीनानाथ, यांत पहिले शब्द प्रथमान्त अनेकवचनी नसून सामान्यरूपात्मक आहेत).

अभाव किंवा निषेध ह्या अर्थी व्यंजनादि शब्दांच्या पूर्वी '**अ**' व स्वरादि शब्दांच्या पूर्वी '**अन्**' किंवा क्वचित् '**न**' हीं अव्ययें येऊन जे तत्पुरुष समास होतात, त्यांस **नञ् तत्पुरुष** समास असें म्हणतात. उदा०—

(सं०)—अब्राह्मण—(नव्हे ब्राह्मण तो), अन्याय, अयोग्य, अनादर, अनिष्ट, अनृत; नास्तिक, नपुंसक, इ०.

(म०)—असमंजस, असडीक, अपुरा, अनोळखी, इ०.

(यवनी)—नाइलाज, नाउमेद, नापसंत, इ०.

[ज्या तत्पुरुष समासांत प्रथम स्थानीं उपसर्ग येतो, त्यास संस्कृतांत **प्रादि समास** असें म्हणतात. उदा०—प्रवात (प्र म्हणजे अधिक जोराचा वात तो), प्रगति, अतिमात्र, उत्क्रान्त, अवगुण, इ०. मराठींत हे अशा प्रकारचे समास सांगण्याची आवश्यकता नाहीं. कारण समास दोन शब्दांचा होतो, व उपसर्ग हे कांहीं शब्द नव्हत; हें उघडच आहे].

## कर्मधारय

ज्या तत्पुरुष समासांत दोन्ही पदांची एकच प्रथमा विभक्ति असते, त्याला **कर्मधारय** समास असें म्हणतात. उदा०-कमलमुख, तांबडमाती, सुवासना, इ०.

कर्मधारय समासांत विशेष्य-विशेषण-संबंध किंवा उपमान-उपमेय-संबंध ह्यांपैकीं एक असतो.

[अ] **विशेष्य-विशेषण-संबंध-दर्शक कर्मधारयाचीं** उदा०—

१. विशेषणपूर्वपद—(सं०)-रक्तचंदन, महाराज, पूर्वरात्र, उत्तररात्र, पीतांबर, नीलोत्पल, महादेव, इ०.

(म०)—काळमांजर, सावळाराम, भोळानाथ, उपजतस्वभाव, रडतराऊत, खडीसाखर, शेंडेनक्षत्र, साडेतिन, इ०.

टीप—सुवासना, कुसंगति, कुयोग, कुपुत्र, दुर्गति, दुर्वासना. यांतील पूर्व-शब्दांचा मराठींत विशेषणाप्रमाणें अर्थ रूढ झाला असल्यामुळें, ह्या शब्दांचा विशेषणपूर्वपद कर्मधारयांतच अन्तर्भाव करण्यास हरकत नाहीं.

२. विशेषणोत्तरपद—( सं० )-भाषान्तर, रूपान्तर, देशान्तर, ( अन्य देश देशान्तर, याप्रमाणें ह्या शब्दांचा विग्रह करितात ). पुरुषोत्तम ( उत्तम असा पुरुष ), छात्रवंचक ( वंचक असा छात्र ), इ०.

( म० )—रामदयाळ-( दयाळ असा राम ), दालचिनी ( चिनी दाल ), इ०.

३. विशेषणोभयपद—( सं ) शुक्लकृष्ण, कृताकृत, दृष्टादृष्ट, श्यामसुन्दर, स्नातानुलिप्त, इ०.

( म० )—लाललाल, काळा-सावळा, उपजतवेडा, इ०.

४. विषयपूर्वपद—( सं० )-देवबुद्धि ( देव आहे अशी बुद्धि ), धर्मबुद्धि, अहंमति, अहंबुद्धि, इ०.

( म० )—पुरुषमाणूस, बायकोमनुष्य, गडीमाणूस, इ०.

## द्विगु

५. संख्यापूर्वपद—ज्या कर्मधारय समासांत पहिलें पद संख्यावाचक विशेषण असून, त्या शब्दाच्या योगानें समाहाराचा म्हणजे समुदायाचा अर्थ उत्पन्न होतो, त्यास **द्विगु** समास म्हणतात. उदा०—( सं० ) त्रिभुवन ( तीन भुवनांचा समुदाय ), त्रैलोक्य, पंचपदी, अष्टाध्यायी, पंचारती, त्रिदल, पंचवटी, नवरात्र, पंचकोशी, इ०.

( म० )—पंचपाळें, बारभाई, चाळीसगांव, छटाक, चौघडी, चातुर्मास, चवाठा, सप्ताह, इ०.

## मध्यमपदलोपी

६. लुप्तपद—ज्या कर्मधारय समासांत पहिल्या पदाचा दुसऱ्या पदाशीं संबंध दाखविणारा एक शब्द किंवा असे अनेक शब्द अध्याहृत किंवा लुप्त असतात व विग्रहाचे वेळीं त्यांची स्पष्टता करावी लागते, त्यास **मध्यमपदलोपी** समास असें म्हणतात. उदा०—साखरभात ( साखरेनें युक्त भात ), वांगीपोहे बटाटेभात, डाळवांगें, पुरणपोळी, गुळांबा, घोडेस्वार, बाळमित्र, भोजनभाऊ, जन्मदरिद्री, पंक्ति-पठाण, कातरविडा, गुडधानी ( गूळ घातलेलें धान्य, धानी

हें धान्य याचें रूप ), इ०. [ चुलतभाऊ ( चुलत्याचा मुलगा या नात्यानें भाऊ ), मामेभाऊ, नातसून, नातजावई, चुलत-सासरा, हेही याच प्रकारचे शब्द होत ].

[ आ ] **उपमान-उपमेय-संबंध-दर्शक कर्मधारयाचीं** उदा०—

१. उपमानपूर्वपद—( सं० ) कमलमुख ( कमलाप्रमाणें मुख ), मेघश्याम, चंद्रमुख, वज्रदेह, कमलनेत्र, इ०. ( म० )-घोडनवरा, सांखरलिंबू, इ०.

२. उपमानोत्तरपद—मुखकमल ( मुख हेंच कमल ), नरसिंह, पुरुषव्याघ्र, नरशार्दूल, मुखेंदु, इ०.

३. अवधारणापूर्वपद—ह्यांत प्रथम पदाचे अर्थावर द्वितीय पदाच्या अर्थाचा आरोप केला जातो. उदा०—विद्याधन ( विद्या हेंच धन, किंवा विद्यारूपी धन ), भवसागर, विद्युल्लता, काव्यामृत, संसाराटवी, पदपद्म, चरणकमल, इ०.

( म० )—उंबरघाट, इ०.

४. अवधारणोत्तरपद—ह्यांत द्वितीय पदाचे अर्थावर प्रथम पदाच्या अर्थाचा आरोप केलेला असतो. उदा०—कृतान्तकटकामलध्वज-जरा, ( ह्यांत जरेवर, कृतान्तकटकामलध्वजाचा आरोप केला आहे ).

## ३. उभयपदप्रधान किंवा द्वंद्व

ज्या समासांतील दोन्ही पदें प्रधान असतात, त्यास **द्वंद्व** समास असें म्हणतात. उदा०—रामकृष्ण, भीमार्जुन, सुखदुःख, शत्रुमित्र, खरेंखोटें, इ०.

ह्या समासाचे **इतरेतर द्वंद्व, वैकल्पिक द्वंद्व** व **समाहार द्वंद्व** असे तीन प्रकार आहेत.

१. **इतरेतर द्वंद्व**—ह्या समासांतील पदामध्यें **आणि, व**, हीं समुच्चय-बोधक उभयान्वयी अव्ययें विग्रहाचे वेळीं घालावीं लागतात; आणि दोन्ही पदांची अर्थाच्या दृष्टीनें प्रमुखत्वानें अपेक्षा असते. उदा०—( सं० )-हरि-हर, राम-लक्ष्मण, कर्ण-शल्य, पितृ-मातुल, ब्रह्मा-विष्णु-महेश, द्रोण-द्रौणि-कृप, इ०.

( म० )—बहीण-भाऊ, बाप-लेक, विटी-दांडू, नाक-डोळे, पळी-पंचपात्री, तांब्या-भांडें, कुलूप-किल्ली, सहाण खोड, सुंठ-साखर, दौत-लेखणी, इ०. [ आई-बापें, दादला-बायलें, स्त्री-पुरुषें; माता-पितरें, बहीण-भावंडें, माय-लेकरें, अशा प्रकारेंही नपुंसकलिंगी अनेकवचनयुक्त कांहीं द्वंद्व समासांचीं उदाहरणें आढळतात ].

२. **वैकल्पिक द्वंद्व**—ह्या समासांतील पदांमध्यें विग्रहाच्या वेळीं **अथवा, किंवा**, ह्यांपैकीं विकल्पबोधक उभयान्वयी अव्यय घालावें लागतें आणि अर्थाच्या दृष्टीनें समासांतील दोन्ही प्रधान पदांपैकीं एकाचीच मात्र अपेक्षा असते. उदा०—(सं०)-पापपुण्य, धर्माधर्म, न्यायान्याय, सत्यासत्य, सुरूप–कुरूप, भक्ष्याभक्ष्य, इ०. (म०)-खरें–खोटें, बरें–वाईट, तीन–चार, दहा–पांच, दहा–वीस, पहिला–दुसरा, इ०.

३. **समाहार द्वंद्व**—ह्यांत समासयुक्त पदांच्या अर्थाशिवाय आणखी तशाच प्रकारच्या अधिक गोष्टींचाही अन्तर्भाव होतो. उदा०–[**अ**] मीठ-भाकर (मीठ, भाकर व असेच दुसरे पदार्थ), भाजी-पाला, पान-पत्रावळ, घर–दार, देव–ब्राह्मण, कोळी–माळी, शेट–सावकार, फंद–फितूर, शेला–पाटोटें, चूक-भूल, अंथरूण-पांघरूण, टिळा-टोपी, वेणी-फणी, ने-आण, चढ-उतर, जा-ये, दे-घे, इ०.

[**आ**] दाणा-दुणा, सोयरा-धायरा, खिडूक-मिडूक, इडा-पिडा, चट्टी-पट्टी, वाकडा-तिकडा, इ०. (यांत व खालील ठिकाणीं दुसरा शब्द अनुप्रासात्मक आहे).

[**इ**] घोडा-बिडा, दगड-बिगड, तंटा-बिटा, भांडण-बिंडण, लहान-सहान, वाईट-साईट, पोर-सोर, लुंगा-सुंगा, इ०.

## ४. **अन्यपदप्रधान** किंवा **बहुव्रीहि**

ज्या समासांतील कोणतेंही पद प्रधान नसून, त्या सर्व सामासिक शब्दापासून त्यांत असणाऱ्या पदांच्या शिवाय निराळ्याच गोष्टीचा प्रामुख्यानें बोध होतो, व तो सामासिक शब्द त्या निराळ्या पदाचें विशेषण असतो, त्या समासाला **बहुव्रीहि** समास असें म्हणतात. उदा०—दशानन (दश आहेत आननें ज्याला तो म्हणजे रावण), लंबोदर (लंब म्हणजे मोठें आहे उदर ज्याचें तो गणपति), वक्रतुंड, महाकाय, इ०.

ह्या समासाचा विग्रह करितांना शेवटीं संबंधी सर्वनाम येते व त्याची जी विभक्ति असते, तिचें नांव त्या समासास देतात.

### विभक्तींवरून बहुव्रीहींचे भेद

**द्वितीया बहुव्रीहि**—प्राप्तोदक (प्राप्त आहे उदक ज्यास तो गांव), प्राप्तधन (प्राप्त आहे धन ज्यास तो पुरुष), इ०. हे समास संस्कृतांतच आढळतात.

**तृतीया बहुव्रीहि** — जितकाम ( जित आहे काम ज्यानें ), जितेंद्रिय, त्यक्तायुध, कृतकृत्य, जितकोप, दत्तधन, पूरित-लोककाम, इ०.

**चतुर्थी बहुव्रीहि** — पंचमुख ( पांच आहेत मुखें ज्याला ), चतुर्मुख, ( म० ) – चौकोन, दुतोंडें, इ०.

**पंचमी बहुव्रीहि** — निर्धन ( गेले आहे धन ज्यापासून ), निर्बल, गलितपर्ण, इ०.

**षष्ठी बहुव्रीहि** — ( सं० ) – तपोबल ( तप हेंच आहे बल ज्याचें ), मानधन, शूलपाणि, तीर्थपाद, शशिशेखर, चंद्रशेखर, इ०.

( म० ) — घारडोळ्या, गायमुख्या, पांढरपेश्या, इ०.

**सप्तमी बहुव्रीहि** — भीमादि ( भीम आहे आदि ज्यांमध्यें ), द्रोण–द्रौणि–कृपादि, नाक ( नाहीं अक म्हणजे दुःख ज्यामध्यें ), इ०.

कर्मधारयाप्रमाणेंच बहुव्रीहि समासांतही विशेष्य–विशेषण–संबंध किंवा उपमान–उपमेय–संबंध असलेलीं पदे असतात.

१. विशेषणपूर्वपद — नीलकंठ, रक्तवस्त्रा, सुग्रीव, इ०.

( म० ) – आखुडशिंगी, बहुदुधी, अल्पमोली, इ०.

२. विशेषणोत्तरपद — मोदकप्रिय ( प्रिय आहे मोदक ज्याला ), पायाशुद्ध, ( शुद्ध आहे पाया ज्याचा ), इ०.

३. उपमानपूर्वपद — कमलनेत्रा, चंद्रमुखी, शशिवदना, चंद्रानना, इ०.

४. अवधारणापूर्वपद — यशोधन ( यश हेंच आहे धन ज्याचें ), मानधन, तपोबल, इ०.

५. लुप्तपद — यांत मध्यमपदलोपीप्रमाणें कांहीं पदे गाळलीं जातात. उदा०– मृगनयना, ( मृगाप्रमाणे आहेत नयन जिचे ), हरिणाक्षी, सिंहकटि, गजगति, ( यांत प्रमाणें हा शब्द लुप्त आहे. ), अभिज्ञानशाकुंतल ( अभिज्ञान आहे शकुंतलेचें ज्यांत तें नाटक ), मुद्राराक्षस ( मुद्रेनें वश केला आहे राक्षस ज्यांत तें नाटक ), इ०.

( म० ) – गायमुख्या, उंटमान्या, घोडमुख्या, इ०.

६. संख्यापूर्वपद — एकदन्त, त्रिनयन, त्र्यंबक, चतुर्भुज, पंचतुंड, इ०.

( म० ) – एकडोळ्या, दुतोंडें, तिकोनी, अष्टपैलू, इ०.

**नञ् बहुव्रीहि**—अनादि ( नाहीं आदि ज्याला तो ), अनंत, अव्यय, अज्ञान, अनाथ, अकर्मक, इ०.

**सहार्थी बहुव्रीहि**—'स' किंवा 'सह' हें अव्यय आरंभीं येऊन हा समास होतो. उदा०—सदार ( दारेने सह ), सपुत्र, सरूप, सवर्ण, सादर, सफल, सनाथ, समूल, सहकुटुंब, सहपरिवार, ( म० )–सढळ, इ.०.

[ दंडादंडी, लठ्ठालठ्ठी, मारामारी, बुक्काबुक्की, झोंबाझोंबी, गुद्दागुद्दी, खेटराखेटरी, हे शब्द संस्कृतांत बहुव्रीहि समासयुक्तच मानितात. ( कारण दंड, दंड, यांच्या योगानें केलेलें कृत्य तें; अशा प्रकारच्या अन्यपदप्रधानाचा अर्थ येथें उत्पन्न होतो. ) मराठींत हे शब्द मूळचे विशेषणें असून त्यांचा नामाप्रमाणें उपयोग होतो, तरी त्यास संस्कृत पद्धतीस अनुसरून बहुव्रीहि समास म्हणण्यास हरकत नाहीं ].

## कांहीं समास–विशेष

( १ ) समासांसंबंधाच्या बऱ्याच गोष्टी संस्कृतावरूनच आल्या असल्यामुळें होतां होईतों संस्कृत पद्धतीस अनुसरूनच समास ठरवावे.

( २ ) अर्थानुरोधानें एकाच शब्दाचे भिन्न समास होऊं शकतील. **सत्यव्रत** ( सत्य हेंच व्रत—क० धा०, सत्य आहे व्रत ज्याचें—बहु० ); **लक्ष्मीकांत** ( लक्ष्मीचा कान्त–ष० त०, लक्ष्मी आहे कांता ज्याची—बहु० ); इ०.

( ३ ) भिन्न भाषांतील शब्दाचा समास करणे योग्य नाहीं. उदा०—शाळामास्तर, आग–बोट, मन–मुराद, दिवा–बत्ती, तार–मास्तर, डाक–घर, इलाखाधिपति, पैसा–फंड, इ०. ( तथापि असे शब्द रूढ झाल्यावर त्यास इलाज नसतो ).

( ४ ) समासांमधील संस्कृत संधियोग्य शब्दांचा संधि अवश्य करावा; परंतु क्वचित् ह्या बाबतींत दुर्लक्षही होतें. उदा०—स्वपदाब्जीं मानसभृंग रमो उगउं दे '**कृपा–अरुणा**'. मराठीची प्रवृत्ति संधि न करण्याची आहे. उदा०—तोंड–ओळख, पैसा–अडका, अधिक–उणा, ना–उमेद, बे–अक्कल, इ०).

( ५ ) सामासिक शब्दाच्या शेवटीं विभक्तिप्रत्यय लागतात; व शेवटच्या शब्दाप्रमाणें सर्व शब्दाचे लिंग, वचन, हीं असतात. 'विद्याभ्यास' ह्यांत विद्या हा शब्द स्त्रीलिंगी असला, तरी सर्व शब्द पुल्लिंगी आहे; 'देव–पूजा' यांत प्रत्येक शब्द भिन्नलिंगी असला, तरी सर्व शब्द स्त्रीलिंगीच आहे; इ०.

( ६ ) खालील ठिकाणीं षष्ठीचा '**चा**' हा प्रत्यय अध्याहृत आहे; **म्हणून** ते शब्द सामासिक नाहींत. 'भिल्ली बोलिली बोल मुंदर असे **रामा** (च्या)-**करींचीं** फळें,' हरिश्चंद्र '**डोंबा**(च्या)-**घरीं** पाणी भरी'; '**पिशाच्चा** (च्या)-**हातीं** कोलींत; इ०. [ मुलां(च्या)-मध्यभागीं बसे कृष्ण तेवीं' यांत ज्याप्रमाणें मुलांमध्यभाग असा शब्द होऊं शकत नाहीं, तेथें मुलां 'च्या' मध्यभागीं असें आहे, त्याचप्रमाणें वरील ठिकाणीं षष्ठीचें प्रत्ययाभावी सामान्यरूप आहे ].

( ७ ) ग्रंथकार व ग्रंथकर्ता, सुखकर व सुखकर्ता, दुःखहर व दुःखहर्ता, ह्यांतील पहिले शब्द **उपपद तत्पुरुष** व दुसरे शब्द **षष्ठी तत्पुरुष** समास होत; तसेंच गृहस्थ व गृहस्थित यातील पहिला शब्द **उपपद तत्पुरुष** व दुसरा **सप्तमी तत्पुरुष** आहे. कारण पहिल्या ठिकाणचे शेवटचे शब्द अस्वतंत्र आहेत व दुसऱ्या ठिकाणचे शब्द वाक्यांत स्वतंत्रपणें येणारे आहेत.

( ८ ) अव्ययीभाव समासान्त शब्द क्रियाविशेषण अव्ययें असलीं पाहिजेत. बहुव्रीहि समासान्त शब्द विशेषणें असतात. तत्पुरुष व द्वंद्व समास असलेले शब्द बहुशः नामें किंवा विशेषणें असतात.

---

# वाक्य-विचार

व्याकरणाची आवश्यकता विशेषेकरून वाक्याच्या स्पष्टीकरणासाठीं आहे. वाक्यांतील घटक जे शब्द व शब्दांतील घटक जे वर्ण त्यांचा येथवर विचार झाला. वाक्य-विचाराकडे आता वळूं.

एक विचार पूर्णपणें व्यक्त करणाऱ्या शब्दसमुच्चयाला **वाक्य** असें म्हणतात. वाक्याचा अर्थ स्पष्ट कळण्यासाठीं त्यांतील पदांचा परस्परांशी संबंध काय, हें कळणें आवश्यक आहे. वाक्यांत मुख्य शब्द दोन, **कर्ता** व **क्रियापद**. क्रियापद सकर्मक असल्यास **कर्म** हा आणखी एक प्रमुख शब्द वाक्यांत असलाच पाहिजे. कर्ता व कर्म हे शब्द नामें ( किंवा नामाप्रमाणें योजलेले इतर शब्द ) असतात. त्यांचे क्रियापदाशीं किंवा अन्य शब्दांशीं जे संबंध असतात, ते विभक्त्यन्त रूपांवरून कळतात; हे संबंध म्हणजेच **विभक्तींचे अर्थ** होत. त्याचप्रमाणें क्रियापदांचेही अर्थ दर्शविणारीं एकेका धातूचीं निरनिराळीं सात प्रकारचीं रूपें असतात, त्यांना **आख्यातें** असें म्हणतात; हें पूर्वी गेलेंच आहे.

हे **विभक्त्यर्थ**, **आख्यातार्थ** व वाक्यरचना किंवा **प्रयोग**, ह्याविषयीं ह्या प्रकरणांत विवेचन करणें ओघानेंच प्राप्त होतें. तथापि अलीकडे आणखी एका महत्त्वाच्या विषयाची वाक्य-विचारांत भर घालण्याचा संप्रदाय पडला आहे. त्यानें वाक्यस्पष्टीकरणास मदतच होत असल्यामुळें, त्याचा वाक्य-विचारांत समावेश करणें जरूरच आहे. त्याला ' **वाक्यपृथक्करण** ' असें म्हणतात. व्याकरणात शब्दांचे परस्परसंबंध त्यांच्या स्वरूपावरून विशेषतः पाहण्यात येतात; परंतु वाक्यपृथक्करणांत ते अर्थाच्या दृष्टीनें पाहण्यांत येतात. ह्या गोष्टींचा क्रमानें आतां विचार करूं.

## विभक्त्यर्थ

विभक्तींच्या योगानें नामाचा किंवा नामाप्रमाणें योजिलेल्या शब्दांचा क्रियापदाशीं किंवा इतर शब्दाशीं संबंध जोडिला जातो. तो ज्या प्रकारचा संबंध असतो, त्यास त्या **विभक्तीचा अर्थ** असे म्हणतात. नामाचा क्रियापदाशीं संबंध असल्यास त्यास **कारकार्थ** व इतर शब्दांशीं संबंध असल्यास त्यास **उपपदार्थ** असें म्हणतात. क्रियापदाचा **कर्ता**, **कर्म**, **करण** ( साधन ), **संप्रदान** ( देणे या धातूप्रमाणें अप्रत्यक्ष दुसरें कर्म ), **अपादान** (एका गोष्टीपासून दुसरी दूर जाणें) आणि **अधिकरण** (ठिकाण); हीं दर्शविण्यासाठीं कारकार्थाचें प्रयोजन आहे. तसेंच उद्देश, विधान, हेतु, कारण, परिणाम, प्रमाण, मूल्य, अंतर, अवधि, आधिक्य, न्यूनत्व, तुलना, विषय, भेद, साहित्य, संबंध, इ० अनेक प्रकारचा एका शब्दाचा दुसऱ्या शब्दाशीं संबंध दर्शविण्यासाठीं उपपदार्थाचें प्रयोजन व्याकरणांत मानिलेलें आहे.

येथें प्रत्येक विभक्तीचे यापैकीं जे प्रमुख अर्थ आढळतात, ते दिले आहेत.

### प्रथमा

**कारकार्थ**—( १ ) **कर्ता**—**तो** गेला, **रामा** रस्त्यानें चालला, **मुलें** पत्ते खेळतात, गोविंदाला **ठेच** लागली. ( यांतील ठळक शब्दांची विभक्ति प्रथमा आहे व त्या त्या वाक्यांत ते शब्द कर्ते आहेत, म्हणून त्यांच्या प्रथमा विभक्तीचा अर्थ **कर्ता** ).

( २ ) **कर्म**—मुलें **अभ्यास** करितात, त्यानें **काम** केलें, मधू **चित्रें** पाहत आहे. ( यांतील ठळक शब्द प्रथमान्त असून, त्या त्या वाक्यांतील **कर्मे** आहेत, म्हणून त्यांच्या प्रथमेचा अर्थ **कर्म** ).

( ३ ) **अधिकरण**—तो दहा **गांवें** हिंडला, मी तीन **कोस** चाललों. 'बाबांनीं पंचवीस **वर्षें** चाकरी केली. ( यांतील प्रथमान्त ठळक शब्दांवरून क्रिया घडण्याचें स्थल व काळ हीं दर्शविलीं जातात, म्हणून त्यांच्या प्रथमा विभक्तीचा अर्थ **अधिकरण** ).

**टीप**—स्थल व काल या दोहोंनाही व्याकरणांत '**अधिकरण**'च म्हणतात.

**उपपदार्थ**—( १ ) **उद्देश**—**नाना फडनवीस** हा मुत्सद्दी होता, **लक्ष्मीबाई** ही शूर होती, **रामा** आणि **गोविंदा हे** शाळेंत गेले. ( या वाक्यात अनुक्रमें हा, ही, हें, हे शब्द कर्ते आहेत: आणि त्यांच्या स्पष्टी-करणाच्या उद्देशानें नाना फडनवीस, लक्ष्मीबाई व रामा, गोविंदा, हे शब्द आले आहेत; त्यांचा क्रियापदाशीं साक्षात् कांहीं संबंध नाहीं; त्याची विभक्ति प्रथमा आहे; म्हणून ह्या प्रथमा विभक्तीचा अर्थ **उद्देश** ).

( २ ) **विधान**—नाना फडनवीस हा **मुत्सद्दी** होता, कालच्या नाटकात गोंद्या बचंभटाची **मुलगी** झाला होता, म्हाताऱ्याला द्यायला आमचे बाबा कांहीं **कसाई** नाहींत. ( या वाक्यांत अनुक्रमें हा, गोंद्या व बाबा हे शब्द कर्ते आहेत, आणि त्याच्यासंबंधी विधान पूर्ण करण्यासाठीं मुत्सद्दी, मुलगी व कसाई हे प्रथमान्त शब्द आले आहेत; ह्या शब्दाच्या प्रथमा विभक्तीचा अर्थ **विधान** ).

( ३ ) **परिमाण**—दोन **खंडी** गहूं, चार **शेर** तूप, सहा **हात** लांब धोतर, पांच **तोळे** सोनें, इ०. ( यातील ठळक शब्दांच्या प्रथमा विभक्तीचा अर्थ **परिमाण** ).

( ४ ) **मूल्य**—हपूसचे आंबे सहा **रुपये** शेंकडा मिळतात, हें कापड चार **आणे** वार आहे, माणशीं पांच **रुपये** भाडें पडतें, मणीं दोन **पैसे** हमाली घेतात, इ०. ( यांतील ठळक शब्दांच्या प्रथमा विभक्तीचा अर्थ **मूल्य** ).

( ५ ) **अंतर, अवधि**—मुंबईहून पुणे १२० **मैल** किंवा ६० **कोस** आहे, कोणत्याही विद्येचा एक **तप** तरी अभ्यास पाहिजे, इ०.

## द्वितीया

**कारकार्थ**—(१) **कर्म**-मी **त्याला** ओळखितों, आईनें **मुलीस** मारिलें, इंग्रजांनीं **पेशव्यांस** जिंकिलें. ( ह्या वाक्यांतील ठळक शब्दांची

विभक्ति द्वितीया असून कर्म ह्या नात्यानें त्यांचा क्रियापदाशीं संबंध आहे; येथें त्या द्वितीयेचा अर्थ **कर्म**). द्वितियेचा **कर्म** हा एकच अर्थ असतो.

## तृतीया

**कारकार्थ**—(१) **कर्ता**—**रामानें** काम केलें, **मुलींनीं** गाणीं म्हटलीं, **त्याच्यानें** जाववतें, **माझ्यानें** हें काम करवेल, इ०.

(२) **करण**—**चाकूनें** लेखणी करितात, त्यानें **तरवारीनें** शीर धडापासून वेगळें केलें, मीं **हातानें** हें सूत काढिलें, कोणासही **पायानें** ढकलूं नये, इ०.

(३) **अधिकरण**—त्या **वाटेनें** फार कांटे आहेत, **आडमार्गानें** जाऊं नये, तो **रस्त्यानें** बसत बसत गेला, इ०.

**उपपदार्थ**—(१) **हेतु, कारण**-आपल्याच **आशीर्वादानें** मी पास झालों, ह्या **बातमीनें** बाबांस मोठा धक्का बसला, स्त्रियांनीं अति **भिडेनें** किंवा **मर्यादेनें** वागण्याचे दिवस आतां संपले, **दांडगाईनें** तुझा निभाव कसा लागेल? इ०.

(२) **साहित्य**—तो एका **वस्त्रानें** घरांतून बाहेर पडला, **सर्वांशीं** गोड बोलावें, हजार **स्वारांनिशीं** क्लाइव्हनें अर्काटवर स्वारी केली, इ०.

(३) **आधिक्य, न्यूनत्व**—[अ] **बुद्धीनें** चलाख, **डोळ्यांनीं** सुंदर. [ब] **डोळ्यांनीं** आंधळा, **कानांनीं** बहिरा, **पायानें** लंगडा, **बुद्धीनें** मंद, इ०.

(४) **परिमाण, प्रमाण**—तांदूळ **पल्ल्यानें** विकतात, वखारींत **खंडींनीं** किंवा **मणांनीं** भुईमूग मिळतो, **शेरांनीं** मिळत नाहीं. चार **बोटांनीं** उंच, पांच **वर्षांनीं** वडील, एका **वितीनें** कमी, **थेंबें थेंबें** तळें साचे, इ०.

(५) **मूल्य**—चार **पैशांनीं** शेर बोरें, अडीच **रुपयांनीं** मण कोळसे, **पैशानें** पांसरी करवंदें, इ०.

(६) **सान्निध्य, तुलना**—तो **बापाशीं** भांडला, **लोडाशीं** बसा, गोकर्ण्यांच्या **घराशींच** माझें घर आहे, तांबडा रंग **हिरव्याशीं** जमत नाहीं, हें चित्र त्या **चित्राशीं** ताडून पहा, तुम्हां **कुबेरांशीं** आमचा काय पाड? इ०.

( ७ ) **रीति**—तो **ऐटीनें** चालतो, माईसाहेब **कुऱ्यानें** बोलतात, सासू तिला **ममतेनें** वागविते, इ०.

( ८ ) **अवधि**—तो चार **वर्षांनीं** मला भेटला, मी आफ्रिकेंतून बारा **वर्षांनीं** आलो, एकवीस **दिवसांनीं** कोंबडीचें अंडें फुटतें, इ०.

ह्याप्रमाणें एकेका विभक्तीचे अनेक अर्थ संभवतील; तारतम्याने हे अर्थ ओळखावे. इतर विभक्तीविषयींही असेंच समजावें.

## चतुर्थी

**कारकार्थ**—( १ ) **कर्ता-त्याला** काम करवतें, **त्याला** बोलतां येतें, **मला** हरभरे चावतात, इ०.

( २ ) **करण**—त्याने त्या कोहळ्याचे एका **घावास** दोन तुकडे केले, लाठीच्या एकेका **तडाक्यास** त्यानें एकेक इसम लोळविला, इ०.

( ३ ) **संप्रदान**—तो **ब्राह्मणाला** दक्षिणा देतो, मीं **त्याला** असें सांगितलें, त्यानें **भावाला** दगड मारिला, शिक्षकानें **विद्यार्थ्यांस** धडा शिकविला, इ०. ( दे, विचार, सांग, बोल, म्हण, इ० धातूंचा एक प्राणिवाचक चतुर्थ्यन्त कर्म व दुसरें अप्राणिवाचक प्रथमान्त कर्म, अशीं दोन कर्में असतात; त्यांपैकीं प्रथमान्त कर्मास प्रत्यक्ष कर्म व चतुर्थ्यन्त कर्मास अप्रत्यक्ष कर्म असें म्हणतात; आणि त्या चतुर्थी विभक्तीचा अर्थ **संप्रदान** असें म्हणतात ).

( ४ ) **अपादान**—त्यांच्या **डोळ्यांना** पाण्याची गळती लागली आहे, व **नाकाला**ही धार लागली आहे, इ०. ( अपादान म्हणजे एका गोष्टीपासून दुसरी दूर जाणें किंवा तिचा वियोग होणें ).

( ५ ) **अधिकरण**—ह्या **भांड्याला** भोक आहे, त्याच्या **डोक्याला** रुमाल होता, **दाराला** कडी घाल, **मुंबईस** प्लेग नाहीं, माझ्या **पायाला** ठेंच लागली, **डोकीस** पागोटें घाल, इ०.

**दिवसास** निजतो, **रात्रीस** जागतो, **दिवाळीला** तुम्ही याल ना? **दसऱ्याला** सोनें लुटतात, **एकादशीस** तुळशीबागेंत बाजार भरतो, इ०. ( कालालाही अधिकरणच म्हणतात, हें पूर्वीं गेलेच आहे; म्हणून ह्या ठिकाणच्या चतुर्थीचा अर्थही **अधिकरण**च ).

**उपपदार्थ**—( १ ) **उद्देश, हेतु**-तो **कीर्तीला** जपतो, बाळू **कामाला** निघाला, त्याने मला **जेवावयास** बोलाविलें आहे, आई **मुंजीला** गेली आहे, **लग्नाला** जातों आम्ही द्वारकापुरा, इ०.

( २ ) **परिमाण, प्रमाण**—**मणाला** दोन रुपये, **शेराला** चार आणे, **डझनाला** रुपया, **पैशाला** दोन म्हणून चार **पैशांना** आठ, इ०.

( ३ ) **मूल्य, विनिमय**—**पैशाला** पाच आंबे, पन्नास **रुपयांला** मला ही शाल मिळाली, दर **मोहरेस** एक मत, हल्लीं पुस्तकी शहाणे **पैशास** पासरी आहेत; **ठोशास** ठोसा, **बुक्कीस** बुक्की, **शेरास** शेर, **जशास** तसें, **शब्दास** शब्द, इ०.

( ४ ) **विषय**—हा आंबा **रसाला** बरा नाहीं, **खायला** ठीक आहे; तो बैल **दिसायला** उत्तम, पण **कामाला** नरम; इ०.

## पंचमी

**कारकार्थ**—( १ ) **अपादान**–तो **गांवाहून** आला, परसू **नागपुराहून** मुंबईस येईल व **मुंबईहून** पुण्यास येईल, इ०.

( २ ) **करण**—त्याच्या **हातून** हें काम होणार नाहीं, माझ्या **तोंडून** त्यानें वदविलें, इ०.

**उपपदार्थ**—( १ ) **अंतर**–**मुंबईहून** काशी सातशें मैल आहे, तुमच्या **घराहून** कचेरी किती दूर आहे ? इ०.

( २ ) **तुलना, भेद**— हा मुलगा आमच्या **मोरूहून** मोठा आहे, दादा **माझ्याहून** दोन वर्षांनीं वडील व माई **दादाच्याहून** दोन वर्षांनीं वडील आहे, **गुळाहून** साखर ज्यास्त गोड असते, **लोण्याहून** मऊ, **कोळशाहून** काळा, **सांबाहून** विष्णु वस्तुतः निराळा नाहीं, **जांभाहून** पेरू वेगळा असतो, इ०.

## षष्ठी

**कारकार्थ**—( १ ) **अपादान**–**शिंक्याचें** सुटलें व बोक्याचें फिकलें, तिला त्याच्या **पोटचें** एक मूल आहे, मी येथें केवढ्या **वेळचा** बसलों आहें, इ०. ( या ठिकाणीं 'पोटचे' व 'वेळचा' हे शब्द कांहींच्या मताप्रमाणें विशेषणें मानिल्यास त्यांचा अपादान हा अर्थ होणार नाहीं ).

( २ ) **अधिकरण**— तो **दिवसाचा** निजतो, **रात्रीचा** जागतो, **उन्हाळ्याचा** मी महाबळेश्वरास जातों, **पावसाळ्याचें** मला नेहमींच पडसें असतें, इ०.

उपपदार्थ—( १ ) **हेतु—स्नानाची** खोली, **निजावयाची** जागा, **मोटेचा** बैल, **संध्येची** पळी, इ०.

( २ ) **स्थित्यंतर—गरीबाचा** श्रीमंत झाला, **मूर्खाचा** शहाणा, परिसानें **लोखंडाचें** सोनें होतें, **पांढऱ्याचें** काळें, **रंकाचा** राव, इ०.

( ३ ) **मूल्य, विनिमय—रुपयाचें** तूप, **पैशाच्या** मिरच्या, **पावलीचें** गोप्रदान, पात्रीं **रुपयाचें** सहस्रभोजन; **तुपाचा** रुपया, **मिरचीचा** पैसा, **गोप्रदानाची** पावली, **पात्राची** दक्षिणा, इ०.

( ४ ) **योग्यता, प्रकार—लग्नाची** मुलगी, **मुंजीचा** मुलगा, **देण्याचें** खण, **ठेवणीचीं** लुगडीं, **खादीचें** कापड, **आंब्याचें** झाड, **स्लेटीचा** दगड, **भोपळ्याची** भाजी, इ०.

( ५ ) **विषय, अविकार—मनाचा** मोकळा, **हाडाचा**, मऊ, **तोंडाचा** फटकळ, **जातीचा** शूर, ' **ढ** ' **च्या** ढ, **वेडाच्या** वेडा, **कोराच्या** कोरा, इ०.

( ६ ) **संबंध**—षष्ठीचा हा नेहमीं येणारा प्रमुख अर्थ असून, त्याचे अनेक प्रकार होऊं शकतील, पण येथें केवळ कांहींचें दिग्दर्शन केलें आहे.

[ क ] **दागिन्याचें** सोनें, **सोन्याचा** दागिना; **दगडाची** मूर्ति, **मूर्तीचा** दगड, **खुर्चीचें** लाकूड, **लाकडाची** खुर्ची; इ०. ( कार्य-कारण-संबंध ).

[ ख ] **मुलाचा** बाप, **बापाचा** मुलगा; **मुलाची** आई, **आईचें** मूल; **काव्याचा** कर्ता, **जगाचा** चालक, **मोरोपंतांचें** काव्य, **मुलीचा** अपराध, **बाजिरावाचा** जय, इ०. ( जन्य-जनक-संबंध ).

[ ग ] **नानाचा** वाडा, **माझें** घर, **घराचा** धनी, **खुर्चीचा** मालक, इ०. ( स्वामित्व-संबंध ).

[ घ ] **खुर्चीचा** पाय, **पायांची** खुर्ची; **मेजाचा** खण, दोन **खणांचें** मेज, **मनुष्याचें** तोंड, **हातांचीं** बोटें, सहा **बोटांचा** हात, इ०. ( अंग-अंगि-संबंध ).

[ ङ ] **आगबोटीचे** उतारू, **उतारूंची** आगबोट, **पेंवाचे** गहूं, **गव्हाचें** पेंव, **विहिरीचें** पाणी, **पाण्याची** विहीर, इ०. (आधार-आधेय-संबंध ).

[ च ] **योग्यतेचा** माणूस, **माणसाची** योग्यता; **नीतीचा** मनुष्य, **मनुष्याची** नीति; **डोक्याचा** मनुष्य, **मनुष्याचें** डोकें, इ०. ( धर्म-धर्मि-संबंध ).

## सप्तमी

**कारकार्थ**—( १ ) **अधिकरण**-तो **संध्याकाळीं घरींच** असतो, मी पुढच्या **महिन्यांत गांवीं** जाणार आहे, मकरकुंडलें तळपत **श्रवणीं**, **कंठीं** कौस्तुभमणी विराजित, **पायीं** खडावा गर्जती, इ०. ( काळ व स्थळ हीं दोन्ही अधिकरणेंच मानितात ).

**उपपदार्थ**—**कारण**, **विषय**-मी तुझ्या **पायीं** बुडालों, ह्या **कामीं** माझें नुकसान झालें, इ०.

## संबोधन

ह्या विभक्तीचा ' **संबोधन** ' म्हणजे हाक मारणें हा एकच अर्थ आहे. दुसऱ्याचें लक्ष वेधून घेण्यासाठीं हाक मारितात; व त्या वेळीं ह्या विभक्तीचा उपयोग होतो. उदा०—**गोविंदा**, इकडे ये; **मुलांनो**, दाडगाई करूं नका; ' तुका म्हणे माझ्या जीवा । कधीं भेटसी ? **केशवा**, ' इ०.

[ क्रियापदाला ज्याप्रमाणें कर्ता, कर्म, हीं असतात त्याचप्रमाणें धातु-साधितालाही असतात; परंतु धातुसाधिताचा कर्ता, कर्म, हीं सांगण्याची प्रचालित पद्धति नाहीं, मात्र विभक्तींचे अर्थ सांगतेवेळीं ज्या नामांचा किंवा सर्वनामाचा धातुसाधिताशीं संबंध असेल, त्याचा कोणत्या अर्थानें त्याशीं संबंध आहे, हें कळणें अवश्य आहे. कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान, अधिकरण, ह्या सर्व प्रकारांनीं नामाचा व सर्वनामांचा धातुसाधिताशीं संबंध आढळतो. उदा०—

**कर्ता**—**दगड** मर्मी लागून, त्या मांजराचा प्राण गेला; **गोविंदराव** आंगरखा-पागोटें घालून, कचेरीस गेले; अंगावर **वीज** पडून, त्याला मृत्यु आला; **तो** चालत वैद्याच्या घरापर्यंत गेला; इ०.

**कर्म**—तुमच्या **ह्या** बोलण्यामुळें रावसाहेब बिथरले; त्यानें **हात** वर करून, चेंडू उडविला; अर्जुनानें भीष्मांना **बाण** मारून, घायाळ केलें; हौद्यांत प्रथम **उडी** घेणारा मनुष्य भ्याड कसा ? इ०.

**करण**—**चाकूनें** लेखणी केल्यामुळें मला लिहावयास सांपडलें; त्यानें गोविंदाला **काठीनें** ढकलून खालीं पाडिलें; **सोंगट्यांनीं** खेळणारा मनुष्य राजकारण काय खेळणार ? इ०.

**संप्रदान—गोविंदाला** असें सांगून, बाबा मुंबईस गेले; **घोड्याला** चाबूक मारितांना त्या सईसाला फार मजा वाटत असे; **दुसऱ्याला** शिव्या देण्यात शहाणपणा काय ? इ०.

**अपादान**—मी त्याला **मुंबईहून** पुण्यास जातांना लोणावळ्याच्या स्टेशनवर पाहिलें, इ०.

**अधिकरण—मी घरीं** जाऊन, तुला एक मच्छरदाणी पाठवून देतों; **ह्या गांवीं** येऊन, मी फार पेंचात सापडलों; इ०.

ह्याशिवाय निरनिराळ्या उपपदार्थांनींही धातुसाधितांशीं संबंध असलेले शब्द येतात; वरील विवेचनावरून त्यासंबंधींही कल्पना येऊं शकेल. त्या त्या विभक्तीचे ते ते अर्थ होत ].

## आख्यातार्थ

मागें विकरण–प्रकरणांत एकाच धातूचीं, **काळ अर्थ** व **पद्यरूपें**, मिळून एकंदर **सात** प्रकारचीं निरनिराळीं रूपें होतात; व तीं त्याच्या त्यांच्या स्वतंत्र प्रत्ययांवरून आपल्यास कळतात, हें गेलेंच आहे. त्याचे प्रत्येकाचे प्रत्ययही पूर्वी दिलेच आहेत. एकाच धातूच्या ह्या निरनिराळ्या क्रियापद–रूपांस **आख्यातें** असें म्हणतात. त्या आख्यातांचीं नावें व मुख्य कार्य खालीलप्रमाणें—

**प्रथमाख्यात**—वर्तमानकाळ.
**द्वितीयाख्यात**—भूतकाळ.
**तृतीयाख्यात**—भविष्यकाळ.
**चतुर्थाख्यात**—आज्ञार्थ.
**पंचमाख्यात**—विध्यर्थ.
**षष्ठाख्यात**—संकेतार्थ.
**सप्तमाख्यात**—पद्यरूपें.

ज्याप्रमाणें एकेका विभक्तीचा मराठींत एकेकच व ठराविक अर्थ होत नाहीं, त्याचप्रमाणें आख्यातांचेंही आहे. वर प्रथमाख्यात—वर्तमानकाळ, इ०. रूढीस अनुसरून जें लिहिलें आहे तें सामान्यतः बरोबर आहे; सर्व अंशीं बरोबर नाहीं. म्हणून प्रत्येक आख्याताचे त्याच्या मुख्य उपयोगाशिवाय आणखीही निराळ्या अर्थांनीं जे उपयोग होतात, ते येथें दिले आहेत.

## काळ

**काळ** म्हणजे **वेळ**. वेळ ही काहीं वस्तु नव्हे, तेव्हां तिचे भाग कसे होऊं शकणार? परंतु वक्त्याच्या किंवा लेखकाच्या दृष्टीनें काळाचे तीन भाग मानितात. वक्ता किंवा लेखक ज्या वेळीं बोलत किंवा लिहीत असतो, त्यावेळीं क्रिया चालू आहे असें विधान त्यानें केल्यास तो **वर्तमानकाळ**; त्याचे पूर्वीचा तो **भूतकाळ** आणि त्याच्या नंतरचा तो **भविष्यकाळ**. वर्तमानकाळ हा केव्हां अत्यन्त अल्प वेळ असतो व केव्हां तो प्रदीर्घही होऊं शकतो. 'पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते' येथील वर्तमानकाळ केवढा दीर्घ आहे पहा. तो संपतच नाहीं. वर्तमानकाळाच्या पूर्वीचा काळ व वर्तमानकाळाच्या नंतरचा काळ हे दुसऱ्या बाजूनें अमर्याद आहेत.

वर्तमानभूतकाळ, भूतभविष्यकाळ, इ० संज्ञा मराठींत स्वीकारण्यास योग्य नाहींत. एकादी क्रिया भूतकाळींही होते व वर्तमानकाळींही होते, किंवा भविष्यकाळांत भूतकाळही असतो, ह्या गोष्टी समर्थनीय नाहींत. ह्यास्तव क्रियापदावरून किंवा वाक्यावरून खरोखर जे अर्थ उत्पन्न होत असतील तेच सांगितले पाहिजेत.

'**दादोबां**'नीं इंग्रजी काळांच्या धर्तीवर वरच्यासारखे काळाचे भेद मानिले आहेत; ते अशास्त्रीय असले तरी इंग्रजीच्या अध्ययनासाठीं त्यांचा उपयोग होतो हें खरें; म्हणून त्यांचा येथें निर्देश करितों.

### वर्तमानकाळ

| | |
|---|---|
| मी करितों | वर्तमान |
| मी करीत आहें | अपूर्ण वर्तमान |
| मी करीत असतों | रीतिवर्तमान |

### भूतकाळ

| | |
|---|---|
| मीं अ० म्यां केलें | भूत |
| मीं अ० ,, केलें आहे | वर्तमानभूत |
| मीं अ० ,, केलें होतें | भूतभूत |
| मी करीत होतों | अपूर्णभूत |
| मी करिता झालों | पूर्णभूत |
| मी करणार होतों | भविष्यभूत |
| मी करीं अ० करीत असें | रीतिभूत |

### भविष्यकाळ

| | |
|---|---|
| मी करीन | भविष्य |
| मी करीत असेन | अपूर्णभविष्य |
| मी केलें असेन | भूतभविष्य |
| मी करणार आहें | वर्तमानभविष्य |
| मी करणार असेन | भविष्यभविष्य |

## अर्थ

**आज्ञार्थ**, **विध्यर्थ**, **संकेतार्थ**, असे क्रियापदाचे मुख्य **तीन अर्थ** मानितात; परंतु एवढेच अर्थ, वाक्यांत क्रियापदावरून नेहमीं कळतात असें नाहीं, तर त्यांशिवायही कित्येक अर्थांच्या छटा उत्पन्न होत असतात. आज्ञा, अनुज्ञा, विनंति, उपदेश, प्रार्थना, इच्छा, उद्देश, सामर्थ्य, आश्चर्य, संभव, विधि, संशय, संकेत, ह्यांशिवाय आणखीही प्रकारचे अर्थ प्रत्येक आख्यातांत उत्पन्न होतात, त्यांचें स्वरूप खालीलप्रमाणें—

### प्रथमाख्यात

ह्या आख्याताचा खालील अर्थी उपयोग होतो.

( १ ) **वर्तमानकाळ**—तो **जातो**, रामा पुस्तक **वाचितो**, मांजर दूध **पितें**, गाय चारा **खाते**, इ०. ( हा ह्या आख्याताचा मुख्य उपयोग ).

( २ ) पृथ्वी सूर्याभोंवतीं **फिरते**, दोन आणि दोन चार **होतात**, गंगा बंगालच्या उपसागरास **मिळते**, इ०. ( येथें वर्तमानकाळ असून, त्याची व्याप्ति मात्र फार मोठी आहे ).

( ३ ) सूत शौनकास **सांगतो**, शुकाचार्य परीक्षितीस **म्हणतात**, इ०. ( ह्या ठिकाणीं वक्त्याचा उद्देश क्रिया जणुं कांहीं आतांच–वर्तमानकालांत–घडत आहेत असें दर्शविण्याचा असतो ).

( ४ ) तुकाराम **म्हणतो**, पंत **म्हणतात**, कृष्णशास्त्री **लिहितात**, इ०. ( ह्या ठिकाणींही क्रिया जणुं कांहीं वर्तमानकाळीं घडत आहे असें दर्शवून, शिवाय त्या त्या व्यक्तींच्या भाषणांचीं अवतरणेंही देण्याचा हेतु असतो. हाही वर्तमानकाळच होय ).

( ५ ) तुम्ही पुढें चला, हा मी **येतोंच**; चला, मी तुम्हांस एक मौज **दाखवितों**; ( येथें ‘ येतों ’ व ‘ दाखवितों ’ हीं क्रियापदाचीं रूपें वर्तमान-

काळीं आहेत; पण खरोखर क्रिया चालू नसून व्हावयाची आहे; तरी जणूं कांहीं ती आतांच घडत आहे, असें दर्शविण्याचा म्हणजे वर्तमानकाळाचा अर्थ या रूपांनीं दर्शविला जात आहे ).

( ६ ) तुम्ही कधीं आलां ? हा मी **येतों** इतकाच. ( ह्या वाक्यांत 'येतों' हें वर्तमानकाळीं रूप आहे, पण वस्तुतः तो मनुष्य येऊनही चुकला आहे. तथापि बोलणाराचा उद्देश फार वेळ होऊन गेला नाहीं, क्रिया जणूं कांहीं आतांच–वर्तमानकालींच–घडली आहे, असें दाखविण्याचा आहे ).

( ७ ) त्याची प्रकृति इतकी बिघडली आहे कीं, तो आतां **मरतोच** ( खास मरणार ), उद्यां तुझ्या वडिलांना ही गोष्ट **सांगतों** ( सांगेन ), आतां त्याला शिक्षा **होते** ( खास होणार ) यांत संशय नाहीं. ( ह्या वाक्यात 'मरतो,' 'सांगतो' व 'होते,' हीं रूपें मात्र वर्तमानकाळीं आहेत; परंतु येथें त्यांचा अर्थ भविष्यकाळीं क्रिया खास घडणार, हें दर्शविण्याचा आहे ).

( ८ ) तो जेवण झाल्यावर वामकुक्षी **करितो**, हा मुलगा शाळेंत उशीरां **येतो**, तो आजारी **असतो**, ( ह्या ठिकाणीं वर्तमानकाळ असून, क्रियेच्या रीतीचाही अर्थ आहे ). पद्यांतील उदा०–" शुक्र म्हणे, वत्से मी **वांचवितों** परि पुनःपुन्हां **मरतो**. "

( ९ ) जर तूं अभ्यास **करितोस**, तर तुला एकाही प्रश्नाचें उत्तर देतां येऊं नये काय ? जरी तो मेहनत **करितो**, तरी ताकावरच **राहतो**; ( येथें रूपें वर्तमानकाळाचीं असून, शिवाय संकेत व रीति ह्यांचाही बोध होत आहे ).

( १० ) जर तुम्ही **विचारितां**, तर मी **सांगतों**; ( येथें संकेतार्थ असून, 'विचारितां' ह्या शब्दानें वर्तमानकाळाचा व 'सांगतों' ह्या शब्दानें भविष्यकालीन क्रियेचा बोध होत आहे ).

ह्याप्रमाणें **प्रथमाख्यातीं** रूपांपासून निरनिराळ्या वाक्यांत निरनिराळे अर्थ उत्पन्न होतात.

## द्वितीयाख्यात

( १ ) **भूतकाळ**—हा या आख्याताचा मुख्य उपयोग. उदा०–मोरोबांनीं चांगला लौकिक **संपादिला**, मघाशीं पाऊस फार **पडला**, तो दहा वाजतां **निजला**, इ०.

( २ ) तुम्ही पुढें व्हा, हा मी **आलोंच**; हें पहा माझें जेवण **झालेंच** म्हणून समजा; ( ह्या ठिकाणीं क्रियापदाचीं रूपें भूतकाळीं आहेत, पण अर्थ मात्र भविष्यकाळाचा आहे ).

( ३ ) माझ्या म्हणण्याप्रमाणें वागल्यास तुम्हांस यश **आलेंच** म्हणून समजा; तुम्ही हो म्हणण्याचा अवकाश, कीं मी **निघालोंच**: ( येथें क्रियापदें भूतकाळाच्या रूपांचीं असून, संकेताचा व भविष्यकाळाचाही अर्थ दिग्दर्शित होत आहे ).

( ४ ) जर तूं मुंबईस **आलास**, तर मला भेटल्यावांचून राहूं नको; यंदां पाऊस **पडला**, तर बरें होईल; ( येथेंही संकेतार्थ असून, भूतकाळाच्या रूपांचा भविष्यकालीन क्रिया दर्शविण्यासाठीं उपयोग केलेला आहे.

( ५ ) ही पहा गाडी **आली**, ( येथें क्रियापदाचें रूप भूतकाळीं आहे, पण वस्तुतः क्रिया चालू असल्याचाच अर्थ उत्पन्न होत आहे ).

### तृतीयाख्यात

( १ ) **भविष्यकाळ** – आज पाऊस **पडेल**, परवां दत्तूची परीक्षा **संपेल**, काका पहिल्या तारखेस नोकरीवर रुजू **होतील**, ( हा या आख्यातचा मुख्य उपयोग आहे ).

( २ ) तो तेथें कसा **जाईल**? मी कां म्हणून **पडेन**? तो असल्या फंदांत कशास **पडेल**? ( येथें क्रियापद –रूपें भविष्यकाळीं असून, शिवाय प्रश्नाचाही अर्थ आहे ).

( ३ ) ते ह्या रस्त्यानें **जातील** तर **जातील**; तूं **रागावशील** तर **रागावशील**; ( ह्या ठिकाणीं क्रियापदाचीं रूपें भविष्यकाळीं असून, शिवाय औदासिन्याचाही अर्थ उत्पन्न होत आहे ).

### चतुर्थाख्यात

( १ ) **आज्ञार्थ**— मी **जाऊं**? आम्ही **खेळूं**? आम्ही तुमच्याबरोबर **येऊं**? ( ह्याप्रमाणें ह्या आख्याताचा प्रथमपुरुषीं प्रश्नपूर्वक अनुज्ञा म्हणजे आज्ञा मागणें किंवा संमति मिळविणें, ह्या अर्थीं उपयोग होतो ).

( २ ) **पाहूं** बरें तुझें अक्षर कसें आहे तें? आपण आतां फिरावयास **जाऊं**; ( ह्या ठिकाणीं एका प्रकारें संमतिपूर्वक दुसऱ्याला केलेल्या सौम्य आज्ञेचाच अर्थ उत्पन्न होत आहे ).

( ३ ) द्वितीय पुरुषीं मात्र साक्षात् आज्ञा किंवा उपदेशाच्या स्वरूपांत आज्ञा असते. उदा०--पुढें **वाच**; मुलांनो, पुस्त्या लिहावयास **बसा**; वेळेवर शाळेत **जा**; इ०.

( ४ ) देवा, माझें संकट निवारण **कर**; महाराज, मजवर दया **करा**; 'हेंचि दान **दे** गा देवा, तुझा विसर न व्हावा;' 'तुका म्हणे व्हाल ऐकत करुणा, तरी नारायणा उडी **घाला**;' (ह्या ठिकाणीं ह्या रूपाचा प्रार्थना करण्याकरितां उपयोग केलेला आहे ).

( ५ ) **चला, उठा**, उद्योगास **लागा**; " आधीं मन **मुंडा** मन **मुंडा**;" ( ह्या ठिकाणीं ह्या रूपाचा आग्रहपूर्वक विनंति असा अर्थ आहे ).

( ६ ) तो **जावो**, ते **खेळोत**, ते गेले तर **जावोत**, ( ह्याप्रमाणें कांहीं अशीं औदासीन्याचाही अर्थ ह्या रूपांवरून केव्हां केव्हां उत्पन्न होतो ).

[ तो जावो व त्यानें जावें; ते खेळोत व त्यांनीं खेळावें; देव तुमचें भलें करो व देवाने तुमचे भलें करावें; सुसंगति सदा घडो व सुसंगति सदा घडावी; ह्या जोडी-जोडीच्या वाक्यांचे अर्थ जरी जवळजवळ सारखेच असले, तरी पहिलीं रूपें चतुर्थाख्यातीं म्हणजे **आज्ञार्थी** आहेत; व दुसऱ्या रूपांवरून विधि म्हणजे कर्तव्य हा अर्थ कळत असल्यामुळें तीं **विध्यर्थी** आहेत; हें ध्यानांत ठेवावयास हवें ].

( ७ ) " **वसो** नृपतिच्या मनीं सदयता समा बुद्धि ती । प्रजाजनहि सूद्यमें **करूत** आत्म-देशोन्नती;" " नृपति म्हणे तरि सुंदरि, सुदति, मुदतिशय तुला मलाहि **घडो** । सत्कृतिची रसिकांची तुजशीं माझी तशीच गांठि **पडो**;" " त्यांचा संग नको मजलागीं । त्यांच्या तोंडा **लागो** आगी;" ( ह्याप्रमाणें ह्या रूपांवरून आशीर्वाद, शाप, हेही अर्थ कळतात ).

( ८ ) तुम्हीं भक्तांनें ईश्वरास **आळवा**, म्हणजे तो तुमचें गाऱ्हाणें ऐकेल; तुम्ही फिरून यत्न **करा**, म्हणजे पास व्हाल; ( येथें ह्या रूपांनीं संकेताचा व भविष्यकाळाचाही अर्थ उत्पन्न होत आहे ).

### पंचमाख्यात

( १ ) **विध्यर्थ**—प्रत्येकानें ईश्वरास स्मरून **वागावें**; " सत्यातें **जोडावें** सुज्ञे धर्मासि पळ न **सोडावें** । पाशांतें **तोडावें** धीरें न कदापि पाप **जोडावें**;" ( ह्या ठिकाणीं ह्या आख्यातांतलि क्रियापदांचा कर्तव्य हा अर्थ असून तो ह्या आख्याताचा मुख्य अर्थ आहे ).

( २ ) हें पद त्यानेंच **म्हणावें**, व्यापार असा इंग्रजांनींच **करावा**, पुरणाची पोळी वारणाताईनींच **करावी**, ( ह्या ठिकाणीं ह्या आख्यातावरून शक्यता, योग्यता, सामर्थ्य, हे अर्थ कळत आहेत ).

( ३ ) तुला काय **म्हणावें ?** ह्या प्रसंगाचें शब्दांनीं काय वर्णन **करावें?** अशा प्रसंगीं तिनें तरी काय **करावें ?** ( ह्या ठिकाणीं ह्या रूपांवरून विशेषतः प्रश्नपूर्वक आश्चर्याचा अर्थ उत्पन्न होत आहे ).

( ४ ) त्याला गुण **पडावा** म्हणून येथें आणिलें आहे; मनुष्याची उन्नति **व्हावी** म्हणून ईश्वरानें त्यास बुद्धि दिली आहे; ( येथें ह्या रूपांनीं उद्देश किंवा हेतु हा अर्थ दर्शविला आहे ).

( ५ ) त्यानें तिला एकसारखें मारीत **सुटावें** व शिव्या **द्यावा**; तूं लहानपणीं नेहमीं **रडावेंस**; ( ह्या ठिकाणी ह्या रूपांवरून भूतकालीन रीतीचाही अर्थ कळत आहे.

( ६ ) आज बहुधा पाऊस **पडावा**; उद्यां त्याचें पत्र **यावें**; आपल्या देशात लौकरच तीव्र जागृति **व्हावी**, असें दिसतें; ( ह्या ठिकाणीं भविष्यकालीन संभवाचा अर्थ कळत आहे ).

( ७ ) खूप पैसा **मिळावा**, एक मोटार **असावी**, पुष्कळ नोकर-चाकर **असावेत**, चैन करायाला **सांपडावी**, ( ह्या ठिकाणीं ह्या रूपांवरून इच्छेचा अर्थ कळत आहे).

( ८ ) पत्राचें उत्तर जरूर **पाठवावें**, आपण आज आमच्याकडे भोजनास **यावें**, ( ह्या ठिकाणीं ह्या रूपांनीं विनंतीचा अर्थ कळत आहे ).

( ९ ) आतां आपण **चलावें**; आपण तिकडे **जावें**, आम्ही मागून येतोंच; ( या ठिकाणी ह्या रूपांवरून सौम्य आज्ञेचा अर्थ कळत आहे).

( १० ) तुमच्या हातून ही गोष्ट कशी **व्हावी** ( झाली ), हें मला समजत नाहीं; त्यानें तुम्हांस शिव्या **द्याव्या** ( दिल्या ), हें मोठें आश्चर्यच आहे; ( ह्या ठिकाणीं ह्या आख्यातावरून भूतकालीन क्रिया व आश्चर्य हे अर्थ व्यक्त होत आहेत ).

( ११ ) आतां मीं काय **करावें?** त्याला आतां काय जबाब **द्यावा?** ( येथें ह्या रूपांनीं केवळ संशयात्मक प्रश्नाचा अर्थ दर्शविला आहे).

( १२ ) तो ह्या वेळीं कचेरींत **असावा**; तो कालच्या सभेस हजर **असावा**; पुढें पश्चात्ताप न **व्हावा** म्हणून अगोदरच जपणें बरें; ( ह्याप्रमाणें ह्या रूपांवरून वर्तमान, भूत व भविष्यकालीन संभवाचाही अर्थ कळतो ).

( १३ ) जर त्यानें **जावें** तर मींही का जाऊं नये ? जर हांसत कर्म **करावें**, तर तें रडत **भोगावें**; ( येथें ह्या रूपांचा संकेतार्थीही उपयोग आहे ).

## षष्ठाख्यात

( १ ) **संकेतार्थ**—जर त्यास वेळेवर औषध **पोंचतें**, तर तो खास **जगता**; जर एक हस्ताचा तेवढा पांऊस **पडता**, तर सतरा आणे पीक **येतें**; ( ह्या ठिकाणीं भूतकाळांतील संकेताचा अर्थ ह्या रूपांवरून कळत आहे ).

( २ ) जर हिंवाळ्याप्रमाणें उन्हाळ्यांतही गार पाणी **मिळतें**, तर किती मौज **होती** ? ( ह्या रूपांवरून भविष्यकालीन संकेताचा अर्थ कळत आहे ).

**टीप**—संकेतार्थी क्रियापदें वर्तमानकाळीं, भूतकाळीं व भविष्यकाळींही असतात. त्या त्या आख्यातांत त्यांचीं रूपें दिलेलींच आहेत.

## सप्तमाख्यात

**पद्यरूपें**—क्रियापद-प्रकरणांत एकदां ह्या आख्याताचीं रूपें दिलींच आहेत; हीं रूपें पद्यांतच येत असल्यामुळें त्यांस **पद्यरूपें** असें म्हणतात. ह्यांचाही निरनिराळ्या काळांत उपयोग होतो; त्यांचीं उदाहरणें ‘ धातूला होणारे विकार ’ या प्रकरणांत दिलीं आहेत. त्यांशिवाय आणखी उदाहरणें—

### ( १ ) वर्तमानकाळीं

“ **दे** ( देतो ) दान गुप्त उपकार **करीं** ( करितो ) न **बोले** ( बोलत नाहीं ) ।
**मानी** ( मानितो ) प्रमोद जरि मान्य घरासि आले ” ॥ ( वामन )

“ करूं **ये** ( येतें ) समाधान जो मूर्ख त्याचें ।
धरूं **ये** ( येतें ) सुखें चित्त पैं जाणत्याचें ॥
न **जाणे** ( जाणत नाहीं ) न **नेणे** ( उमजत नाहीं ) अशा पामराला ।
बुझावूं **शके** ना ( शकत नाहीं ) विधाता तयाला ” ॥ ( वामन )

“ पार्थ **म्हणे** ( म्हणतो ) तो कोण ब्रह्मर्षि **असे** ( आहे ) मनोरमहि ज्यां तें ॥
तद्यश **नसे** ( नाहीं ) परिशिलें सांग; सख्या, तूं तदीय माहिम्यातें ” ॥ ( मोरो० )

(२) **भूतकाळीं**

" शब्दभाव बाळिलाहि ना **कळे** ( कळला नाहीं )।
शुक्र सन्निध तयासाचि तो **कळे** ( कळला " ॥ ( वामन )

" बहु शांतवन धर्म **करी** न **शमे**, न **वळे**, परंतु तो चैद्य "॥
" भेटोनि तितिक्षेचे गुण **सांगे** साधु बाप तनयेते " ॥
" **पाहे** तीस नृप **म्हणे**, मग मुनिला गाय मागतों द्या; हे " ॥ (मोरो०)
" भोजन **दे** चोराला आदर आग्रह **करी** स्वयें मोठा ॥
साधु प्रसन्न-चित्तें बांधुनि **लागे** वहावया मोटा " ॥

( ३ ) **रीतिभूतकाळीं**

" त्या वैश्य-कुमारांचें **भक्षी** ( भक्षीत असे ) उच्छिष्ट एक काक सदा " ॥
" मधु घृत पायस वायस **खाय** ( खात असे ) सदा पक्षियांसवें **भांडे** "
( भांडत असे ) ॥ ( मोरो० )

( ४ ) **भविष्यकाळीं**

" देव **करी** ( करील ) तरी काय एक नोहे ? "
" सत्य धरितां निर्धार । काय न **करी** (करील ) विश्वंभर " ( तुका० )
" न **धरीं** शस्त्र करीं मी गोष्टी सांगेन युक्तिच्या चार " ॥ ( मोरो० )
" कसा त्या नादातें क्षणभरिहि तो पामर **करी** ( करील ? ) " ( कृ०चि० )

ह्याप्रमाणें प्रत्येक आख्याताचे आपल्या भाषेंत आढळणारे उपयोग सांगितले.

---

# प्रयोग

वाक्यांतील क्रियापदाचा त्याच्या कर्त्याशीं किंवा कर्माशीं पुरुष, लिंग, वचन, ह्या बाबतींत जो अन्वय ( एकसारखा समान संबंध ) किंवा अनन्वय ( असमान संबंध ) त्यास **प्रयोग** असें म्हणतात.

**प्रयोग** ओळखतां येण्यासाठीं कर्ता, कर्म, क्रियापद, हीं बरोबर ओळखतां आलीं पाहिजेत. वाक्यांत कधीं कधीं कर्ता, कर्म, किंवा क्रियापद, ह्यांपैकीं एकादी किंवा क्वचित् दोन गोष्टी लुप्त किंवा अध्याहृत असतात; त्या उघड किंवा स्पष्ट केल्यावांचून प्रयोग ओळखणें कठीण पडतें. " असें म्हणतात कीं, प्राचीन काळीं एका गुरूजवळ शेंकडों विद्यार्थी पढत असत;" " सोन्याचे दागिने करितात;"

ह्या दोन वाक्यांत ' म्हणतात ' व ' कारितात ' ह्या क्रियापदांचा ' लोक ' हा कर्ता अध्याहृत आहे. " गर्जेल तो पडेल काय " यांत ' गर्जेल ' या क्रियापदाचा 'जो' हा कर्ता अध्याहृत आहे. त्याचप्रमाणें " करील तो भरील " यांत ' करील ' या क्रियापदाचा 'जो' हा कर्ता, व 'जें' हें कर्म, ह्या दोन्ही गोष्टी अध्याहृत आहेत: व ' भरील ' या क्रियापदाचें 'तें' हें कर्मच फक्त अध्याहृत आहे. " त्याच्यासारखा विद्वान् तोच " ( होय ); " भिक्षापति तो लक्षापति " ( असतो ); " पिंडीं तें ब्रह्मांडीं " ( आहे ); "तो उद्यां जायचा" ( आहे ); ह्या ठिकाणीं कंसांत दिलेलीं क्रियापदें अध्याहृत आहेत.

एकंदर प्रयोग **तीन** आहेत. **कर्तरि, कर्मणि व भावे.**

## कर्तरि-प्रयोग

जेव्हां कर्त्याच्या पुरुष-लिंग-वचनाप्रमाणें क्रियापदाचें रूप असतें, तेव्हां त्या वाक्यरचनेस **कर्तरिप्रयोग** असें म्हणतात. उदा०-मी जातों, ती बसते, ते-त्या-तीं येतात, मुलें पुस्तक वाचितात, इ०.

**टीप**--क्रियापद नेहमीं ( कर्त्याच्या किंवा कर्माच्या ) पुरुष-लिंग-वचन ह्या सर्वांप्रमाणेंच बदलतें असें नाहीं; केव्हां केव्हां कांहीं आख्यातांत तिन्ही लिंगी रूप एकसारखेंच असतें. अशा वेळीं पुरुष व वचन ह्यांवरून क्रियापद बदलतें कीं नाहीं तें पाहिलें पाहिजे. उ०—मजजवळ पुस्तक-पोथी-ग्रंथ आहे. येथें आहे हें क्रियापद तिन्ही लिंगीं समान आहे.

सकर्मक आणि अकर्मक असे दोन प्रकारचे धातु असतात, ह्यामुळें कर्तरिप्रयोगही **सकर्मक कर्तरि** व **अकर्मक कर्तरि** असा दोन प्रकारचा होतो.

**कर्तरिप्रयोगां**त कर्ता हा नेहमीं **प्रथमान्त**च असतो; आणि कर्म हें प्रथमान्त किंवा द्वितीयान्त असतें. उदा०—**रामा** जातो, **मी** बेळगांवाहून आलों, **तो** ' पत्र ' लिहितो, **अण्णासाहेब** ' मला ' ओळखितात; ह्या सर्व वाक्यांतील कर्ते प्रथमान्तच असून, तिसऱ्या वाक्यांतील ' पत्र ' हें कर्म प्रथमान्त व शेवटच्या वाक्यांतील ' मला ' हें कर्म द्वितीयान्त आहे.

ह्या मुख्य गोष्टींशिवाय **कर्तरिप्रयोगां**त खालील आणखी कांहीं गोष्टी आढळून येतात.

( १ ) प्राणिवाचक कर्म बहुधा द्वितीयान्त असतें; व अप्राणिवाचक कर्म बहुधा प्रथमान्त असतें. उदा०—

[ **अ** ] शिक्षक **मुलांस** शिकवितात, आई **मुलीस** रागवते, मालक **चाकरांस** बोलावितो, तुम्ही **त्याला** घरीं आणावा, इ०.

[ **आ** ] तो **काम** करितो, मी मंडईतून **आंबे** आणीन, तो **पुस्तक** वाचील, धोबी **कपडे** धुतात, इ०.

**अपवाद्**—पद्यांत किंवा मनुष्येतर प्राण्यांच्या संबंधानें थोड्या कमीपणानें बोलावयाचें असल्यास वरच्या नियमांत फरकही आढळतो. उदा०—

[ **क** ] " धनिक वेंची **धनातें** । दरिद्री नाचरे **तपातें**; " " सीता म्हणे अहाहा धावा हो मारितात **हांकेला**; " " यापरि वदोनि हित मित वर्णा कर्णामृता खऱ्या **वचना**; " इ०. ( यांत अप्राणिवाचक कर्म असूनही तें द्वितीयान्त आलें आहे ).

[ **ख** ] तो **गाय** बांधितो किंवा गाईस बांधितो; तो **घोडा** इकडे बांध किंवा त्या घोड्याला इकडे बांध; तो **गुरें** राखितो किंवा गुरांना राखितो; मांजर **उंदीर** पकडतें किवा उंदराला पकडतें; ( येथें मनुष्येतर प्राणिवाचक कर्में प्रथमान्तही आहेत ).

[ **ग** ] जेव्हां वाक्यांत संप्रदानार्थी चतुर्थी असते, तेव्हां प्राणिवाचक किंवा अप्राणिवाचक कोणतेंही कर्म असलें, तरी तें प्रथमान्तच असतें. उदा०—नानासाहेब ब्राह्मणांस **दक्षिणा** वाटितात, मी तुला हजार **गाई** देतों, अखेरीस कांचनभटजी म्हाताऱ्यालाच **मुलगी** देणार आहेत, इ०.

( २ ) सर्वनामांपैकीं मी–आम्ही व तूं–तुम्ही हीं सर्वनामें गद्यांत कधींही कर्मस्थानीं प्रथमान्त येत नाहींत; तृतीयपुरुषवाचक सर्वनामें मात्र प्राण्यांबद्दल आल्यास द्वितीयान्त व पदार्थांबद्दल आल्यास प्रथमान्त असा साधारण नियम आढळतो. उदा०—तूं **तिला** इकडे आण; **त्याला** बोलाव ( प्राणिवाचक ); मी **तें** ( भाडें ) देऊन टाकीन; मधूला **ही** ( छत्री ) आवडत नाहीं ( अप्राणिवाचक ).

( ३ ) **कर्तरिप्रयोगांत** खालील प्रकारचीं क्रियापदें आढळून येतात—

| | | |
|---|---|---|
| वर्तमानकाळीं — | मी काम करितों | गोपाळा घरीं जातो |
| भविष्यकाळीं — | मी काम करीन | गोपाळा घरीं जाईल |
| आज्ञार्थी — | मी काम करूं ? | गोपाळा घरीं जाओ, जाऊं दे |
| संकेतार्थी— | जर मी काम करितों | जर गोपाळा घरीं जाता |
| सतमाख्यातीं — | मी काम करीं | गोपाळा घरीं जाई |

**टीप**—ह्यावरून असें दिसून येईल कीं, **भूतकाळीं** व **विध्यर्थी** कर्तरि-प्रयोग होत नसावा; परंतु ह्यास खालील अपवाद आहेत--

**क**. सर्व **अकर्मक** धातूंचा **भूतकाळीं** कर्तरिप्रयोग होतो. उदा०-रामा गेला, विमल बसली, तूं पळालास, पांखरें उडालीं, इ०.

**ख. उमजगणांतील** धातूंचा **भूतकाळीं** कर्तरिच प्रयोग होतो. उदा०—शिवराम माझें बोलणें उमजला, ती मुलगी धडा विसरली, गाय गोऱ्हा व्याली, इ०. ( उमजगणांतील धातु पृ० ३०९ पहा ).

**ग. आचरगणांतील** धातूंचा **भूतकाळीं** कर्तरि व कर्माणि दोन्ही प्रकारचा प्रयोग होतो. उदा०—तो हें व्रत आचरला किंवा त्यानें हें व्रत आचरिलें; तो तें शास्त्र पढला किंवा त्यानें शास्त्र पढलें; तो विष ओकला किंवा त्यानें विष ओकलें; तो तोंड धुतला किंवा त्यानें तोंड धुतलें; इत्यादि. ( आचरगणांतील धातु पृ० ३०९ पहा ).

**घ**. पुढलिसारख्या वाक्यांतही **भूतकाळीं** कर्तरिप्रयोग होतो. उदा०—तो काम करिता झाला, सूत शौनकास सांगते झाले, इ०.

**ङ**. अकर्मक धातु असतां **विध्यर्थी** कर्तरि-प्रयोग विकल्पानें होतो. उदा—तूं आज सभेस यावास किंवा तूं आज सभेस यावेंस; तो येथून निघून जावा किंवा त्याने निघून जावें; ह्या दुखण्यांत ही म्हातारी मरावी किंवा ह्या म्हातारीनें मरावें, इ०. (यांत पहिलीं वाक्यें कर्तरि आहेत, हें ध्यानांत येईलच ).

**च. उमजगण व आचरगण** ह्यांतील सकर्मक धातूंचाही **विध्यर्थी** विकल्पानें कर्तरि व कर्माणि असा दोन्ही प्रकारचा प्रयोग होतो. उदा०—तो ही वाट चुकावा किंवा त्याने ही वाट चुकावी; तो हें उमजावा किंवा त्यानें हें उमजावें; तो हें औषध ओकावा किंवा त्यानें हें औषध ओकावें; इ०.

## कर्माणि-प्रयोग

जेव्हां कर्माच्या पुरुष-लिंग-वचनाप्रमाणें क्रियापदाचें रूप असतें, तेव्हां त्या वाक्यरचनेस **कर्माणि-प्रयोग** असें म्हणतात. उदा०—रामानें काम केलें, मीं पुस्तकें वाचलीं, हल्लीं माझ्यानें लांकडें फोडवत नाहींत, इ०.

( १ ) अकर्मक धातूंचा कर्मणि-प्रयोग होणें शक्य नाहीं, हें उघडच आहे.

( २ ) **कर्मणि-प्रयोगांत** कर्ता प्रथमान्त कधींही नसतो; कर्म मात्र **प्रथमान्तच** असतें. कर्ता तृतीयान्त, सविकरणी तृतीयान्त, शब्दयोगी अव्ययान्त किंवा चतुर्थ्यन्त असतो. उदा—

**तृतीयान्त कर्ते—इंदिरेनें** भाजी चिरली, **मुलानें** गाय बांधिली, **शिक्षकांनीं** छड्या मारिल्या, **विद्यार्थ्यानें** अभ्यास करावा, **त्यानें** दूध सांडलें, **तिनें** वेणी घातली, इ०.

**सविकरणी तृ०—रामाच्यानें** काम करवतें, **त्याच्यानें** हें पुस्तक वाचवत नाहीं, **माझ्यानें** हरभरे चावतात, इ०.

**शब्दयोगी अ० तृ०—शिपायाकडून** चोर धरिला गेला, **माझ्याकडून** काम केलें गेलें, **कारकुनाकडून** पैसे वाटले गेले, इ०.

**चतुर्थ्यन्त—रामाला** काम करवतें, **त्याला** हें पुस्तक वाचवतें, **मला** हरभरे चावतात, **चिक्कणमामांना** पैसा सोडवत नाहीं, इ०.

( ३ ) **कर्मणि-प्रयोगांत** विशेषेंकरून भूतकाळीं व विध्यर्थी क्रियापदें आढळतात. उदा०—कृष्णानें गाई **बांधिल्या**, भीमानें जरासंध **मारिला**; कृष्णानें रोज दहीं दूध **चोरावें**, आम्ही जिवापाड कामें **करावीं**, पोटानें रिकामें बसून **खावें**, त्यांनीं रोज सोंगट्या **खेळाव्या**; इ०.

**टीप—शक्य क्रियापद** असतां वर्तमानकाळीं, भविष्यकाळीं व संकेतार्थीहि कर्मणि-प्रयोग होतो, उदा०—

वर्त० का०—त्याला काम **करवतें**, त्याच्यानें ही भाजी **खाववते**, इ०.

भवि० का०—त्याला काम **करवेल**, त्याच्यानें ही भाजी **खाववेल**, इ०.

संकेतार्थी—जर आम्हांला धान्य **दळवतें**, तर दळलें असतें; जर त्याला फुटाणे **चावते**, तर त्यानें भराभर खाल्ले असते; इ०.

( ४ ) यांशिवाय **कर्मणि-प्रयोगासंबंधानें** पद्यांत येणाऱ्या खालील गोष्टी ध्यानांत ठेवावयास पाहिजेत.

**अ**. देइजे, ध्याइजे, बोलिजे, अशा प्रकारचीं क्रियापदाचीं रूपें पद्यांत येऊन कर्मणि-प्रयोग होतो. उदा०—नळें इंद्रासी असें **बोलिजेलें, त्वां** काय **कर्म करिजे** लघु लेंकरानें, जो जो **कीजे** परमार्थ-लाहो तो तो पावे सिद्धीतें, द्विजीं निषधापासाव ( असें ) **म्हणीजेलें**, इ०.

**आ.** मी, आम्ही, व तूं, तुम्ही, हे प्रथम पुरुषी व द्वितीय पुरुषी शब्द केवळ पद्यांतच प्रथमा विभक्तींत येऊन कर्मणि-प्रयोग होतो. ( गद्यांत हे शब्द कर्मस्थानीं प्रथमा विभक्तींत येऊन कर्मणि-प्रयोग कधीच होत नाहीं ). उदा०-

" प्रेमें रक्षितिल सदा म्हणुनि दिलें **मी** जयासि मत्तातें "
" त्यातें प्रद्युम्न म्हणे, मायेसि दिला **तुम्ही** उपायनसे "
" जाउनि तो दूत म्हणे, कृष्णे वृतांत **तूं** स्वयें धर्मे—
हारविलसि; सुयोधन-सदनाप्रति ये करावया कर्मे " } (मोरोपंत)

" इंद्रियांचीं दीनें, **आम्ही** केलों नारायणें " (तुकाराम)

## भावे-प्रयोग

जेव्हां कर्त्याच्या किंवा कर्माच्या पुरुष-लिंग-वचनाप्रमाणें क्रियापद बदलत नसून, तें नेहमीं तृतीय पुरुषीं, नपुंसकलिंगीं, एकवचनीं, असें स्वतंत्र असतें; अशा प्रकारच्या वाक्य-रचनेस **भावे-प्रयोग** असें म्हणतात. उदा०—त्यानें जावें, गोविंदानें गोपाळास बोलाविलें, शिक्षकानीं मुलांस शिकवावें, त्याच्यानें बसवतें, इ०.

क्रियापद सकर्मक असल्यास **सकर्मक भावे** व अकर्मक असल्यास **अकर्मक भावे** असे दोन प्रकारचे भावेप्रयोग मानितात.

( १ ) **भावे-प्रयोगांत** कर्मणि-प्रयोगांतल्याप्रमाणेंच कर्ते तृतीयान्त साधि-करणी तृतीयान्त, शब्दयोगी अव्ययान्त व चतुर्थ्यन्त असतात;प्रथमान्त कधींही नसतात. त्याचप्रमाणें कर्म द्वितीयान्त असतें; प्रथमान्त कधींही नसतें. उदा०—

| | अकर्मक | सकर्मक |
|---|---|---|
| तृतीया- | विष्णूनें जावें | विष्णूनें हिरण्यकश्यपूस मारावें |
| साधि० तृ०- | विष्णूच्यानें जाववतें | विष्णूच्यानें हिरण्यकश्यपूस मारवतें |
| श० अ० तृ०- | ( होत नाहीं ) | विष्णूकडून हिरण्यकश्यपूस मारलें जातें |
| चतुर्थी- | विष्णूला जाववतें | विष्णूला हिरण्यकश्यपूस मारवतें. |

( २ ) देइजे ध्याइजे, अशा प्रकारच्या मूळ कर्मणि रूपांपासून कवितेंत भावेप्रयोगही झालेले आढळतात. उदा०—" स्वर्गा पुण्यात्मकें पापें **येइजो** पापात्मकें पापें नरका **जाइजे**. " ( मनुष्यानें पुण्यात्मक अशा प्रकारचें पाप जरी केलें, तरी त्यायोगें त्यानें स्वर्गाला **यावें** व पापात्मक पाप केलें, तर त्यानें नरकाला **जावें**; असा याचा अर्थ आहे ). हे **अकर्मक भावे** प्रयोग आहेत.

( ३ ) मला **कळमळतें**, त्यास लकडीपुलावरच **सांजावलें**. पर्वतीवर चढतांच आम्हांस **उजाडलें**, इ०. अशा ठिकाणीं कळमळणारा कांहीं मी नव्हे. सांजावणारा कांहीं तो नव्हे, उजाडणारे कांहीं आम्ही नाहीं, अर्थात् ह्या ठिकाणीं मला, त्यास, आम्हांस, ह्या शब्दांना कर्ते म्हणणें कांहीं योग्य नाहीं. काय मळमळतें, काय सांजावतें किंवा काय उजाडतें, हे सांगणारे शब्द म्हणजे कर्मेंही ह्या ठिकाणी नाहींत; मात्र भावे-प्रयोगांतल्याप्रमाणेंच येथें क्रियापद तृतीयपुरुषी, नपुंसकलिंगी, एकवचनी आहे; अर्थात् ह्यांस भावेप्रयोग म्हणणेंच योग्य आहे; पण ह्यांत नेहेमीं असणारा कर्तादेखील नसल्यामुळें ह्यांस **अकर्तृक भावे** प्रयोग म्हणण्यास हरकत नाहीं. **दादोबांनीं** ह्यांस **भावकर्तरि** प्रयोग असें म्हटलें आहे.

[ अशा **अकर्तृक** भावे प्रयोगांतील ' मला कळमळतें, तिला तेथेंच सांजावलें, ' यांतील मला, तिला, हे शब्द चतुर्थ्यन्त असून, त्या चतुर्थीचा अर्थ अनुक्रमें अधिकरण, संबंध, हा आहे. वस्तुतः तेथें कळमळ + होतें = कळमळतें, सांज + झाली = सांजावलें, असें या शब्दांचें मूळ स्वरूप आहे ].

## विशिष्ट प्रयोग

( १ ) मराठींत केव्हां केव्हां खालील प्रकारचीं म्हणजे अंशतः कर्तृगामी व अंशतः कर्मगामी वाक्यरचना आढळते. उदा०—

१. तूं मला पुस्तक दिलेंस; २. तुम्हीं मला किती पुस्तकें दिलींत ? पद्यांतील—

३. "वत्से, लिहिलेस उत्तम श्लोक;" ४. "दैन्यवेषं कासयासि घेतलाति सांगिजे."

ह्या ठिकाणीं पहिल्या दोन उदाहरणांत तूं व तुम्ही ह्या द्वितीयपुरुषीं कर्त्यांस अनुसरून क्रियापदांस एकवचनी 'स' व अनेकवचनी, 'त' हे द्वितीय पुरुषाचे प्रत्यय लागलेले आहेत; परंतु पुस्तक व पुस्तकें ह्या कर्मांप्रमाणेंही त्यांचें लिंग-वचन हीं आहेत. तिसऱ्या उदाहरणांत तूं ह्या द्वितीयपुरुषी एकवचनी कर्त्या-प्रमाणें क्रियापदाला ' स ' हा प्रत्यय लागला असून, श्लोक ह्या कर्माप्रमाणेंही पुल्लिंगी अनेकवचनी क्रियापद आहे. चौथ्या उदाहरणांत तुम्ही ह्या द्वितीयपुरुषी अनेकवचनी क्रियापदाप्रमाणें क्रियापदास ' ति ' हा प्रत्यय लागला आहे, तर दैन्यवेष ह्या पुल्लिंगी एकवचनी कर्माप्रमाणेंही क्रियापद आहे. ह्या प्रकारच्या विशिष्ट वाक्य-रचनेस **कर्तृ-कर्म-संकर** प्रयोग असें म्हणतात.

( २ ) मराठींत केव्हां केव्हां खालील प्रकारचीही रचना आढळते.

| | |
|---|---|
| तूं घरीं जायचें होतेंस | तुम्हीं त्याला मारायचें नव्हतेंत |
| तूं त्याला न्यायचें होतेंस | तुम्हीं त्यालाही न्यायचें होतेंत |
| तूं त्या ठिकाणीं बसायचें होतेंस | तुम्हीं खुशाल निजायचें होतेंत |

ह्या ठिकाणीं क्रियापदें सर्वत्र तृतीयपुरुषीं, नपुंसकलिंगीं, एकवचनीं असून, शिवाय द्वितीयपुरुषीं कर्त्यांप्रमाणेंही त्यांना 'स' व 'त' हे प्रत्यय लागले आहेत; म्हणजे मूलत: हे भावेप्रयोग असून, शिवाय ते अंशतः कर्तृगामीही आहेत; अशा वाक्यरचनेस **कर्तृ-भाव-संकर** प्रयोग असें म्हणतात.

( ३ ) ह्याशिवाय आणखी एक प्रकारची रचना आढळते. आईनें मुलीला निजविली, बापानें मुलाला शाळेंत घातला, गोविंदरावांनीं तिला माहेरीं पाठविली, गोविंदरावांनीं त्याला विलायतेस पाठविला.

ह्या वाक्यांत तृतीयान्त कर्ता, द्वितीयान्त कर्म, असल्यामुळे क्रियापद भावे-प्रयोगांतल्याप्रमाणें तृतीयपुरुषीं, नपुंसकलिंगीं, एकवचनीं असावयास पाहिजे; परंतु तें कर्मगामी आहे: अशा प्रकारच्या वाक्य-रचनेस **कर्म-भाव-संकर** प्रयोग असें म्हणतात.

## कांहीं वाक्यांचे प्रयोग

१. '**देवाला जग दिसतें**'—यांत दिसणारें जग म्हणून जग हा कर्ता, दिसतें हें क्रियापद; **अकर्मक कर्तरि** प्रयोग. ( दिसणें व पाहणें हे दोन धातु भिन्न अर्थांचे आहेत. दिसणें याप्रमाणेंच रुचणें, आवडणें, शोभणें, हे धातु अकर्मक आहेत ).

२. **मला मुंबईस जावयाचें आहे**'—यांत मला हा कर्ता, जावयाचें आहे हें संयुक्त क्रियापद; **अकर्मक भावे** प्रयोग.

३. '**त्याला गुजराथी वाचावयास येतें**'—यांत ( अर्थातच त्याला गुजराथी येतें किंवा येत नाहीं हें सांगावयाचे नसल्यामुळें, वाचणें हा धातु मुख्य आहे ) वाचणारा तो म्हणून त्याला हा कर्ता, गुजराथी हें कर्म, वाचावयास येते हे संयुक्त क्रियापद; हा **कर्मणि** प्रयोग.

४. '**बाजिरावास इंग्रजांना पुणें द्यावें लागलें**'—यांत बाजिरावास हा कर्ता, पुणें हें कर्म, द्यावें लागलें हे संयुक्तक्रियापद; **कर्मणि** प्रयोग.

५. ‘ **मी उद्यां जाणार** ’—येथें ‘ आहे ’ हे क्रियापद अध्याहृत घ्यावयास हवें. मी हा कर्ता, जाणार आहे हें संयुक्त क्रियापद; **अकर्मक कर्तरि** प्रयोग.

६. ‘ **आईनें मुलीला जेवूं घातलें** ’—यात आईनें हा कर्ता, मुलीला हें कर्म, जेवूं घातलें हें क्रियापद; **सकर्मक भावे** प्रयोग.

७. ‘ **त्यानें मला वाचूं दिलें** ’—यांत त्यानें हा कर्ता, मला हें कर्म, वाचूं दिलें हें संयुक्त क्रियापद; **सकर्मक भावे** प्रयोग.

८. ‘ **कोलंबसास गलबतें नैर्ऋत्येकडे हाकारावीं लागलीं** ’—**कर्मणि** प्रयोग.

९. ‘ **तिची अंगठी हरवली** ’—यांत अंगठी हा कर्ता, हरवली हें क्रियापद; **अकर्मक कर्तरि** प्रयोग.

१०. ‘ **चिंतूनें तिची अंगठी हरवली** ’—यांत चिंतूनें हा कर्ता, अंगठी हें कर्म, हरवली हें क्रियापद; **कर्मणि** प्रयोग.

११. ‘ **अध्यां घटकेंत उजाडेल** ’—**अकर्तृक भावे** प्रयोग किंवा **भावकर्तरि** प्रयोग.

---

## कृदन्तांचे उपयोग

धातूला आख्यातांचे प्रत्यय लागून क्रियापदें होतात; त्याचप्रमाणें नामें, विशेषणें व अव्ययें यांचे प्रत्यय लागून धातुसाधित शब्द किंवा **कृदन्तें** होतात; शेवटीं लागणाऱ्या प्रत्ययांवरून त्यांचीं **णें-कृदन्त**, **त-कृदन्त**, अशीं नांवें पडलीं आहेत. तीं नऊ आहेत. त्यांचे उपयोग खालीलप्रमाणें.

### १. णें-कृदन्त

**नाम**—त्यानें तेथें **जाणें** योग्य नाहीं, आपल्या **येण्यानें** समारंभास शोभा येईल, त्याच्या **वागण्याचा** असा परिणाम झाला, **उपजणें मरणें** न चुके नरा, इ०.

**सं० क्रि०**—मला तिकडे **जाणें** आहे, मला त्याचे पांच रुपये **देणें** आहेत, इ०.

[ वरचेवर पत्र **पाठविणें** ( पाठवावें ), त्याला चार उपदेशाच्या गोष्टी **सांगणें** ( सांगाव्या ), आयुष्याच्या साधनें सच्चिदानंद पदवी **घेणें** ( घ्यावी ), येथें हे शब्द क्रियापदें आहेत ].

### २. त – कृदन्त

**क्रि० वि० अ० —हांसत** कर्म करावें भोगावें **रडत** तींचि परिणामीं, त्यानें **देखत** कोट पळविला, तो **पळत पळत** किंवा **रखडत** चालतो, इ०.

**सं० क्रि०** — तो **बसत** आहे, मी आतां **वाचीत** नाहीं, इ०.

[ मकर–कुंडलें **तळपत** (तळपतात) श्रवणीं, कंठीं कौस्तुभमणी **विराजत** ( विराजतो ), येथें हे शब्द क्रियापदें आहेत ]

### ३. ता – कृदन्त

**नाम — बुडत्यास** हात द्यावा, **मारत्याचा** हात धरवतो, पण **बोलत्याचें** तोंड धरवत नाहीं, **नावडतीचें** मीठ अळणी, इ०.

**विशेषण—रांगतें** मूल, **लाभता** काळ, **जागता** कुणबी, **मारता** हात, **पाळता** हात, **बोलविता** धणी, इ०.

**विधिविशेषण** — तूं असा **बोलता** ( बोलणारा ) हो, म्हणून मी येथें **विहरता** ( विहरणारा ) झालों, इ०.

**सं० क्रि०** — तो **जाता** झाला, धौम्य पांडवांस **सांगते** झाले, इ०.

[ जर दुर्योधन धर्माला राज्य **देता**, तर धर्म त्याला **वांचविता**; येथें हे शब्द संकेतार्थी क्रियापदें आहेत ].

### ४ तां – कृदन्त

**काल० क्रि० अ०** — उद्यां नऊ **वाजतां** ये, अहो **येतां जातां** भगवच्चिंतन करा, तो न **बोलतां** काम साधतो, इ०.

**सं० क्रि०** — मोतियांचें पाणी **भरितां** न ये रांजणीं, त्यास **बोलतां** येतें, पण **चालतां** येत नाहीं, ( यांतलि भरितां, बोलतां, चालतां, हे शब्द नामें नाहींत. बोलतां = बोलणें असा अर्थ करणें चुकीचें आहे ). इ०.

[ तुम्ही कोठें **राहतां** ? काय **करितां** ? येथें हे शब्द क्रियापदें आहेत ].

### ५. तांना – कृदन्त

**काल० क्रि० अ०** —तो **बोलतांना** अडखळतो, त्यानें **पोहतांना** गटंगळ्या खाल्लया, **वाचतांना** फार वाकूं नये, इ०.

### ६. ला–कृदन्त

**भू० का० वि०** —रामभाऊ केवळ **पिकलें** पान झाले आहेत, **गेला** माणूस पुनः कसा भेटेल ? **झांकली** मूठ सव्वा लाखांची, इ०.

**नाम** —तो **जेवल्यानें** तुझें पोट कसें भरेल? देशाटन **केल्यानें** चातुर्य येतें, हें घर **बांधल्याला** चार वर्षें झालीं, इ०.

**सं०क्रि०**—मीं रामायण **वाचिलें** आहे, त्यास कोणी पैही **दिली** नाहीं, चोर शिपायांकडून **पकडला** गेला, मीं तुला हाका **मारिल्या** होत्या, इ०.

[ रामा **गेला**, मनी **बसली**, मूल **पडलें**, येथें हे शब्द क्रियापदें आहेत ].

७. वें-कृदन्त

**नाम**—मला घरीं **जावयास** आतां वेळ नाहीं, ही पुस्तकें मीं त्याला **पहावयास** दिलीं आहेत, मीं तुम्हांस हे आंबे **द्यावयास** आणिले आहेत, त्याची माझ्यावर हात **उगारावयाची** काय छाती आहे? इ० .

**विशेषण**—**रडवा** मुलगा, **नटवी** मुलगी; ( **जागावयाचे** पहारेकरी, **अंथरावयाचें** धोतर, **बसावयाचा** घोडा, हातांत **धरावयाची** काठी, इ० मधील ठळक शब्दही कांहींच्या मताप्रमाणें विशेषणें होतील ).

**विधिविशेषण**—त्याचा एक मुलगा मुंज **व्हावयाचा** व एक मुलगी लग्न **व्हावयाची** आहे, ही चूल पाणी **तापवावयाची** आहे व ही दुसरी जेवण **करावयाची** आहे, इ०.

**सं० क्रि०**—बाळूला पुढें **शिकावयाचें** नाहीं, मला हें काम **करावें** लागतें, त्याला रोज मंडईंत **जावें** लागतें, त्यांनीं आम्हाकडे **यावयाचें** नव्हतें, इ०.

[ काल तो घोड्यावरून **पडायचाच**, हा मुलगा खोटें **बोलायचाच**, आमची सुंदर पास **व्हावयाचाच**, इ० ठिकाणीं क्रियेची निश्चित संभवता दर्शविणारे हे शब्द क्रियापदें आहेत ].

८. ऊन-कृदन्त

**क्रि० वि० अ०**—मीं झाडावर **चढून**, हे आंबे काढिले; तो **निजून**, आपला अभ्यास करितो; ती पहाटेस **उठून**, भूपाळ्या म्हणते; तो सर्व परवाचा **म्हणून**, जेवावयास गेला; इ०.

**सं० क्रि०**—आम्हीं ते पेढे **खाऊन** टाकिले, रामभाऊंनीं त्याचे देणें **देऊन** टाकिलें, इ०.

९. ऊं-कृदन्त

**नाम**—त्याला प्रथम **हसूं** आलें व मग **रडूं** कोसळलें, इ०.

**सं० क्रि०**—आई विमलला **मारूं** लागली, आपण कोणाचें वर्म **पाहूं** नये, गोड फार **खाऊं** नये, ती. शिव्या **देऊं** लागलो, इ०.

[ आपण घरीं **जाऊं, खाऊं, पिऊं** व पत्ते **खेळूं**; यांतील शब्द क्रियापदे आहेत ].

---

## पदक्रम व पदान्वय

१. मराठींत प्रथम कर्ता, नंतर कर्म व नंतर क्रियापद असा बहुधा क्रम असतो. उदा०—गोविंदा जातो, गोविंदा पुस्तक वाचितो, इ०

२. कर्त्याचीं विशेषणें व त्याशीं संबंध असणारे शब्द कर्त्याच्या मागें, कर्माचीं विशेषणें व त्याशीं संबंध असणारे शब्द कर्माचे अगोदर आणि क्रियापदाचीं विशेषणें किंवा तत्संबंधी शब्द क्रियापदाचे अगोदर बहुधा असतात. उदा०—

( अ ) **रामाचे वडील** गोविंदराव निवर्तले; **गोविंदा, कृष्णा, चिमणी** व **मनी** हीं मुलें खेळत होतीं; **तें कुजलेलें** झाड पडलें; इ०.

( आ ) गोविंदानें **कामांचे** कागद फाडिले, विष्णु **चांगलीं** चित्रें काढितो, विष्णु **चेहऱ्यावरील भावना उत्कृष्ट दाखविणारीं** चित्रें काढितो, इ०.

( इ ) दाजीबा **हळू** चालतात; दाजीबा **डेक्कन क्वीननें, काल सकाळीं, आठ वाजतां, मुंबईस** गेले; इ०.

३. विधिविशेषणें विशेष्याचे नंतर व क्रियापदाचे पूर्वी बहुधा येतात. उदा०—मुलगी **हुशार** आहे, त्याचें हस्ताक्षर **चांगलें** आहे, तो **श्रीमंत** आहे, इ०.

४. विधानपूरकें हींही क्रियापदापूर्वींच येतात. उदा०—माझी आई **बरी** झाली, नाटकांत तो **राजा** झाला होता, गणू **वेडा** दिसतो, इ०.

५. संप्रदानार्थी अप्रत्यक्ष कर्म अगोदर व प्रथमान्त प्रत्यक्ष कर्म त्यामागून असा क्रम आढळतो. उदा०—न्यायाधीश **अपराध्यास** दंड करितात, रामानें **गणूस** रुपया दिला, इ०.

६. सर्वनामांचा उपयोग विशेषणाप्रमाणें होतो, तेव्हां तीं नामापूर्वींच येतात. उदा०—**हा** मुलगा द्वाड आहे, **ते** चोरटे पळून गेले, **ज्या** मुलींनीं हे कागद फाडिले **त्या** मुलांना बोलाव, इ०.

७. सर्वनामांचीं विशेषणें बहुधा त्या सर्वनामांच्या पुढें येतात. उदा०— मला **गरीबाला** ही उठाठेव नको, तिला **लुबरीला** मध्यें बोलूं देऊं नका, इ०

८. जुन्या भाषेंत विधानांस जोर येण्यासाठीं केव्हां केव्हां विशेषणें विशेष्यानंतर येतात. उदा०—शहाणीं मनुष्यें **विचारसूक्ष्मज्ञ, भिडेचीं,** पदरीं बाळगावीं, इ०.

९. जसें–तसें; जरी–तरी, जेव्हां–तेव्हां, ज्यामुळें–त्यामुळें, इत्यादि संबंधी व अनुसंबंधी शब्दाच्या जोड्यांतील संबंधी शब्द पहिल्या वाक्यापूर्वीं व अनुसंबंधी शब्द उत्तर–वाक्यापूर्वीं येतात. उदा०—**जसें** करावें, **तसें** भरावें; **जरी** व्हावा तुज देव, **तरी** सुलभ उपाव; **जिकडे** जावें, **तिकडे** मातीच्याच चुली; **ज्यापेक्षां** विचारतोस, **त्यापेक्षां** मी तुला सांगतों; इ०.

१० समुच्चयबोधक व विकल्पबोधक उभयान्वयी अव्ययें जुन्या भाषेंत निगडित करावयाच्या दोन शब्दांत प्रत्येक वेळीं येतात; पण चालू भाषेंत निगडित करावयाच्या अनेक शब्दांपैकीं शेवटच्या दोहोंत मात्र येतात. उदा०—

(अ) खेरीज बंदुका **व** तरवारी **व** पेषकबज **व** बिचवे हीं हत्यारें सांपडलीं;

(आ) रामा **आणि** गोविंदा हे भाऊभाऊ होते; संजय **किंवा** विदुर यांपैकीं एकाची माहिती सांग; मीं ठाण्याच्या ग्रंथसंग्रहालयांतील व्युत्पत्तीचीं, व्याकरणाचीं, काव्याचीं **आणि** इतिहासाचीं सर्व पुस्तकें वाचून टाकिलीं; इ०.

११. व्यावहारिक भाषणांत पदक्रमासंबंधानें बरेंच स्वातंत्र्य आढळतें. उदा०—आतां या पोराला करावें तरी काय? करावें तरी काय आतां या पोराला? काय तरी करावें आतां या पोराला? काय करावें आतां या पोराला तरी? इ०.

१२. कालवाचक व स्थलवाचक क्रि० वि० अव्ययें, संकेतबोधक उभयान्वयी अव्ययें, संबोधनान्त शब्द व केवलप्रयोगी अव्ययें, बहुधा आरंभींच येतात. उदा०—**जेथें** जातों **तेथें** तूं माझा सांगाती, **काल** गोविंदाग्रजांचा स्मृतिदिन होता, **गोविंदा**, इकडे ये; **छेः**! मी नाहीं तो चहा पिणार; इ०.

**पदान्वया**संबंधानें म्हणजे वाक्यांतील शब्दांच्या परस्पर जुळणसंबंधानें खालील गोष्टी आढळून येतात.

**अ.** ( १ ) **कर्तरिप्रयोगांत** समानलिंगी व समानपुरुषी अनेक कर्ते असल्यास, क्रियापद त्याच लिंगीं व त्याच पुरुषीं पण अनेकवचनीं असतें. उदा०—विष्णु, परसू व दत्तू शाळेंत गेले; राम व लक्ष्मण वनवासास गेले; इ०.

( २ ) **कर्तरिप्रयोगांत** भिन्न पुरुषीं अनेक कर्ते असतां क्रियापद प्रथम-पुरुषीं अनेकवचनीं असतें. प्रथमपुरुषीं सर्वनाम वाक्यांत नसेल तर द्वितीय-पुरुषीं अनेकवचनीं असतें. उदा०—मी, तूं व ते उद्यां जाऊं; तूं आणि तो आतांच निघा कसे; इ०.

( ३ ) **कर्तरिप्रयोगांत** भिन्न लिंगांचे कर्ते असल्यास क्रियापद नपुंसक-लिंगीं अनेकवचनीं असतें. उदा०—राजा व राणी आलीं; मी, माझी बायको व मुलगा उद्यां गांवीं जावयाचीं आहों: रामा, गोविंदा व आई काल मुंबईस गेलीं; इ०.

[ **कर्तरिप्रयोगांत** अनेक कर्ते असल्यास त्या सर्वांबद्दल **हा** किंवा **असा** या शब्दांचा अनेकवचनीं उपयोग करणें अधिक प्रशस्त समजतात. उदा०—रामा, गोविंदा व आई **हीं** काल मुंबईस गेलीं; घोडे, बंदुका, तोफा व शिपाई **हीं** लढाईंत फार उपयोगाचीं आहेत; रस्त्यानें एक म्हातारा, एक मुलगी व दोन मुलगे **हीं** किंवा **अशीं** ( माणसें ) चाललीं होतीं; इ० ].

( ४ ) **कर्तरिप्रयोगांत** भिन्न लिंगीं कर्त्यांचा क्रियापदाशीं पृथक् संबंध दाखवावयाचा असेल तर क्रियापद अखेरच्या कर्त्याप्रमाणें असतें. उदा०—या जमिनींत ज्वारी व कापूस पिकतो; त्याच्या घरीं दोन बैल, एक म्हैस व एक तट्टू आहे; इ०.

**ब. कर्मणि-प्रयोगांत** कर्तरिप्रयोगांतील कर्ता व क्रियापद यांच्या अन्वयासंबंधानें वर जे नियम दिले आहेत, तेच कर्म व क्रियापद यांच्या अन्वयासंबंधानें लागू पडणारे आहेत.

( १ ) **कर्मणि-प्रयोगांत** एक लिंगीं अनेक कर्मे असल्यास क्रियापद त्याच लिंगीं अनेकवचनीं असतें. उदा०—त्यानें जोंधळे, गहू व तांदूळ आणिले; इ०

( २ ) **कर्मणि-प्रयोगां**त गद्यांत प्रथम व द्वितीय पुरुषीं कर्मे येतच नाहींत, म्हणून भिन्न पुरुषीं कर्म संभवतच नाहींत. गद्यांत कर्मे तृतीय पुरुषांचि असतात.

( ३ ) **कर्मणि- प्रयोगां**त भिन्न लिंगीं कर्मांचा क्रियापदाशीं पृथक् संबंध दाखवावयाचा असतां, क्रियापद शेवटच्या कर्माप्रमाणें असतें. उदा०—त्यानें एक घोडा व एक म्हैस विकत घेतली, मीं दोन हरिणें व एक वाघ मारिला, इ०.

( ४ ) **कर्मणि-प्रयोगां**त भिन्न लिंगीं अनेक कर्मे असल्यास क्रियापद नपुंसकलिंगीं अनेकवचनीं असतें. परंतु अशा वेळीं त्या अनेक कर्मांच्याबद्दल शेवटा **हा** किंवा **असा** ह्या शब्दांचा उपयोग केला जातो. उदा०—त्यानें बाजारांतून द्रोण व पत्रावळी **हीं** आणिलीं; मी एक गाय, दोन म्हशी व एक बैल **हीं** विकत घेतलीं; इ०.

( ५ ) **कर्मणि-प्रयोगां**त अनेक कर्ते असता त्या प्रत्येकाची तृतीया किंवा चतुर्थी यांपैकीं कोणती तरी एकच विभक्ति असते; अथवा ते कर्ते प्रथमान्त ठेवून, त्यांच्या दर्शक सर्वनामाची तृतीया किंवा चतुर्थी योजितात. उदा०—रामानें, गोविंदानें व कृष्णानें हें काम केलें; किंवा रामा, गोविंदा व कृष्णा **ह्यांनीं** हें काम केलें; रामाला व गोविंदाला हें ओझें उचलतें किंवा रामा व गोविंदा **ह्यांना** हें ओझें उचलतें; इ०.

**क. भावे-प्रयोगां**त अनेक कर्ते व कर्मे ह्यांना विभक्ति लावण्याची पद्धति वरीलप्रमाणेंच आहे. उदा०—रामानें व गोविंदानें चोरास धरिलें किंवा रामा व गोविंदा **ह्यांनीं** चोरास धरिलें; तसेंच रामानें उंदरास व घुशीस पकडलें किंवा रामानें उंदीर व घूस **यांस** पकडिलें; इ०.

कर्ता व कर्म ह्यांशिवाय अनेक नामांस एकच विभक्ति लावण्याचा प्रसंग आल्यास, त्या ठिकाणीं त्याच विभक्तीचे पण भिन्न प्रत्यय योजीत नाहींत.

उदा०—'धाके अशनीं, शयनीं, ध्यानीं, स्वप्नीं, जनीं, वनीं, नयनीं,' ॥ (मोरो०)
'नेत्रांत, प्राणांत, श्रवणांत, मुखांत, सर्व कटकाच्या' ॥ (मोरो०)

**टीप**—उभयान्वयी अव्ययें दोन शब्द किंवा दोन वाक्यें यांमध्यें येतात.

## पद्यविशेष

आतांपर्यंत गद्यभाषेंतलि शब्दांच्या स्वरूपासंबंधानें विचार केला. आतां पद्यामध्ये गद्यांतल्यापेक्षां निराळ्या प्रकारचीं शब्दांचीं रूपें केव्हां केव्हां आढळतात; त्यापैकीं प्रमुख गोष्टींचा येथें निर्देश करितों.

**१.** कवि केव्हां केव्हा वृत्ताच्या जुळणीसाठीं ऱ्हस्वांचीं दीर्घ किंवा दीर्घ अक्षरांचीं ऱ्हस्व अक्षरें करितात. उदा०---१. त**नू** त्यागितां कीर्ति मागें उरावी। मना सज्जना, हेचि **क्रीया** धरावी; २. जगीं सर्व**सूखी** असा कोण आहे; ३. कोठें भयाचा ज**रि** लेश वाटे। द्विरेफ मोदें मजला**गिं** भेटे; ४. जाते घडि ही अपुली साधा। करा काय तें **अतां** करा; ५. नेदी चिन्ता शांती ऐशी विद्या **का**शाला; इ०.

**२.** जुन्या कवितेंत केव्हा केव्हां **ऊ**-कारान्त व **ओ**-कारान्त प्रथमेचीं रूपें आढळतात. उदा०---१. नको रे मना **मत्सरू दंभभारू**; २. भूगोल हा उलथितां मज नाहि **वेळू**; ३. देह बुद्धिचा **निश्चयो** तो ढळेना; ४. तिसरा जो का **आजानुबाहो**। जो द्रौपदीचा तिसरा **नाहो**। जेणें करूनी खांडव-**दाहो**। तोषविलें त्रिपादातें; इ०.

**३.** द्वितीया व चतुर्थी यांकरिता ' **तें** ' व ' **सी** ' हे प्रत्यय केव्हां केव्हां पद्यांत येतात. उदा०---१. **उत्तमातें** धरिजे। **अधमातें** अव्हेरिजे; २. **सत्यातें** जोडावें सुज्ञें **धर्मासि** पळ न सोडावें ( द्वितीया ). १. ज्याशीं समग्र जगतींत **तुलावयातें**। नाहींच अन्य गिरि योग्य म्हणून **ज्यातें**; २. खाणींत सांपडाति वास्तव **संपदेतें**। न्यूनत्व ह्या जनपदीं न कधींहि येतें ( चतुर्थी ).

**४.** तृतीयेचे **एं**, **ई** व **हीं** हे प्रत्यय पद्यात आढळतात. उदा०---१. भाच्याचा वध इच्छिला कुमतिने **कंसें प्रयासें** महा; २. भंगिलें शिव-धनुष्य **रामें** वरिलें मला; ३ फडफड **निजपक्षीं** दाविलें कीं उडाया; ४. **द्विजीं** निषधापासाव म्हणीजेलें; ५ गर्वोद्धतांसहि **जिहीं** मदहीन केलें; ६. **यांहीं** धेनु वळाव्या शिव शिव गोपाळ रामकृष्ण हरे! इ०

**५.** पद्यांत केव्हां केव्हां पंचमीच्या ' **हून** ' प्रत्ययाबद्दल '**हूनि**' असें रूप येतें. उदा०---किंबहुना **मातेहूनि** अधिक हिची योग्यता असे खचित; इ०.

६. षष्ठीच्या ' **च्या** ' ( **ल्या** किंवा **झ्या** ) प्रत्ययाबद्दल केव्हां केव्हां पुढील रूपें आढळतात. उदा०—१. **निंबाचिया** झाडा साखरेचें आळें; २. **आपुलिया** बळें नाहीं बोलवत; ३ नृपा लागियलों **तूझिया** लगामीं; इ०.

७. सप्तमीचा ' **आं** ' प्रत्यय विशेषतः कवितेंत आढळतो. उदा०—१. **गळां** तुळशीहार कासे पीतांबर; २. अंतरीं निर्मळ, वाचेचा रसाळ, त्याचे **गळां** माळ, असो नसो; ३. नाठाळाचे काठी हाणूं **माथां**; इ०. ( गद्यांतील उदा०—मी त्याच्या **पायां** पडलों ).

८. विभक्तीकरितां पद्यांत केव्हां केव्हां शब्दांच्या मूळ रूपांचाच उपयोग आढळतो. उदा०—( तृ० )–स्वकरें चंदन घाशी गंगेचें पाणि **कावडी** ( नें ) भरितो; उद्धवें विनविल्यावरी **कृपा** ( नें ) कळवळला श्रीहरी; ( च० )–तेवीं नमी सीता। आनंदित चित्ता। मग हो बोलता। राम **मुनी** ( ला ); सत्कर्म **सिद्धी** ( स ) गेलें। तरी फुगेना म्यां हें केलें; ( ष० )–तुझिये **माया** ( ची ) विचित्र उपाधी। शरीरीं केली आत्मबुद्धी; ( स० )–मज नांदतां ये **सृष्टी** (त), काळ उघडूं न शके दृष्टी; इ०.

९. केव्हां केव्हां पद्यांत विभक्तीकरितां शब्दाचें नुसतेंच सामान्यरूप येतें. उदा०—( द्वि० )–साष्टांग वंदीं रघुराज**पायां**(ना); गरुड जसा गगनांतुनि वेगें उतरोनि **पन्नगा** ( ला ) झडपी; ( तृ० )–स्वयें सर्वदा नम्र**वाचे** ( नें ) वदावें; गुण गाईन **आवडी** ( नें )। हेचि माझी सर्व जोडी; ( च० )–**युद्धा** ( स ) निघाला पार्थकुमार; **रामा** ( ला ) वन **भरता** ( ला ) सिंहासन देइन जाण तरीच खरी मी; ( ष० )–पारधीमाजी **खगां** ( ची ) **मृगां** ( ची ) राजे। करिति हिंसा जी तीच बरी साजे; आम्रा त्या पिक सेवितां **समसमां**(चा) संयोग कीं जाहला; ( स० )–आननपंक्ति **धरे** ( वर ) रचली; इ०.

१०. पद्यांत केव्हां केव्हां विशेषणालाही विशेष्याच्या विभक्तीचे प्रत्यय लागलेले आढळतात; त्याचीं उदाहरणें मागें गेलींच आहेत. आणखी उदा०—( द्वि० )–तो भीम भीमकर्मा गांठी त्या रिपुसि **भूमिगलितासी**; ( तृ० )–**कृतघ्नें** शत्रुनें प्रबळ रिपु पाहोनि नयनीं; ( षष्ठी )–लज्जावती फार तथापि **त्याची**। शंका न सीता धरि हो पित्याची; ( स० )–**अत्युच्चीं** पदिं थोरही बिघडतो हा बोल आहे खरा; हिरेजडित **सुंदरीं** कनक–पंजरींही वसे; इ०.

**११. ही, जी, ती**, ह्या स्त्रीलिंगी रूपांबद्दल कवितेंत केव्हां केव्हां **हे, जे, ते**, अशीं रूपें येतात. उदा०—वधुनि माझी **हे** (ही) कनकरूप काया; श्रीवामनैकपद सर्व वसुंधरा **हे** (ही); विद्या भोग-सुकीर्ति-दायक पहा **ते** (ती) मान्य मान्यांसही; इ०.

**१२**. केव्हां केव्हां संस्कृतांतल्याप्रमाणें पद्यांत **आ**-कारान्त स्त्रीलिंगी विशेषणें आढळतात. उदा०—कोपानें वदली न ती कटुवचें **शांता** सदा राहिली; बा मूर्च्छा पावले **अदभ्रा** ते; सत्संगति बहु **मान्या** थोराहुनि बहु दया करि ल्हानीं; इ०.

**१३**. प्रथम व द्वितीय पुरुषीं कर्मणिप्रयोग पद्यांतच आढळतात; त्यांचीं उदाहरणें मागें गेलींच आहेत. आणखी उदा०—१. इंद्रियांचीं दीनें **आम्ही केलों नारायणें**; २. प्रेमें रक्षितिल-सदा म्हणुनि **दिले मी** जयांसि **मत्तातें**; ३. जाउनि तो दूत म्हणे कृष्णे द्यूतांत **तूं** स्वयें **धर्मे, हारविलीस** सुयोधन-सदनाप्रति ये करावया कर्मे; इ०

---

## पदपरिस्फोट

बिकट पदपरिस्फोटाची विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें फारशी अपेक्षा नसल्यामुळें आतां विषयपूर्तीसाठीं नमुन्यादाखल एका सोप्याच वाक्यांतील प्रत्येक शब्दाचें व्याकरण लिहून दाखवितों. तसें करितांना शब्दासंबंधानें खालील गोष्टी सांगावयाच्या असतात.

**नाम**, **सर्वनाम** } मूळ शब्द, जात व पोटजात, लिंग, वचन, विभक्ति व विभक्तीचा अर्थ.

**विशेषण**—कोणाचें तें.

**क्रियापद** } मूळ धातु, सकर्मक कीं अकर्मक, अर्थ, काळ, पुरुष, लिंग, वचन व प्रयोग.

**अव्यय**—कोणत्या प्रकारचें तें.

१. " **मराठ्यांसंबंधीं दूषित वातावरण थोडें तरी निवळण्यास मदत करणारे गृहस्थ म्हणजे प्रसिद्ध इतिहासकार सर जदुनाथ सरकार हे होत.** "

**मराठ्यांसंबंधीं**—मराठे, सामान्यनाम, पुल्लिंगी, संबंधीं ह्या शब्दयोगी अव्ययामुळें अनेकवचनी सामान्यरूप.

**संबंधीं**—हें शब्दयोगी अव्यय.

**दूषित**—हें वातावरण ह्या शब्दाचें विशेषण.

**वातावरण**—हें सामान्यनाम, नपुंसकलिंगी, प्रथमेचे एकवचन; प्रथमेचा अर्थ कर्ता, निवळण्यास ह्या साधुसाधिताचा.

**थोडेंतरी**—हें क्रियाविशेषण अव्यय.

**निवळण्यास**—निवळणें हें धातुसाधित नाम, नपुंसकलिंगी, चतुर्थीचें एकवचन; चतुर्थीचा अर्थ हेतु.

**मदत**—हें सामान्यनाम, स्त्रीलिंगी, प्रथमेचे एकवचन; प्रथमेचा अर्थ कर्म, करणारे ह्या धातुसाधिताचें.

**करणारे**—हें गृहस्थ ह्या शब्दाचें विशेषण.

**गृहस्थ**—हें सामान्यनाम, पुल्लिंगी, प्रथमेचे बहुमानार्थी अनेकवचन; प्रथमेचा अर्थ उद्देश.

**म्हणजे**—हें स्वरूपबोधक उभयान्वयी अव्यय.

**प्रसिद्ध**—हें इतिहासकार ह्या शब्दाचें विशेषण.

**इतिहासकार**—हें जदुनाथ सरकार ह्या शब्दाचें विशेषण.

**सर**—हें जदुनाथ सरकार ह्या शब्दाचें विशेषण.

**जदुनाथ सरकार**—हें विशेषनाम, पुल्लिंगी, प्रथमेचें बहुमानार्थी अनेकवचन; प्रथमेचा अर्थ उद्देश.

**हे**—दर्शक सर्वनाम, पुल्लिंगी, प्रथमेचें बहुमानार्थी अनेकवचन; प्रथमेचा अर्थ कर्ता, होत या क्रियापदाचा.

**होत**—हें हो या अकर्मक धातूचें वर्तमानकाळीं, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचें बहुमानार्थी अनेकवचन.

ह्या वाक्यांत हे हा कर्ता, होत हें क्रियापद, हा अकर्मक कर्तरि प्रयोग.

# वाक्य--पृथक्करण

व्याकरणाची फलश्रुति म्हणजे **वाक्य-पृथक्करण** बरोबर रीतीनें करितां येणें ही होय. व्याकरणांत विशेष प्राधान्य शब्दाच्या स्वरूपाला असतें. वाक्य-पृथक्करणांत मुख्य प्राधान्य शब्दाच्या बाह्य स्वरूपापेक्षां बोलणाराचा उद्दिष्ट अर्थ समजून घेण्याकडे असतें. व्याकरणाला ह्या गोष्टीची जोड देण्याची पद्धति अलीकडेच पडली आहे, तीस अनुसरून खालील विचार केला आहे.

## वाक्य व त्याचे मुख्य भाग

एक पूर्ण विचार व्यक्त करणाऱ्या शब्दसमुच्चयास **वाक्य** असें म्हणतात, हें पूर्वीं गेलेंच आहे.

'वारा आला' एवढ्या शब्दसमुच्चयानें केव्हां केव्हां एक पूर्ण विचार व्यक्त केला जातो; 'वारा आला आणि पाऊस गेला' असे दोन शब्दसमुच्चय एकत्र जोडून केव्हा केव्हां एक पूर्ण विचार व्यक्त केला जातो; आणि 'जर वारा सुटेल तर पाऊस जाईल' अशा प्रकारच्या एका शब्दसमुच्चयावर अवलंबून असलेल्या दुसऱ्या शब्दसमुच्चयासहित अशा वाक्यानें एकादा पूर्ण विचार व्यक्त केला जातो; म्हणून येथें वर अवतरणांत दिले आहे तें एकेक वाक्य आहे.

वाक्य म्हटलें कीं, त्यात कोणाविषयीं तरीं बोलणें असतें; आणि ज्याविषयीं बोलावयाचें त्याबद्दल कांहीं तरी सांगितलेलें म्हणजे विधान केलेलें असतें. ह्यामुळें **वाक्याचे दोन भाग** पडतात. (१) ज्याच्याविषयीं किंवा ज्याच्या उद्देशानें बोलावयाचें असतें, त्याला "**उद्देश्य**" असें म्हणतात; व (२) उद्देश्याविषयीं वाक्यांत जें कांहीं सांगितलेलें असतें, म्हणजेच विधान केलें असतें, त्यास "**विधेय**" असें म्हणतात. उदा०—मनुष्य बुद्धिमान् प्राणी आहे, गोविंदा घरीं जातो, आम्हांस मुंबईस जावयाचें आहे, कृष्णानें कंसाला मारिलें, ह्या वाक्यांत अनुक्रमें मनुष्य, गोविंदा, आम्ही व कृष्ण याच्यासंबंधानें बोलावयाचें असल्यामुळें त्या त्या वाक्यांतील ते शब्द **उद्देश्यें** होत ;आणि त्यांच्याबद्दल अनुक्रमें 'बुद्धिमान् प्राणी आहे' 'घरीं जातो,' 'मुंबईस जावयाचें आहे' व 'कंसाला मारलें' हें जें सांगितलें आहे, तें दर्शविणारे शब्दसमुच्चय हीं **विधेयें** आहेत.

## वाक्याचे प्रकार

वाक्य **तीन** प्रकारचें आढळतें. **शुद्ध**, **मिश्र** व **संयुक्त**.

ज्या वाक्यांत एकच उद्देश्य असून, एकच क्रियापद असतें त्यास **शुद्ध-वाक्य** असें म्हणतात. उदा०—तो तेथेंच राहिला, ईश्वराचें स्वरूप निर्विकार व निर्मल आहे, मी त्याला वंदन करितों, त्यानें माझें कल्याण केलें, इ०.

एक मुख्य वाक्य असून त्यावर अवलंबून असलेलीं एक किंवा अनेक वाक्यें ज्यांत असतात, त्यास **मिश्र-वाक्य** असें म्हणतात. उदा०—'जो मनुष्य चोरी करितो, त्यास शिक्षा होते;' (यांत 'त्यास शिक्षा होते' हें मुख्य वाक्य असून, 'जो मनुष्य चोरी करितो' हें त्यावर अवलंबून असलेलें वाक्य आहे). 'मी आतां येणार नाहीं, असें गोविंदराव व म्हणाले;' (यांत 'गोविंदराव असें म्हणाले' हें मुख्य वाक्य असून 'मी आज येणार नाहीं' हें त्यावर अवलंबून असलेलें वाक्य आहे).

मिश्र वाक्यांतील मुख्य उद्देश्य व मुख्य विधेय ह्यांनीं होणाऱ्या वाक्यास **मुख्य वाक्य** किंवा **प्रधान वाक्य** असें म्हणतात; आणि त्यावर अवलंबून असलेल्या एक किंवा अनेक वाक्यांस **पोट-वाक्य**, **गौण-वाक्य** किंवा **अवलंबी वाक्य**, असें म्हणतात.

ज्या वाक्यामध्यें दोन अथवा अधिक प्रमुख वाक्यें असतात, त्यास **संयुक्त-वाक्य** असें म्हणतात. उदा०—'तो आला आणि लगेंच गेला' (यांत दोन प्रमुख वाक्यें आहेत); 'मामांनीं मला जत्रेंतून एक पतंग आणिला, ताईला एक बाहुली आणिली, आणि मधूला एक चेंडू आणिला, (यांत तीन प्रमुख वाक्यें आहेत).

[ संयुक्त-वाक्यांत ( १ ) 'वारा आला आणि पाऊस गेला' याप्रमाणें केव्हां प्रत्येकच प्रमुख वाक्य असतें; ( २ ) 'जो श्रीमंत असतो, त्याला विद्येची गोडी नसते, आणि ज्याला विद्येची गोडी असते, त्याला अनुकूलता नसते. याप्रमाणें दोन्ही प्रमुख वाक्यांच्या पोटांत गौणवाक्यें येऊन त्या वाक्यांचा संयोग असतो; किंवा ( ३ ) 'श्रीमंताला विद्या नको आणि ज्याला विद्या हवी असते, त्याला शिकण्यापुरता पैसा मिळत नाहीं;' याप्रमाणें एक नुसतेंच प्रमुख वाक्य व दुसरें प्रमुख वाक्याच्या पोटांत गौणवाक्य, अशांचा संयोग झालेला असतो; असे प्रकार आढळतात ].

कांहीं वाक्यांत धातुसाधितानें युक्त असे एक किंवा अनेक तुकडे असतात, त्यांस "**वाक्यांश**" असें म्हणतात. ह्यांच्या योगानेंच शुद्धवाक्याचें मिश्रवाक्य किंवा संयुक्तवाक्य बनवितां येतें; आणि मिश्र किंवा संयुक्त वाक्याचें शुद्धवाक्य बनवितां येतें. उदा०—

( १ ) **असें करणें** तुला शोभत नाहीं ( यांत 'असें करणें' हा वाक्यांश असून, यांतील करणें हें धातुसाधित काढून टाकून 'तूं जें करितोस, तें तुला शोभत नाहीं' असें प्रथमच्या शुद्धवाक्याचें मिश्रवाक्य बनवितां येतें ).

( २ ) **माझ्याजवळ पैसे असून**, ते खर्च करण्याची स्वतंत्रता मला नाहीं. ( यांत 'माझ्याजवळ पैसे असून' हा वाक्यांश असून 'माझ्याजवळ पैसे आहेत, पण ते खर्च करण्याची मला स्वतंत्रता नाहीं' असें शुद्धवाक्याचें संयुक्तवाक्य, 'असून' या धातुसाधिताबद्दल क्रियापद घालून बनवितां येतें ).

## शुद्धवाक्य

**उद्देश्य व विधेय** हे वाक्याचे मुख्य दोन भाग. केव्हा केव्हां उद्देश्य व विधेय हीं एकेक शब्दात्मकच असतात, तर केव्हां केव्हां यांपैकीं एक एक-शब्दात्मक व दुसरें अनेक-शब्दात्मक असें असतें; आणि केव्हां केव्हां तीं दोन्हीं कमीजास्त अनेक-शब्दात्मक असूं शकतात.

उद्देश्याचा दर्शक एक मुख्य शब्द (मूल उद्देश्य) व विधेयाचा दर्शक एक मुख्य शब्द ( मूल विधेय ) असे दोन शब्द, कोणत्याही वाक्यांत असलेच पाहिजेत.

उद्देश्याविषयीं अधिक खुलासा करणारे शब्द, मूल उद्देश्याला वाढवितात. आणि विधेयाविषयीं ज्यास्त खुलासा करणारे शब्द मूल विधेयाला वाढवितात; ह्यांना अनुक्रमें **उद्देश्य-विस्तारक** व **विधेय-विस्तारक** असें म्हणतात.

( अ ) 'रामा खातो,' 'सुतारानें केला,' ह्या वाक्यांत काय खातो व काय केला हें सांगितल्यावांचून विधान पूर्ण होत नाहीं. म्हणजे 'पेरू,' 'पाळणा,' हे किंवा असेच त्या वाक्यांत लागू पडणारे शब्द तेथें आवश्यक आहेत. अर्थात् हे शब्द म्हणजेच **कर्में** हीं **विधान पूर्ण करणारीं** असतात, असें झालें. यांस **विधेयपूरक** असें म्हणतात.

(**आ**) देणें, म्हणणें, सांगणें, बोलणें, इ० केव्हां केव्हां अप्रत्यक्ष कर्म असलेल्या वाक्यांतील कर्मेंही—तीं विधान पूर्ण करणारींच असल्यामुळें—विधेयपूरकेंच होत. उदा०—'गोविदानें कृष्णाला बैदूल दिले' यांत कृष्णाला हें अप्रत्यक्ष कर्म **विधेयपूरक** आहे.

(**इ**) रोगी **बरा** झाला, ही मुलगी **शहाणी** आहे, नाटकांत तो **हरिश्चंद्र** झाला होता, त्या भांड्यांत दूध **नासलेलें** दिसलें, यांतील ठळक शब्द विधेयाची पूर्णता करणारे आहेत हें मागे गेलेलेंच आहे; यांसही **विधेय-पूरक** म्हणतात.

वाक्याचे हे वर दिलेले मुख्य भाग व पोटभाग नीट ओळखून ते सांगणें किंवा व्यवस्थितपणें लिहून दाखविणे याला **वाक्यपृथक्करण** असें म्हणतात. ते मुख्य भाग व पोटभाग खालील कोष्टकांत दाखविले आहेत.

| उद्देश्य | | विधेय | | | |
|---|---|---|---|---|---|
| उद्देश्यविस्तारक | मूल उद्देश्य | विधेयविस्तारक | विधेय-पूरक | | मूल विधेय |
| | | | कर्म | पूरक | |
| | | | | | |

वक्त्याला कोणाविषयीं, किंवा कोणत्या गोष्टीला उद्देशून बोलावयाचें आहे हें खरोखर त्याच्या बोलण्यांतील ज्या शब्दावर त्यानें जोर दिला असेल त्यावरूनच कळावयाचें; परंतु प्रत्येक वेळीं वक्ता आपल्या पुढें हजर असतोच असें नाहीं; पुष्कळ वेळां व्यक्त करावयाचा अभिप्रेत अर्थ लेखनावरूनच ओळखावा लागतो. उदा०—'सोन्याचे दागिने करितात' अशासारख्या वाक्यांत 'लोक' सोन्याचे दागिने करितात, असें **लोकांविषयीं** बोलण्याचा उद्देश आहे, कीं 'सोन्याचे' करितात असें सांगण्याचा म्हणजे **सोन्याविषयीं** बोलण्याचा उद्देश आहे. कीं 'दागिने' करितात, भांडीं करीत नाहींत, असें **दागिन्यांविषयीं** बोलण्याचा त्याचा हेतु आहे, हें वक्ता पुढें असल्याशिवाय निखालस सांगतां

येणें अशक्य आहे. यासाठीं अनेक वाक्यें पाहून त्यांवरून कांहीं सामान्य नियम बसविले आहेत, त्यांसच अनुसरणें आपल्यास भाग आहे.

**शुद्ध-वाक्यां**त खालील प्रकारचीं **उद्देश्यें** आढळतात.

( १ ) कर्तरि-प्रयोगातील वाक्यांत नेहमीं कर्ता हाच उद्देश्य असून, तो प्रथमान्त असतो. उदा०—**गोविंदा** जातो, **तो** काम करितो, **वामनराव** येतील, मला **पैसा** मिळावा, **ईश्वर** तुमचें कल्याण करो, इ०.

( २ ) कर्मणि-प्रयोगांतील वाक्यांत शुद्ध तृतीयान्त किंवा शुद्ध चतुर्थ्यन्त कर्ता असेल तर तोच उद्देश्य असतो: आणि तसा तो नसेल तर कर्म हेंच उद्देश्य असतें. उदा०—

शु० तृ० कर्ता — **रामानें** काम केलें, **तुम्हीं** हें पुस्तक वाचावें.
शु० च० कर्ता — **त्याला** पेरू खातां येतो, **मला** हा धंदा करावा लागतो, इ०.

प्रथमान्त कर्म — शिपायाकडून **चोर** धरला गेला, **चोर** अरण्यांत आला, इ०.

( ३ ) भावे-प्रयोगांतील वाक्यांतही शुद्ध तृतीयान्त किंवा शुद्ध चतुर्थ्यन्त कर्ता असल्यास तोच उद्देश्य असतो: तसे नसल्यास उद्देश्य क्रियापदान्तर्गतच असतें. उदा०—

शु० तृ० कर्ता — **त्यानें** जावें, **रामानें** रावणास मारलें, इ०.
शु० च० कर्ता — **त्याला** गेलें पाहिजे, **मला** बसतां येतें, इ०.

क्रियापदान्तर्गत— { मला **जाववतें**, त्याला **बसवलें**, आतां नुकतेंच **उजाडलें**, इ०.

[ शुद्ध तृतीया किंवा शुद्ध चतुर्थी म्हणजे जिच्याबद्दल सविकरणी तृतीयान्त शब्द वाक्यांत योजिला असतां चालूं शकत नाहीं, अशी तृतीया किंवा चतुर्थी. उदा०—'त्याला गेलें पाहिजे' येथें 'त्याच्यानें गेलें पाहिजे' असें वाक्य जमत नाहीं, म्हणून 'त्याला' ही या ठिकाणीं शुद्ध चतुर्थी; परंतु त्याला जाववतें याबद्दल 'त्याच्यानें जाववतें' हें वाक्य चालूं शकतें, म्हणून येथें 'त्याला' ही शुद्ध चतुर्थी नव्हे. तसेंच 'त्यानें जावें' येथें 'त्याच्यानें जावें' असें वाक्य जमत नाहीं, म्हणून या ठिकाणीं 'त्यानें' ही शुद्ध तृतीया ].

वाक्यांतील उद्देश्य ओळखण्याच्या दृष्टीनें वरील गोष्टी ध्यानांत ठेवणें अवश्य आहे.

आतां मूल-उद्देश्य, उद्देश्य-विस्तारक आणि मूल-विधेय, विधेय-विस्तारक व विधेय-पूरक यांचे जागीं कोणत्या प्रकारचे शब्द येतात, तें पाहूं.

**मुख्य उद्देश्याचे** ठिकाणीं खालील शब्द आढळतात.

नाम —आकाशांत **धूमकेतु** आहे.

सर्वनाम—**तो** गोळी लागल्यामुळें मेला.

विशेषणात्मक नाम—**गरीबानें** भलत्या गोष्टींत पडूं नये.

कृदन्त-नामात्मक वाक्यांश—**मुलांचे लाड करणें** योग्य नाहीं.

[ केव्हां केव्हां नामवाक्यही मुख्य वाक्याच्या उद्देश्यस्थानीं येतें; परंतु तेव्हां तें सर्व मिश्रवाक्य असतें. उदा०—'त्यानें तुला त्रास द्यावा' हें योग्य नाहीं; 'मोठ्या मनुष्यांनीं खोटें बोलावें' हें त्यास शोभत नाहीं; येथें अवतरणांतील वाक्यें उद्देश्यस्थानीं आलेलीं आहेत ].

शुद्धवाक्यांत कर्माच्या ठिकाणींही कोणत्या तरी प्रकारचें नाम येतें, म्हणून कर्त्याच्या ठिकाणीं ज्या ज्या प्रकारचे नामदर्शक शब्द येऊं शकतात, त्याच प्रकारचे नामदर्शक शब्द कर्माच्या ठिकाणींही येतात. उदा०—

नाम—मीं एक **धूमकेतु** पाहिला.

सर्वनाम—गोविंदरावांनीं **त्याला** खूप चोपलें.

विशेषणात्मक नाम—तो **गरिबाला** भेवडावतो.

कृदन्त-नामात्मक वाक्यांश—आतां मी **तुझें म्हणणें** ऐकणार नाहीं.

[ केव्हां केव्हां नामवाक्यही मुख्य वाक्याच्या कर्मस्थानीं येतें; पण त्यावेळीं तें सर्व मिश्रवाक्य असतें. उदा०—मी त्याला 'गांठ कशी मारावी' हें शिकवितो, 'तूं आतां बोललास' हें मी पुनः ऐकणार नाहीं, येथें अवतरणांतील वाक्यें कर्मस्थानीं आलेलीं आहेत ].

**मूल-उद्देश्य** व कर्म ह्यांचे ठिकाणीं नामाप्रमाणें योजलेले अन्य प्रकारचे **शब्दही** येतात. उदा०—या प्रत्येक आर्येंत 'परंतु' आलें आहे, त्याला '**आंत-बाहेर**' माहीत नाहीं; तसेंच तो 'मागें-पुढें' करीत आहे, इ०.

मूल-उद्देश्याचा विस्तार खालील प्रकारच्या शब्दांनीं होतो.

अधिविशेषणें -- **उंच** मनुष्य जलद चालतो, पानिपतच्या लढाईत **पुष्कळ लहानमोठे शूर** योद्धे पडले, इ०.

कृदन्त विशेषणें-आम्हांला **गाणारा** पोपट आवडतो, **ओरडणारा** आवडत नाहीं, इ०.

कृदन्त-विशेषणात्मक वाक्यांश — मला **मुंबईस जाणारा** मनुष्य आढळला नाहीं, **लोकांनीं पूज्य मानिलेला** तो सरदार मरण पावला, इ०.

षष्ठयन्त संबंधी शब्द -- **गोविंदरावांच्या** मुलानें झटून अभ्यास केला, **माझी रोजची लिहावयाची** लेखणी कोठें आहे ? इ०.

समानाधिकरण शब्द— **शिवाजीचा भाऊ** व्यंकोजी तंजावरास गेला, **हिंदुस्थानची अधिस्वामिनी इंग्लंडची राणी** व्हिक्टोरिया भाग्य-शाली होती, इ०.

कर्माचा विस्तारही वरीलसारख्याच शब्दांनीं होतो.

अधिविशेषणें — तो **तांबडा** कोट वापरतो, त्यानें **लाल** शाई अंगास फासली, इ०.

कृदन्त विशेषणें — तो **गाणाऱ्या** मुलास चाहतो.

कृदन्त-विशेषणयुक्त वाक्यांश — परवांच्या लग्नांत बंडूनानांनीं **आमच्या-कडे आलेल्या** आचाऱ्यास बोलाविलें, इ०.

षष्ठयन्त संबंधी शब्द — बाबासाहेबांनीं **आपल्या स्नेह्याचा** घोडा विकत घेतला, काल **आगगाडींत पाहिलेल्या मनुष्याचें** नांव सांगाल का ? इ०.

समानाधिकरण शब्द -- त्या प्रसंगीं धर्मानें **पांडवांचा साहाय्यक श्रीकृष्ण** यास बोलाविलें.

[ मूल-विधेयाला पूर्ण करणारे शब्द म्हणजे प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष कर्म आणि विधान-पूरकें हे होत. ह्यांपैकीं कर्माचा विस्तार कोणत्या शब्दांनीं होतो, हें वर आलेंच आहे ].

विधान-पूरक शब्द नामें व विशेषणें असतात.

नामें -- तो **राजा** झाला, तो एक **ऋषिच** होय, सरकारनें त्याला **जज्ज** नेमिलें, दुर्योधनानें कर्णाला **राजा** केलें, इ०.

(.) विशेषणें — रामा **वेडा** दिसतो, तो आंबा **चांगला** निघाला, तो मनुष्य **रागावलेला** आहे, तिनें बाहुल्या **उभ्या** ठेविल्या, इ०.

**मूल-विधेय** हें क्रियापद असतें.

मूल-विधेयाचा विस्तार अर्थात् क्रियाविशेषणांनीं व क्रियाविशेषण-सदृश क्रियेविषयीं ज्यास्त माहिती देणाऱ्या शब्दांनीं होणार हें साहजिकच आहे. हे शब्द पुढील प्रकारचे असतात.

( १ ) मुख्य उद्देश्याशीं सबंध न ठेवणारीं करण, संप्रदान, अपादान, अधिकरण, इ० अर्थांचीं संबंधी शब्दांसहित नामें व सर्वनामें; ( २ ) शब्दयोगी अव्ययान्त नामें, सर्वनामें किंवा नामांप्रमाणें उपयोग केलेलीं विशेषणें; त्याच-प्रमाणें ( ३ ) क्रियाविशेषणाप्रमाणें योजिलेलीं विशेषणें; ( ४ ) निव्वळ क्रियाविशेषण अव्ययें; ( ५ ) संकेत, कारण, इ० दर्शक उभयान्वयी अव्ययें; ( ६ ) कृदन्तें किंवा कृदन्त वाक्यांश; आणि मिश्रवाक्य असल्यास ( ७ ) क्रियाविशेषणवाक्य. उदा० —

नामें — इंग्रजी अभ्यास **बारा वर्षें** करावा लागतो, तो **मर्यादेनें** वागतो, **त्याला** चार भाऊ आहेत, तो **दिवसाचा** निजतो, आम्ही **घरीं** गेलों, मीं **चाकूनें** ही लेखणी केली, इ०.

क्रियाविशेषणें – तो **चांगलें** वाचतो, ती **तिरपें** लिहिते, इ०.

क्रि० वि० अव्ययें — तो **हळू** चालतो, केळीं **लौकर** घेऊन ये, मी **आज** येणार नाहीं, **उद्यां** येईन, इ०.

कृदन्तें व कृदन्त-वाक्यांश — तो **पळत** गेला, विमल **चालतांना** अडखळली, **मुलांस बक्षिसें वाटण्यासाठीं** रावसाहेब येणार आहेत, इ०.

शब्दयोगी अव्ययान्त शब्द — **गेल्या वर्षापासून** तो आजारी आहे, तुम्ही **माझ्याबरोबर** चला, तो एका **धोतरासह** बाहेर पडला, इ०.

[ ‘ चणे खावे लोखंडाचे, तंव ब्रह्मपदीं नाचे ’ येथें विधेयविस्तारासाठीं पहिलें क्रियाविशेषण-वाक्य आलें आहे; पण त्यामुळें हें सर्वच मिश्रवाक्य झालें आहे ].

आतां कांहीं शुद्ध-वाक्यांचें पृथक्करण लिहून दाखवितों.

१. "आम्हीं त्या दिवशीं सकाळीं दहा वाजतां साताऱ्यास जाण्याची खटपट केली."

| उद्देश्य | | विधेय | | | |
|---|---|---|---|---|---|
| उद्देश्यविस्तारक | मूल उद्देश्य | विधेयविस्तारक | विधेय-पूरक | | मूल विधेय |
| | | | कर्म | पूरक | |
| ... | आम्हीं | त्या दिवशीं, सकाळीं, दहा वाजतां, | साताऱ्यास जाण्याची खटपट | ... | केली |

२. "आमचे एक ग्रामस्थ तेथें कलेक्टर कचेरींत कारकून असल्यामुळें त्यांजकडे आम्हीं बिऱ्हाड ठेविलें."

| उद्देश्य | | विधेय | | | |
|---|---|---|---|---|---|
| उद्देश्यविस्तारक | मूल उद्देश्य | विधेयविस्तारक | विधेय-पूरक | | मूल विधेय |
| | | | कर्म | पूरक | |
| ... | आम्हीं | आमचे एक ग्रामस्थ, तेथें, कलेक्टर कचेरींत, कारकून असल्यामुळें, त्यांजकडे, | बिऱ्हाड | | ठेविलें |

**३. "दुसऱ्या दिवशीं दहा वाजतां आम्हांला परीक्षेच्या ठिकाणीं जावयाचें होतें."**

| उद्देश्य | | विधेय | | | |
|---|---|---|---|---|---|
| उद्देश्यविस्तारक | मूल उद्देश्य | विधेयविस्तारक | विधेय-पूरक | | मूलविधेय |
| | | | कर्म | पूरक | |
| ... | आम्हांला | दुसऱ्या दिवशीं दहा वाजतां, परीक्षेच्या ठिकाणीं, | ... | ... | जावयाचें होतें |

**४. "पूर्वी घडून आलेला आणखी एक प्रसंग सांगण्या-सारखा आहे."**

| उद्देश्य | | विधेय | | | |
|---|---|---|---|---|---|
| उद्देश्याविस्तारक | मूल उद्देश्य | विधेयविस्तारक | विधेयपूरक | | मूलविधेय |
| | | | कर्म | पूरक | |
| पूर्वा घडून आलेला आणखी एक | प्रसंग | ... | ... | सांगण्या-सारखा | आहे |

## मिश्र-वाक्य

**मिश्र-वाक्यांत** एक मुख्य उद्देश्य व एक मुख्य विधेय असून बाकीचीं एक किंवा अनेक पोट-वाक्यांतील उद्देश्यें व विधेयें असतात. पोट-वाक्यें किंवा गौण-वाक्यें तीन प्रकारचीं आढळतात. **नाम-वाक्य**, **विशेषण-वाक्य** व **क्रिया-विशेषण-वाक्य.**

शुद्ध-वाक्यांत ज्या ठिकाणीं नाम येतें, त्या ठिकाणीं मिश्र-वाक्यांत येणाऱ्या वाक्यास **नामवाक्य** असें म्हणतात. उदा०– ' तो इशाऱ्यापूर्वींच आला ' हें वाईट झालें, यांत अवतरणांतील वाक्य **नामवाक्य** आहे. ' त्याचें इशाऱ्यापूर्वींच येणें वाईट झालें ' किंवा ' त्याचें इशाऱ्यापूर्वींच आगमन वाईट झालें ' हें शुद्धवाक्य आहे; आणि त्यांतील येणें किंवा आगमन ह्या नामाच्या जागीं 'तो इशाऱ्यापूर्वींच आला ' हें वाक्य आलें आहे; म्हणून तें **नाम-गौणवाक्य** आहे. आणखी उदा०–' तूं बोललास ' ( तुझें बोलणें ) हें बरोबर नाहीं, ' तूं काल येथें नव्हतास ' ( तुझें नसणें ) ही चांगली गोष्ट झाली; ' तुम्ही नुकतेंच मुंबईहून आलांत ' ( तुमचें आगमन ) असें गोविंदरावांकडून मला समजलें; इ०.

शुद्ध-वाक्यांत ज्या ठिकाणीं विशेषण येऊं शकतें, त्या ठिकाणीं मिश्रवाक्यांत येणाऱ्या पोटवाक्यास **विशेषण-वाक्य** असें म्हणतात. उदा०–' त्यांपैकीं जो मनुष्य उंच होता ' तो पुढें आला; याचें ' उंच असणारा मनुष्य पुढें आला ' असें शुद्धवाक्य होईल. येथें ' उंच असणारा ' ह्या विशेषणाबद्दल 'जो उंच होता ' असें पोटवाक्य वरच्या मिश्रवाक्यांत आलें आहे; म्हणून हें **विशेषण-गौणवाक्य** आहे. आणखी उदा०–' जे विद्यार्थी चांगला अभ्यास करितात ' ( चांगला अभ्यास करणारे ) ते पास होतात; ' आज जी संपत्ति त्याच्याजवळ आहे ' ( त्याच्या जवळ असणारी ) ती त्यानें पराक्रमानें मिळविलेली आहे; इ०.

शुद्ध-वाक्यांत ज्या ठिकाणीं क्रियाविशेषण अव्यय येऊं शकतें, त्या ठिकाणीं मिश्रवाक्यांत येणाऱ्या पोटवाक्यास **क्रियाविशेषण अव्यय-वाक्य** किंवा **क्रियाविशेषण-वाक्य** असें म्हणतात. उदा०–' आज सूर्य मावळला ' तेव्हां मी घरींच होतों; येथें 'मावळतांना' ह्या कृदन्त अव्ययाबद्दल आज 'सूर्य मावळला' हें वाक्य आलें आहे, म्हणून तें **क्रियाविशेषण-गौणवाक्य** आहे. आणखी उदा०––' आज दुपारपर्यंत मला तें पुस्तक मिळालें ' .( मिळालें असतां ) तर माझें काम होईल; ' तुम्ही जिकडे गेलां होतां ' तिकडे तोही गेला आहे; इ०.

मिश्रवाक्यांत अनेक गौणवाक्यें असल्यास, केव्हां केव्हां तीं समान दर्ज्याचीं असतात, आणि केव्हां केव्हां भिन्न दर्ज्याचीं असतात. उदा०–( १ ) ' त्यानें जें वाचलें ' आणि ' तो जें बोलला ' तें ऐकून मला फार आश्चर्य वाटलें; ह्या ठिकाणीं पहिलीं दोन समान दर्ज्याचीं नाम-गौणवाक्यें आहेत. त्यांस **समानाधिकरण** गौणवाक्यें असें म्हणतात. ( २ ) ' द्रोणाचार्य जरी युद्धकलेंत निपुण व शूर होते,' तरी ' अश्वत्थामा रणांत पडला ' ही बातमी ऐकून त्यांना

क्षणभर मूर्च्छा आली; ह्या ठिकाणीं पहिलें व दुसरें हीं वाक्यें समान योग्यतेचीं नाहींत. पहिलें ' द्रोणाचार्य......होते ' हें क्रियाविशेषण-गौणवाक्य असून, दुसरें ' अश्वत्थामा......पडला ' हें नाम-गौणवाक्य आहे. ह्या दोन वाक्यांना **व्यधिकरण** गौणवाक्यें असें म्हणतात.

## नामवाक्य

शुद्ध-वाक्यांत उद्देश्य, कर्म, समानाधिकरण शब्द व पूरक इतक्या ठिकाणीं नाम येत असल्यामुळें, मिश्रवाक्यांत इतक्या ठिकाणीं नामवाक्यें येऊं शकतात. उदा०—

उद्देश्य—' तुम्ही आलांत ' ( तुमचें येणें ) हें फार चांगलें झालें.

कर्म—' मी उद्यां येईन ' असें तो म्हणाला, ( त्यानें माझें उद्यांचें आगमन सांगितलें ).

समानाधिकरण शब्द—' शास्त्रीबोवा एकाएकीं मृत्यु पावले ' ही बातमी ऐकून सर्वांस फार दुःख झालें; ( शास्त्रीबोवांचें मृत्यु पावणें ही बातमी ).

पूरक—आज लोकांसमोरील प्रश्न हा आहे कीं, ' आपल्या मुलांस योग्य शिक्षण कसें द्यावें. ' ( 'हा' या पूरकाचे ठिकाणीं पुढील वाक्य आहे ).

[ शुद्ध-वाक्यांत जेथें जेथें नाम येतें, तेथें तेथें मिश्र-वाक्यांत नामवाक्य येऊं शकतें; एवढें ठरल्यावर, अर्थात् एकाद्या वाक्यांशांत मध्यन्तरींच जर कोठें नाम येत असेल, तर त्याच्या ठिकाणींही मिश्र-वाक्यांत नामवाक्य येऊं शकतें, हें साहाजिकच आहे. उदा०—" तें उदाहरण कसें करावें हें समजावून देत असतां, मी तेथें पोंचलों." ह्या ठिकाणीं, ' हें समजावून देत असतां ' ह्या वाक्यांशांतील कर्माच्या ठिकाणीं ' तें उदाहरण कसें करावें ' हें नामवाक्य झालें आहे ].

( १ ) नामवाक्य अगोदर असतां **हें** किंवा **असें** किंवा **म्हणून**, **हें जें** किंवा **असें जें** व **हें**च्या ऐवजीं **तें**, यांपैकीं कोणते तरी शब्द त्याचे पुढें येऊन नंतर प्रधान वाक्य येतें. उदा०—

**हें** किंवा **असें**—' तो काल गेला' **हें** फार चांगलें झालें; ' प्रत्येक मनुष्यानें खरें बोलावें ' **हें** त्याचें कर्तव्य आहे; ' तूं काल तेथें नव्हतास ' **ही** गोष्ट बरी झाली नाहीं; ' तूं काल आलास ' **हें** किंवा **असें** मला गोविंदाकडून समजलें; ' त्यास फांशीं देणार ' **असें** म्हणतात; इ०

**म्हणून**—'मी उद्यां येईन' **म्हणून** (असें) तो बोलला; 'त्याला घरांत घेऊं नको' **म्हणून** (अशी) बाबांनीं मला ताकीद केली आहे; इ०.

**हें जें** किंवा **असें जें**–'ह्या झाडाचीं फळें आपल्या हयातींत खावयास मिळावीं' **हा जो** आपला हेतु तो सिद्धीस जात नाहीं; 'या जागेचे पांचशें रुपये येतील' **असा जो** अंदाज तो चुकीचा ठरला; इ०.

**हें** किंवा **तें**—'तो कधीं येणार' **हें** किंवा **तें** मला माहीत नाहीं; 'तो कोठें गेला' **हें** किंवा **तें** मला सांग; इ०.

(२) प्रधानवाक्य अगोदर असतां, **कीं**, **जे**, किंवा **ऐसाजे**. हीं स्वरूप-दर्शक उभयान्वयी अव्ययें प्रधान वाक्यानंतर येऊन, त्यापुढें नामवाक्य येतें. उदा०—नाना म्हणाले **कीं**, 'यंदां कोकणांत पाऊस पडला;' परसूनें खबर आणिली आहे **कीं**, 'दादा फर्स्टक्लासमध्यें पास झाला;' करारनामा लिहून देतों **ऐसाजे**......;विनंति **जे**...; इ०.

नामवाक्य ओळखण्यासंबंधाच्या ह्या खुणा बऱ्याच उपयोगी पडतील.

## विशेषण-वाक्य

शुद्धवाक्यांत उद्देश्य, कर्म, पूरक, इ० च्या विस्ताराकरितां विशेषणें येऊं शकतात, अर्थात् मिश्रवाक्यांत त्या त्या ठिकाणीं विशेषणवाक्य येऊं शकतें. उदा०—

उद्देश्यविस्तारक—'जे विद्यार्थी चांगला अभ्यास करितात' ते पास होतात (चांगला अभ्यास **करणारे** विद्यार्थी); इ०.

कर्मविस्तारक—'आज जी संपत्ति त्यानें मिळविली आहे,' ती स्वतःच्या पराक्रमावर मिळविली आहे (त्यानें **मिळविलेली** संपत्ति); इ०.

विभक्त्यन्त शब्दाचें विस्तारक—'ज्या दसऱ्याला आतां मराठे लोक फक्त शमीपूजनासाठीं सीमोल्लंघन करितात,' त्या दसऱ्याला पेशवाईंत मराठे सरदार मोहीम करण्यास बाहेर पडत (सीमोल्लंघन करीत **असलेल्या** दसऱ्याला); इ०.

पूरकाचें विस्तारक—'ज्यानें बापाच्या कीर्तीस काळोखी आणिली,' असा कुलकलंक हा मुलगा निघाला (काळोखी **आणणारा** कुलकलंक); इ०.

[केव्हां केव्हां मूळ वाक्यांतील एकाद्या कोनाकोपऱ्यांतील नामांच्या विशेषणाच्या जागींही विशेषण-गौणवाक्य आढळतें. उदा०—'जेथें आमच्या

मुलीचा नवरा राहतो ' त्या गांवांत राहणाऱ्या श्रीनिवासराव नांवाच्या गृहस्थानें दळण्याचें एक नवीन यंत्र काढिलें आहे ('जेथें...राहतो' तो गांव) इ०].

(१) विशेषण-गौणवाक्यांत आरंभीं **जो, जी, जें**, हीं संबंधी सर्वनामें आणि **जितका, जेवढा**, इ० संबंधी विशेषणें येतात; आणि **तो, ती, तें**, हीं सर्वनामें व **तितका, तेवढा**, इ० विशेषणें हीं प्रधानवाक्याचे आरंभीं येतात. उदा०—' **जो** चोरी करितो ' **तो** शिक्षा भोगतो; इ०.

[ केव्हां केव्हां ' **जो** ' ह्या संबंधार्थक शब्दाऐवजीं **कोण, काय**, हे शब्दही गौणवाक्यारंभीं येतात. उदा०—' येथें **कसा काय** (**जो**) प्रकार घडला, ' तो मला माहीत नाहीं; ' तो **कोणत्या**, (**ज्या**) गांवास गेला, ' तें मला आठवत नाहीं; इ० ].

[ केव्हां केव्हां इंग्रजी वाक्य-रचनेच्या धर्तीवर नामाच्या पुढें विशेषण-वाक्य आलेलें आढळतें. उदा०—त्याचा मुलगा, ' जो विलायतेस गेला होता,' तो हाच होय; इ०. हा प्रकार नवीनच पडत चाललला आहे ].

## क्रियाविशेषण-वाक्य

शुद्धवाक्यांत क्रियाविशेषणें जेथें जेथें येतात, तेथें तेथें मिश्रवाक्यांत क्रियाविशेषणवाक्य येऊं शकतें; परंतु तें क्रियापदाशीं किंवा क्रियाविशेषणाशींच संबद्ध असेल तर त्याचा विधेयविस्तारांत समावेश होतो; आणि विशेषणाशीं किंवा कृदन्त नामाशीं संबद्ध असेल तर तें विशेषण किंवा तें कृदन्त ज्या सदरांत समाविष्ट होत असेल, त्याच सदरांत त्याचें विस्तारक म्हणून क्रियाविशेषण-वाक्य पडतें. उदा०—

क्रियापदाशीं संबद्ध–' आज दुपारपर्यंत तें पुस्तक मिळालें, ' तर माझें काम होईल ( होईल ' ह्याशीं संबद्ध ).

क्रियाविशेषणाशीं संबद्ध–' तुम्ही जिकडे गेलां होतां, ' तिकडेच तोही गेला आहे ( 'तिकडे' ह्याशीं संबद्ध ).

कृदन्ताशीं संबद्ध—'चांगला अभ्यास केलास ' तर यश येणें कांहीं कठीण नाहीं ( ' येणें ' ह्याशीं संबद्ध ).

विशेषणाशीं संबद्ध—' चार पांच जणांची दमचक्की करील, ' इतकी ताकद त्याला आहे ( ' इतकी ' ह्याशीं संबद्ध ).

( १ ) गौण क्रियाविशेषण–वाक्याचे आरंभीं संबंधी क्रियाविशेषण अव्ययें व वाक्यपृथक्करणदृष्ट्या क्रियाविशेषणसदृश संबंधीं शब्दयोगी अव्ययान्त शब्द येतात; व प्रधान वाक्याचे पूर्वी त्यांचेच अनुसंबंधी शब्द येतात. उदा०—'**जेथें** जावें,' **तेथें** तूं माझा सांगाती; '**जेव्हां** मेहनत करावी,' **तेव्हां** पोट भरतें; **ज्याप्रमाणें** मोठे लोक वागतात,' **त्याप्रमाणें**च इतर लोक वागतात;'**ज्याअर्थी** तूं माझी गट्टी फू केली आहेस,' **त्याअर्थी** मी तुझ्याशीं बोलत नाहीं; इ०.

( २ ) संकेतदर्शक, कारणदर्शक, उद्देशदर्शक व स्वरूपदर्शक, उभयान्वयी अव्ययें मध्यें येऊनही गौण–क्रियाविशेषणवाक्यें होतात. उदा०—तो लगेच मेला, **कारण** 'धोतऱ्याचें विष प्याला;' तो इतका संतापला **कीं**, 'त्याचा सगळा चेहरा लाल होऊन गेला;' 'कोळसे तयार झाले' **म्हणजे** त्यापासून तापण्याचें काम होतें; 'आपण इमानानें वागलों,' **तर** आपल्यावर कोणीही विश्वास ठेवील; इ०.

मिश्र-वाक्याचें पृथक्करण करितांना प्रथम तें सर्व **वाक्य**; नंतर त्या वाक्याचें स्पष्टीकरण म्हणजे तें कोणत्या प्रकारचें मिश्रवाक्य आहे व त्यांतील प्रधान व गौण-वाक्यांचा संबंध कोणत्या प्रकारचा आहे तें; आणि नंतर त्याचें आराखड्यांत **पृथक्करण**; हा क्रम अवलंबिण्याची पद्धति आहे. त्याप्रमाणें या प्रकरणाचे शेवटीं कांहीं वाक्यांचें पृथक्करण लिहून दाखविलें आहे.

## संयुक्त–वाक्य

केवल–संयुक्त, मिश्र–संयुक्त व केवलमिश्र–संयुक्त अशीं तीन प्रकारचीं संयुक्त–वाक्यें आढळतात, हें पूर्वींच येऊन गेलें आहे.

संयुक्तवाक्यें हीं विशेषेंकरून समुच्चयबोधक, विकल्पबोधक, न्यूनत्वबोधक व परिणामबोधक उभयान्वयी अव्ययें मध्यें येऊन होतात. ( अशा प्रकारें झालेल्या केवल–संयुक्त वाक्यांत जेवढीं वाक्यें असतील, तेवढीं प्रमुख किंवा प्रधान वाक्यें असतात; आणि मिश्र–संयुक्त वाक्यामधील मिश्रवाक्यांत एक मुख्य वाक्य व एक किंवा अनेक गौण–वाक्यें असतात ).

समुच्चयबोधक—वारा आला **आणि** पाऊस गेला; प्रत्येक काव्यग्रंथाचा कांहीं विशिष्ट हेतु असतो **व** तो उद्देश सिद्ध झाल्यावर त्याची परिसमाप्ति होते; इ०.

विकल्पबोधक — तुम्ही स्वतः या **किंवा** गड्याला पाठवा; आम्हांला प्यायला पाणी द्या **अगर** विहिरींतून पाणी काढण्यासाठीं पोहरा द्या; इ०.

न्यूनत्वबोधक — यंदां पुष्कळ पाऊस पडला, **परंतु** तो अवेळीं पडल्यानें पिकांस फायदा झाला नाहीं; सगळें कांहीं त्याला माहीत आहे, **पण** लक्षांत कोण घेतो ? इ०.

परिणामबोधक — यत्नाशिवाय दैव पंगु आहे, **म्हणून** प्रयत्नालाच प्राधान्य दिलें पाहिजे; वेळेवर डॉक्टरला आणिलें, **म्हणून** त्याचा भाऊ वांचला; इ०.

## संकुचित वाक्यें

शब्दांची पुनरुक्ति टाळण्यासाठीं कर्ता, कर्म, पूरक किंवा त्यांचीं विस्तारकें किंवा विधेयविस्तारकें ह्यांपैकीं समान दर्ज्याच्या कांहींचा एकत्र समुच्चय करून, त्या प्रत्येकाकारितां निरानिराळें क्रियापद घालून संयुक्तवाक्य बनविण्याऐवजीं एकच क्रियापद घालून शुद्धवाक्य बनवितात. अशा प्रकारें अनेक वाक्यें होणें शक्य असतां, त्यांचा संकोच करून एकच वाक्य बनवितात, त्यास **संकुचित वाक्य** असें म्हणतात. उदा० — रामा, गोविंदा व विष्णु हे मुंबईस गेले (येथें रामा गेला, गोविंदा गेला व विष्णु गेला, या तीन वाक्यांचा एकच क्रियापद योजून संकोच केला आहे); घोडा हा फार चपळ, उपयोगी व उमदा प्राणी आहे; तो रोज संध्या, पूजा, जप, वैश्वदेव व वेदाध्ययन करितो; दुसऱ्याला त्रास दिल्यानें, त्याचें नुकसान केल्यानें किंवा त्याचा हेवा केल्यानेंही स्वतःचें नुकसान होतें; (यांत प्रत्येक ठिकाणीं क्रियापदें घालून निरानिराळीं स्वतंत्र वाक्यें करून त्या सर्वांचें संयुक्तवाक्य न बनवितां एकच शुद्धवाक्य केलें आहे.

[ अशा प्रकारच्या वाक्यांना फोडून त्यांचीं अनेक वाक्यें बनवून पृथक्करण भानगडीचें करण्यापेक्षां अशा वाक्यांत एकच क्रियापद असतें म्हणून तें शुद्ध-वाक्यच समजून पृथक्करण करणें अधिक सोयीचें आहे. मात्र अनेक क्रियापदें असल्यास तें संकुचित वाक्य राहणार नाहीं, त्या सर्वांमिळून संयुक्त–वाक्य होईल हें ध्यानांत ठेवावयास हवें.

संयुक्त–वाक्यांत जेव्हां सर्वच केवल–वाक्यें असतील, तेव्हां अनुक्रमानें त्या वाक्यांचें पृथक्करण शुद्धवाक्यांत दर्शविल्याप्रमाणें करावें. केवल–मिश्र असें संयुक्त वाक्य असेल, तर मुख्य वाक्यांचें अगोदर पृथक्करण करून, गौणवाक्य ज्या

मुख्य वाक्यांतर्गत असेल त्या मुख्य वाक्याच्या पृथक्करणानंतर लगेच त्याच्या एक किंवा अनेक गौण–वाक्यांचें पृथक्करण करावें; तसेंच मिश्र–मिश्र असें संयुक्त वाक्य असेल तर पहिल्या मिश्र–वाक्यांतील प्रधान–वाक्याचें अगोदर व गौण–वाक्याचें मागून, नंतर दुसऱ्या मिश्र–वाक्यांतील प्रधान–वाक्याचें अगोदर व गौण–वाक्याचें मागून, याप्रमाणें पृथक्करण करावें ].

## संक्षिप्त वाक्यें

केव्हां केव्हां वाक्यातील सहज ज्ञात होणारे शब्द गाळून बोलतात किंवा लिहितात; अशा तऱ्हेच्या वाक्यांस **संक्षिप्त वाक्यें** असें म्हणतात. उदा०— 'ते जसे रागीट तसा तोही हट्टी होता' हें मिश्रवाक्य असून, यांतील पहिल्या वाक्यांतील 'होते' हें क्रियापद गाळलें आहे; तरी वाक्य–पृथक्करणाच्या वेळीं तें घेऊनच स्पष्टीकरण किंवा पृथक्करण केलें पाहिजे. 'ते जसे रागीट होते, तसाच तो हट्टी होता' अशा प्रकारचें हें वाक्य आहे. त्याचप्रमाणें 'माझ्यापेक्षां तो हुशार आहे,' 'तो माझ्याइतका उंच आहे,' 'तो तुमच्यासारखा चपळ नाहीं,' 'दोष देण्याजोगा अपराध त्याजकडून घडला नाहीं,' इ० वाक्यें होत.

[ संक्षिप्त वाक्यांच्या पृथक्करणासंबंधानें सामान्यतः असें ठरवितां येईल कीं, त्यांत जर क्रियापदांचा अध्याहार असेल, तर तीं क्रियापदें घालून, मिश्रवाक्य बनवून त्याचें पृथक्करण करावें; आणि क्रियापदांशिवाय विशेषणें, क्रियाविशेषणें, इ० चा अध्याहार असेल, तर तें शुद्धवाक्य समजून त्याचें पृथक्करण करावें.

हीच गोष्ट संकुचित वाक्यासंबंधानेंही आहे. संकुचित वाक्यांत अनेक क्रियापदें असून, इतर गोष्टींचा संकोच केला असेल, तरच तेथें अनेक वाक्यें आहेत असें समजावें; परंतु अनेक कर्ते, कर्मे, एकाच क्रियापदाशीं निगडीत असतील, तर त्यांचीं अनेक निरनिराळीं वाक्यें करण्याचें कारण नाहीं ].

## प्रश्नार्थक, आज्ञार्थक, उद्गारार्थक वाक्यें

ह्या प्रकारच्या वाक्यांचें पृथक्करण इतर वाक्यांप्रमाणेंच करितां येतें. [ १ ] प्रश्नार्थक वाक्यांत काय ( किंवा का ) हें प्रश्नार्थक क्रियाविशेषण आलें असतां तें वाक्याच्या शेवटीं येतें; व इतर प्रश्नार्थक शब्द वाक्याच्या मध्यें येतात. उदा०—तुझ्याजवळ पैसे आहेत काय? तेथें कोण बसला आहे? इ०. प्रश्नार्थक वाक्यें शुद्ध, मिश्र किंवा संयुक्त अशीं तिन्ही प्रकारचीं असूं शकतात.

उदा०—तो कोठें गेला असेल? (शुद्ध). तो आला नसेल असें होईल काय? (मिश्र). तुम्ही केव्हां आलांत आणि केव्हां गेलांत? (संयुक्त). [ २ ] आज्ञार्थक वाक्यें हीं शुद्ध, मिश्र किंवा संयुक्त असूं शकतात. उदा०—तुम्ही आतां घरीं जा (शुद्ध).तुम्ही जाल कीं नाहीं, तें सांगा (मिश्र). घरांत जा व पाणी आण (संयुक्त). [ ३ ] उद्गारार्थ वाक्यांचें पृथक्करण शुद्ध वाक्याप्रमाणेंच.

आतां मिश्र, संयुक्त, संकुचित, प्रश्नार्थक, इ० पैकीं कांहीं वाक्यांचें पृथक्करण करून दाखवितों. पृथक्करणाची पद्धति पूर्व-परिचित असल्यामुळें आतां त्यासंबंधानें येथें पुनरुक्ति नको. (पृथक्करणाचा आराखडा मे० डायरेक्टरसाहेब यांनीं ठरविल्याप्रप्रमाणेंच येथें घेतला आहे).

**१. वाक्य**—" या मालेंतील सर्व व्याख्यानें मराठींतून व्हावयाचीं असतां, तिचा आरंभ मला इंग्रजींतून करावा लागत आहे, ही दिलगिरीची गोष्ट आहे."

**स्पष्टीकरण**—हें सर्व मिश्रवाक्य असून, यांत दुसरें प्रधानवाक्य आहे. आणि पहिलें वाक्य ' ही गोष्ट ' या नामाच्या विस्तारासाठीं आलें असल्यामुळें नामगौण वाक्य आहे. त्याचें पृथक्करण खालीलप्रमाणें—

| उद्देश्य | | विधेय | | | |
|---|---|---|---|---|---|
| उद्देश्यविस्तारक | मूल उद्देश्य | विधेयविस्तारक | विधेयपूरक | | मूल विधेय |
| | | | कर्म | पूरक | |
| ... | ही | ... | ... | (पहिलें गौणवाक्य) दिलगिरी-ची गोष्ट | आहे |
| ... | मला | या मालेंतील सर्व व्याख्यानें मराठींत व्हाव-याचीं असतां, इंग्रजींत, | तिचा आरंभ | ... | करावा लागत आहे |

२. **वाक्य**—" आज जी संपत्ति त्याजपाशीं आहे, ती त्यानें स्वतःच्या पराक्रमावर आपल्या हयातींतच मिळविली आहे. "

**स्पष्टीकरण**—हें सर्व मिश्रवाक्य असून, यांत दुसरें प्रधानवाक्य आहे; आणि पहिलें 'ती' ह्या कर्माचें विशेषण असल्यामुळें विशेषण-गौणवाक्य आहे. याचें स्पष्टीकरण खालीलप्रमाणें—

| उद्देश्य | | विधेय | | | |
|---|---|---|---|---|---|
| उद्देश्यविस्तारक | मूल उद्देश्य | विधेयविस्तारक | विधेय-पूरक | | मूलविधेय |
| | | | कर्म | पूरक | |
| ... | त्यानें | स्वतःच्या पराक्रमावर, आपल्या हयातींतच | (आज जी संपत्ति त्याजपाशीं आहे) ती | ... | मिळविली आहे |
| जी | संपत्ति | आज, त्याजपाशीं, | ... | ... | आहे |

३. **वाक्य**—" हवा कोंदट असल्यास मनुष्यांच्या प्रकृति बिघडतात; फुप्फुसांचा व्यापार नीट चालत नाहीं आणि अनेक प्रकारचे रोग उत्पन्न होतात."

**स्पष्टीकरण**—हें सर्व केवल-संयुक्त वाक्य आहे व म्हणून यातील प्रत्येक प्रधानवाक्य आहे. या वाक्याचें पृथक्करण खालीलप्रमाणें—

| उद्देश्य | | विधेय | | | |
|---|---|---|---|---|---|
| उद्देश्यविस्तारक | मूल उद्देश्य | विधेयविस्तारक | विधेय-पूरक | | मूलविधेय |
| | | | कर्म | पूरक | |
| मनुष्यांच्या | प्रकृति | हवा कोंदट असल्यास, | ... | ... | बिघडतात |
| फुप्फुसांचा | व्यापार | नीट | ... | ... | चालत नाहीं |
| अनेक प्रकारचे | रोग | — | ... | उत्पन्न | होतात |

**४. वाक्य**--" पक्ष्यांना जशा हवा राहण्याच्या पिशव्या असतात, तशा माशांनाही असतात; आणि पक्ष्यांना जशा त्या हवेंत तरण्यासाठीं उपयोगी पडतात, तशा ह्याही माशांना पाण्यांत तरण्यासाठीं उपयोगी पडतात. "।

**स्पष्टीकरण**--हें सर्व मिश्र-संयुक्त वाक्य असून, ह्यांत पहिल्या दोन वाक्यांचें एक मिश्रवाक्य आहे व पुढच्या दोन वाक्यांचें दुसरें मिश्रवाक्य आहे; आणि हीं दोन वाक्ये मिळून संयुक्तवाक्य झालें आहे. प्रथमच्या मिश्र-वाक्यांत दुसरें वाक्य प्रमुख असून, पहिलें त्याचें गौण क्रियाविशेषण-वाक्य आहे; त्याचप्रमाणें दुसऱ्या मिश्रवाक्यांतही शेवटचें वाक्य प्रमुख असून, पहिलें त्याचें गौण क्रियाविशेषणवाक्य आहे. याचें पृथक्करण खालीलप्रमाणें—

| उद्देश्य | | विधेय | | | |
|---|---|---|---|---|---|
| उद्देश्यविस्तारक | मूल उद्देश्य | विधेयविस्तारक | विधेय-पूरक: कर्म | विधेय-पूरक: पूरक | मूल विधेय |
| (२) ... | (पिशव्या) | माशांनाही | ... | (१लें गौ०वा०) तशा | असतात |
| (१) हवा राहण्याच्या | पिशव्या | पक्ष्यांना | ... | जशा | असतात |
| (४) ... | ह्याही | माशांना, पाण्यांत तरण्यासाठीं, | ... | (१ लें गौ०वा०) तशा. उपयोगी, | पडतात |
| (३) ... | त्या | हवेंत तरण्यासाठीं, पक्ष्यांना, | ... | जशा, उपयोगी | पडतात |

५. " नाना व आम्ही सर्व मुलें नाटकास गेलों. "

येथें एकाच क्रियापदाचे कर्ते मात्र दोन आहेत, म्हणून हें **संकुचित वाक्य** आहे; पण क्रियापद एकच असल्यामुळें हें सर्व शुद्धवाक्यच समजून त्याप्रमाणेंच त्याचें पृथक्करण करावयाचें.

६. ते जसे रागीट, तसा तो हट्टी आहे. "

येथें रागीट यापुढें ' आहेत ' हें क्रियापद घालणें अवश्य आहे; तें घालून मिश्रवाक्याप्रमाणें याचें पृथक्करण करावयाचें.

७. "पोहण्यांत माझ्याकडून तो अधिक चपळाई दाखवितो."

येथें एका क्रियापदानें कार्यभाग साधत असल्यामुळें दोन वाक्यें करण्याची जरूर नाहीं. शुद्धवाक्याप्रमाणें याचें पृथक्करण करावयाचें.

**टीप**—संबोधनान्त शब्द, केवलप्रयोगी अव्ययें व प्रधानवाक्यें ज्यांच्या योगानें होतात अशीं उभयान्वयी अव्ययें, हे शब्द--त्यांचा वाक्यांत कोणाशींच संबंध नसल्यामुळें--वाक्यपृथक्करणांत येत नाहींत.

---

## विरामचिन्हें व अर्थदर्शक चिन्हें

बोलण्यांत अभिप्रेत अर्थ कळण्यासाठीं मनुष्य अनेक युक्ति अमलांत आणीत असतो. लेखनावरून त्याचा तो अर्थ कळण्याकरितां अनेक प्रकारचीं चिन्हें योजिलीं आहेत. त्यापैकीं कांहींना **विरामचिन्हें** व कांहींना **अर्थबोधक चिन्हें** म्हणतात. ह्यांपैकीं प्रमुखांचा येथें निर्देश करितों.

### विराम-चिन्हें

१. **स्वल्पविराम**—समान योग्यतेचे अनेक शब्द--नामें, सर्वनामें, विशेषणें, क्रियापदें, वाक्यांश, किंवा लहान लहान वाक्यें, इ०—जवळ जवळ आलीं असतां, त्यांमधील पृथक्पणा व्यक्त करण्यासाठीं, त्या प्रत्येक शब्दाच्या, वाक्यांशाच्या किंवा वाक्याच्या उच्चारानंतर थोडेंसें थांबतात; तें अल्पसें थांबणें लेखनांत व्यक्त करण्याकरितां ( , ) ही खूण करितात; तिला **स्वल्पविराम** असें म्हणतात. [**आणि, व,** हीं समुच्चयबोधक व **अथवा, किंवा,** हीं विकल्पबोधक उभयान्वयी अव्ययें मध्यें आलीं असतां, त्यांपूर्वीच्या शब्दापुढें किंवा वाक्यापुढें मात्र स्वल्पविराम देण्याची पद्धति नाहीं]. उदा०—

**नामें**—बाबांनीं बाजारांतून केळीं, द्राक्षें, अंजीर, अननस व कलिंगड हीं फळें आणिलीं.

**सर्वनामें**—मी, तूं व तो नाटकास जाऊं.

**विशेषणें**—तेथें हिरवे, पिवळे, तांबडे व पांढऱ्या रंगांचेही राघू होते.

**क्रियापदें**--तो मुंबईहून आला, जेवला व लगेच गेला.

**वाक्यांश**--अभिमन्यु गर्जना करीत, गरगर गदा फिरवीत, धांवला.

**वाक्यें**--मी त्याच्याकडे थांबलों नाहीं, त्याच्याकडे जेवलों नाहीं, त्याचे पैसेही घेतले नाहींत व त्यास नमस्कारही केला नाहीं, इ०.

[ संबोधनान्त शब्दांच्या शेवटींही स्वल्पविराम येतो. उदा०—गोविंदा, इकडे ये; दैवा, तुला माझा छळ करण्यास कसें फावलें? इ०. ]

२. **अर्धविराम**--ज्या ठिकाणीं स्वल्पविरामापेक्षां थोडें जास्त थांबावें लागतें, परंतु बोलणें तर पूर्ण होत नाहीं, अशा ठिकाणीं ( ; ) ही खूण करितात; तिला **अर्धविराम** असें म्हणतात. [ स्वल्पविरामात्मक शब्दांचे किंवा शब्दसमूहांचे कांहीं गट एकापुढें एक आल्यास, त्या प्रत्येक गटापुढें अर्धविराम येतो. तसेंच, समान योग्यतेचीं मोठालीं वाक्यें लागोपाठ आल्यास, त्यांपैकीं शेवटच्याशिवाय बाकीच्या वाक्यांपुढें अर्धविराम येतो. **आणि, व, अथवा, किंवा**, हे शब्द मध्यें आले असतां, त्यापूर्वीच्या शब्दांपुढें किंवा वाक्यापुढें मात्र अर्धविराम येत नाहीं ]. उदा०—

( **अ** ) मुंबईस पंजाबी, बंगाली, सिंधी, गुजराती, तेलंगी, मद्रासी व महाराष्ट्रीय हे हिंदी लोक; इंग्रज, फ्रेंच, डच, पोर्तुगीज, इ० युरोपियन लोक; कॅनडा व ऑस्ट्रेलिया या खंडांतील लोक आणि जपान, चीन, तिबेट, या पौरस्त्य देशांतीलही लोक रहातात. ( **आ** ) इतक्यांत, आकाशांत जिकडे तिकडे ढग दिसूं लागले; थोड्याच वेळानें गारांचा वर्षाव होऊं लागला; त्या गारांच्या माऱ्यानें डोक्यांस टेंगळें आलीं; लगेच मुसळधार पाऊस पडूं लागला; अशा कचाट्यांत आमचा सोमदत्त सांपडला; इ०.

३. **पूर्णविराम**--जेथें एकादा विचार पूर्ण प्रकट झालेला दिसतो व बोलतांना तसें दर्शविण्यासाठीं आपण तेथें पूर्ण थांबतों आणि नंतर तो पूर्ण अवधि संपल्यावर दुसरा विचार बोलण्यास आरंभ करितों; अशा प्रकारें जेथें जेथें एक विचार पूर्ण होतों, तेथें तेथें तसें थांबण्यासाठीं ( . ) ही खूण करितात, तिला **पूर्णविराम** असें म्हणतात. [ स्वतंत्र लहान लहान वाक्यें असूनही तीं एक एक विचार पूर्णपणें दर्शवीत असलीं, तर तेथें हें चिन्ह येतें, व मोठमोठीं मिश्र, संयुक्त, अशीं वाक्यें असल्यास त्यांच्या शेवटींही हें चिन्ह येतें ). उदा०--

( **अ** ) एक होता उंदीर. तो वई वई धावे. त्याला सांपडलें फडकें. तो गेला शिंप्याकडे. इ०. ( **आ** ) वाळूचे कण रगडले तर तेलसुद्धां कदाचित् निघेल; मृगजळानें कदाचित् तहान भागूं शकेल; अरण्य धुंडलें तर कदाचित् सशाला शिंग आढळेल; पण मूर्खाचें मन कांहीं केल्या वळणार नाहीं.

## अर्थदर्शक चिन्हें

४. **प्रश्नचिन्ह**—प्रश्न विचारण्यासाठीं प्रश्नार्थक वाक्याच्या शेवटीं (?) हें चिन्ह करितात, त्यास **प्रश्नचिन्ह** असें म्हणतात. उदा०—तुमच्या हातांत काय आहे? तुम्हीं कोणास विचारलें? त्याला पैसे हवे आहेत काय? मला कां इतक्यांत घराबाहेर घालतां? इ०.

[प्रश्नार्थक वाक्य नसतां चुकीनें खालील ठिकाणीं प्रश्नचिन्ह करितात, तें बरोबर नाहीं. उदा०—'मुंबई इलाख्याच्या पश्चिम-किनाऱ्यावर बंदरें कोणतीं आहेत, तीं सांगा.' 'इंद्रधनुष्य म्हणजे काय, त्याचा खुलासा करा.' यांतील पहिल्या वाक्यांत 'आहेत' येथें व दुसऱ्या वाक्यांत 'काय' यापुढें प्रश्नचिन्ह नको; कारण हीं प्रश्नार्थक वाक्यें नसून आज्ञार्थक वाक्यें आहेत].

५. **उद्गारचिन्ह**—एकादा मनोविकार एकदम प्रकट झालेला आहे असें दर्शित करावयाचें असल्यास त्या वाक्याच्या शेवटीं (!) हें चिन्ह करितात, त्यास **उद्गारचिन्ह** असें म्हणतात. उद्गारार्थक केवलप्रयोगी अव्ययें व उद्गारार्थक वाक्यें यांच्यापुढें हें चिन्ह येतें. उदा०—अबब! किती तरी हीं माणसें!; ओहोहो! किती उंच पतंग उडाला हा!; छेः! मला नाहीं असलें बोलणें खपायचें!; इ०.

[संबोधनार्थक शब्दापुढें वस्तुतः स्वल्पविराम हवा; पण पूर्वीच्या कांहीं लोकांच्या लेखनांत व पद्यांत त्याऐवजीं उद्गारचिन्ह घालीत, हें बरोबर नाहीं. आतां मात्र हा प्रचार मागें पडत चालला आहे. उदा०—"प्रभो! प्रणतवत्सला! बहुत पातकी दीन मी" येथें उद्गारचिन्ह असण्याचें कांहीं योग्य कारण दिसत नाहीं].

६. **अवतरणचिन्ह**—महत्त्वाचे शब्द किंवा शब्दसमूह किंवा दुसऱ्याचें म्हणणें ह्या गोष्टी (' ') ह्या किंवा (" ") ह्या चिन्हानें दर्शवीत असतात, त्यास **अवतरणचिन्ह** असें म्हणतात. पहिलें एकेरी अवतरणचिन्ह व दुसरें दुहेरी अवतरणचिन्ह आहे. [एकाद दुसराच महत्त्वाचा शब्द किंवा महत्त्वाचा लहानसा शब्दसमूह किंवा लहानसेंच दुसऱ्याच्या तोंडचें किंवा लेखांतील वाक्य असल्यास तें एकेरी अवतरणांत लिहितात; आणि वाक्ये किंवा उतारा मोठा असल्यास तो दुहेरी अवतरणांत लिहितात]. उदा०—

( **अ** ) झाला 'अनंत' वस्त्रें कीं तीस अनाथसें न वाटावे ॥ ( मोरो० ). येथें अनंत ( श्रीकृष्ण ), अनंत ( वस्त्रें याचें विशेषण ), असा श्लेषात्मक महत्त्वाचा तो शब्द असल्यानें एकेरी अवतरण आहे. तसेंच, एका गृहस्थाच्या घरीं त्याच्या ' उपवधू ' भावाबद्दल गळ घालण्याकरितां, मी व तिंबूनाना गेलों होतों ( गडकरी ). यांतील उपवर याच्याशीं तुल्य दुसरा बनविलेला शब्द ' उपवधू ' ह्याकडे लक्ष वेधावें म्हणून तो एकेरी अवतरणांत घातला आहे. ' बोले तैसा चाले त्याचीं वंदावीं पाऊलें ' असें रामदासांनीं म्हटलें आहे. यांत रामदासाचे शब्द एकेरी अवतरणांत घातले आहेत.

( **आ** ) गडकरी म्हणतात—" कवि व सत्कवि यांच्या कृति जरी सकृत्-दर्शनीं एकसारख्या भासल्या, तरी त्यांत सूज-बाळशाइतकें अंतर असतें;" भर्तृहरि म्हणतो,—" ज्ञानलवदुर्विदग्धं ब्रह्मापि च तं नरं न रंजयति "; इ०.

७. **संयोगचिन्ह**—सामासिक शब्दांमधील प्रत्येक दोन पदांमध्यें ( - ) ही खूण करितात; तिला **संयोगचिन्ह** म्हणतात. उदा०—

राम-कृष्ण, हरि-हर, द्रोण-द्रौणि-कृप, पितृ-मातुल-सम-शुद्धकीर्ति-धौत-मही, इ०.

८. **स्पष्टीकरणचिन्ह**—एखाद्या गोष्टीचा अधिक खुलासा करावयाचे वेळीं ( — ) या चिन्हाचा उपयोग करितात, त्यास **स्पष्टीकरणचिन्ह** असें म्हणतात. [ उदाहरणें, दाखले, देतेवेळी ह्यांचा फार उपयोग होतो. हें साधारणपणें संयोगचिन्हाच्या दुपटीइतकें लांब असतें ]. उदा० —

अर्ज ऐसाजे —; त्यानें बोलक्या ढलप्याची गोष्ट सांगितली ती अशी—; क्रियापदाचीं उदाहरणें— करितो, बोलतो, इ०.

[ स्पष्टीकरणाचा मजकूर ज्यास्त असल्यास, त्याच्या आरंभीं व शेवटीं असें दोनदां हें चिन्ह केव्हां केव्हां करितात. उदा०-वाईकर भटजी — जे इतका वेळ दुरूनच स्तब्ध बसून ऐकत होते—ते आतां एकदम पुढें आले, इ० ].

९. **कंस** --अध्याहृत किंवा गौण गोष्टी व्यक्त करावयाच्या असतां (   ) ह्या चिन्हाचा उपयोग करितात; त्यास **कंस** असें म्हणतात. उदा०-- सोन्याचे दागिने करितात ( लोक ), रांगोळ्या घातल्या ( मुलींनीं ), आम्ही ( हिंदुस्थानचे लोक ) कांहीं मेल्या आईचें दूध प्यालों नाहीं, इ०.

**टीप** --इतरही अनेक चिन्हें आहेत, पण येथें विद्यार्थ्यांस आवश्यक तेवढींच दिलीं आहेत.

---

# ८ लेखन-शुद्धि

[ महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या शुद्धलेखन-मंडळानें ठरविलेल्या लेखन-शुद्धीच्या नियमांस मुंबई विद्याखात्यानें व इतर बऱ्याच विद्यापीठांनीं मान्यता दिली असल्यामुळें, फरक दाखवून, त्यास अनुसरूनच खालील नियम दिले आहेत ].

'मराठीमध्यें कोणतें लेखन शुद्ध व कोणतें अशुद्ध ह्याचा कांहीं धरबंध नाहीं' असें कांहीं लोक त्रासून म्हणतांना ऐकण्यांत येतें; परंतु वस्तुतः तें बिलकुल खरें नाहीं. केवळ आवश्यकतेमुळें इंग्रजी आदिकरून भाषांचा जसा आपण अभ्यास करितों, तसा मातृभाषेचा करीत नाहीं, हेंच खरोखर ह्या गोष्टीचें कारण आहे.

**लेखन-शुद्धी**चे बाबतींत ( १ ) **मराठी ऱ्हस्व-दीर्घ**, (२) **संस्कृत ऱ्हस्व-दीर्घ**, ( ३ ) **अनुस्वार** व ( ४ ) इतर **कांहीं किरकोळ गोष्टी**, यांविषयीं विचार करावा लागतो. त्यासंबंधीं सामान्य रूपरेषा खालीं दिली आहे.

## ( १ ) मराठी ऱ्हस्व-दीर्घ

कर्ण-कान, सर्प-साप, हस्त-हात, द्वार-दार, स्तंभ-खांब, यांतील संस्कृत व मराठी शब्द आपल्यास ओळखतां येतात; त्याचप्रमाणें मराठींत येणारे बहुतेक संस्कृत शब्द व निव्वळ मराठी शब्द —त्यांचा उच्चारादिकांमुळें कठीणपणा व सोपेपणा यांमुळें—आपल्यास ओळखण्यास फारशी अडचण पडत नाहीं; म्हणून खालीं त्यांचे निरनिराळे नियम दिले आहेत.

१. निव्वळ मराठी शब्दांतील अन्त्य **इ**-कार व **उ**-कार हे दीर्घच असावयाचे. उदा०—आ**ई**, मा**ई**, का**ठी**, लो**टी**; **मी**, **तूं**; का**ळी**, गो**री**; आ**ली**, गे**ली**; ह**ळू**. खा**लीं**, वर**तीं**, ज**री**, त**री**, वळक**टी**, आवळक**टी**, इ०.

**अपवाद**—आणि; लुडुलुडु, दुडुदुडु.

२. निव्वळ मराठी अ-कारान्त शब्दांतील उपान्त्य **इ**-कार व **उ**-कार दीर्घच असतात. उदा०—**खीळ**, **बीळ**, **रीत**, **वीत**, मा**री**ल, खा**ई**ल, **आऊ**न, ये**ऊ**न, इ०.

३. निव्वळ मराठींत अकारान्तेतर शब्दांतील उपान्त्य **इ**-कार व **उ**-कार ऱ्हस्व असतात. उदा०—**वि**टा, **खि**ळा, **जि**ना, **बि**लें, **फु**लें, **मु**लें, मा**रि**तो, इ०.

४. निव्वळ मराठी शब्दांतील अन्त्य व उपान्त्य यांमागील **इ**-कार व **उ**-कार ऱ्हस्व असतात. उदा०—**चि**मटा, **चि**मणी, **हि**रवा, **पि**कला, **चु**लता, **भि**जलें, **चि**मुकला. **सु**रकुती, **कि**रकोळ, इ०.

५. सामान्यरूप नेहमीं दीर्घ असतें. उदा०—क**वीस**, बु**द्धी**स, बु**द्धीनें**, यु**क्ती**मुळें, गुरूपासून, गा**ई**चा, इ०. (पद्याच्या जुळणीकरितां कवितेंत केव्हां केव्हा सामान्यरूप ऱ्हस्व येऊं शकतें. उदा०-अंत**रिं**चा ज्ञानदिवा मालवूं नको रे, भिल्लिच्या वन-फळें मन धालें, इ० ).

६. जोडाक्षर व खणखणीत अनुस्वार यांपूर्वीचीं अक्षरें ऱ्हस्व असतात. उदा०—( १ ) भिंत, चिंच, सुंठ, भिल्ल, शिस्त, कुस्ती, इ०. ( २ ) कींव, शींव, इ० ठिकाणीं खणखणीत अनुस्वार नसल्यानें त्यांपूर्वीचीं अक्षरें ऱ्हस्व नाहींत.

[ एका शब्दाला—दुसरा शब्द, शब्दयोगी अव्यय किंवा विभक्तिप्रत्यय—हीं जोडून आल्यास, तें निरनिराळे स्वतंत्रच शब्द आहेत असें समजून, त्यांस ऱ्हस्व-दीर्घासंबंधाचे वरील नियम लागतात. उदा०—बाईसाहेब, राणी-साहेब, गंगू-ताई, मोरू-मामा, सदू-भटजी, इ०. ( येथें राणिसाहेब, गंगुताई, असें लिहिणें बरोबर नाहीं ). त्याचप्रमाणें गुरू-नें, कवी-स, विहिरीं-तून, घरीं-चिया, काठी-वरील, शिडी-खालून, यमी-करितां, इ०. येथें वरचे नियम कसे लागले आहेत, तें स्पष्ट समजून येईल].

## ( २ ) संस्कृत ऱ्हस्व-दीर्घ

संस्कृत शब्दांमधील ऱ्हस्व-दीर्घत्व माहींतच पाहिजे. खालील माहिती केवळ ढोबळ स्वरूपाची दिली आहे. ( या शब्दांस **तत्सम** शब्द म्हणतात ).

१. कवि, रवि, शशि, गुरु, धेनु, युक्ति, मति, बुद्धि, आसक्ति, संपत्ति, इ० शब्दांमधील अन्त्य **इ**-कार व **उ**-कार ऱ्हस्व असतात. ( परंतु, अद्यापि, यथामति, इ० तत्सम अव्ययेंही ऱ्हस्वच आहेत ).

२. गुण, सुत, विष, चतुर, मधुर, प्रिय, मिष, इ० तत्सम शब्दांतील उपान्त्य अक्षर ऱ्हस्व असतें. ( गूण, सूत, चतूर, असें लिहिणें योग्य नाहीं ).

३. भीति, नीति, रीति, प्रीति, अप्रीति, अनुभूति, सहानुभूति, गीति, कीर्ति, स्फूर्ति, मूर्ति, यांतील अन्त्याक्षर ऱ्हस्व व उपान्त्यक्षर दीर्घ असतें.

४. रेफापूर्वीचें अक्षर दीर्घ असतें. उदा०—पूर्व, धूर्त, सूर्य, जीर्ण, कीर्ण, शौर्य, अवतीर्ण, मूर्त, पूर्ण, चूर्ण, उत्तीर्ण, विदीर्ण, मुहूर्त, अपूर्व, इ०.

**अपवाद**—निर् व दुर्, या उपसर्गांतील रेफापूर्वीचें व खालील र–कारान्त विशेषणांपासून बनलेल्या भाववाचक नामांतील रेफापूर्वीचें अक्षर ऱ्हस्व असतें. उदा०—दुर्गम, दुर्गति, निर्लोभ, निर्विकार; चातुर्य, माधुर्य, प्राचुर्य; इ०.

५. जोडाक्षरापूर्वीचें अक्षर बहुधा ऱ्हस्वच असतें. उदा०—विद्या, चिन्ता, सुज्ञ, प्रतिज्ञा, प्रफुल्ल, चिन्ह, छिन्न, भिन्न, इ०.

६. हस्तिन्–हत्ती. याप्रमाणें वादी, प्रतिवादी, गुणी, मानी, मंत्री, संन्यासी, वनमाली, इ० इन्नन्त शब्दांपासून बनलेल्या शब्दांमधील पुल्लिंगी शब्दांचें अन्त्याक्षर दीर्घ असतें.

७. पुढील प्रकारच्या स्त्रीलिंगी शब्दांमधील अन्त्याक्षर दीर्घ असतें, उदा०—गौरी, पार्वती, लक्ष्मी, सरस्वती, नदी, भागीरथी, कावेरी, वल्ली, सुंदरी, नगरी, पुरी, व्याघ्री, कुमारी, श्री, स्त्री, भू, भ्रू, श्वश्रू, इ०.

८. विभक्तिप्रत्यय व शब्दयोगी अव्यय यांमुळें होणारें संस्कृत ऱ्हस्वान्त शब्दांचें सामान्यरूप दीर्घच असतें. उदा—**कवी**ला, **रवी**चा, **गुरू**नें, भा**नू**स, इ०.

९. जे संस्कृत शब्द मराठींत आत्मसात् झाले असतील, त्यांचेंच अन्त्य व उपान्त्य यांमागील अक्षर मराठीच्या मागील नियमांप्रमाणें ऱ्हस्व होतें; एऱ्हवीं तत्सम शब्दांच्या स्वरूपांत कांहीं फरक होत नाहीं. उदा०—जिवास, शरिरांत, इ०. (परंतु गीतेंत, सूत्रांत, नीतीनें, ह्यांऐवजीं गीतेंत, सुत्रांत, नितीनें, असें चालणार नाहीं).

## (३) अनुस्वार

१. अ–कारान्ताशिवाय सर्व **नपुंसकलिंगी अन्त्याक्षरांवर** अनुस्वार असतो. उदा०–मोतें, मोत्यें, वासरूं, वासरें, पांखरूं, पांखरें, जाणें, येणें, बोलणीं, केळें, केळीं, घरें, मुलें, फुलें, हें, जें, तें, हीं, जीं, तीं, बरें, काळें, चांगलें, असें, तसें, काळीं, गोरीं, अशीं, तशीं, माणसें आलीं, मुलें गेलीं, इ०. (आ–कारान्त न० लिंगी शब्द मराठींत नाहींतच).

**अपवाद**—पाणी, लोणी, ताकवणी, गुळवणी, यांसारखे शब्द.

२. तें, नें, एं, शीं, नीं हीं, ईं, आं, ह्या विभक्ति-प्रत्ययांवर अनुस्वार असतो. (पैकीं 'नें' व 'नीं' यांवरील अनुस्वार स्वतंत्रपणें उच्चारणांत

येत नसल्यानें ते गाळावे, असें म०सा० प० च्या शुद्धलेखनमंडळानें सुचविलें आहे. द्वितीयेच्या व चतुर्थीच्या ' ना ' वर केव्हांच अनुस्वार नको. उदा०— **मुलांनां** असें नको ).

३. अनेकवचनी सामान्यरूपावर अवश्य अनुस्वार असतो; एकवचनी सामान्यरूपावर नसतो. उदा०—मुलाला बोलाव, **मुलांना** बोलाव; गाईनें लाथ मारिली, गाईंनीं दूध दिलें नाहीं; शेजारच्या नाऱ्याची आणि गोपाळराव **गोखल्यांची** तुलना तरी तुम्ही कोणत्या गोष्टींत करणार ? इ०.

४. मी, आम्ही, तुम्ही व कोणी हे शब्द तृतीयान्त असल्यास त्यांतील अन्त्याक्षरावर अनुस्वार असतो; प्रथमान्त असल्यास नसतो. उदा०—मी काम करितों, मीं काम केलें; आम्ही श्लोक म्हणतों, आम्हीं श्लोक म्हटले; तुम्हीं त्याचे पैसे दिले का ? तुम्ही त्याचे पैसे देणार नाहींसें दिसतें; हें काम कोणीं केलें ? कोणी करणार नाहीं; इ०.

५. प्रथम व द्वितीयपुरुषीं आणि रीतिभूतकाळीं उभयवचनीं, तसेंच प्रथम व द्वितीय आख्यातीं, अनेकवचनीं क्रियापदान्तावर अनुस्वार असतो. तृतीय पुरुषीं पुल्लिंगी व स्त्रीलिंगी क्रियापदान्तावर अनुस्वार नसतो. उदा०—मी जातों, आम्ही येतों, आम्ही गेलों, आम्ही जाऊं, मी भजें, मी प्रभूच्या स्तवातें करीं, तुम्ही जातां, तुम्ही गेलां, इ०. ( परंतु तो जाई, तो करी, ती येई, ती जातो, ती जाते, ती गेली, इ०. येथें क्रियापदान्तावर अनुस्वार नाहीं. )

६. तूं, कांहीं, नाहीं, गहूं, यांतील अन्त्याक्षरावर नेहमींच अनुस्वार असतो.
[ परंतु ' कांहीं ( किम् + अपि ), ' नाहीं ' ( नास्ति ), यांतील ' ही ' वरील अनुस्वार व्युत्पत्तिसिद्ध नसल्यानें तो गाळण्यास हरकत नाहीं ].

७. करूं लागला, जाऊं इच्छितो, इ०; तसेंच करितां, देतां, घेतां. इ०; संस्कृतावरून आलेल्या तुबन्त व वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्ययांच्या अन्त्याक्षरावर अनुस्वार असतो. ( गोळी ' लागू ' झाली, आगगाडी ' चालू ' झाली, येथें अनुस्वार नको. गाडी **चालूं** लागली येथें हवा. कारण पहिल्या दोन ठिकाणीं लागू, चालू, हे शब्द क्रियाविशेषण अव्ययें आहेत; आणि ' चालूं लागली ' यांतील **चालूं** हें कर्तुं = करूं, गन्तुं = जाऊं, यांतल्याप्रमाणें चलितुं = चालूं, असें तुबन्ताचें रूप आहे ).

८. येथें, तेथे, जेथें, कोठें, आतां, उद्यां, मघां, मागें, पुढें, जेव्हां, तेव्हां, इ० स्थलवाचक व कालवाचक क्रियाविशेषणांच्या अन्त्याक्षरांवर अनुस्वार असतो. ( परंतु इकडे, तिकडे, जरा, हळू, इ० क्रियाविशेषणांच्या अन्त्याक्षरांवर अनुस्वार देत नाहींत. म० सा० प० च्या शु० मं० नें ह्या सर्व ठिकाणचे अनुस्वार गाळावे असें सुचविलें आहे ).

९. कारणदर्शक ' का ' यावर अनुस्वार असतो; संमत्यर्थक ' का ' वर नसतो. उदा०—तूं रामाकडे **कां** गेलास ? तूं बाबांना विचारलेंस **का** ? इ०.

[ केस, रेस, कोपर, ढोपर, धावणें, हसणें, काकडी, घास, कासव, भुवई, घोस, इ० पुष्कळच शब्दांत विशेषतः कोकणस्थ लोकांच्या भाषेंत व लेखनांत निष्कारण दिले जाणारे; आणि व्युत्पत्तीचा आधार नसलेले; अनुस्वार गाळून टाकण्याची हल्लीं प्रवृत्ति आहे. त्याचप्रमाणें नांव, नाव; पांच, पाच; इ० अर्थभेदास आवश्यक तेवढेच अनुस्वार परंपरा राखण्यासाठीं कायम ठेवून, बाकीचे कोंवळा ( कोमल ), सावळा ( श्यामल ), इ० शब्दांमधील व्युत्पत्तिसिद्ध अनुस्वारही गाळण्याकडेच आधुनिकांचा कल आहे ].

## ( ४ ) कांहीं किरकोळ गोष्टी

१. अर्थानुरोधानें काही शब्दांतील इ–कार व उ–कार यांच्या ऱ्हस्व–दीर्घ लेखनांत फरक होतो. उदा०—सुत ( मुलगा ), सूत ( सारथि ); द्विप ( हत्ती ), द्वीप ( बेट ); दिन ( दिवस ), दीन ( गरीब ); इ०.

२. कांहीं जोडाक्षरें लिहिण्यांत पुढीलसारख्या घोटाळ्याच्या चुका होतात. उदा०—सत्पात्र, द्वंद्व, सप्तमी, सद्बुद्धि, तत्पुरुष, सर्व, इ०. ( याबद्दल सप्तात्र, व्दंव्द, सत्पमी, सब्दुद्धि, तप्तुरुष, सव्र, इ० ).

३. ' व 'कारान्त धातूस **ऊन** हा प्रत्यय लागल्यास जेवून, ठेवून, मारवून, अशीं रूपें होतात; ( जेऊन, ठेऊन, मारऊन, असें होत नाहीं ). एकाक्षरी धातूचीं मात्र खाऊन, पिऊन, देऊन, अशीं रूपें होतात.

४. ब्राह्मण, ह्रस्व, आह्लाद, चिह्न, विह्वल, या संस्कृत शब्दांतील जोडाक्षरें म्ह, ल्ह, न्ह, व्ह, ऱ्ह, अशीं लिहूं नयेत.

५. राजास याबद्दल राज्यास, अशा प्रकारच्याही अर्थभेदात्मक चुका होतात. वेदांत ( सप्तमी ), वेदान्त ( वेदांचा निष्कर्ष ); देहांत ( सप्तमी ), देहान्त ( देहाचा शेवट ); इ०.

६. पुढील शब्दांत कंसांतल्याप्रमाणेंच अशुद्ध लेखन नसावें. महादेव (माहदेव), महाराज ( माहराज ), सिंह ( सिन्ह ), अरण्य ( अरंण्य ), शाप ( श्राप ), चार ( च्यार ), विचार ( विच्यार ), ध्रुवपद ( ध्रुवपद ), दुष्ट ( द्रुष्ट ), पूर्ण, पूर्व, धूर्त, सूर्य ( पुर्व इ० नव्हे ), स्त्री ( स्त्रीं ), प्रावीण्य, नावीन्य ( प्राविण्य नव्हे ), सीता ( सिता ), सुशीला ( सुशिला ), शत्रु,रिपु ( शत्रू नव्हे ), इ०.

७. वर्ण व वरण, नाव व नांव, पाच व पांच, आत व आंत, आ व आं, का व कां, काकू व कांकूं, काच व कांच, मास व मांस, वाचणें व वांचणें, वाचून व वांचून, इ० शब्द लिहिण्यांत फरक झाला तर अर्थभेद होतो; म्हणून ते योग्य तसेच लिहिणें अवश्य आहे.

**टीप**—केवळ उच्चाराप्रमाणें लेखन ही गोष्ट सर्वस्वीं विद्वत्संमत व व्यवहार्य नाहीं. परंपरा, वर्तमानकालीन प्रचार, व्युत्पत्ति, व्याकरण आणि उपयुक्तता, एवढ्या गोष्टींचा लेखनशुद्धीचे बाबतींत विचार करणें अवश्य असतें.

## उपसंहार

येथपर्यंत सध्यांच्या मराठी भाषेच्या व्याकरणासंबंधींचा प्रौढ विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें उपयुक्त तेवढा विचार केला. येथें सांगोपांग ऊहापोह किंवा चर्चा केली नाहीं, त्याचप्रमाणें प्राचीन मराठी पद्य व अर्वाचीन मराठी पद्य यांविषयींही येथें व्याकरणदृष्ट्या सविस्तर विवरण केलें नाहीं. प्राचीन गद्य व निरनिराळ्या प्रांतांतील निरनिराळ्या प्रचलित महाराष्ट्र बोली यांचाही येथें विचार केला नाहीं; केवळ महाराष्ट्राचें केंद्र जें पुणें तेथील विद्वान् लोकांची बोलण्यांतील आणि ग्रंथांतील मराठी भाषा, हिचेंच स्वरूप येथें प्रामुख्यानें वर्णिलें आहे; आणि '**मराठी**'चा स्थूल दृष्टीनें अभ्यास करणाऱ्या प्रौढ विद्यार्थ्यांस तेवढें पुरे आहे.

---

# एवढें पुरे

## ( १ )

१. **कठोर** व **मृदु** वर्ण कोणते ? ( पान २३३ ).
२. **गुरुत्व** व **आघात** यांत फरक काय तें समजून घ्या. घर, गवत, काका, काकाला, यांत आघात आहे का ? ( पान २३६ ).
३. **संधि** म्हणजे काय ? ते कोणत्या कारणानें होतात ? ( पान २३६ ).
४. खालील वर्णांचे संधि कसे होतील ? उदाहरणांसहित सांगा —
त् + च, त् + ज, त् + ल, त् + न, त् + श, त् + अ, त् + प, ( पानें २४० – ४१ ).
५. खालील संधींचे नियम सांगा —
अद्रींद्र, वामनैकपद, एकोन, अत्युच्च व सामाश्रय ( पानें २३८–४० ).
६. राजोपासना व रजोबल; दुर्वासना व दुष्कृत्य; निःसंदेह व निस्संदेह; दिग्मूढ व दिङ्मूढ; यांतील संधिदृष्ट्या असलेला फरक स्पष्ट करा ( पानें २४०-४३ ).

## ( २ )

७. कांहीं सामान्यनामांचा विशेषनामांप्रमाणे केव्हां उपयोग होतो ? (पा० २४५).
८. कांहीं विशेषनामांचा सामान्यनामांप्रमाणे केव्हां उपयोग होतो ? (पा० २४५).
९. नाम व सर्वनाम, सर्वनाम व विशेषण, विशेषण व क्रियाविशेषण, आणि कृदन्त व क्रियापद, यांत फरक काय ? ( पानें २४६, २५४, २५८ व २६७).
१०. **कोण** व **काय** ह्या सर्वनामांचा प्रश्नार्थक व सामान्य ह्या प्रकारांत उपयोग करून दाखवा ( पान २५० ).
११. पुरुषवाचक **आपण** व आत्मवाचक **आपण** यांत फरक काय ? ( पान २५१ ),
१२. भलता, सर्व, अवघा, असा, तसा, यांना विशेषणें कां म्हणावयाचें ? (पा० २५४).
१३. मी, आम्ही, तूं, तुम्ही, व कोणी, ह्यांचा प्रथमान्त व तृतीयान्त उपयोग वाक्यांत करून दाखवा ( पान २९७ ).
१४. विशेषणें नामांच्या मागें येतात, असे असल्यास खालील वाक्यांतील विशेषणांची संगति लावून दाखवा —

१ ) **चांगला** मुलगा उद्धट नसतो, उद्धट मुलगा **चांगला** नसतो (पानें
२ ) सभ्य मनुष्यें, **प्रामाणिक, भिडेचीं, अशीं** पदरीं बाळगावीं २५२-५३).

१५. विशेषणाला विभक्ति लागल्यास तो शब्द नाम होतो, हें कसें? ( पान २५७ ).
१६. **शहाण्यास** मार शब्दांचा, आणि **कुमतिनें** कंसें भाच्याचा वध इच्छिला, यांतील विशेषणांत फरक काय ? ( ( पाने २४६, २५७ ).

( ३ )

१७. क्रियापद व क्रियावाचक शब्द म्हणजे काय ? ( **जातो** हे, क्रियापद; पण **जाणें, जाऊन, जातांना,** हे क्रियावाचक धातुसाधित शब्द ( पान २५८ ).

१८. **कर्ता** व **कर्म** कसें ओळखावें ? मी झाड पाहतो व मला झाड दिसतें; मला धक्का लागला व त्याने मला धक्का लावला; साजावले व सांज झाली; तिला हरभरा चावला व तिला कुत्रा चावला; ह्या वाक्यांतील कर्ता व कर्म हुडकून काढा ( पान २५९ ).

१९. शक्य, प्रयोजक व गौण अ० सिद्ध क्रियापदे म्हणजे काय ? ( पान २६२ ). **विकरण** म्हणजे काय ? शक्य क्रियापदे धातूला 'व' विकरण लागून आणि प्रयोजक क्रियापदें 'वि' हें विकरण लागून साधतात; हे स्पष्ट करा (पान २६३).

२०. गुण व वृद्धि होऊन प्रयोजक क्रियापदे साधतात; दोन दोन उदाहरणें द्या.

२१. सहाय व संयुक्त क्रियापद म्हणजे काय याचा खुलासा करा ( पान २६१ ).

२२. क्रियाविशेषण अव्यये, यांचा खालील उदाहरणांवरून खुलासा करा — विमल **चांगलें** लिहिते, विमल **हळू** लिहिते ( पानें २६७–६८ ).

२३. मागे, पुढे, जवळ, ह्या शब्दांचा क्रियाविशेषण अव्यय व शब्दयोगी अव्यय ह्या दोन्ही प्रकारांत वाक्यांत उपयोग करून दाखवा ( पान २७३ ).

२४. घरोघर, घरोघरीं, इतक्यांत, मोठ्याने, दिवसास, रात्रीचा, ह्या शब्दांपैकीं क्रियाविशेषण कोणास म्हणावे ? कोणास नाही ? कां ? ( पानें २६६–२६७ ).

२५. **म्हणून, कीं,** ह्यांची उभयान्वयी अव्ययाच्या भिन्न प्रकारांत योजना करून दाखवा ( पानें २७० ते २७२ ).

( ४ )

२६. **विभक्ति** म्हणजे काय ? **गाय** ह्या शब्दाची सर्व विभक्तिरूपे द्या ( पान २८८).

२७. कोणते विभक्ति-प्रत्यय पद्यांतच येतात ? त्यांचें एकेक उदाहरण द्या ( ३६० ).

२८. **सामान्यरूप** म्हणजे काय ? ते केव्हां होते ? केव्हां होत नाही ? ( कान याचे कानाने असे रूप होतें; मान याचें मानाने असे कां होत नाहीं ? **जॉन** याचें काय होईल ? कां ? ( पान २९० ).

२९. **कारक** म्हणजे काय ? कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान, अधिकरण, ह्या कारकांचें एकेक उदाहरण द्या ( पानें ३२९ ते ३३६ ).

३०. **उपपदार्थ** कशाला म्हणतात ? उद्देश, विधान, मूल्य, परिमाण, न्यूनत्व व संबंध यांचें एकेक उदाहरण द्या ( पानें ३२९ ते ३३६ ).

३१. '**चा**' व '**ला**' हे प्रत्यय विभक्तीचेही आहेत व विशेषणाचेही आहेत; त्यांची स्पष्टता करा. **दाराची** भाजी, **दाराची** कडी, ( पान २९३ ).

३२. प्रत्ययाभावी विभक्ति व विभक्तीकारितां मूळ रूपांचाच उपयोग; याची **दोन** दोन उदाहरणें **द्या** ( पान ३६० ).

३३. विभक्ति मराठींत प्रत्ययांवरूनच कां मानाव्या ? अर्थावरून कां मानूं **नये** ?

३४. क्रियापदाची रूपे म्हणजे **आख्यातें** किती प्रकारची आहेत ? ( पा०३०२–५ )

३५. क्रियापदाचे **काळ** व **अर्थ** भिन्न कां मानिले आहेत ? वाक्यांतील **आज्ञार्थी**, विध्यर्थी, संकेतार्थी क्रियापदांवरून काळाचा कांहींच बोध होत नाहीं **काय** ?

३६. **जा** व **खा** हे धातु सर्व आख्यातांत चालवून दाखवा.

३७. पुल्लिंगावरून स्त्रीलिंगी शब्द बनण्याचे मराठींत कांहीं सामान्य नियम **आढळून** येत असल्यास ते सांगा; ( **मडमीण** हे रूप कसे झालें ? ).

३८. ‘ मी काम करितो ’ व ‘ मी काम केलें ’ ह्या वाक्यांतील क्रियापदांचे **पुरुष** कोणते ? का ? ( पान ३४९ ).

३९. ‘ इंद्रियांची दीनें । आम्ही केलों नारायणें ’ या वाक्य–रचनेतील **वैशिष्ट्य** विचारांत घ्या ( पान ३४९ )

४०. ‘ सुसंगति घडो ’ व ‘ सुसंगति घडावी ’ या वाक्यांतील अर्थदृष्ट्या **असणारा** फरक स्पष्ट करा ( पान ३४१ ).

( ५ )

४१. मनुष्याच्या बोलण्याच्या द्वारें विचार प्रकट करण्याच्या कोणत्या निर-निराळ्या प्रवृत्ति आहेत, त्यांची स्पष्टता करा ( पान ३१६ ).

४२. **समास** म्हणजे काय व त्यांचा भाषेंत उपयोग काय ? ( पान ३१६ ).

४३. समास **दोन दोनच** शब्दांचा होतो; अनेक शब्दांमिळून **एकच सामासिक** शब्द बनतो; सामासिक शब्दांतील शेवटच्या शब्दाप्रमाणें त्या सर्व **शब्दाचें** लिंग–वचन हीं असतात ( पान ३२७ ).

४४. समासाचे मुख्य **चार** भेद कोणत्या कारणाने पाडिले आहेत ? ( पान ३१७ ).

४५. **तत्पुरुष** व **बहुव्रीहि** समास **ह्यांत** साम्य व भेद काय ? ( पानें ३१९ व ३२५ )

४६. घरोघरी, दिवसेंदिवस, दिवसानदिवस, हे अव्ययीभाव समास **कसे** ? ( ३१८–३१९ ). दंडादंडी, लठ्ठालठ्ठी, हे समास कोणते ? ( पान ३२७ ).

४७. सुख–कर व सुख–कर्ता, गृहस्थ व गृहस्थित, ग्रथकार व ग्रंथकर्ता, या शब्दांच्या समासांत फरक काय ? ( पान ३२८ ).

४८. **डोंबा–घरीं**, **रामा–करींचीं** फळें, **शाळा–मास्तर**, **पैसा–फंड**, **गुद्दागुद्दी**, या शब्दांवर समासदृष्ट्या टीपा द्या ( पान ३२७–२८ ).

४९. समाहार-द्वंद्व, द्विगु, मध्यमपदलोपी, नञ् तत्पुरुष व नञ् बहुव्रीहि, **उपपद** तत्पुरुष, व सहार्थी व बहुव्रीहि, हे समास कसे ओळखावे ? उदाहरण द्या.

( ६ )

५०. करी, बोले, जाणे, नेणे, भक्षा, देई, घेई, हीं **पद्यरूपें** वर्तमानकाळीं, भूतकाळीं, रीतिभूतकाळीं व भविष्यकाळींही होतात ( पानें ३४३–४४ ).

५१. **भूतकाळीं**, कर्तरि–प्रयोग केव्हां होतो ? कर्तरि व कर्मणि प्रयोग केव्हां होतो ?

५२. **उमजगण व आचरगण** यांतील धातूंमधलि विशेष ध्यानांत घ्या(२०९व३४७).

५३. खालील वाक्यांतील मिश्र प्रयोग विचारांत घ्या—
( १ ) वत्से, लिहिलेस उत्तम श्लोक; ( २ ) तुम्हीं घरीं जायचें होतेंत; ( ३ ) आईनें मुलीला निजविली (पानें ३५०–३५१ ).

५४. त्याला घरांत बसवतें व त्याला पोटांत कळमळतें; देव जग पाहतो व देवाला जग दिसतें; मी उद्यां जाणार व मी उद्यां जाणार आहें; त्याची अंगठी हरवली व मीं त्याची अंगठी हरवली; यांतील प्रयोगांची स्पष्टता करा.

५५. **कृदन्तांचा** उपयोग नाम, विशेषण, विधिविशेषण व संयुक्तक्रियापदान्तर्गत, ह्या चार प्रकारांत होतो; **णें**–कृदन्त, **ला**–कृदन्त, **वें**–कृदन्त, यांचा अशा प्रकारें उपयोग करून दाखवा ( पान ३५२–५४ ).

( ७ )

५६. धातुसाधित शब्द बदलल्यानें **शुद्ध, मिश्र व संयुक्त** ह्या तिन्ही प्रकारांत वाक्यें करितां येतात; तर्शीं खालील वाक्यें करून दाखवा.
( १ ) मी जेवून शाळेंत गेलों; (२) देशाटन केल्यानें चातुर्य येतें.(पा० ३६५).

५७. वाक्यांतील उद्देश्य ओळखण्याचें साधारण गमक सांगा. ' त्यानें केळें खावें ' व ' त्याला केळें खाववतें ' यांतील उद्देश्ये ओळखा ( पानें ३६७ ).

५८. विधानपूरकांच्या ठिकाणीं नाम, विशेषण, विधिविशेषण, हीं आणून दाखवा.

५९. **कर्म** ' हे विधानपूरकच असतें ' कसें तें स्पष्ट करा ( पानें ३६५–३६६ ).

( ८ )

६०. खालील ठिकाणचे दोष ओळखा—
( १ ) ह्या कपाटांतील वस्तु **घेऊन ये** ( घेऊं नये ).
( २ ) डोक्यावर मोराचीं पिसें, व मुकुट खांद्यावर, घोंगडी पायांत, वाहणा हातांत, काठी, अशा वेषानें कृष्ण रानांत गेला.
( ३ ) मी पुनः चोरी करणार; नाहीं केली तर मला शिक्षा द्यावी.
( ४ ) सशाला शिंगें असतात ? ( सशाला शिंगें असतात ).

**( समाप्त )**